श्री

# वैद्यसारसंग्रह.

हा ग्रंथ.

रघुनाथशास्त्रीदांत्ये व कृष्णाशास्त्री

भाटवडेकर.

यांणीं

लोक कल्याणार्थ केला.

तो

## मुंबईंत

महादेवगोपाळ शास्त्री अमरापुरकर यांणीं

आपले स्वतांचे

छापखान्यांत छापिला.

आवृत्ती ४थी.

शके १७९१ सन १८६९ तारीख १ माहे मे.

इत्यनुक्रमणिका समाप्ता.

सूचना ह्मणजे ग्रंथांतील अनुक्तार्थाचें सूचन- त्याचे येथें तीन प्रकार सांगीतले आहेत, ते असे. १ औषधादिकांचें परिमाण. २ क्काथादिप्रक्रिया. ३ स्नेहपाक.

---

## औषधादिकांचें मान.

ज्या कषायादि औषधामध्यें द्रव्याचें मान सांगितलें नाहीं, तेथें सर्व औषधें समभाग घ्यावीं. बरें पण समभाग तरीं किती घ्यावीं ? अशी शंका राहिलीच तिचें निवारण येणें प्रमाणें. जेथें स्वरस ह्मणजे आंगरस घेण्या विषयीं सांगीतलें आहे, तेथें स्वरसाची मात्रा नित्य दोन तोळे योजावी. स्वरसांत साकर, मध, गूळ, इत्यादिक घालावयाचीं असल्यास तीं ६ मासे योजावीं पुटपाकाची मात्रा. नित्य चार तोळे असावी. त्यांत मध घालणें झाल्यास एक तोळा घालावा. व कल्कचूर्णादिक. घालणें झाल्यास तें स्वरसाप्रमाणें ६ मासे असावें.

---

## क्काथादि प्रक्रिया.

काढा. काढ्यांतील सर्व औषधें मिळून चार तोळे घेऊन कुटावीं आणि सोळापट ह्मणजे ६४ तोळे पाणी घालून मंदाग्नीनें मडक्यांत शिजवावें. नंतर अष्टमांश ह्मणजे ८ तोळे उरवून कोंबट आहे तोंच काढा पाजावा. तितका सोसत नसल्यास ४ तोळे घ्यावा. लहान मुलास तीन माशांपासून एक तोळा पर्यंत द्यावा. तो काढा अन्नरसाचा पाक चांगला झाल्यावर घ्यावा. काढ्यांत साकर घालावयाची असल्यास वात, पित्त, कफ, या रोगांवर अनुक्रमानें ४था, ८वा, व १६वा हिस्सा घालावी. आणि मध घालावयाचा असल्यास त्याच्या विपरीत ह्मणजे कफावर ४था अंश पित्तावर ८वा अंश आणि वात रोगावर

१६वा अंश याप्रमाणें घालावा. जिरें, गुग्गूळ, क्षार, शिलाजित, हिंग वगैरे औषधें ३ मासे टाकावीं. दूध, तूप, गूळ, तेल, कल्क, चूर्ण, वगैरे औषधें काढ्यांत तोळा तोळा घालावीं.

फांट[1] व हिम[2] यांचेंही मान व त्यांत टाकावयाच्या द्रव्याचें मान काढ्या प्रमाणेंच जाणावें.

कल्क. ओलें किंवा शुष्क द्रव्य घेऊन पाणी घालून पाट्यावर वाटतात त्यास कल्क ह्मणतात. त्याचें प्रमाण १ तोळा असावें. कल्कामध्यें मध, तूप, तेल इत्यादि कल्काचे दुप्पट घालावें. साखर, गूळ बरोबर घालावीं. आणि द्रव्य चौपट असावें.

चूर्ण. अत्यंत शुष्क द्रव्य घेऊन सुंदर वाटून वस्त्रानें गाळावें. त्या गाळलेल्या बुकणीस चूर्ण ह्मणतात. तें मोठे मनुष्यास ६ माशांपासून एक तोळा पर्यंत व लहान मुलास एक १ माशापासून ३ मासे पर्यंत तारतम्य पाहून द्यावें. चूर्णांत गूळ समभाग घालावा. व साकर दुप्पट घालावी. हिंग घालणें तो भाजून घातल्या असतां उल्हासे येत नाहींत. घृतादिक द्रव्याशीं चूर्ण वाटणें झाल्यास चूर्णाचे दुप्पट घृतादिक असावें. पाण्यांत कालवून चूर्ण घेणें असल्यास पाणी चौपट असावें. चूर्ण, अवलेह, गुटिका, कल्क, यांच्या मागून जें पाणी अगर दूध घ्यावयाचें तें वात, पित्त, कफ, या रोगांवर क्रमानें १२।८।४ तोळे घ्यावें ह्मणजे जसा पाण्यावर तेलाचा थेंब पडला असतां क्षणांत चहूंकडे पसरतो. तसें अनुमानाच्या जोरानें औषधही सर्व अंगभर पसरतें. एकादे चूर्णास लिंबाच्या रसाची वगैरे भावना (पूट) देणें झाल्यास जितक्या द्रवानें सर्व चूर्ण भिजतें तेंच भावनेचें प्रमाण समजावें.

---

१ द्रव्य कुटून उष्ण पाण्यांत घालून त्याच वेळेस गाळून जें पाणी घेतात तें.

२ द्रव्य रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कोळून जें पाणी घेतात तें.

जरीहीं वर कषायादिकांचीं मानें सांगीतलीं आहेत तरीं देशकाल प्रकृति, वय, आणि बळ, इत्यादिकांचा पुर्तेपणीं विचार करून उक्त ओषधांचीं प्रमाणें योजावीं.

---

## स्नेहपाक.

कल्कापेक्षां चोपट तूप किंवा तेल घेऊन त्याच्या चोपट पाणी किंवा दुसरा द्रवपदार्थ घालून शिजवावें. नंतर सिद्ध झालेल्या स्नेहाची मात्रा चार तोळे प्राशन करावी. ज्या द्रव्याचें तेल किंवा तूप काढावयाचें आहे त्याच्या चोपट पाणी घालून चतुर्थांश उरवावें व त्याबरोबर तेल किंवा तूप सिद्ध करावें. मृदु द्रव्य असलें तर पाणी चोपट घालावें. व कठीण द्रव्याला सोळापट पाणी घालावें. जेथें केवळ पाणी काढा, आणि स्वरस याणीं स्नेह तयार करणें आहे तेथें कल्काचा अंश अनुक्रमानें ४था ६वा ८वा घालावा. दूध, दहीं स्वरस आणि नाक यांबरोबर स्नेह सिद्ध करणें असल्यास अष्टमांश कल्क योजावा. आणि कल्काचा चांगला पाक होण्यासाठीं त्यांत चोपट पाणी योजावें. जेव्हां केवळ काढ्यानें स्नेह सिद्ध करावयाचा आहे तेथें काढ्याच्या द्रव्याचाच कल्क घालून स्नेह सिद्ध करावा. जेथें दुधानें स्नेह सिद्ध करावयाचा आहे तेथें ओषधांचे आठपट आणि दुधाच्या चोपट पाणी घालून शिजवावा. स्नेहाचा थेंब अग्नीवर घालून पाहावा. तो तडतड वाजूं लागला ह्मणजे सिद्ध झाला असें समजावें. फेंस येऊं लागला ह्मणजे समजावें कीं, तेल तयार झालें. आणि फेंस नाहींसा झाला ह्मणजे तूप तयार झालें असें जाणावें.

---

## परिभाषाप्रकरण.

या परिभाषेंत चार प्रकरणें आहेत. तीं अशीं, १ युक्तायुक्तविचार, २ रें, वैद्यलक्षण, ३ रें, औषध घेण्याचाकाळ- आणि ४ थें, औषध प्रतिनिधि.

१ लें युक्तायुक्तविचार संपूर्ण कार्याचे ठायीं नवीन औषधांचीच योजना करावी; परंतु; वावडिंग, पिंपळी व गूळ, धणे, तूप, मध, हे सहा पदार्थ तर एका वर्षाचे जुने घ्यावे. गुळवेल, कुडयाची साल, अडुळसा, कोहोळा, शतावरी, आसंध, कोरांटा, बडीशोप, चांदवेल, हीं औषधें सर्वकाळ ओलींच घ्यावीं- ओलीं ह्मणून दुप्पट घेऊंनये- बरकड औषधें ओलीं असतां दुप्पट घ्यावीं. ज्याप्रयोगाचे ठाईं काळसांगितला नाहीं तेथें प्रातःकाळ घ्यावा व ज्या औषधीचें अंग सांगितलें नाहीं, तेथें तिचें मूळ घ्यावें.- जेथें भाग सांगितला नाहीं, तेथें समान भाग घ्यावा. जेथें पात्र सांगितलें नाहीं, तेथें मातीचें पात्र घ्यावें. प्रयोगामध्यें एक औषध दोनवेळ आलें असतां तें दुप्पट घ्यावें. चूर्ण, तूप, व तेल, आदिकरून स्नेह पदार्थ व अवलेह यांमध्यें श्वेत चंदन योजावा. एका वर्षा नंतर औषधांचें तेज व गुण कमी होतात. त्यामध्यें दोन महिन्यांनीं चूर्ण हतवीर्य होतें. गुटिका आणि अवलेह हीं वर्षानंतर हीनवीर्य होतात. तूप आणि तेलादिक हीं चार महिन्यांनीं हतवीर्य होतात. औषधी व हलके पाक हे एका वर्षानंतर हतवीर्य होतात. आसव आणि सोने आदिकरून सर्व धातूंचीं भस्में व रसायनें जितकीं जुनी होत जातील, तितका त्यांचा गुण विशेष होतो. रोगांवर चूर्ण कषाय इत्यादिकांची योजना गणें करून करावयाची असतां गणांमध्यें एकादें औषध रोगाला विरुद्ध असेल, तें गणोक्त जरी आहे, तथापि काढून टाकावें. एखादें औषध उपयुक्त असतां त्या गणांत नसलें तरी स्वबुद्धीनें घालावें.

**औषधी आणावयाचा प्रकार.** प्रातःकाळीं उठून स्वस्थचित्त

करून शुचिर्भूत होत्साता चांगला दिवस पाहून देवास नमस्कार व ध्यान करून कोणाशीं न बोलतां जी औषधी आणावयाची असेल, तेथें जाऊन त्या औषधीचें उत्तरेकडील मूळ अथवा साल काढून आणावी. जी-औषधी वारुळावर रुजलेली व वाईट जाग्यावरील व पाण्याच्या आश्रयानें असत्ये ती व स्मशान भूमीवर होत्ये, ती व ज्या जाग्यावर गवत होत नाहीं. त्या जाग्यावरची व चवाठ्यावरील व कीड लागलेली अशा प्रकारची औषधी आणूं नये. तिजपासून कांहीं एक कार्य होणार नाहीं अश्विन, कार्तिकांचे महिन्यांत सर्व औषधी रसभरित होतात, यास्तव सर्व कार्याकरितां त्या दोहीं महिन्यांत औषधी आणून ठेवाव्या. वद्याळ होण्याविषयीं व ओकारी होण्याविषयीं वैशाख व ज्येष्ठ या दोहीं महिन्यांत आणाव्या.- ज्या वृक्षांचें थोर मूळ आहे, त्या मुळाची साल घ्यावी. व ज्या वनस्पतीचें मूळ लहान आहे. तिचें मूळच घ्यावें अथवा पानें, फुलें, मुळें, फळांही घ्यावीं. वड आदिकरून पायरी, जांबूळ, आंबा, पिंपळ, इत्यादिकांची साल घ्यावी. बिबळा, खैर आसाणा, मोहो, बाभूळ, इत्यादिकांचा नार घ्यावा. तालिसपत्र, तमालपत्र, कोरफड, नागवेली, इत्यादिकांचीं पानें घ्यावीं. त्रिफळा, फणारी, बोर, इत्यादिकांचीं फळें घ्यावीं. धायटी, पळस, गुलाब, इत्यादिकांचीं फुलें घ्यावीं. निवडुंग, रुई इत्यादिकांचा चीक घ्यावा. या प्रकारें औषधींचें हरण करावें.

## काळ व देश यांचे ठाईं कोणकोणत्या दोषांचें प्राबल्य असतें तें.

भाद्रपद, श्रावण, माघ, मार्गशीर्ष, आषाढ, पौष या महिन्यांत वायूचें प्राबल्य जाणावें. वैशाख, आश्विन, ज्येष्ठ कार्तिक, या महिन्यांत पित्ताचें प्राबल्य जाणावें. व फाल्गुन, चैत्र, यांमध्यें कफाचें प्राबल्य, व दक्षिण व पश्चिम समुद्रतीरीं पित्तबाहुल्य:- आणि पूर्व समुद्रतीरीं उष्णता असत्ये. उत्तर देशीं शीत असतें. सह्याद्रीचे पायीं पित्ताधिक्य, व मस्तकावर कफा-

धिक्य असतें. कावेरीचे दक्षिणतीरीं उष्णता असते. तुंगभद्रातीरीं पित्ताधिक्य. कृष्णातीरीं वाताधिक्य असतें. गोदावरीचे दोन्ही भागीं दोषांचें साम्य असतें. तापी तीरीं व तापीचे दक्षिणभागीं वाताधिक्य, रेवातीरीं व तिचे दक्षिणभागीं पित्ताधिक्य. मही तीरीं व तिचे दक्षिणभागीं पित्ताधिक्य, पार्वती तीरीं दोषसाम्य असतें, गंगा व कालिंदी यांचे तीरीं शीत असतें. याप्रकारें काल देश यांचें तारतम्य पाहून औषध द्यावें

२ रें. वैद्यलक्षण. गुरूपासून संपूर्ण वैद्यक शिकलेला व रसायनादिक औषधें करण्याविषयीं कुशल आणि यशस्वी, लोभरहित, धैर्यवान, दयाळू, सदाचरणी, अहंकाररहित, धर्म करणारा, आलस्यरहित देवाची भक्ति करणारा, अशा लक्षणें करून वैद्य युक्त असावा, आणि ज्याला एकेक रोगावर शंभर उपचार ठाऊक आहेत, त्याला वैद्य ह्मणतात. ३०० ठाऊक आहेत त्याला चिकित्सक ह्म० सात ७००शें उपचार ठाऊक आहेत त्याला धन्वंतरी ह्मणतात. याहून विशेष वैद्याचीं लक्षणें कोशांतरीं पाहावीं

३ रें. औषध घेण्याचा काळ. वैद्यांनीं बहुत करून औषध प्रातःकाळीं द्यावें; परंतु आंगरस, कल्क, काढे व फांट व हिम, हेतर विशेषें करून प्रातःकाळींच द्यावे. पित्त आणि कफ यांचा प्रकोप झाला असतां पित्ताला विरेचन आणि कफाला वमन, तसेंच लेखन ह्मणजे पत्तली करण (ह्मणजे वातादि दोषांनां स्नेहादिकांचे योगें करून पातळ करणें ) स्थूळ मनुष्याला मध पाणी देऊन कृश करणें, याविषयीं ही औषध प्रातःकाळींच द्यावें व रोग्याला प्रातःकाळीं भोजन देऊं नये. गुद संबंधीं वायू क्रुद्ध झाला असतां भोजनाचे किंचित् आधीं औषध भक्षण करावें. व अवदणें पडलें असतां नाना प्रकारचीं अन्नें व नानाप्रकारचीं तोंडीं लावणीं यांचे बरोबर औषध द्यावें. नाभि संबंधीं वायू क्रुद्ध झाला असतां व अग्निमांद्य झालें असतां; अग्नि प्रदीप्त होई असें औषध भोजनामध्यें द्यावें, व सकल शरीर व्यापी असा जो व्यान वायू त्याचा कोप झाला असतां भोजनाचे अंतीं-

औषध द्यावें. व उचकी आणि आक्षेपक वायू आणि कंपवायू यांचा कोप झाला असतां भोजनाचे पूर्वी व अंतीं औषध द्यावें.- कंठ संबंधी उदान वायूचाकोप होऊन स्वर भंगादि रोग झाले असतां सायंकाळचे भोजन समयीं ग्रासा बरोबर व दोहों ग्रासांमध्यें औषध द्यावें. हृदयस्थित प्राणवायूचा कोप जाहला असतां बहुत करून सायंकाळचे भोजनाचे अंतीं औषध द्यावें, तृषा व ओकारी व उचकी व श्वास व विषदोष हे रोगझाले असतां वारंवारअन्न सहित व अन्न रहित ही औषध द्यावें. जत्रूर्ध्व० ग्रीवा मूळ त्याचे ऊर्ध्वभागीं कर्ण रोग व नेत्र रोग व मुख रोग व नासा रोग इत्यादि रोगांविषयीं व वृद्ध वातादि दोषांचे छेदना विषयीं रात्रीचे ठाईं पाचन रूप व शमन रूप औषध अन्न रहित द्यावें.

---

## ४ थें. औषधिप्रतिनिधि.

| औ० प्र० | औ० प्र० |
|---|---|
| अंतः संमार्जनी, ओंवा, अजमोदा, | आम्लवेतस, चुका, आंब. |
| अतिविष, नागरमोथे. | आसव, मद्य. |
| अभ्रकसत्व, कांतलोह. | उत्पल, कमल. |
| अश्वमूत्र, गोमूत्र. | ऋद्धी वृद्धी, डुकर कंद, महाबला. |
| अहिंसा, मान कंद, मायफुलें. | कांकोळ, एलची, जायपत्री. |
| आमसोल, आम्लदाडिंब. | कंटकारी, ,मोतरिंगणी. |
| आम्ल कांजी. | कडुजिरें, शाहाजिरें. |
| कंद, सुरण. | धमासा, दुरालभा. |
| कस्तूरी, जायपत्री. | धायटी फूल, मोहाचें फूल. |
| कांकोळी, क्षीरकांकोळी, आसंध,शतावरी | नखला, लवंग. |

| औ॰ प्र॰ | औ॰ प्र॰ |
|---|---|
| | नागकेशर, कमळकेशर. |
| कांतलोह, तिखं, पोलाद. | नीलोत्पल, कमोद पुष्प. |
| कापूर, चंदन, रक्तचंदन. | पित्त ज्याचें पित्त मिळत नाहीं त्याचें मांसाचा रस, विषमुष्टी. |
| काश्मरी, शिवण, मोहाचा वृक्ष. | |
| केळ, रानकेळ. | पिंपळी, मिरी. |
| केशर, कुसुंभ | पुष्कर मूळ, कोष्ठ. |
| खैरसाल, कडुनिंबाचीसाल. | बकुळ, कल्हार, कमल. |
| गजपिंपळी, पिंपळमूळ. | बहिःसंमार्जनी, अजमोदा, ओंवा. |
| गहूं, नाचण्या. | बावच्या, टाकळ्याचें बीं. |
| मूग, काकवी. | बिबवा, चित्रक. |
| चंदन, वाळा, कापूर. | बृहती, मोठरिंगणी. |
| चवक, गजपिंपळी. | भद्रमोथ, कापूर. |
| चित्रक, दांती, जेपाळ. | भारंगमूळ, रिंगणी मूळ. |
| जायपत्री, लवंग. | मधु, ऊनागूळ. |
| रिंगणी, कडुनिंब. | मयूरशिखा, शिवा. |
| जिरे, धणें. | मेद, महामेद, ज्येष्ठीमध व आसंध. शतावरी, मसालिणी. |
| जीवक, ऋषभक, भूयकोहळा. वंशलोचन. | मोती, मोत्यांचीशिंप. |
| ज्येष्ठमध, धायटीपुष्प. | मोरवेल, दालचिनी. |
| तगर, कोष्ट. | रक्तचंदन, वाळा. |
| तांदूळ, जोंधळे, साठेतांदूळ. | रसांजन, दारुहळद. |
| तालीसपत्र, स्वर्णतालीसपत्र. | रुईचा चीक, रुईचे पानाचा रस. |

| औ० प्र० | औ० प्र० |
|---|---|
| तुरी, कुळित्थ. | रुपें, रौप्यमाक्षिक, लोहभस्म. |
| जुनेंतूप, साजूकतूप. | लक्ष्मणा, मयूरशिखा. |
| दही, ताक. | वन्या, सांवे. |
| दारुहळद, हळद. | वाराणे, लांक. |
| शेळीचेंदूध व मेंढीचेंदूध, गाईचेंदूध. | वाराहीकंद, डुकरकंद. |
| द्राक्ष, खजूर, शिवणीचें फळ. | शाळा, नागरमोथे. |
| मसूरा, उडीद. | शिखरा, नल. |
| माक्षिक, सोनगेरू. | वेरवंड, मोरवेल, कोळिंजन. |
| मिरीं, लवंग. | शाका, दुधभोंपळा. |
| मूग, मठ. | संचळ, खारीलवण, पांसळवण. |
| साकर, खडीसाकर, जुनीमध. | सुंठ, आलें. |
| सोनें, सुवर्णमाक्षिक, लोहभस्म. | सोरठीमाती, फटकी. |
| हिरा, वैक्रांतमणी. | स्थौणेय, कोष्ठ, भदोरा. |
| हरीतकी, आंवळकठी. | क्षाराचे अभावीं आघाड्याचा खार घ्यावा. |

आणि जो पदार्थ मिळत नाहीं, त्याचे गुणदोष पाहून तसेच गुण ज्या पदार्थाचे असतील तो पदार्थ त्याठिकाणीं योजावा.

इति परिभाषाप्रकरणं.

# परीक्षाप्रकरणं

नाडीपरीक्षा— तैलाभ्यंग केलेला व स्नान आणि भोजन केलेला व क्षुधा आणि तृषा इंहीं करून पीडित असा जो मनुष्य त्याची नाडी पाहिली असतां यथार्थ समजत नाहीं, ह्मणून प्रातःकाळीं उठून घटिकाभर स्वस्थ बसलेला जो त्याची नाडी पाहिली ह्मणजे चांगली समजत्ये पुरुषाचा उजवा हात व स्त्रीचा डावा हात लांब सरळ करून आंगठ्याचे मुळीं तर्जनी, मध्यमा, अनामिका हीं तीन बोटें ठेवून, वात, पित्त, कफ, हे दोष अनुक्रमें करून जाणावे. तशींच पायांच्या मुळींही नाडी पाहावी. प्रातःकाळीं दहा १० घटिकापर्यंत कफनाडी, व मध्यान्हीं दहा घटिकापर्यंत पित्तनाडी, व सायंकाळीं १० घटिकापर्यंत वातनाडी; याप्रमाणें रात्रीचीही नाडी जाणावी.

आतां नाडीच्या गतीचीं लक्षणें— वांकडी व सर्प आणि जळू यांचे चाली सारखी जी चालत्ये, ती वातनाडी जाणावी. त्वरेनें बेडूक व कावळा व कुलिंगपक्षी यांचे सारखी चालत्ये ती पित्तनाडी जाणावी. हंस व पारवे व मोर व कोंबडे यांचे सारखी मंद मंद चालत्ये, ती कफ नाडी जाणावी. सन्निपात झाला असतां नाडी लावापक्षी व तित्तिरपक्षी यांचे सारखी चालत्ये. व द्विदोषाचा कोप झाला असतां नाडी हळू हळू फिरून लागलीच झर झर चालूं लागत्ये. व जी नाडी स्वस्थानापासून सुटली ती व राहून राहून चालते ती व फार क्षीण आणि फार थंड झाली ती, अशा चारी प्रकारच्या नाडी रोग्याचे प्राणाचा नाश करितात.— सामान्य ज्वराचा कोप झाला असतां नाडी ऊष्ण असून मोठ्या वेगानें चालत्ये. व कामादिकांवर इच्छा होऊन त्यांचा लाभ झाला नसतां व क्रोध आला असतां नाडी मोठ्या वेगानें चालत्ये व चिंता आणि भय हीं प्राप्त झालीं असतां नाडी क्षीण होत्ये— व मंदाग्नी व धातु क्षीण अशा मनुष्याची नाडी फार मंद होत्ये. व रक्ताच्या कोपें करून नाडी व्याप्त असतां थोडी थोडी ऊष्ण असू-

न पाषाणा सारखी जड होत्ये. व आमयुक्त असतां फार जड होत्ये. गर्भिणीची नाडी गंभीर आणि पुष्ट व हलकी अशी चालत्ये. तृषार्त, निजलेला, आलस्य युक्त. सरवी व निजून उठलेला त्याची व जो कांहीं एक मनांत कार्याची योजना करणारा त्याची नाडी स्थीर चालत्ये. मलमूत्रानें व्याप्त झाली असतां ज्वराप्रमाणें चालत्ये. लोभ व मद हे उत्पन्न झाले असतां किंचित् चंचळ चालत्ये. चोराची नाडी कांहीं तीव्र व कांहीं नम्र अशी चालत्ये. उद्योगी व मार्ग चालून श्रम पावलेला जो मनुष्य त्याची नाडी ऊष्ण व चंचळ चालत्ये. भूतनाडी. कनिष्ठिकेची नाडी चालत असतां भूतोपद्रव जाणावा. अनामिकेची नाडी चालत असतां कुळदेवतेचा क्षोभ जाणावा. तसें धमनीची नाडी चालत असतां जळदेवतेचा उपद्रव जाणावा. मध्यमेची नाडी चालत असतां ग्रमांदिक पीडा जाणावी. अजीर्णाची नाडी. कावळा व हंस यांच्या चाली सारिखी व अभ्र ह्मणजे आभाळ चालतें तशी व निजलेल्या मनुष्याच्या नाडीसारिखी व कांहीं कफाच्या नाडी सारिखी चालत्ये. उत्तमप्रकृतीची नाडी. ज्याचा जठराग्नि मदीप्त आहे, त्याची नाडी हलकी आणि वेगानें चालत्ये. स्वस्थमनुष्याची नाडीस्थिर असून प्रबळ अशी असत्ये. व जो क्षुधेंकरून व्याप्त झाला त्याची नाडी चंचळ असत्ये. व भोजनादिकें करून तृप्त झाला त्याची नाडी निश्चळ असत्ये. असाध्य सन्निपातनाडी. तुटत तुटत अतित्वरेनें काष्ठाप्रमाणें कठीण आणिस्थिर व वांकडी आणि क्षणांत हळू व क्षणांत सत्वर व अतिऊष्ण व मोठा वेग असून ज्वरानें व्याप्त व लावा, तित्तिर, पिंगला, यांच्या गती सारिखी आणि गुंतत चालून स्वस्थळ सोडून भ्रमते व क्षणांत स्थानावर येत्ये. याप्रमाणें सन्निपाताची नाडी जाणावी. जी नाडी राहून राहून चालत्ये व अतिनेक्ष्ण आणि मंद झाली व अकस्मात् कांपरा पर्यंत गेली ती अंतीची.

जाणावी:- तशीच तर्जनीची नाडी चालूं लागली असतां ती ही अंतींचीजाणावी:- नाडी स्वस्थानीं भ्रमन असतां चक्रासारिखी भ्रमत्ये व भयाचे नाडी प्रमाणें चालत्ये:- व क्षणांत अतिसूक्ष्म वाहते ती असाध्य जाणावी:- जर दोन प्रहरीं ज्वर युक्त आणि अग्नितुल्य अशी नाडी चालूं लागली किंवा गती सोडून अतित्वरेनें चालली तर रोगी एकादिवसांत मरेल व ज्याची नाडी डमरूसारखी चालूं लागली तो चवथे दिवशीं मरेल:- व ज्याचे नाडीनें स्थान सोडिलें तो तीन दिवसांनीं मरेल. जर नाडीउष्ण आणि शरीर निस्तेज असून थंड अथवा बहुत ज्वर वशरीर क्षीण व नाडीची गति मंद असेल तररोगी २ दिवसांनीं मरेल. याप्रकारें नाडी परीक्षा जाणावी.

मूत्रपरीक्षा:- कांचेचे अथवा कांशाचे पात्रांत पाहाटेस रोग्याचें मूत्र पहिली धार व शेवटली धार टाकून मधलेंच धरावें. त्यांत तेलाचा बिंदू गवताचे काडीनें टांकावा, तो बिंदू जर कदाचित् तळास जाऊन वरआला आणि त्या बिंदूंत छिद्र दिसलें आणि मूत्र काळें किंवा तांबूस आहे तर रोगी असाध्य जाणावा:- बिंदू टांकतांच पसरला तर असाध्य:- बिंदू तसाच राहिला तर कष्टसाध्य, तळास बसला तर मृत्यू जाणावा:- वाताधिक्य आहे तर बिंदू टांकतांच पसरतो आणि मूत्र रक्त वर्ण व शीतळ असें असतें:- पित्ताधिक्य असेल तर तेलांत बुड बुडे होतात. व मूत्र पीतवर्ण आणि ऊष्ण असतें- कफाधिक्य आहे तर मूत्र स्निग्ध व श्वेतवर्ण व बर्फासारिखा रंग दिसतो:- सन्निपाताचें काळें व तांबडें व पिंवळें असें मिश्र वर्ण असतें:- वात पित्ताचें धूम्र वर्ण व वात कफाचें फेनयुक्त व धातू आणि इंद्रिय रोग यांचें तेलासारिखें असतें. त्रिदोषाचें काळसर व पीत वर्ण व तांबडें व फेनयुक्त व बुद्बुद युक्त व सोन्यासारिखा रंग दिसतो.

**आतां बिंदूंचीं लक्षणें.** चमर, पद्म, शंख, पर्ण, फल, पुष्प, मणि, या सारिखी बिंदूंची आकृती झाली असतां रोगी असाध्य आहे असें जाणावें.- सिंह, श्वान, गज, कुक्कुट, जंतु, मनुष्य, शस्त्र, सर्प, वानर, वृश्चिक, मांजर, डुकर यांचे सारिखी आकृति झाली असतां तो रोगी असाध्य जाणावा. पूर्व पश्चिम किंवा उत्तर या दिशेस बिंदु वाढला असतां रोगी वांचेल. दक्षिणेकडे वाढला तर रोगी मरेल. आग्नेयी नैर्ऋती वायवी ईशानी या दिशांस वाढला तर रोगी असाध्य जाणावा.- पूर्वेस फांटा फुटला असतां समुद्राची पीडा जाणावी. दक्षिणेस महापुरुषाची पीडा.- पश्चिमेस क्षेत्रपालाची पीडा जाणावी. उत्तरेस अरण्यदेवाची पीडा.- आग्नेयी, नैर्ऋती, वायवी, ईशानी, या दिशांस ग्रामदेवता अथवा कुलदेवता यांची पीडा जाणावी. बिंदु पसरून आंत चाळणी सारखीं छिद्रें पडलीं असतां भूत प्रेत अनेक दोष आहेत असें जाणावें.- दोन मस्तकां सारखी किंवा पुरुषासारिखी बिंदूंची आकृति झाली तर चांडाळ भूत किंवा फिरणारे पिशाच यांचा झपाटा आहे असें जाणावें. पश्चिमदिशेस बिंदु वाढून सर्पाकृति झाला असतां उदररोग आहे असें जाणावें. बिंदूंची आकृति त्रिकोण झाली असतां शाकिनी व कुलदेवते चा कोप जाणावा.- मस्तकहीन अथवा गात्रहीन अशा मनुष्या सारिखी आकृति झाली असतां रोग असाध्य जाणावा. मूत्र तुपाचे कण्या सारिखें झालें असतां जलोदर झालें असें जाणावें.- जो तेल बिंदु पसरून मुताबरोबर मिळून जातो तो असाध्य जाणावा.

**मलपरीक्षा.**- वायूचा कोप असतां मळ फेनयुक्त व रूक्ष आणि धूम्रवर्ण व ज्याच्या शिंतड्या हल० चोंथा पाणी असा असतो.- पित्ताचा कोप असतां हिरवट, पिंवळा, गंधयुक्त, शिथिल, उष्ण असा असतो. कफाचा कोप झाला असतां श्वेतवर्ण व कांहीं शुष्क आणि कांहीं आर्द्र व स्निग्ध

असा असतो- वात कफाचा आर्द्र,व श्यामवर्ण, बुळबुळीत, शिंतड्यां नीं युक्त,असा असतो. वातपित्ताचा पिंवळट,व काळसर व आर्द्र व आंत गुठळ्या,असा असतो. पित्त कफाचा पिंवळट, पांडुरवर्ण असतो. त्रिदोषाचा श्वेत, पिंवळा, काळसर, शिथिल आणि आंत गुठळ्या असा असतो. अजीर्णाचा दुर्गंध युक्त असून शिथिल असतो. जीर्णज्वराचा शिंतड्यायुक्त ०- जलोदराचा मोठा दुर्गंध व श्वेतवर्ण० क्षयाचा श्यामवर्ण० रक्त कोपाचा पातळ आणि रक्तवर्ण० प्राणांतींचा दुर्गंधि व तांबुस असून किंचित् श्वेतवर्ण० व मांसासारिखा आणि श्यामवर्ण असा असतो- याप्रकारें मल परीक्षा जाणावी.

जिव्हापरीक्षा. वायूचा कोप झाला असतां जिव्हा खरखरीत असून फुटलेली आणि पिंवळट असत्ये- पित्ताचा कोप असतां आरक्त असून त्यांतच किंचित् श्यामता असत्ये- कफाचा कोप असतां श्वेतवर्ण व आर्द्र व बुळबुळीत अशी असत्ये द्विदोषाचा कोप असतां त्यात्या दोषांच्यालक्षणें करून युक्त असत्ये. त्रिदोषाचा कोप असतां कृष्णवर्ण,कंटकयुक्त, शुष्क, अशी असत्ये. अरुची व अतिसार हे असतां जिव्हा मधुरवर्ण असत्ये. प्रमेह व संग्रहणी यांची धूम्रवर्ण व कृष्ण आणि कपिशवर्ण अशी असत्ये. विस्फोट रोग झाला असतां जिव्हा खरखरीत कांट्यासारिखी असून आंतून पाणी गळतें- मरण काळींची जिव्हा खरखरीत असून ओढलेली व फेनयुक्त व कठीण व चलन वलन रहित अशी असत्ये. याप्रमाणें जिव्हा परीक्षा जाणावी.

नेत्रपरीक्षा- वायूचा कोप असतां नेत्र रूक्ष व धूम्रवर्ण व दाहयुक्त व चंचळ व उग्र अशीं असतात- पित्ताचा कोप असतां नेत्रें पिंवळीं हळदीसारखीं व तांबूसवर्ण व दाहयुक्त आणि दीप पाहाण्यास असमर्थ अशीं असतात. कफाचा कोप असतां नेत्रें श्वेतवर्ण व निस्तेज व स्रावयुक्त व विकट असून

शिथिल अशीं असतात. दोहों दोषांचा कोप असतां त्यात्या दोषांचे लक्षणांनीं युक्त असतात. त्रिदोषाचा कोप झाला असतां नेत्रें रक्तवर्ण असून किंचित् श्यामवर्ण व गढूळ थिजल्या सारिखीं असतात. **आतां असाध्य लक्षणें:**– ज्याचा एक डोळा थिजल्या सारखा असून वटारलेला उघडा असतां व दुसरा मिटलेला असतो तो रोगी प्रहरानें मरेल:– अथवा दृष्टि ऊर्ध्व असतां ही रोगी असाध्य जाणावा:– व नेत्रें कंपयुक्त असून भ्रमिष्ठा सारखीं चंचळ, भयंकर व तेजोहीन, कृष्णवर्ण व काळसर व रक्तवर्ण व रूक्ष होतात. व मुख भयंकर दिसतें तो रोगी असाध्य॰ नेत्रांतील बाहुली भ्रमिष्ट होऊन नेत्रें थिजल्या सारिखीं दिसतात. तो रोगी एका दिवसांत मरेल:– **भूतोपद्रवाचीं नेत्रें:**– भ्रांता सारिखीं असून गरगरां फिरत असतात, या प्रमाणें नेत्र परीक्षा जा॰ **रूपपरीक्षा॰**– प्रातःकाळीं रोग्याजवळ जाऊन त्याचें रूप पाहावें, तें तेजोहीन व विचित्र, श्यामवर्ण, असलें तर तो व्याधी वातजन्य जाणावा. पीतवर्ण मुख व किंचित् सूजीर असलें तर पित्त प्रकोप जाणावा:– कलाहीन मुख असून तेलट दिसतें व डोळे विलक्षण चिकटलेले अशा लक्षणानें कफ प्रकोप जाणावा:– व डोळ्यानें पाहिलें असतां जसे रोग स्पष्ट दिसतील तशीं नावें ठेवावीं:– प्लीहा व कावीळ, ग्रंथी व शल्य व नळवायु व वायगोळा, व डबा व जंतु. व कठोर गुल्म, हे रोग हातानें दाबून पाहून अमुक रोग आहे असा निश्चय करावा या प्रमाणें रूपपरीक्षा जाणावी.

**शब्दपरीक्षा:**– वायूचा कोप असतां कंठांतून शब्द निघतो तो सौम्य ह्मणजे हलका निघतो:– पित्ताचा प्रकोप असतां शब्द स्पष्ट निघतो. कफाचा कोप असतां शब्द जड व घरघर युक्त निघतो:– द्विदोषाचा व त्रिदोषाचा कोप असतां शब्द द्विदोषाचे व त्रिदोषाचे लक्षणांनीं युक्त असतो असें जाणावें.

**स्पर्शपरीक्षा:**– वायूचा कोप असतां शरीराचा स्पर्श साग व पळस यांचे

पानासारिखा खरखरीत असून शीतळ असतो. पित्ताचा कोप असतां स्पर्श उष्ण असतो:- व कफाचा कोप असतां शीतळ आर्द्र असा असतो. द्विदोषाचा व त्रिदोषाचा कोप असतां द्विदोषाचे व त्रिदोषाचे लक्षणां करून युक्त असतो. व ज्याचे शरीराचा स्पर्श क्षणांत शीत व क्षणांत अतितप्त आणि रोगेंकरून व्याप्त असा आहे. तर तो रोगी असाध्य जाणावा. याप्रकारें स्पर्श परीक्षा जाणावी.

**काळज्ञान.** साध्यलक्षण:- मुख तेजस्वी, नाडी सम, कोकिळेसारिखा स्वर, अग्निप्रदीप्त, मस्तकास कंडू, जिव्हा आणि ओष्ठ हे आर्द्र, हाता पायांचे तळवे व ओंठ व हृदय यांचे ठायीं दृढता व मन चिंतारहित, नखें आणि शिरा, आरक्त वर्ण, सुगंधि पदार्थावर इच्छा हीं लक्षणें झालीं असतां रोग सुसाध्य जाणावा. **असाध्यलक्षणें:-** अति तीक्ष्ण ज्वर, बडबड करणें, नेत्रें व नखें फार आरक्त, किंवा श्वेत, हात पांय थंड, स्वर क्षीण, मुख व नासिकायांस निस्तेजपणा, कंठावरोध, उचकी, शरीर भयंकर, मूर्छा, भ्रम, कंप, हीं लक्षणें असतां तो रोगी असाध्य जाणावा:- ज्याचे नाकाचा उजवा सूर एक अथवा दोन किंवा तीन दिवस अहोरात्र वाहतो तो मनुष्य तीन वर्षांनीं व एका वर्षानें व सहा महिन्यांनीं क्रमेंकरून मरेल:- ज्याचा डावा सूर दिवसास फार त्वरेनें चालतो आणि रात्रीस शमतो तो चार दिवसांनीं मरेल:- ज्याचे दोनी सूर दहा दिवस समान चालतात तो ३ दिवस वांचेल:- ज्याचे डावे हाताची नाडी चालतां चालतां तुटत्ये व डावा सूर अगदींच बंद होतो तो तात्काल मरेल. ज्याचें नाक वांकडें झालें आणि नाकाचे सूर बंद होऊन तोंडांतून श्वास चालला तर तो १० प्रहर वांचेल:- ज्याची सांवली दक्षिणेकडे दिसूं लागली तो ५ दिवसांनीं मरेल:- ज्यास छायापुरुष दोन भुजा आणि मस्तक इहीं करून रहित दिसूं लागला तर तो १ महिना वांचेल:- जो पुरुष काळा असतां अकस्मात पीत वर्ण झाला तर तो दोन वर्षें वांचेल:- ज्याचें तोंड आर

शांत अथवा तुपांत दिसेनासें झालें तर तो सहा महिन्यांनीं मरेल.-ज्याचे दांत, ओंठ, जिव्हा, हीं शुष्क पडलीं व नेत्रें, नखें नीलवर्ण झालीं व पिंवळा रंग व हिरवा आणि तांबडा रंग काळा दिसूं लागला तर तो सहा महिने वांचेल ज्यास आकाशांत नानाप्रकारचे रंगाचे सर्प दृष्टीस पडले तो तीन महिने वांचेल. ज्यास वीर्य सुटावयाचे संधीस मुतावयास होऊं लागलें व शिंक आली तर तो एक वर्षानें मरेल. ज्यास मळ आणि मूत्र हीं एक काळींच झालीं तो एक वर्षानें मरेल. ज्यास मस्तक व हात, पाय हे पाण्यांत पाहिले असतां न दिसले तो एक वर्ष वांचेल. उन्हांत उभें राहिलें असतां ज्याची सावली कांपल्ये तो ४ महिने वांचेल. हात, पाय, हृदय, हीं स्नान केल्यावर लागलींच आपाप कोरडीं होतात. तो तीन महिने वांचेल. ज्यास कटुम्लादि पदार्थ अकस्मात विपरीत भासले तो ६ महिने वांचेल. ज्यास सूर्य अथवा चंद्र आकाशांत २ दोन दृष्टीस पडतात. आणि रात्रीस चांदण्या दिसत नाहींत दिवसास दिसतात, तो ६ महिने वांचेल. व कानांत बोटें घातलीं असतां ध्वनि ऐकूं येत नाहीं तो ७ सात दिवसांनीं मरेल. जो कृश असतां अकस्मात् स्थूल झाला व स्थूळ असतां कृश झाला व बुद्धीस अंतर पडलें तो ६ सहा महिन्यांनीं मरेल. रात्रीचा दाह, दिवसास शैत्य, कंठावरोध, ऊर, हात, पाय, नाक, हीं थंड, मस्तकांत शूळ, अशीं लक्षणें झालीं असतां तो तात्काळ मृत्यु पावेल. ज्याचा उजवा सूर बंद होऊन डावाच चालतो, व कोणत्याही पदार्थाचा वास येत नाहीं तो एक महिना वांचेल. मैथुन काळीं वीर्य पतनाचे पूर्वी शिंक आली तर तो ५ पांच महिन्यांनीं मरेल. ज्यास जिव्हाग्र न दिसलें तो १ एक दिवसानें मरेल. ज्यास भिवयांचा मध्यभाग व दिव्याची ज्योत न दिसली तर तो ७ दिवसांनीं मरेल. व नासाग्र न दिसलें तर ३ दिवसांत अथवा १ महिन्यानें मरेल.-ज्यास नेत्रांतील कर्णिका ह्मणजे नेत्राग्र दिसत नाहीं तो ५ दिवसांनीं मरेल.

ज्यास आपलें प्रतिबिंब तेलांत दिसत नाहीं, आणि नासिकाहीन मुख दिसतें. व तळहात मस्तकावर ठेवून दोहों डोळ्यांनीं मणगट पाहिलें असतां जर मोठें दिसलें तर, व कानांतील नाद क्षणक्षणीं ऐकूं येऊं लागला व शीतज दर्शनें न दिसली तर तो १ महिन्यानें मरेल. ज्याचा मतिभ्रंश होऊन वाणी स्खलित झाली व रात्रीं आकाशांत धनुष्य दृष्टीस पडलें तो ६ महिन्यांनीं मरेल.—जो कृपण असतां अकस्मात बहुत दान करूं लागला आणि प्रकृति विपरीत झाली तर तो ६ सहा महिन्यांनीं मरेल. उजवे तळहातावर कनिष्ठिके पासून तर्जनी पर्यंत अर्धचंद्राकार वांकडी अशी रेषा असल्ये ती अखंड असली तर तो १०० वर्षे वांचेल मध्यमे पर्यंत आहे तर ७० वर्षें वांचेल.—अनामिके पर्यंत आहे तर ५० वर्षें वांचेल.—नंतर जशी जशी कमी असेल तस तसा तो ४०,३०, २२ वर्षें याक्रमानें वांचेल. कोणाच्या मतें रेषेंत फांटे अथवा कातर किंवा शूळ असला तर तो अपमृत्यु आहे असें जाणावें.—याप्रमाणेंच ज्योतिषी यांस पत्रिका दाखवून आयुष्याचा विचार करावा. याप्रमाणें कालज्ञान जाणावें.

औषधी आणावयास मुहूर्त.—हस्त, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु, अभिजित्, मृगशीर्ष, रोहिणी, अनुराधा, शततारका, स्वाती, हीं नक्षत्रें जाणावीं. अमृतसिद्धि योग व गुरुवार व शुक्रवार, रविवार, बुधवार, आणि शुक्लपक्ष व शुभयोग व शुभ करण यांजवर औषधी आणाव्या. रसायनादि औषधी करण्यास मुहूर्त.—हस्त, अश्विनी, पुष्य, अभिजित, मृगशीर्ष, रेवती, चित्रा, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती, मूळ, हीं नक्षत्रें:—आणि शुक्रवार, सोमवार, गुरुवार, बुधवार, मिथुन, कन्या, मीन धन हीं लग्नें असावीं.—वैद्यानें रोग्यास औषध देण्यास मुहूर्त.—गुरुवार, शुक्रवार, रविवार, हे तीन वार असावे.—व मेष, तुला, कर्क, मकर, हीं लग्नें व शुभ योग आणि शुभ करणें असावीं.

**रोग्यास औषध घेण्यास.**— चवथा व आठवा व बारावा हे चंद्र न सावे. आणि घातचंद्र, घातवार, घाततिथि व जन्मनक्षत्र हीं नसावीं. व काळ राहु पृष्ठभागीं असावा.— व नक्षत्रांच्या व तिथींच्या विषघटी व मंगळ, व शनि आणि सोम, हे वार नसावे. व वैधृती, व्यतीपात, इत्यादिक कुयोग व विष्ट्यादि कु करणें, नसावीं.

**विरेचन व वमन देण्यास**—सोमवार, रविवार, गुरुवार हे उत्तम जाणावे.

**रक्त काढण्यास.**— श्रवण, अनुराधा, मृगशीर्ष, हीं नक्षत्रें, मंगळ आणि रवि हे वार असावे. व समुद्रास भरती असावी.

**कफावर औषध देण्यास.** स्वाती, कृत्तिका, हस्त, पुनर्वसु, श्रवण आणि ज्येष्ठा हीं नक्षत्रें प्रशस्त जाणावीं.

**शूलादिकांस औषध देण्या.**—दिन शुद्धि असावी. व वार शूळ पृष्ठभागीं असावा. शूळ योग मात्र अति अनिष्ट आहे.

**रोग्यास स्नान करण्यास.**— आर्द्रा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, चित्रा, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अश्विनी, हस्त, अभिजित्, आणि पुष्य, हीं नक्षत्रें— व रविवार, बुधवार, मंगळवार, गुरुवार व रिक्तातिथि हीं सर्व प्रशस्त जाणावीं.

ज्या नक्षत्रीं व ज्या वारीं व ज्या तिथीस रोग उत्पन्न होतो, त्या नक्षत्राची व वाराची व तिथीची पीडा किती दिवस हें समजण्याकरितां नक्षत्रांचें कोष्टक व त्यांत एकाखालीं एक असे दोन दोन अंक मत भेदानें लिहिले आहेत. त्यावरून पीडा जाणावी.

---

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी. | भरणी. | कृत्तिका | रोहिणी | मृग | आर्द्रा | पुनर्वसु | पुष्य | आश्लेषा |
| ९<br>९ | ०<br>११ | १०<br>५ | ३<br>७ | ५<br>३० | ०<br>० | ७<br>७ | ७<br>७ | ९<br>० |
| मघा | पूर्वा | उत्तरा | हस्त | चित्रा | स्वाती | विशाखा | अनुराधा | ज्येष्ठा |
| ०<br>२० | ३०<br>० | २<br>७ | १५<br>१५ | ०<br>११ | १५<br>० | ६०<br>१५ | स्थैर्य<br>२० | १०<br>० |
| मूळ | पू०षा० | उत्त०षा० | श्रवण | धनिष्ठा | शततार० | पू०भाद्र० | उत्त०भा० | रेवती. |
| १<br>९ | १५<br>० | १५<br>३० | ७<br>११ | ३०<br>१५ | १५<br>११ | १०<br>० | १५<br>० | ८<br>स्थैर्य |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रतिपदा | द्वितीया | तृतीया | चतुर्थी | पंचमी | षष्ठी | सप्तमी | अष्टमी. |
| १५<br>१० | ३० | ३ | ० | ५ | ५<br>१० | ३० | ३ |
| नवमी | दशमी | एकादशी | द्वादशी | त्रयोदशी | चतुर्दशी | पौर्णिमा | अमावा. |
| ० | ५ | ५<br>१० | ३० | ३ | ० | ५ | ० |
| रविवार | सोमवार | मंगळवार | बुधवार | गुरूवार | शुक्रवार | शनिवार | |
| ३० | ४५ | ० | ८ | ५ | ७ | ३० | ०<br>०<br>० |

मृत्युयोग:- आश्लेषा, शततारका, आर्द्रा, धनिष्ठा, हस्त, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, भरणी, मघा, विशाखा, ह्या नक्षत्रांचा व प्रतिपदा, नवमी, चतुर्थी, द्वादशी, अष्टमी ह्या तिथींचा, रवि व मंगळ व शनि, यावारीं योग होऊन जर त्या दिवशीं रोग उत्पन्न झाला तर, तो, त्या रोग्यास मृत्यु देतो. आणि कृत्तिका, मूळ, विशाखा, मघा, आश्लेषा, आर्द्रा, यानक्षत्रीं सर्पदंश झाला तर मृत्यु.

## फणिचक्र.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] |
| [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] |
| [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] | [illegible] |

सूर्यनक्षत्र व चंद्रनक्षत्र व रोग्याचें जन्मनक्षत्र एकागाईंत आलें असतां ८ पासून बारा पर्यंत मृत्यु. १३ पासून तेवीस पर्यंत जय. २४ सां पासून ५७ पर्यंत व्याधि याप्रमाणें जाणावें.

दूतप्रश्न.– रोग्याकडून वैद्यास जो बोलाऊं येतो तो प्रथम जितकीं अक्षरें बोलेल तीं त्रिगुणित करून त्यास आठांनीं भाग द्यावा शेष अंक राहील तो विषम राहिले तर, रोगी वांचेल. आणि सम अंक राहिले तर रोगी मरेल असें जाणावें.

दुष्टस्वप्नें.– स्वप्नांत नागवे सन्यासी व गोसावी व मुंडलेले व लांबडीं काळीं वस्त्रें पांघरलेले व नाक कान कापलेले व पांगळे व कुबडे व खुजे व काळे व हातामध्यें पाश व तरवार व भाला व बर्ची इत्यादि धारण केलेले व चोरांनीं बांधून मारणारे व दक्षिण दिशेचे आश्रयें करून राहिलेले व ह्लैस व उंट व गाढव यांजवर बसलेले इत्यादिक पाहिले असतां ज्याची प्रकृति स्वस्थ आहे त्याला रोग होतो. व ज्याला रोग आहे तो मरणा पावतो स्वप्नामध्यें आपण पर्वत व झाडें इत्यादि उच्चस्थानावरून पडलों असें पाहातो व पाण्यामध्यें बुडालों व अग्नीनें जळालों असें पाहातो व कुत्र्यानीं पायानीं ओरबाडिलें व मत्स्यादिकांनीं भक्षिलें व अकस्मात डोळे गेले आणि दिवे मालविले असें पाहातो व तेल व सुरा प्यालों व लोखंड यनीळ यांचा लाभ झाला व शिजलेलें अन्न भक्षिलें व मातेचे घरांत शिरलों अथवा तिचे उदरांत शिरलों असें पाहातो, अशा प्रकारचीं स्वप्नें पाहिलीं असतां ज्याची प्रकृति स्वस्थ आहे त्याला रोग होतो. व ज्याला रोग आहे तो मरण पावतो.

दुसरीं दुष्टस्वप्नें.– नौका, गाडी, आरसा, लग्न व शुभकार्य, घर, पाण्यांत डोंगर, धन, धान्य, हीं रोग्यानें पाहिलीं असतां मृत्यु जवळ आला असें जाणावें. भुतें, आणि श्वापदें व पिशाच व पक्षी हीं आपलें शरी-

र भक्षितात, असें पाहिलें तर तो आठा महिन्यांनीं मरेल. गवत आणि लांकडें मस्तकावर घेतलीं व पर्वतावर व नुसते भुईवर व धुळीवर व त्यंभाग्रावर व शूळावर बसलों, असें पाहिलें तर तो तीन महिन्यांनीं मरेल. आपले पूर्वज पाहिले व श्मश्रु केल्या वर तैलाभ्यंग करून घोडक्या गाढवावर बसून दक्षिण दिशेस जातों. व काळें वस्त्र नेसलेला पुरुष, अशीं स्वप्नें पाहिलीं असतां स हा महिन्यांनीं मरेल. स्वता गाढवावर अथवा उंटावर अथवा मेंढ्यावर अथवा रेडयावर बसून दक्षिणदिशेस जातो असें पाहिलें असतां तत्काळ किंवा वीस दिवसांनीं मरेल:- स्वशरीर रक्तगंध रक्तपुष्प रक्तअक्षता इहीं करून भूषित असें ज्याणें पाहिलें त्याला आठ महिन्यांत मृत्यु आहे असें जाणावें.

आतां दुष्टस्वप्नांचा परिहार:- पूर्वीं सांगितलें लग्न मुंडादि दुष्टस्वप्न पाहून कोणा एकाजवळ न बोलतां प्रातःकाळीं स्नानकरून सोनें व काळेतीळ व लोखंड हीं दानें करून देवाची स्तुति करावी, आणि रात्रीं देवळांत राहून जागरण करावें. याप्रमाणें तीन दिवस केलें असतां दुष्ट स्वप्नाची बाधा होत नाहीं.

चांगलीं स्वप्नें:- जो मनुष्य स्वप्नामध्यें इंद्रादि देव व राजे व मित्र व ब्राह्मण यांना राजीव पाहतो व गाय व देदीप्यमान अग्नि व प्रयागादि तीर्थें व विस्तारानें गढुळलेलें पाणी असें व शत्रूंच्या समुदायांनीं जिंकिलें असें व पांढरें रंगानें शोभित केलेली माडी, बैल व पर्वत व हत्ती व घोडे इत्यादिकांवर बसलों असें पाहतो व जळूव मधावरल्या काळ्यामाशा व गांधिलमाशा व मशकादिक वसर्पादिक डसतात असें पाहतो व आपल्याला जी स्त्री योग्य नाहीं तिजपाशीं गेलों अथवा जें स्थान योग्य नाहीं त्या स्थानी गेलों असें व विष्ठेनें आंग माखिलें व आपलें रडें व दुसऱ्यानें रडें व मरण पावलों व कच्चें मांस भक्षिलें असें पाहतो तो मनुष्य रोगी असल्यास रोगरहित होतो, व स्वस्थ असल्यास त्याला

धनप्राप्त होते.- रक्त मांस यांणीं स्वशरीर लिप्त झालें व श्वेतवस्त्र नेसलों व दूध प्यालों व शव व जारस्त्री व धेनु व बालवनिता यांनां पाहिलें व मृत्तिकाभक्षिली व नळ्यांत बहुत कमळें व राजसभेस द्विजमंडळी व पाणी व दूध यांनां पाहिलें असतां शुभचिन्ह जाणावें.

दुश्चिन्हें.- जागृत असतांच काळपुरुष काळें वस्त्र नेसून लोखंडाचा दंड हातीं घेऊन उभा आहे असें पाहिलें तर मृत्यु.- धूमकेतु व वीज हीं दिवसास पाहिलीं व डोंगराचें शिखर खचून मोठा शब्द झाला अथवा कारणाशिवाय घरें व झाडें व देवांच्या मूर्ती व देवळाचीं शिखरें उभीं च दुभंग झालीं व भूमी नाद झाला व रात्रीस रणस्थानीं भूतें नाचतात असें पाहिलें तर मृत्यु. दिवसास अथवा श्रावण मासांत आपली घोडी प्रसवली व बुधवारीं अथवा माघमहिन्यांत म्हैस व्याली. व सिंह संक्रांतींत गाय व्याली अशीं दुश्चिन्हें झालीं तर घरधन्यास मृत्यु. विहिरींत मोठे शब्द व अनेक उत्पात व गंधर्वचेष्टा व अकाळीं वृष्टि व घरांत भूतांच्या चेष्टा व वायूची गर्जना व सूर्यचंद्रांस खळीं व नक्षत्रें व तारे तुटून पडले व भूमी कांपूं लागली. व दिवस तेजोहीन पाहिला. व पृथ्वी फाटून मोठा नाद झाला व मन भयभीत होऊन डोळ्यांतून पाणी गळूं लागलें. व पांकोळ्या व मधाच्या माशा यांणीं घरांत वास्तव्य केलें. पुष्कळ खाल्लें तरीं भूक न राहाणें बुद्धिभ्रंश व निश्चेष्टितपणा व देह भयंकर दिसूं लागणें व पाली व पिंगळे यांचे शब्द भलते वेळेस ऐकणें व रात्रीं गाई हंबरूं लागणें, कुत्रे दारीं रडूं लागणें व कोल्हे व गीध व ससे घरांत आले असें पाहिलें आणि वृद्धपुरुष व देव द्विज व गुरु व श्रेष्ठ यांचा द्वेष करणें आणि त्यांची निंदा करूं लागणें अशीं दुश्चिन्हें झालीं असतां आयुष्य सरलें असें जाणावें.

सौम्यशकुन.- भेरी, मृदंग, शंख, वीणा, मंगलगीत, पुत्रवती स्त्री, स

वत्सगाय, कन्या, दहीं, फळें, पुष्पें, दीप, अन्न, छत्री, मद्य, मांस, मेंढी, घोडा, दोन ब्राह्मण, भारद्वाजपक्षी, चाषपक्षी, हरण, मोर, मुंगूस, पाण्यानें भरलेली घागर, वेश्या, रत्नें वस्त्रें, धान्य, निशाण, शूद्र इत्यादिक सौम्य शकुन जाणावे.

प्रदीप्त अशुभ शकुनः- कुत्सित्स्थ, नीळ, कापूस, कोंडा, पाषाण, भस्म, आंगार, तेल, चिखल, रक्तशिरस, पळसाचीं लांकडें, महार व मांग, काष्ठ, अग्नि, हंस व टोणगा, हिजडा, विधवास्त्री व सन्यासी, मानभाव, एकाकीब्राह्मण, कावळा, घार, मांजर, बिब्बा, दोनशूद्र, घुबड, डुकर, भगवें वस्त्रधारण करणारे शिवूंनयेसी स्त्री, रिकामी घागर, इत्यादिक.

दूतलक्षणः- (ह्मणजे वैद्यास बलावणारा जो मनुष्य त्याचें लक्षण.) तो दूत रोग्याचे जातीचा, तेजस्वी, श्वेतवस्त्र नेसलेला, गंधादिकें करून अलंकृत, हास्यवदन, मधुरवक्ता, स्नेहरक्षून प्रातःकाळीं वैद्यास प्रश्नकरणारा, घोड्यावर अथवा बैलावर बसलेला, श्वेतपुष्पें व पक्व फळें यांहींकरून युक्त याप्रकारचा असावा, व चांगला दिवस पाहून नाकाचासूर जिकडला वाहात असेल त्या बाजूस आला असतां रोग्याचें कल्याण होतें-

आतां दूताचीं वाईट लक्षणें:- म्लानवदन, अतिचंचळ, कठोरवक्ता, दुर्गंधयुक्त, श्रमी, काष्ठ व पाषाण व तृण, हीं आहेत हस्तान्याटाई ज्याच्या असा, नग्न, रोगी, नेत्रांनां पाणी आलेला, घाबरलेला, रक्त, काळें, नगवें वस्त्र धारण केलेला, जटिल, मुंडलेला, तेलाभ्यंग केलेला, भस्मलावलेला, चिखलानें माखलेला, केशपिंजारलेला, विक्षिप्त, अस्तमानीं आलेला, दक्षिणदिशेस उभाराहून बोलणारा, याप्रकारचा दूत बोलावूं आला असतां रोग्याचें अकल्याण जाणावें.

वैद्याला बोलावूं जाणारा जो दूत त्याचे शुभाशुभ शकुनः- दूत मार्गानें जात असतां भेरी मृदंगादिक जे सौम्य शकुन ते रोग्याला शुभदायक

होत नाहींत, व अंगार व तेल व कुळित्थ इत्यादि जे प्रदीप्त अशुभशकुन-ते शुभदायक होतात. या प्रकारें दूतलक्षण व शुभाशुभलक्षणें जाणावीं

## ज्वरोत्पत्तीचें कारण.

अजीर्णापासून वातादि दोष दुष्ट होऊन आमाश यांत जाऊन कोष्ठगत अग्नीला बाहेरील त्वचे पावेतों आणितात. त्या योगें शरीर उष्ण होतें. या प्रमाणें ज्वराची उत्पत्ति जाणावी.

ज्वराचें पूर्वरूप:- जांभया, ठेंचल्या सारिखें आंग दुखतें, मनोविकार, नेत्रांचा दाह, जडता, अरुचि, शरीर रोमांचित, डोळ्यां पुढें आंधेरें होतें, घाम धड, निःश्वास स्वस्थता नसणें व शीत, वायु आणि ऊन यांविषयीं वारंवार इच्छा आणि द्वेष उत्पन्न होणें, अन्न न पचणें. तोंड पचपचीत, बळ वर्णाची हानि, आणि वायुचें प्राबल्य असतां जांभया फार येतात, पित्ताचें प्राबल्य असतां नेत्रांचा फार दाह होतो, व कफाचें प्राबल्य-असतां अन्नावर अरुचि, द्विदोषांचा कोप असतां दोहोंचीं लक्षणें, त्रि-दोषांचा कोप असतां सारीं लक्षणें होतात.

ज्वर येतांच:-प्रारंभीं काय करावें तें:- प्रथम लंघन करावें, भूक लागेल तरच अन्न द्यावें, परंतु वातज्वरी, क्षयी, क्षुधित, गर्भिणी, दुर्बळ, लहान मूल, तृषित, ऊर्ध्वश्वासी, यांनीं लंघन करूं नये, मूग, मसुरा, चणें, कुळित्थ, मठ, या पंचधान्याचें कढण करून, अथवा तांदळांची कण्हेरी द्यावी, किंवा तांदळांच्या रव्यांत गव्हांचा रवा घालून त्याची कण्हेरी अथवा नुस्त्याच गव्हांच्या रव्याची कण्हेरी द्यावी. केवळ पित्तज्वर असतां मृदु रेच द्यावा, केवळ कफज्वर असतां वमन द्यावें, पाचन औषधें व काढे व त्यांत पाणी किती घालावें तें व स्वरसादि पांच प्रकारचे काढे प्रारंभीं लिहिले आहेत. तेथें पाहून योजना करावी.

ज्वरपाचनः– देवदार, धणे, सुंठ, रिंगणी आणि डोरलीमूळ यांचा काढा करून अष्टमांश द्यावा. ह्मणजे ज्वर पक्क होतो.

वातज्वराचें कारणः– वाल, उडीद, तुरी, हरभरे, जडान्न, चिकटपदार्थ, कलिंगड, कवठ, मुळा, कंद, कांकडी, थेंडशी, मुळे, रूक्षपदार्थ व अतिमैथुन व अति व्यायाम, अति जागर, या कारणांनीं वातज्वर उत्पन्न होतो.

वातज्वराचें लक्षणः– शरीरास कंप, कंठ आणि ओंठ शुष्क होणें, मलावरोध, शिंका बंद, पोट, मस्तक, कंबर, डोळे, आंग हीं दुखतात, निद्रा येत नाहीं, ज्वर केव्हां थोडा येतो, केव्हां फार येतो, तोंडास चव नसते, अरुचि होते, जांभया येतात, पोट फुगतें, अजीर्ण, श्रम, मोह, भ्रम होतात, आंगावर रोमांच, डोळ्यांवर झांपड, पोटऱ्या व मांड्या फुटतात, कानांत नाद होतो, सकारवा कला, दांत शिवशिवतात, हीं लक्षणें होतात.

वातज्वराचें पाचनः– गुळवेल, पिंपळमूळ, सुंठ, यांचा काढा निकाढा ज्वराचे सातवे दिवशीं द्यावा ह्मणजे ज्वराचें पाचन होतें.

वातज्वरावर उपचारः– गुळवेल, सुंठ, धमासा, नागरमोथे, यांचा काढा द्यावा– वाळा, सुंठ, पिठवण, किराईत, साळईची मुळी, रिंगणमूळ, डोरली, गुळवेल, गोरखरू यांचा काढा घेतला असतां वातज्वर तत्काळ जातो. गुळवेल, सुंठ, पिंपळमूळ, यांचा काढा मध घालून द्यावा. सालवण चिकण्याचें मूळ, काळी द्राक्षें, गुळवेल, उपलसरी, कावळी, शेवग्याची साल यांचा काढा करून तीव्र वातज्वरास द्यावा ज्वर जातो.

पित्तज्वराचें कारणः– क्षारान्नभोजन, तैलभक्षण, पक्करंताक (आगें) स्मरण, कारलीं, कडूपदार्थ, निखट, मोहऱ्या, यांचें अतिसेवन इहीं करून पित्तज्वर होतो.

पित्तज्वराचें लक्षणः– शरीर पीतवर्ण, सर्वांगाचा दाह, तृषा, मूर्छा–

अल्पनिद्रा, तोंड कडू, ओकारी, भोंवळ, बडबडणें, अतिसार, घाम, कैफ घेत- ल्यासारिखें होणें; थंड पदार्थावर इच्छा, मल, मूत्र, नेत्र, हीं पीतवर्ण, हीं पित्तज्वराचीं लक्षणें होतात.

पित्तज्वरावर पाचन:- इंद्रजव, पहाडमूळ, कुटकी, नागरमोथे यांचा काढा दहा दिवसांनंतर द्यावा. नंतर औषध द्यावें.

पित्तज्वरावर उपचार:- गुळवेल, हरीतकी, पित्तपापडा, यांचा काढा- खडेसाखर घालून घ्यावा- बाहव्याचागीर, काळीं द्राक्षें, पित्तपापडा, कुटकी, हरीतकी, नागरमोथे, यांचा काढा द्यावा. नुस्ता पित्तपापडा याचाही काढा द्यावा:- पित्तपापडा, वाळा, रक्तचंदन, धणे, सुंठ, यांचा काढा द्यावा.

वातपित्तज्वराचें लक्षण:- गळा, तोंड, शुष्क होतात, दाह, मूर्च्छा, तृषा, निद्रानाश, ओकारी, भ्रम, डोळ्यांपुढें आंधारी, श्वास, अरुचि, जिव्हा, शोष बडबड, रोमांच, हीं लक्षणें होतात.

वातपित्तज्वरावर उपचार:- पित्तपापडा, नागरमोथे, गुळवेल, सुंठ, किराईत यांचा काढा द्यावा:- रिंगणी, डोरली, गोखरू, गुळवेल, सुंठ, नागरमोथे, यांचा काढा द्यावा:- मनुका, पित्तपापडा, बाहव्याचागीर, कुटकी, नागरमोथे, हिरडेदळ, यांचा काढा द्यावा. ह्मणजे पित्तज्वर, मूर्च्छा, सूज, तलखी, बडबड, भ्रम, दाह, यांचा नाश होतो. मनुका, बाहव्याचा मगज यांचा काढा घेतला असतांही पित्तज्वर जातो:- त्यांत जर पित्तपापडा, नागरमोथे, गुळवेल, कुटकी घालून घेतला तर अमृततुल्य गुण करितो.

रक्तपित्तज्वरावर उपचार:- धमासा, अतिविष, किराईत, कुटकी, अडुळसा, पित्तपापडा, काळिद्राक्षें, यांचा काढा साखर घालून घेतला असतां तृषा, दाह, कंडू, रक्तपित्तज्वर, हीं नाश पावतात:- गुळवेल, हिरडेदळ, पित्तपापडा, यांचा काढाही रक्तपित्तज्वराचा नाश करितो:- वाळा, नागरमोथे, पित्तपापडा, सुंठ, रक्तचंदन, धणे, निंबकाड्या, पद्मकाष्ठ, यांचा काढा रक्त-

पित्तज्वराचा नाश करितो. व दाह, शोष, ओकारी, बंद करून जठराग्निप्रदीप्त करितो.

कफज्वराचें कारण:– मिष्टान्नावर आगलेंच पाणी पिणें, मेद्यानुपानें न ढळलेले पदार्थ खाणें व दहीं दूध भक्षण, वारंवार स्नान, दिवानिद्रा, नित्य नवें पाणी पिणें. इत्यादिकांनीं कफज्वर होतो.

कफज्वराचें लक्षण:– अंगजाड्य, कोरडी ओकारी, तोंड गुळचट, पडसें, खोकला, आळस, तृप्ति, अंगथंड, मळ, मूत्र, नेत्र शुभ्रवर्ण, श्वास, स्वरभंग, अन्नद्वेष, शब्द जाड्य, अंगावर सतेंनाकांतून पाणी गळणें, मस्तक दुखणें, निद्राधिक्य, रसवाहिनी नाडींचा रोध, रोमांच, घर्म, पोट घट्ट होणें, मूत्रबाहुल्य, डोळ्यांवर झांपड हीं लक्षणें कफज्वरानें होतात.

कफज्वरावर पाचन:– महाळुंगीचें मूळ, हरीतकी, सुंठ, पिंपळमूळ, यांचें चूर्ण आंनजवखार घालून, ज्वराचे १०दिवसांनंतर घ्यावें. मग काढा घ्यावा. सुंठ, अडुळसा, नागरमोथे, धमासा, यांचा काढा घ्यावा. भारंगमूळ, देवदार, पुष्करमूळ, पिंपळी, गुळवेल, अडुळसा, सुंठ, नागरमोथे, यांचा काढा घ्यावा. पडवळ, त्रिफळा, कुटकी, कचोरा, अडुळसा, गुळवेल, यांचा काढा मध घालून घ्यावा. कांकडशिंगी, कायफळ, पिंपळी, कमळाचा कांदा, यांचें चूर्ण मधांत घ्यावें.

वातकफज्वरावर:– बाहव्याचा गीर, पिंपळमूळ, नागरमोथे, कुटकी, हरीतकी, यांचा काढा घ्यावा म्हणजे वातकफज्वर, आमशूळ दूर होऊन दीपन, पाचन होतें. रिंगणीमूळ, सुंठ, एरंडमूळ, गुळवेल यांचा काढा घ्यावा. म्हणजे वातकफज्वर, त्रिदोषज्वर, श्वास, कास, अरुचि, पृष्ठशूळ, हे रोग दूर होऊन बुद्धि स्थिर राहाते.

पित्तकफज्वरावर:– गुळवेल, निंबकाड्या, कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, पडोळ, रक्तचंदन, यांचा काढा घ्यावा; म्हणजे पित्तकफज्वर, ओकारी, अरुचि, डाळ पडलेली, दाह, शोष, हे दूर होतात रक्तचंदन, पद्मकाष्ठ, धणे, गुळवेल, निंबकाड्या, यांचा काढा कफपित्तज्वराचा नाश करून ओकारी, दाह, शोष, यांसही बसवितो.

सर्वज्वरांवर पाचन:– देवदार, धणे, सुंठ, रिंगणी, डोरली, यांचें चूर्ण

द्यावें. कचोरा, संठ, पित्तपापडा, देवदार, धमासा, डोरली, मोथे, कुटकी, किराईत, यांचा काढा मध, पिंपळी, घालून द्यावा.

कामज्वराचें कारण– इच्छिलेल्या स्त्रीची प्राप्ति न झाली असतां तिचा संग व गुण आणि रूप यांचे निजध्यासामुळें ज्वर होतो.

त्याचें लक्षण– मनोव्यथा, भ्रम, मूर्च्छा, आळस, तदितर कर्माचा कंटाळा, गात्रें शुष्क होणें, कापूर, चंदन, शीतळ छाया, चांदिणें, शीत पदार्थ, यांचे सेवनाची इच्छा, श्वासोश्वास टाकणें, कदाचित् भ्रांति असणें, मोहित असणें, निद्रा, लज्जा, बुद्धि धैर्य यांचा क्षय, दाह, विरह वेदना इत्यादि होतात.

कामज्वरावर उप० स्वरूप, शृंगारित, सुगंधचर्चित, रसिक, कामानें रसरसलेल्या व शृंगारिक भाषण करणाऱ्या, अशा तरुण स्त्रियांनें आलिंगन, संभाषण, स्पर्शादिकें करून कामज्वर शांत होतो. निर्मळ स्थळ, कमळें, सुगंधि फुलांवरून आलेला वायु, जळक्रीडा, सुंदर बागांतून फिरणें, सुरूप स्त्रि यांचा समागम, या उपचारांनीं कामज्वर जातो.

कामज्वर, क्रोधज्वर, शोकज्वर, भयज्वर, यांजवर पित्तशामक उपाय करावे.

विषज्वरावर– पित्तशामक उपाय करावे, व विषांवर उपचार असतील ते करावे.

श्रमज्वरावर– घृत द्यावें, अभ्यंग करावा, व मांसरसोदन* व क्षीरोदन व मदिरा द्यावी.

दाहजन्य व क्षतजन्य ज्वरावर– उष्णोपचार वर्ज करून स्निग्ध व मधुर उपचार करावे.

स्वेदजज्वरावर– वातादि दोषांचें प्राबल्य पाहून उपचार करावे. तृष्णा–

---

* मांसरसानें काढलेला भात.

पाणी द्यावें; आंग रगडावें, त्रिकटू, हिंग, किराईत, यांचें चूर्ण द्यावें.

सन्निपातज्वर:- हा सन्निपात नव्हे तर केवळ मृत्युच होय. सन्निपाताला जो वैद्य जिंकितो, तो मृत्युंजयच, अतएव सन्निपात समुद्रांत बुडाले त्यास जो काढितो. त्याचे मस्तकप कारीं सर्वस्वदान केलें तरीं पुरेसें होत नाहीं.

सन्निपातज्वर:- (ह्मणजे त्रिदोषज्वर.) वातादि त्रिदोष कांहीं निमित्तानें प्रक्षुब्ध झालें असतां त्यांपासून जो ज्वर तो. हा कष्टसाध्य. कारण तिघांचा प्रकोप आहे. अतएव एकाचें उपशमार्थ औषध द्यावें तर दुसरे अधिक होतात.

सन्निपाताचें लक्षण:- जिव्हा काळी व खरखरीत, डोळे ताठलेले, अथवा दृष्टी वक्र व रक्तवर्ण आणि नेत्रांतून पाणी गळतें, तृषा फार, हाडें दुखतात. गीत नृत्यादि नाना चेष्टा, घाम फार, अथवा अगदींच येत नाहीं, क्षणांत दाह, क्षणांत थंडी, डोळ्यांवर झांपड, बडबडणें, अथवा मुक्यासारिखें राहाणें, मोह, गळ्यांत कुसासारिखें खुपणें, मस्तक कांपणें, गळा वाजणें, कानांत विलक्षण शब्द होतो, खोकला, श्वास, अरुचि, भ्रम, निद्रानाश, मळ, मूत्र, फार वेळानें थोडें थोडें होणें, नाडीची तीव्रता, पोट जड होणें, इत्यादि लक्षणें होतात.

सन्निपातावर[1]:- पिंपळमूळ, देवदार, इंद्रजव, वावडिंगें, ब्राह्मी, माका, त्रिकटु, चित्रक, कायफळ, कमळकांदा, यांचा काढा मासाभर गुग्गुळ घालून द्यावा.- रास्ना, हिरडेदळ, डोरली, रिंगणीमूळ, निर्गुंड, पहाडमूळ, वेखंड, चवक, यांचा काढा मासाभर गुग्गूळ घालून द्यावा; ह्मणजे सन्निपात, घाम, शैत्य, बडबड, शूळ, दमा, कफ, वाळंतरोग, यांचा नाश करितो:- रुईचें मूळ, भमासा, देवदार, किराईत, रास्ना, निर्गुंडीचा पाला, वेखंड, टांकळा, शेव-

---

[1] ह्या सन्निपाताचे सुमारें तिसांवर भेद आहेत. व त्यांची अति सूक्ष्म परीक्षा आहे. व ते साधारण वैद्यास देखील दुर्ज्ञेय आहेत. इतका सूक्ष्म विचार लिहून ही उपयोग नाहीं. ह्मणून या पुस्तकांत लिहिले नाहींत. निघंट प्रकाशीं पाहावे.

ज्याची साल, पिंपळी, पिंपळमूळ, मिरें, चवक, सुंठ, अतिविष, माका, यांचा काढा:- सन्निपात, धनुर्वात, दांतखिळी, घाम, श्वास, बाळंतरोग, यांचा नाश करितो.

कर्णमूळ:- सन्निपातज्वराचे अंतीं कर्णाचे खालीं मूळभागीं सूज येऊन गळवा सारिखें गुल्म होतें. त्याचा उगम आंतून असतो. तो रोग असाध्य अथवा कष्टसाध्य. हें कर्णमूळ मृत्यूचें दुसरें निमंत्रण.

कर्णमूळावर:- जळवा लावून रक्तमोक्ष करावा. तेणेंकरून ग्लानि येऊन फारच आतूर झाला तर तूप पाजावें.

रास्ना, सुंठ, महाळुंगीचें मूळ, दारूहळद, टाकळी या औषधांचा लेप करावा. वर पोटीस बांधून पिकवावें. आणि त्याचे छिद्रांत जुने तुपाची अथवा मलमाची वात करून दररोज नवी घालीत जावी. म्हणजे पुवाचा निचरा होऊन भरत येतें. नाहींतर आंतले आंत पिकोन खालीं छातींत उतरतें;- किंवा कानांतून वाहूं लागतें, तें अगदीं असाध्य. यास्तव बाहेर तोंड पाडून प्रतिकार होईल तें करावें.

सन्निपातावर:- आणखी उपचार:- कुटकी, किराईत, पित्तपापडा, गुळवेल, कचोरा, रास्ना, पिंपळी, कमळकंद, मेहेंदी, रिंगणी, देवदार, सुंठ, हिरडेदळ, धमासा, ब्राह्मी, यांचा काढा, त्रिदोषज्वर, दिवानिद्रा, रात्रीं जागर, तृषा, खोकला, शोक, दाह, दमा, यांस घालवितो. याच काढ्यांत मध आणि पिंपळी घालून घेतला असतां जीर्णज्वर, विषमज्वर, हे जातात.

जीर्णज्वर:- (म्हणजे हाडींज्वर) फार दिवस शरीरांत रेंगाळलेला जोबारीक ताप तो. त्याचें कारण, पूर्वीं मोठा ताप आला होता. त्या तापाचे तीन अंश औषधाद्युपचारें करून गेले आणि अवशिष्ट ज्वर चालढकली मुळें नसाच शरीरांत राहातो. तो; पुढें अस्थींत प्रवेश करितो. त्याची उपेक्षा केली असतां पुढें पांडु, क्षय यांना परिणाम होतो.

जीर्णज्वराचें लक्षण:- उत्तरोत्तर मंद गतीनें आहार कमी होत जातो.

अन्न पचन होत नाहीं. मळशुद्धि स्वच्छ होत नाहीं. हाडें धगधगीत राहातात. तोंडास पाणी सुटतें, शक्र धातू पातळ असून क्षीण इत्यादि लक्षणें जाणावीं.

जीर्णज्वर यद्यपि एकदांच तादृश पीडा करीत नाहीं तथापि उत्तरोत्तर अति पीडा कारक होऊन प्राणनाशक रोग उत्पन्न करितो.

जीर्णज्वरावर.– वाळबेल, किरमिरी आंबा, टांकळी, पहाडमूळ, टेंटू यांचा काढा घेतला असतां जीर्णज्वर अगदीं जातो. पोटशूळ, माथेशूळ श्वास, कास, यांचा नाश होतो. पिंपळी, जुना गूळ दुप्पट हें एकत्र करून घेतलें असतां जीर्णज्वर, अजीर्ण, अग्निमांद्य, खोकला, अरुचि, कृमी, श्वास, यांचा नाश होतो. गुळवेलीचा काढा पिंपळी घालून घ्यावा, म्हणजे कफोद्भव जीर्णज्वर जातो. जिरें आणि तिवरशा, जुनागूळ हीं एकत्र करून रोज सकाळ संध्याकाळ घेत जावें. गुळवेलीचें सत्व तूप साखरेबरोबर किंवा मध साखरेबरोबर घ्यावें. गुळवेल, सरांटे व त्याचे चतुर्थांश सुंठ, यांचा काढा, मधुशर्करा युक्त घ्यावा. एका सप्तकांत जीर्णज्वर जातो. क्षुधा प्रदीप्त होत्ये, धातू जमूं लागतात.

काळीं द्राक्षें, गुळवेल, काकडशिंगी, कचोरा, नागरमोथे, रक्तचंदन, सुंठ, कुटकी, पहाडमूळ, किराईत, धमासा, वाळा, धणें, पद्मकाष्ठ, काळावाळा, रिंगणीमूळ, कमळकांदा, निंबकाड्या, यांचा काढा घेतला असतां, जीर्णज्वर, अरुचि, श्वास, कास, सूज, अजीर्ण, हे रोग दूर होतात. गुळवेल, पिंपळमूळ, पिंपळी, हरीतकी, लवंग, निंबाची साल, श्वेतचंदन, सुंठ, कुटकी, किराईत यांचें चूर्ण सर्वज्वरांचा नाश करितें. आंवळकठी, सैंधव, चित्रक, हरितकी, पिंपळी, यांचें चूर्ण करून ऊन पाण्यांत द्यावें. म्हणजे सर्व प्रकारचे ज्वर जातात. गाईचें दूध तोळे ४ पाणी १६ पिंपळ्या ३ हीं कल्हईचे भांड्यांत कढवून पाणी आटलें म्हणजे त्यांतील पिंपळ्या चावून वरती दूध प्यावें. वर दूध भात पथ्य.

स्वर्ण मालिनी वसंत-अथवा लघुमालिनी वसंत-अथवा मंडूर अनुपान योजून द्यावा.

एकाहिक द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक, यांचीं कारणें:- ज्याचा ज्वर शुक्रांत गेला आहे त्याणें विरुद्ध पदार्थ, जडान्न, आंबट, खिरवट, मक्षित्यानें अल्प दोष उत्पन्न होऊन तो सप्त धातूंतून कोणत्याही धातूला व्यापून नाना प्रकारचे विषम ज्वरांस उत्पन्न करितो: अम्लादि पदार्थांचें भक्षणानें पित्तादि दोष कुपित होऊन आरंभापासून ही विषमादिज्वर उत्पन्न होतात:-

एकाहिकज्वरावर:- अडुळसा, कडुपडवळ, त्रिफळा, काळीं द्राक्षें, बाभुळ्याचा गीर, निंब काड्या, यांचा काढा मध व साखर घालून घ्यावा. काळींद्राक्षें कडुपडवळ, निंबकाड्या, नागरमोथे, इंद्रजव, त्रिफळा, गुळवेल, यांचा काढा द्यावा.

द्व्याहिक वत्र्याहिकज्वराचें विशेष कारण:- अतिक्रोधानें किंवा अति भयानें, अथवा भयंकरअरण्य, मोठ्या अग्नीच्याज्वाळा व जळकें शरीर, पाहिल्यानें, वदुसरा फार वाईट पदार्थ खात आहे तें पाहिल्यानें, देशांतरीं मरणपावलेल्या आप्तीयाची मरणवार्ता ऐकिल्यानें व पिशाचादिकांवर आस्तिक्य बुद्धी ठेवणारे, यांस त्यांच्या बाधेच्या कांक्षेनें ही ज्वर होतो.

त्याजवर उपचार:- रक्तचंदन, पिंपळी, सुंठ, वाळा, नागरमोथे, धणे, यांचाकाढा मध व साखर घालून द्यावा.

चातुर्थिकाचें:- विशेष कारण:- दुःस्वप्नें, मेलेल्या मनुष्याचे केंस, पिंजारलेलें डोकें, दारुण युद्ध, शूळावर अथवा फांशीं चढविलेल्यास पाहिल्यानें व अतिभयंकर कर्म पाहिल्यानें ही विषमज्वर होतो.

---

+ क्षीर मत्स्यादि.

चातुर्थिकज्वरावर:- जुनेंतूप आणि हिंग, हीं एकत्र करून ज्वर आला म्हणजे नाकांत घालावीं. अगस्त्याचे पानांचा रस नाकांत घालावा. देवदार, आंवळकाठी, सुंठ, हिरडेदळ, अडुळसा, यांचा काढा मध व साखर घालून घ्यावा.

शीतज्वर:- (हिंवताप) शिताफळें, केळीं, इत्यादि शीत पदार्थांचें अति भक्षणानें वत्यांचें भक्षण करून वर पाणी पिण्यानें हा शीतज्वर उत्पन्न होतो व अतिभयानें किंवा अतिशोकानेंही येतो.

शीतज्वरावर उपचार:- त्रिकटूचें चूर्ण नाकांत घालून प्यावें अथवा हिंव येतांच निर्धूम अग्नीनें शेकावें. इंद्रजव, अडुळसा, वावडिंग, गुळवेल निर्गुंडीचा पाला, माका, सुंठ, डोरली, अजमोदा, यांचा काढा घ्यावा.

सर्वविषमज्वरावर:- नागरमोथे, रिंगणी, गुळवेल, सुंठ, आंवळकाठी यांचा काढा मध, पिंपळी, घालून घ्यावा. दारुहळद, देवदार, इंद्रजव, मंजिष्ठ, बाहव्याचा गीर, पाहाडमूळ, पिंपळी, अर्जुनवृक्षाची साल, अश्वगिमिरी, किराईत, कोरांट्याचें मूळ, पद्मकाष्ठ, कुडेसाल, धणे, सुंठ, मोथे, वाळा, रिंगणी, हरीतकी, पित्तपापडा, कुटकी, धमासा, गुळवेल, एरंडमूळ, यांचा काढा दिला असतां, धातुगतज्वर, सर्वविषमज्वर, त्रिदोषज्वर, भूतज्वर, हे दूर होतात. पडवळ, ज्येष्ठमध, हरीतकी, कुटकी, मोथे, यांचा काढा घ्यावा. अडुळसा, मोथे, गुळवेल, सुंठ यांचा काढा मधपिंपळी घालून घ्यावा.

---

## महाशीतज्वरांकुश.

हरताळ ८ भाग, शंखचूर्ण ४, मोरचूत १, यांचा कोरफडीचे रसांत एक दिवस खल करून शरावांत घालून गजपुट द्यावें. थंड झाल्यावर काढून खलून ठेवावें, तें १ गुंज किंवा २ गुंजा भस्म जिरें व साकर यांबरोबर द्यावें. वर पाणी घोटभर प्यावें. पथ्य दहीं भात; या औषधानें सर्व विषमज्वर

जातात. गुळवेल, आंवळकाठी, उटकटारी, सुंठ, मोथे, यांचा काढा पिं-पळी आणि मध घालून द्यावा. हिरडेदळाचें चूर्ण मध घालून द्यावें. वर्धमान पिंपळी द्यावी. जिरें व त्याचेदुप्पट जुना गूळ घालून द्यावें. अ-थवा त्रिफळा गुळाबरोबर द्यावा. कडूपडवळ, कुटकी, ज्येष्ठीमध, हिर-डेदळ, नागरमोथे, यांचा काढा द्यावा. नुसती पिंपळी मधाबरोबर द्यावी. त्रिफळा, आंवळकाठी, सालवण, कुटकी, पिंपळी, काळीद्राक्षें, वाळवेल, डोरली, रक्तचंदन, अतिविष, नागरमोथे, इंद्रजव, यांचा चतुर्थांश का-ढा उरवून त्यांत १भाग तूप, घालून पुनः तो काढा अग्नीवर ठेवून तूपरा-ही तों पर्यंत कढवावा. नंतर ते तूप प्यावें. ह्मणजे विषमज्वर, क्षय, माथेशूळ, पोटशूळ, अरुचि मूर्च्छा, शोष, संधिगत ऊष्णवायु यांचा-नाश होतो.

अजीर्णज्वरः ह्मणजे वातुळ जड पदार्थ, शाका, फळें, कंद, यांचा अतिभक्षणानें, भोजनावर लागलेंच खाल्यानें अजीर्ण होऊन ज्वर ये-तो त्याचें लक्षण. ढेंकर, वांति, भ्रम, मस्तक, दुखणें, कंबर, बरगड्या, गुद, पोट, दुखणें, अरुचि, शोष, मोह, उचकी, हीं लक्षणें होतात.

अजीर्णज्वरावरः- रिंगणी, पित्तपापडा, यांचा अष्टमांश काढा द्यावा. नागरमोथे, सुंठ, यांचा काढा द्यावा. किराईत, सुंठ, गुळवेल, पिंपळी, नागरमोथे, यांचा काढा द्यावा. अजमोदा, हरीतकी, कचोरा, संचळ, यां-चें चूर्ण उष्णोदकांत द्यावें.

रक्तज्वराचें कारण व लक्षण. आपल्यास आवडत्या वांचून मोद-कादि पदार्थ खाणें, मद्यपान करणें, मल्लयुद्ध करून वारा घेणें, दुष्टजला-शयाचें पाणी पिणें, अपक्वमांसभक्षण, हत्ती, घोडे यांजवर बसून त्व-रेनें जाणें, या कारणानें रक्त क्षुब्ध होऊन ज्वर येतो. याचें लक्षण.- ओकारी, बडबड, शरीर, नेत्र रक्तवर्ण, नाकांतून रक्तस्राव, अतितृष्णा,

अति दाह, भ्रम, हीं लक्षणें होतात.

रक्तज्वरावर.- नागरमोथे, पित्तपापडा, रक्तचंदन, ज्येष्ठीमध, मनुका, वाळा, शिवण, काकोली, धणे यांचा काढा द्यावा. व पित्तज्वराचे उपचार करावे रक्त काढावें.

मंथरज्वर- (ह्मणजे मधुरा) याचें लक्षण. अतिसार, दाह, मोह, भ्रम, ज्वर, ओकारी, तृषा, निद्रानाश, तोंडावर लाली, तालु, जिव्हा यांस कोरड, गळ्यावर पांढऱ्या मोहऱ्यांसारखा पुरळ, डोळ्यांवर झांपड, हीं लक्षणें होतात.

मधुरा याजवर उपचार- नागरमोथे, पित्तपापडा, ज्येष्ठीमध, काळींद्राक्षें, यांचा अष्टमांश काढा करून मध घालून द्यावा- रक्तचंदन, वाळा, धणे, पित्तपापडा, सुंठ, नागरमोथे, यांचा काढा करून द्यावा अथवा माशी गुळांत घालून गिळावयास द्यावी. व वडाचीं पानें व बाजरीचें पीठ यांचा काढा करून द्यावा. अथवा पुदिना, गवतुळस, कृष्णतुळस, तिहींचा रस काढून त्यांत खडीसाखर तीनमासे घालून तीनदिवस देतजावा. १नागरमोथे, १कपुरीमधुरी, १गवतुळस. १पित्तपापडा, १सुंठ, यांचा काढा करून द्यावा. मधुराज्वर बरा होतो.

ज्वराच्या अंतर्दाहावर- पूर्वदिवशीं रात्रीं धणे कुटून पाण्यांत भिजत घालून ठेवावे आणि प्रातःकाळीं तें पाणी गाळून आंत साखर घालून द्यावें.

ज्वर जाऊन कांहीं कसर राहिली असतां त्याजवर उपचार- ब्राह्मीचीसाल, गुळवेल, देवदार, डोरली, सुंठ, कमळकंद, यांचा काढा द्यावा. ज्वराची कसर, दमा, यांचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

ज्वर शांत झाल्यावर- तोंड कडू होतें त्याजवर- कुटकीचा काढा घ्यावा, अथवा चूर्ण पाण्याबरोबर घ्यावें. कायफळ, गवताचें फूल, मोथे, धणे, कांकडशिंगी, हिरडेदळ, ब्राह्मीची साल, पित्तपापडा, सुंठ, देवदार यांचा काढा भाजलेला हिंग मध घालून घ्यावा. ह्मणजे अरुचि, खोकला, गळ्यांतील रोग, दमा, हीं दूर होतात. शेंदेलोण व महाळुंगाचा मगज, यांची तुपांत गोळी

करून घ्यावी. ह्मणजे तोंडाला रुचि येऊन अन्नावर वासना होत्ये. महाळुंगाचा मगज, मीठ, हीं तुपाशीं द्यावीं. किंवा डाळिंबाचें चूर्ण, मीठ, हीं तुपाबरोबर द्यावीं. आंवळकाठी, शेंदेलोण, चित्रकमूळ, बाळहिरडे, पिंपळी यांचें चूर्ण करून त्याचा उष्णोदकांत देणें ह्मणजे रुचि, पाचनशक्ति, अग्निदीप्ति आणि मलशुद्धि हीं होतात.

उलटलेल्या ज्वरावर:- कुटकी, वाळा, अतिविष, पित्तपापडा, मोथें यांचा काढा वातादि दोषांचें तारतम्य पाहून मध, अथवा साखर वगैरे अनुपान योजून द्यावें.

ज्वराचे दहा उपद्रव:- ते असे, अतिसार अथवा मलबद्धता, तृषा, खोकला, श्वास, आंग दुखणें, ओकारी, अरुचि, उचकी, मूर्छा, उरांत दुखणें यांतून एखादा होतो. किंवा अनेक होतात.

ज्वर मुक्तीचे पूर्वरूपाचें लक्षण:- तृष्णा, घर्म प्रवृत्ति, भ्रम, तृषा, मलप्रवृत्ति, निश्चेष्ट पडणें, कुंथणें, गात्रांना दुर्गंधी वगैरे, हीं लक्षणें होतात.

विगतज्वराचें लक्षण:- शरीर हलकें, मुखपाक, घर्मप्रवृत्ति, सर्व इंद्रियांस आपापले व्यापारांविषयीं सामर्थ्य, शिंका, अन्नावर इच्छा, मस्तकास कंडू आणि ग्लानि व मोह यांचा नाश, हीं लक्षणें होतात.

---

## अतिसार.

अतिसाराचें कारण:- जड पदार्थ, अतिस्निग्ध पदार्थ, अति रूक्ष अति उष्ण पदार्थ, पातळ पदार्थ, अतिस्थूल, लाडु, मोदक, शिकरण इत्यादिक, अतिशीतळ पदार्थ व विरुद्ध पदार्थ, यांचे विशेष भक्षणानें व भोजन होतांच फिरून भोजन करणें, अपक्व अन्नभक्षण, विषमाशन, अतिखाणें, स्नेह

---

१ क्षीरमत्स्यादिक. २ अकाळीं थोडें किंवा फार खाणें.

पिणें व वमन, विरेचन यांचा अतियोग करणें, अतिमैथुन, किंवा इच्छा असतां मैथुनांचा अलाभ, विषमादिसेवन, भय, शोक, अतिमद्यपान, दुष्टजलपान, जेंभावत नाहीं तें खाणें, ज्या ऋतूंत जो उपचार असावा तो न मिळणें, जळांत अतिक्रीडा करणें, मलमूत्रांचा रोध करणें, व जंतांना कोप झाला असतां. इत्यादि कारणांनीं अतिसार उत्पन्न होतो.

अतिसाराची संप्राप्ति:- रस, जल, मूत्र, स्वेद, मेद, कफ, पित्त, व रक्त हे [1]अब्धातु क्षोभित होऊन अग्नीला मंद करून मलमिश्रित होतात. आणि वायूनें अधोदेशीं प्रेरित असतां गुदावाटे पडूं लागतात.

अतिसाराचें लक्षण:- नाभि, गुद, यांस व्यथा, पोट फुगणें, अन्न न पचणें, गात्रें गळणें, कांहीं वेळ वायूचा अवरोध, मलबद्धता व मलशुद्धि होते तेव्हां चौथ्यापाणी, फेंस, मस्त्रा, इत्यादि विकार होतात.

ज्वरातिसार, आमातिसार, पक्वातिसार, रक्तातिसार, शोकातिसार, व भयातिसार, वातादिदोषजन्यातिसार,- असे अनेक प्रकारचे अतिसार आहेत.

अतिसाराचें असाध्य लक्षण:- ओकारी, दुःख, ज्वर, खोकला, कफ, श्वास, तृषा, मोह, सूज, शूल, उचकी व भुवळ, इत्यादिकां सारखे ढाळ व त्यांस कुजलेल्या सारखी दुर्गंधी येत्ये अशीं लक्षणें होतात. तो असाध्य जाणावा.

ज्वरातिसार:- (ह्मणजे ज्वरापासून जडला जो अतिसार तो.) त्याजवर चिकित्सा- ज्वरप्रकरणीं लंघनांचा योग सांगितला आहे तो येथेंही करावा. इसबगोलाचा काढा द्यावा. अथवा तें भिजत घालून साखरे बरोबर पाणी द्यावें. सुंठ, गुळवेल, वाळा, रक्तचंदन, कुड्याची साल, नागरमोथे, किराईत, हीं औषधें समभाग घेऊन काढा करून द्यावा. ह्मणजे ओकारी, दाह, तृषा, सूज ज्वरयुक्त अतिसार हे रोग दूर होतात. गुळवेल, अतिवि-

[1] उदकप्रधान.

ष, देवदार, इंद्रजव, मोथे, किराईत, सुंठ, यांचा काढा द्यावा. ज्वरातिसारा-चा नाश करितो. रक्तचंदन, वाळा, कुडेसाल, पहाडमूळ, कमलकंद, धणे, गुळवेल, किराईत, नागरमोथे, बाळबेल, अतिविष, सुंठ, यांचा काढा मध घालून द्यावा. म्हणजे अतिसार, वांति, तृषा, दाह, अरुचि यांचानाश होतो. बाळबेल, किरमाणी ओंवा, टांकळी, पाटला[1], टेंटू, पहाडमूळ, नागरमोथे, अतिविष, इंद्रजव, कुडेसाल, कुटकी, गुळवेल, सुंठ, यांचा काढा द्यावा. येणेंकरून ज्वरातिसार, खोकला, ओकारी, श्वास, शूळ हे रोग दूर होतात. पंचधान्यें म्हणजे वाळा, बाळबेल, मोथे, सुंठ, धणे यांचा काढा सर्व प्रकारचे अतिसारांस दूर करितो. आल्याचा रस नाभीला चोळला असतां दुःसाध्य ही अतिसार बरा होतो.

शोफातिसारावर[2]:- देवदार, अतिविष, पहाडमूळ, नागरमोथे, मिरें, कुडेसाल, यांचा काढा शोफातिसाराचा नाश करितो.

पित्तातिसारावर:- धणे, वाळा, बाळबेल, नागरमोथे यांचा काढा द्यावा. इंद्रजव, मोथे, सुपारी, धायटीचें फूल, बाळबेल, लोध, सुंठ, यांचें चूर्ण करून दुप्पट दूध घालून ताकांत कालवून द्यावें. सुंठ, धायटीचें फूल, कांटेसांवरीचाडींक, अजमोदा, यांचें चूर्ण ताकांत द्यावें. तेंड, तमालपत्र, चित्रक, बाळबेल, डाळिंबसाल, यांचें चूर्ण ताकांत द्यावें याणें अतिसार जाऊन जठराग्नि प्रदीप्त होतो.

रक्तातिसारावर- कुडेसाल नागरमोथे, बाळबेल, अतिविष, वाळा, यांचा काढा रक्तातिसार व आमशूळ यांचा नाश करितो. डाळिंबाची साल, कुडेसाल बाळबेल यांचा काढा मध घालून द्यावा. तांदुळांचे धुवणांत चंदन उगाळून त्यांत मध व साखर घालून द्यावें. म्हणजे रक्तातिसार दूर

---

१ पाडळ, २ शोफ म्हणजे सूज.

होतो आणि दाह शोष हीं असतात. बाळबेल यांचें चूर्ण गुळाबरोबर द्यावें. ह्मणजे रक्तातिसार, पोटशूळ, आमशूळ, यांचा नाश होतो. जांभळी, आंबा, आंवळी यांचीं कोंवळीं पानें कुटून रस काढून त्यांत बकरीचें दूध घालून द्यावें. आंब्याची कोय ताकांत अथवा धुवणांत उगाळून द्यावी.

जीर्णातिसारावर:- धायटीचें फूल, मोथे, आंवळकठी पहाडमूळ, गवलाचें फूल, ज्येष्ठमध, बाळबेल, जांभळी, आंबा, यांची अंतर्साल, सुंठ, अतिविष, लोध्र, वाळा, यांचें चूर्ण तांदुळाचें धुवणाबरोबर, किंवा ताकाबरोबर द्यावें.

आमातिसार:- ह्मणजे अन्नरसाचा पाक चांगला होत नाहीं. तेणेंकरून आमांश होऊन मळाबरोबर आमांशाचे डाळ होतात.

आमांशातिसारावर,- प्रथम झाडा होण्यासाठीं एरंडेल द्यावें अथवा बाल हर्तकी, (तुपांत तळलेली असली तर फारच गुणकारी) पिंपळी इचें चूर्ण उष्णोदकांत द्यावें. पहाडमूळ, बाळबेल, धायटीचें फूल, कुडेसाल, वाळा, नागरमोथे, लोध्र, रक्तचंदन, डाळिंबसाल, यांचा काढा करून मध घालून घ्यावा. तेणेकरून शूळ युक्त आमातिसार व रक्तातिसार जातात. सुंठीची पूड करून तिला तुपाचें मोहन घालून एरंडाचे ओले पानांत पुडी बांधून फुंपाट्यांत भाजून काढून त्यांत समभाग साखर घालून तोळा अथवा अर्धतोळा दोन वेळा देत जावें. ह्मणजे आमातिसार बंद होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. धणे, सुंठ, नागरमोथे, वाळा, बाळबेल, यांचा काढा द्यावा. बडीशोप, सुंठ, धणें, वाळा, हिरडे, आंवळकाठी, हीं तुपांत तळून प्रथम उन्हापाण्याबरोबर द्यावीं. नंतर ताकाबरोबर द्यावीं. आंवेचा झाडा होण्यासाठीं ऊष्ण पाण्यांत तूप घालून द्यावें, झाडा झाल्यावर थंड पाण्यांत तूप घालून घ्यावें. सुंठ, गूळ, तूप यांची गोळी करून खावी. ह्मणजे आंवेचें पाणी होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. कोंवळे बांबुकाचा भांगाबरोबर फांकी करून

त्यांत सैंधव व थोडासा हिंग भरून एरंडाचा पानांत गुंडाळून फुंपाट्यांन- भाजून काढून तें कोमट थोडुक खावें. याणें आंवेचें पाणी होऊन आमाति- सार बंद होतो. खसखस, बडिशेप, सुंठ, हीं अर्धीकच्चीं भाजून त्यांचें चूर्ण साखरे बरोबर घ्यावें. अथवा ताकाशीं घ्यावें. सुंठ, बाळहर्तकी, बडीशेप आ- णि पोस्त हीं तुपांत परतून कुटून वस्त्रगाळ करून सम शर्करा घालून चूर्ण तीन मासे उष्णोदकांत द्यावें.

पक्कातिसारावर:- मोचरस, सुंठ, मोथे, पहाडमूळ, लोध्र, धायटीचें फूल यांचें चूर्ण दह्यांबरोबर अथवा ताकाशीं द्यावें.

सर्वातिसारावर:- शुद्ध केलेली अफू व केशर समभाग घेऊन खलून गुंजे- प्रमाणें गोळ्या करून ठेवाव्या. एक एक गोळी मधाबरोबर द्यावी. कुड्याचे- सालीचा काढा षोडशांश करून त्यांत अतिविषाची पूड घालून द्यावा. पा- रा व त्याचे दुप्पट गंधक याची कज्जली करून व त्रिकटु आणि पंच लवण- (ह्मणजे टांकणखार, मीठ, सैंधव, बीडलवण, संचळ.) इंद्रजव, यांचें चूर्ण या सर्वांचा एकत्र खल करून चूर्ण करून ठेवावें ते २ अथवा ३ मासे चूर्ण ४ तो- ळे कांजींत किंवा ताकांत घालून द्यावें. रक्तचंदन, वाळा, कुड्याचीसाल, इंद्रजव, पहाडमूळ, पद्मकाष्ठ, धणे, गुळवेल, किराईत, मोथें, अतिविष, बेलकाचरी, सुंठ, यांचा काढा मध घालून द्यावा. ह्मणजे सर्व अतिसार व ज्व- र हे दूर होतात.

---

## ग्रहणी.

संग्रहणीचें कारण:- अतिसार निवृत्त झाला असतां अग्नि मंद असतां त्यांत विरुद्धाहारानें अथवा जडान्न भक्षणानें. आमांश होऊन अग्नीचें स्थान दुष्ट होतें यास्तव आममिश्र मल पडूं लागतो त्याला संग्रहणी ह्मणतात. अ-

१ सावरीचा चीक.

थवा अतिसारावांचून ही जडान्न भक्षणानें किंवा कारणांतरानें संग्रहणी रो-
ग होतो. ती संग्रहणी प्रतिदिवशीं आंवेचा संग्रह करून वारंवार शूल्ययुक्त-
आंवेला सोडिते. किंवा एक दोन दिवस सारखा धरून एके दिवशीं आमयु-
क्त मल वारंवार पडतो. पुनः एक दोन दिवस सारखा धरून पुनः पडूं लागतो.
किंवा भक्ष्म होतो. अथवा चोथा पाणी पडतें.

संग्रहणीचें स्वरूप व लक्षण:- संग्रहणी ह्मणजे अग्नीचें स्थान त्याचें आश्रयेंकरून वातादि दोष कुपित होऊन जो रोग होतो तो. तिचें लक्षण. जी आंव पडते त्या आंवेला अति दुर्गंधि व गुरडा असतो. वायूचा योगानें क्षणोक्षणीं तुंबारा धरतो आणि पित्ताच्या योगानें पडते ती कच्ची आंव पडते किंवा त्या आंवेचा पाक होऊन ही पडते.

संग्रहणीचें पूर्वरूप:- तहान, आळस, शक्तिक्षीणता, जठराग्निमंद असतो यामुळें अन्नाचें विरुद्ध पचन ह्मणजे करपल्या सारखें होतें. व त्याचा पाक कालातिक्रमानें होतो व शरीर जड होतें. आणि बावडें स्वा-द्यावर अति प्रीति होते. वातसंग्रहणी, पित्तसंग्रहणी, कफसंग्रहणी, आमसंग्रहणी, गुल्मसंग्रहणी, रक्तसंग्रहणी असे तिचे अनेक भेद आहेत. — त्या संग्रहणीचे उपद्रव. अग्निमांद्य, सूज, निस्तेजपणा, अन्न नपचणें, अन्नाचा तिरस्कार, ग्लानि, तृषा, दुर्बळपणा, श्वास, कपटदेंकर, पोटफुगणें, हे उपद्रव होतात.

संग्रहणीवर:- औषधोपाय करण्यापूर्वीं दीपन, पाचन- अजमोदा, संठ, वाळा, धणे, अतिविष, नागरमोथे, रानगांजा यांचें चूर्ण द्यावें.

वात, पित्त, कफ, जन्यसंग्रहणीवर औषध:- गुळवेल, अतिविष, संठ, नागरमोथे, यांचा काढा द्यावा. मिऱ्यें, रूप्य, गंधक, स्वागीरवार, वच-नाग, पिंपळी, धोत्र्याचें बीं हीं औषधें एकत्र खल करून भांगेचें पाणी घा-लून पुनः दोन प्रहर खल करून गोळ्या गुंजे प्रमाणें कराव्या. एक अथवा

दोन गोळ्या उष्णोदका बरोबर किंवा ताका बरोबर द्याव्या. पारा, गंधक, अतिविष, बाळहिरडे, अभ्रकभस्म, क्षारत्रय, (जवखार, सज्जिखार, टांकणखार) मोचरस, वेखंड, यांचें चूर्ण करून भांगेच्या पाण्यांत व लिंबूचे रसांत खलून दोन गुंजेप्रमाणें गोळ्या कराव्या प्रातःकाळीं १ गोळी मधांत घालून त्यांत शंखभस्म १ गुंजभर घालून द्यावी.

गुल्मसंग्रहणीवर:- पेटुळी, मिरें, अमरवेल, सुंठ, चित्रक, हिरडेदळ, करंजबीज, बाळबेल, यांचा काढा सर्व संग्रहणीचा नाश करितो. सुंठाचे काढ्यांत समभाग तूप घालून पुनः शिजवून कांहीं अंश आटल्यावर त्यांत भाताच्या लाह्या कुटून तें प्यावें ह्मणजे प्लीहा आमवायु व संग्रहणी यांचा नाश होतो.

रक्तसंग्रहणीवर:- पहाडमूळ, अतिविष, इंद्रजव, कुडेसाल, मोथें, कुटकी, धायटीचें फूल, सुंठ, बाळबेल, रसांजन[1] यांचें चूर्ण तांदळांचें धुवण व मध यांबरोबर द्यावें. किराईत, कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, त्रिकटु हीं समभाग व या सर्वांचे दुप्पट कुड्याचीसाल किंवा कुडे, चित्रक दोन भाग, या सर्वांचे दुप्पट गूळ यांचें एकत्र चूर्ण करून कोमट पाणी घेऊन त्यांत द्यावें, ह्मणजे रक्तसंग्रहणी, पांडुरोग, अतिसार, कामोद्व, अरुचि, मेह, यांचा नाश होतो. सज्जीखार, जवखार, सेंधव, पादेलोण, बीडलोण, त्रिकटु, चवक, अजमोदा, चित्रक, पिंपळमूळ, जिरें, बडीशेप, यांचें चूर्ण ऊन पाण्यांत अथवा बोरीचे सालीचे काढ्यांत किंवा ताकांत, अथवा तारतम्य पाहून दुसरें अनुपान योजून द्यावें. ह्मणजे संग्रहणी, उदर, गुल्मवायु, मूळव्याध यांचा नाश होतो. सज्जीखार, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, मिरें, सुंठ, मीठ, टांकणखार, सेंधव, बीडलोण, पादेलोण, गूळ, भाजलेला-

१ रसांजन ह्मणजे दारू हळदीचा अष्टमांश काढा करून त्यांत शेळीचें दूध काढ्याचा चतुर्थांश इतकें घालून कढवून शुष्क करतात तें.

हिंग, अजमोदा, यांचें चूर्ण डाळिंबाचे रसांत अथवा माहळुंगाचे रसांत व बेद-रक्काथ यांबरोबर घ्यावें, ह्मणजे संग्रहणी, मुळव्याध, यांचा नाश होऊन मुखास रुचि येऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. पादेलोण, चित्रक, मिरें, यांचें चूर्ण ताकाबरोबर सेवन करावें, ह्मणजे संग्रहणी, उदर, गुल्म, मुळव्याध, अग्निमांद्य, प्लीहा. यांचा नाश होतो. चित्रक, चवक, सुंठ, बाळबेल, यांचें चूर्ण ताकाबरोबर घ्यावें. मोथे, इंद्रजव, बाळबेल, वाळा, सुपारीचें फूल, यांचा काढा शेळीचें निरसें दूध समभाग घालून द्यावा, ह्मणजे आमसंग्रहणी, रुधिरसंग्रहणी यांचा नाश होतो. मिरीं १ हिंगुळ १ खागीरखार लाही १ गंधक १ पिंपळी १ बचनाग १ आणि धोत्र्याचें बीं ॥ हीं सर्व औषधें एकत्र करून खलून नंतर भांगेच्या रसांत पुनः २ प्रहर खलून गुंजेप्रमाणें गोळ्या करून ठेवाव्या. एक अथवा दोन गोळ्या ताकाबरोबर द्याव्या. कुडेपाक व पंचामृत पर्पट्यादि औषधें हीं ग्रहणीवर प्रशस्त आहेत.

---

## अर्श.

मुळव्याधीचें कारण:— अशक्तपणानें व मिरच्या वगैरे तीक्ष्ण पदार्थ व रूक्ष पदार्थ यांचे अतिभक्षणानें व कैफी पदार्थ भक्षणें करून मलावरोध झाल्यानें फार कुंथणें, फार धांवणें, अतिमैथुन, मद्यादिकांचें अतिसेवन, रात्रौ जागरण, शोक, इत्यादि कारणांनीं मुळव्याध होतो. त्या मुळव्याधीचे सहा प्रकार आहेत.

मुळव्याधीवर उपचार:— वाळलेले सुरणाचें चूर्ण ८ भाग, चित्रकमूळ ४, बाळहरतकी १, सुंठ १, पिंपळी ॥, या औषधांचें एकत्र चूर्ण करून नंतर १४ भाग गूळ घेऊन त्याचा पाक करून त्यांत तें चूर्ण घालून त्याच्या वड्या कराव्या. रोज १ किंवा २ खाव्या. ह्मणजे अग्निमांद्य, मुळव्याध

१ बोरीचा काढा.

मलावरोध, हे रोग दूर होतात. पिलु वृक्षाचीं ओलीं फळें भक्षिलीं असतां कृमि, गुल्म, अर्श, संग्रहणी हे रोग दूर होतात. लाजाळूचा रस व तूप हीं समभाग करून द्यावा. रक्त पडत असल्यास लोणी व तीळ द्यावे. अथवा लोणी, नागकेशर, साखर हीं एकत्र करून भक्षावीं. सुंठीचें चूर्ण ताकांत द्यावें. तीळ, बिबवे, वाळहरतकी, यांची गुळांत गोळी करून द्यावी. ह्मणजे श्वास, कास, पांडुरोग, ज्वर, मुळव्याध, हे रोग दूर होतात. उन्हाळीच्या मुळ्या दह्यांत द्याव्या. राळेचें चूर्ण शिरस व तेल हीं एकत्र करून धुरी द्यावी. खारकेची बी बारीक करून धुरी द्यावी. कडुनिंबाच्या बिया तेलांत तळून त्यांतच खलाव्या आणि त्यांत थोडी मोरचुताची लाही घालून तें मलम मोडास लावावें. ह्मणजे हे मोड गळून पडतात. सेंधव देवडांगरीचें बीज, कांजींत वाटून मोडास लेप करावा. पिंपळीचें चूर्ण, ताकांत द्यावें. देवडांगरीच्या काढ्यानें गुदप्रक्षालन करावें. एरंडेल साखरेबरोबर प्यावें. खाजच्या करणाचें काप तुपांत तळून लोणी व साखर यांजबरोबर खावें. मुळ्याचें काप तुपांत तळून साखरेशीं खावें. संगजिरें, कल्हई, सफेता, सोनकाव, तुरटीची लाही, मुरदाडशिंग, मेण, हळद, हीं शिळे लोण्यांत खलून अथवा एरंडेलांत खलून लावीत जावी. पांढरे जास्वंदीच्या कळ्या साजूक तुपांत तळून खाव्या. नृकेश, सापाची कात, वावडिंग, रुईचें मूळ, शमीचीं पानें, शिंगाचे मोड, हिंग यांची धुरी द्यावी.

---

## कास श्वास.

कास ह्मणजे खोकला याचें स्वरूप:- वातादि दोष कुपित झाल्यानें प्राण वायूचा उदान वायूशीं आघात होऊन तेणेंकरून तोंडावाटे कफ पडतो. किंवा सुका खोकला येतो.

कासाचें कारण:- तोंडांत व नाकांत फार धूर गेल्यानें, दूषित वायूनें अप-

व अन्नरस ऊर्ध्व जातो तेणेंकरून किंवा अतिव्यायामानें व मल, मूत्र, वायु- शिंका यांचे अवरोधानें प्राण वायु दुष्ट होऊन उदानवायूशीं त्याचा आघात होतो. तेणेंकरून कास रोग उत्पन्न होतो. तो- कासरोग, वातकास, पित्तकास, कफकास, उरःक्षतकास, धातुक्षयकास, इत्यादि ६ प्रकारचा आहे.

श्वास ह्मणजे दमा:- तो उचकी आणि कास उत्पन्न होण्याचीं जीं कारणें त्यांपासूनच उत्पन्न होतो.

कास व श्वास यांवर:- कफ असल्यास बाळबेल, किरमाणी ओवा, ढांकळी, पहाडमूळ, पाटला, टेंटू, यांचा काढा पिंपळी व मध घालून द्यावा. नागरमोथें, सुंठ, हिरडेदळ, हे समभाग व यांचे दुप्पट गूळ घालून गोळ्या कराव्या. ती गोळी तीन दिवस सेविली असतां कासश्वास जातात. शेळीचें मूळ व तितकेंच बेहेडेदळ यांच्या गोळ्या कराव्या. मधंबरोबर ही एक एक गोळी घेतली असतां खोकला, दमा, हे रोग दूर होतात. धणे, अजमोदा, लोहभस्म, जिरें, वेलदोडे, दालचिनी, जायपत्री, हीं औषधें समभाग व त्यांचे दुप्पट आलें व गूळ घेऊन या सर्वांचा पाक करावा. तो पाक भक्षिला असतां खोकला, शुळव्याध, ज्वर, पीनस, कफ, गुल्म, क्षयरोग, यांचा नाश होतो. आल्याचा रस मधांत घालून घ्यावा, ह्मणजे खोकला, दमा, यांचा बीज मोड होतो. अडुळशाचा रसांत मध व सैंधव घालून घ्यावा. लवंगा, मिरें, बेहेडेदळ, हीं समभाग व यांतिहींचे समान खदिरसार (अथवा पांढरा कात) घालून बाभळीचे अंतर सालीचे काढ्यांत गोळ्या कराव्या. ती गोळी तोंडांत धरल्यानें एका प्रहरांत खोकला बसतो. अडुळसा, धणे, हळद, गुळवेल, भारंगी, पिंपळी, सुंठ, रिंगणी, यांचा काढा, दोन मासे मिरपूड, व खडीसाखर घालून घ्यावा. वात, पित्त, कफ, यांचें न्यूनाधिक्य पाहून ह्मणजे पित्ताधिक्य असल्या-

स ३ भाग खडीसाखर व १ भाग सुंठ, कफाधिक्य अथवा वाताधिक्य असल्यास दोन्ही समभाग घेऊन त्यांचा काढा द्यावा, म्हणजे खोकला, दमा, वायु पीनस, कफ यांचा नाश होतो. व दृष्टि स्वच्छ होते, तेजोवृद्धि होते, हृद्रोगाचा नाश होतो, जठराग्नि प्रदीप्त होतो. डोरलीचा काढा, पिंपळी, खडीसाखर, घालून द्यावा. पिंपळी, पिंपळमूळ, बेहेडा, सुंठ, यांचा काढा मधसाखर घालून द्यावा. सुंठ, ब्राह्मी यांचा काढा मध साखर घालून द्यावा. अडुळशाचे काढ्यांत साखर व मध घालून द्यावा. रास्ना, अतिविष, देवदार, पद्मकाष्ठ, त्रिफळा, त्रिकटु, वावडिंग, हीं समभाग घेऊन यांचें चूर्ण करून मध व साजूक तूप यांबरोबर बोरा एवढें घेत जावें. या चूर्णास चिंतामणि चूर्ण म्हटलें आहे. सुंठ, गांठेंपिंपळमूळ, बेहेडा, यांचें चूर्ण मधेबरोबर घेत जावें म्हणजे कफाचें पाणी होऊन खोकला बसतो. सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण मध व साजूक तूप यांबरोबर द्यावें. शिरसेल तेल व गुळ हीं दोन्ही समभाग करून द्यावीं. टंकण व वंशलोचन समभाग करून मधांत द्यावें.

कासश्वासावर आणखी उपचार:– भारंगमूळ, कायफळ, देवदार, रोहीगवत, नागरमोथे, सुंठ, धणे, कांकडशिंगी, वेखंड, पित्तपापडा, वाळहरडे यांचा काढा करून त्यांत हिंग सजगुऱ्या इतका व मध घालून द्यावा. म्हणजे ज्वर, कास, श्वास, कफ, मुखरोग, गलग्रह, वायु हे रोग दूर होतात. रुईचे फुलांतील कळे घेऊन समभाग मिरपूड घालून चार चार वालांच्या गोळ्या करून नी एक एक गोळी द्यावी. ओली रिंगणी कुटून रस काढून त्यांत मध घालून द्यावा. भारंगमूळ, कांकडशिंगी, कायफळ, वायफळी, त्रिकटु, कोष्ठकोलिंजन, सेंधव, मोथे, धमासा, जिरें, शाहाजिरें, जवखार, सज्जिखार, चित्रकमूळ, अजमोदा, या सर्वांचे दुप्पट गूळ घालून त्यांचें चाटण करून मधाबरोबर देत जावें. म्हणजे कास, श्वास, कफ, अग्निमांद्य, पांडुरोग, गुल्म, उचकी,

राजयक्ष्मा, ज्वर, अर्श, प्याहा, ऊर्ध्ववात, आनाहवायु, हे रोग दूर होतात. पिंपळी पद्मकाष्ठ, लाख, रिंगणीचीं फळें, यांचें चूर्ण मध व तूप यांत घ्यावें, ह्मणजे क्षय, कास दूर होतो. हळद, दारुहळद, मनशीळ, हीं औषधें अंमळ कुटून चिलमें-त घालून गुरगुडी ओढावी, ह्मणजे कफ पडतो. कुळित्थ, सुंठ, रिंगणी, अडुळसा, पुष्करमूळ, वडीशेप, यांचा काढा साखर घालून घ्यावा. भारंगमू-ळ, सुंठ, यांचें चूर्ण आल्याचे रसांत घालून त्यांत खडीसाखर घालून घ्यावें. पिंपळी, गेळफळ, सैंधव यांचें चूर्ण उष्णोदकांत तीनमासे किंवा पांचमासे घ्यावें. ह्मणजे कफ पडून श्वास बसतो. मोराचे पिसांचें भस्म व पिंपळीचें × चूर्ण मधांत कालवून वारंवार चाटावें. शेराचा चीक लोण्यांत शक्त्यनु-सार एक दोन किंवा तीनमासे घ्यावा, त्याणें वमन होईल व दाखही होतील. वर दहीं भात खावा. याप्रमाणें तीन पांच किंवा सात दिवस अंतरानें औषध फार जपून घ्यावें. रुईचे पानाचा रस १ किंवा २ तोळे घ्यावा त्याणें वमन होऊन कफ व पित्त पडेल. त्यावर उनारा तूप भात, अथवा तूप पाजावें. छटांक-किंवा अदपाव कढतपाणी घेऊन त्यांत बारीक केलेलें मीठ घालून प्यावें त्याणें वमन होऊन पित्तपडून छातीचा खुलासा होईल. वर तूप भात खावा. उष्णतेमुळें छातीस कफ सुकून गेला असल्यास ज्येष्ठीमधाचा चाहा करू-न त्यांत खडीसाखर घालून प्यावा. दोन पैसेभार उष्णोदकांत साजुक तू-प व मध आणि खडीसाखर व किंचित सैंधव टाकून प्यावें, असें दोन चार वेळा केलें असतां कफाचा द्रव होऊन पडतो. व कास, श्वास, बसून कंठ छाती यांचा खुलासा होतो. धणे, वरयाली[1], ज्येष्ठीमध, यांचा काढा करून त्यांत खडी साखर व थोडें सैंधव घालून घ्यावा. कफ सुटून छातीचा खु-लासा होतो. फार कफ दाटला असल्यास गरम चाहांत अडुळशाचा रस

---

१ वरयाली ह्मणजे बडीशोप.

व गारवद्र व मध व दोन गुंजा पादेलोण घालून द्यावें. एलचीदाणे साजूक तूप आणि सैंधव एकत्र करून चाटावें.

श्वासकुठार मात्रा— पारा १, गंधक १, मनशीळ १, बचनाग १, टांकणखार १ व मिरें ८ भाग यांचा चांगला खल करून त्यांत त्रिकटूचें[1] चूर्ण ६ भाग घालून दोन किंवा तीन दिवस खलून शिशींत भरून ठेवावें, तें दोन गुंजा चूर्ण नागवेलीचे पानाबरोबर द्यावें, ह्मणजे श्वास दूर होतो. आणि नाकांत ओढलें असतां सन्निपात, मूर्छा, अपस्मार[2], अतिमोह, हे रोग दूर होतात.

उरःक्षत[3] कासाचें कारण व लक्षण. अतिमैथुन, शरीरावर अतिभार घेणें, फार मजल करणें, मल्लयुद्ध करणें, अतिगांजा ओढणें, अतिमद्यपान, अतिरूक्ष पदार्थ भक्षण. इत्यादि कारणामुळें वातादि दोष कुपित होऊन त्यांहीं शुक्रधातूचा मार्ग रोधिल्या मुळें तिचा ह्रास होतो आणि शुक्रधातूचा क्षय होऊं लागल्यामुळें दुसऱ्या धातूही शुष्क होऊं लागतात. व शरीर निर्वीर्य होतें तेणेंकरून उरांत वायूचा विशेष आघात होऊं लागतो. तेणेकरून उरांत क्षत होतें. प्रारंभीं सुका खोकला येऊं लागतो, नंतर तोंडावाटे रक्तमिश्रित कफ पडूं लागतो. उरांत व कंठाला पीडा, ज्वर, सुका खोकला, श्वास, तृषा, हीं होतात. पारवा घुमतो तसा कंठ वाजूं लागतो. पार्श्वादिकांचे ठाईं पीडा, सर्व संधीस पीडा आणि उरांत घाय बसल्यासारिखें वाटतें. याला क्षतकास ह्मणतात. हा नवीन असला तरी कष्टसाध्य आहे.

---

१ सुंठ, मिरीं, पिंपळी. २ घुरे.

३ उरःक्षत कास. आणि क्षय रोगांतील उरःक्षत क्षय ह्मणून एक प्रकार आहे. या दोहोंत फारसा भेद नाहीं. कारण यादोहोंचें निदान एक प्रकारचेंच आहे. हे दोन्ही धातुक्षयापासून उत्पन्न होतात. हे दोन्ही कष्टसाध्यच आहेत. व दोहों रोगांस औषधी उपाय परस्परांचे परस्परांस लागू पडतात.

क्षतकासावर. बेदाणा, उसवो, मोंगली बेदाणा, आणि ज्येष्ठीमध व धणे, हीं औषधें रात्रीं निरनिराळीं भिजत घालून ठेवावीं. व सकाळीं मुखप्रक्षालन केल्यानंतर तीं कोळून त्यांचा बलक काढून त्यांत खडीसाखर घालून प्यावें. याप्रमाणें रोज दोनवेळां किंवा तीनवेळां घेत जावें. दाणा आवळ्याचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. शंखजिऱ्याची पूड तूपसाखरेंत द्यावी. धणे कुटून त्याचे पाण्यांत गुलकंद कोळून त्यापाण्यांत द्राक्षें, बेदाणा, मोंगली बेदाणा रात्रीं भिजत घालून ठेवावा. सकाळीं त्यांत साजूक तूप व मध घालून घेत जावें. मोत्यांचें भस्म अथवा प्रवाळ भस्म अथवा दोन्ही भस्में व मध व साजूक तूप यांत घेत जावीं. गुळवेलीचें सत्व व गुलकंद यांत मोत्यांचें भस्म किंवा प्रवाळभस्म किंवा दोन्ही घालून साजूक तूप व मध यांशीं घ्यावीं. चिंचोके अंमळ भाजून सालपटें काढून टाकावीं. आणि आंतील पांढरे चिंचोके यांची पूड व मध व साजूक तूप यांत घ्यावी. बियाकाढलेल्या मनूका १ भाग, साजूक तूप १, मध १, असीं एके बरणींत भरून तोंड बंद करून धान्यांत पुरून ठेवावी. पंधरा दिवसांनंतर अथवा महिन्यानें काढून त्यांतले रोज सांज सकाळ मिळून तोळा दीड तोळा खात जावें. पथ्य गहूं, तांदूळ, तूप, लोणी, मध, साकर, मीठ, थोडी भेंड्याची भाजी इत्यादि खावीं. तिखट, तेलकट, आंबट, अगदीं वर्ज्य करावें. तालिमखान्याचें चूर्ण मधव साजूक तूप यांत घ्यावें.

---

## आमवात.

आमवाताचें कारण:- विरुद्धाहार, विरुद्ध चेष्टा, अग्निमांद्य, निश्चळ बसणें, स्निग्धान्न भक्षून लागलाच अतिव्यायाम करणें किंवा लागलेंच निजणें, व अति निद्रा. अग्निमांद्य असतां जड पदार्थ भक्षण ईहीं करून आमवात होतो. पोटांत आमांशाचा संचय झाल्यामुळें त्यांत जो वायु शिरलेला असतो

त्याची सहज गति रुद्ध झाल्यामुळें तो संधींत शिरतो, तेणेंकरून सांधे धर तात, दुखूं लागतात. तो आमवायु, वात, पित्त, कफ, आणि सन्निपात या भेदेंकरून चार प्रकारचा आहे.

आमवाताचें स्वरूप व सामान्य लक्षण:- वातादि दोष कुपित झाल्यानें जठराग्नि मंद होतो, तेणेंकरून अन्नाचा रस पक्व होत नाहीं; अपक्व राहातें त्याला आम ह्मणतात. तो शिरांचे द्वारें सर्व शरीरांत व्यापून सर्व शरीरास पीडा करितो. व कफ वायु एकाकाळींच कंबरेचे संधींत जाऊन सर्व गात्रें स्तब्ध करितो, त्या आमवायूनें अंगदुखणें, ज्वर, अरोचक, तृषा, आळस, अंगजाड्य, अपचन, सर्वांगास सूज सारखा धोधरा येतो, इत्यादि लक्षणें होतात. ज्यांत शूळ अधिक असतो तो वातजन्य व दाह ज्यांत विशेष असतो तो पित्तजन्य आणि ज्यांत निश्चलत्व व अंगजाड्य असतें तो कफजन्य, तीन्हीं लक्षणें असल्यास तो सन्निपातजन्य ह्मणावा. तो प्रायः कष्टसाध्य होय.

आमवातावर. लघु[1] पंचमूळ, बृहत्पंचमूळ[2], यांचे काढ्यांत समभाग एरंडेल घालून द्यावें. सुंठीचे काढ्यांत समभाग एरंडेल द्यावें, ह्मणजे कटिशूळ, पाठशूळ, पोटशूळ व बस्तिशूळ बंद होतात. रास्ना, गुळवेल, सुंठ, देवदार, इंद्रजव, वावडिंग, इंद्रजव, यांच्या काढ्यांत समभाग एरंडेल घालून तो द्यावा. गूळ, सुंठ, एरंडमूळ, आसंध, यांचा काढा द्यावा. रास्ना, बाहव्याचे शेंगांचा मगज, देवदार सुंठ, गुळवेल, पुनर्नवा, गोखरू, एरंडमूळ, यांचे काढ्यांत एरंडेल द्यावें. गुळवेलीचे काढ्यांत एरंडेल द्यावें. गूळ, सुंठ यांचे काढ्यांत सज्जीखार घालून द्यावा. चित्रक, कुटकी, पहाडमूळ, इंद्रजव, अतिविष, गुळवेल, देवदार, मोथें, सुंठ, बाळहर्तकी, यांचें चूर्ण उष्णोदकांत द्यावें. पावशेर खजू

---

1 रिंगणी, डोरली, साळवण, पिठवण, आणि गोखरू.

2 बाळवेल, शिवणीमूळ, टांकळा, पहाडमूळ, टेंटू.

पाण्यांत कोळून पाजावा, ह्मणजे एक दिवसांत आमवायु बरा होतो. सुंठीच्या काढ्यांत योगराज गुग्गूळ द्यावा.

---

## ऊरुस्तंभ.

ऊरुस्तंभावर.* बिबवे, पिंपळी, पिंपळमूळ, यांचें चूर्ण मधांतून द्यावें. गोमूत्रांत सैंधव घालून उकळून वाफ द्यावी. करंज, आसंध, रुईचीं मुळं, देवदार, दारुहळद, हीं पाण्यांत वाटून ऊन करून लेप करावा. ह्मशागुग्गूळ, गोमूत्रांत खलून लेप करावा. अथवा गोमूत्रांत गुग्गूळ घालून तें प्यावें. किंवा तुपांतून गुग्गूळ खावा. नक्तेल लावावें. नारायण तेल लावावें.

### वातव्याधी.

वायूचे रोगांवर. ओंवा, सुंठ, कांगोणीचें बीज हीं समभाग व यांचे दुप्पट जुनागूळ हीं एकत्र कुटून अर्ध तोळ्या प्रमाणें गोळ्या कराव्या. त्या नित्य तुपा बरोबर एकेक गोळी द्यावी ह्मणजे सर्व प्रकारचे वायुरोग दूर होतात.

सर्व वायु व संधिवायु यांजवर. रस्याबोळ, हिंगूळ व गुग्गूळ, हीं समभाग औषधें गाईचे दुधांत खलून सुमारें चार गुंजाप्रमाणें एकेक गोळी करून अनुपान योजून द्यावी.

पक्षोघात,[1] कर्णनाद,[2] अर्दितवायु,[3] आणि मन्यास्तंभ.[4] यांजवर बिकण्याचें मूळ, उडीद, कुहिलीचीं मुळं, रोहिगवत, रास्ना, आसंध, एरंडमूळ, यांचा काढा करून त्यांत हिंग व सैंधव घालून द्यावा. दोन अथवा चार तोळे लसूण सोलींव घेऊन कुटून त्यांत हिंग, जिरें, सैंधव, संचळ, त्रिकटू, यांचें चूर्ण मासा मासा घालून गोळ्या कराव्या त्या शक्ति पाहून

---

* ऊरुस्तंभ ह्मणजे मांड्या धरतात किंवा बधिर होतात. १ अर्धांगवायु. २ कानामध्यें घंटानगारे वगैरे शब्द होणें. ३ तोंड वांकडें होणें. ४ मानेची स्तब्धता.

याच्या ह्मणजे पक्षाघात वायु, सर्वांग वायु, ऊरुस्तंभ, कृमि, शूल, कटिशूल पृष्ठशूल, जठरसंबंधी वायु इत्यादि सर्व वायूंचा नाश होतो.

धनुर्वातावर. कृष्णतुळसी, आलें, कांदा, लसूण यांचा रस एकत्रक-रून तीन मासे पोटांत द्यावा. राहिलेला आंगास चोळावा.

आर्दितवायूवर. उडदाचे वडे तुपांत तळून लोण्याबरोबर खावे.

क्रोष्टुशीर्षवायु याजवर. गुळवेल आणि त्रिफळा यांचे काढ्यांत गुग्गूळ घालून द्यावा. कटीशूळ व संचारी व गृध्रसी वायु यांजवर.-ए-रंड्यांतील शुभ्र गोळे काढून दुधांत कालवून आटवून खवा करून खा-वा. दुधांत आहाळीवांची खीर करून गूळ अथवा साखर घालून द्या-वी. कंबर, मांड्या, पाट, त्रिक एनसंबंधी वायु व गुल्म, शूल, गृध्रसी उदावर्त हनुस्तंभ. यांजवर आल्याचे अथवा महाळुंगाचे रसांत ते-ल अथवा तूप घालून द्यावा. अथवा लुसणाचे रसांत गूळ घालून द्यावा.

गृध्रसी व ऊरुस्तंभवायूवर. हातांच्या शिरा काढाव्या नुसतें एरंडेल द्यावें अथवा गोमूत्रांत एरंडेल द्यावें.

सर्वप्रकारचे वायूवर. रास्ना, कोरांटा, मोथे, अडुळसा, गुळवेल, गोखरू, वेखंड, देवदार, हरीतकी, बाहवा, कचोरा, सुंठ, पिंपळी, मिरें, रिंगणी, धणे, अतिविष, शतावरी, चिकणामूळ, एरंडमूळ, शोपा, पु-नर्नवा, डोरली, यांचा काढा करून आंत सुंठीची पूड घालून द्यावा. यो-गराज गुग्गूळ तुपांत द्यावा. समीरदावानल. बिबव्याचा चतुर्थांश

---

१ ह्मणजे एकाएकीं रक्तदोषानें गुडघा सजून कोल्ह्याचे डोक्यासारखा होतो. यास एडघी ह्मणतात. २ कंबरेपासून मांड्या गुडघे पोटऱ्या आणि पाय यां-च्या मध्यें क्रमानें वायु होतो तो. ३ सर्वांगव्यापी पोट फुगणें. ४ दांतखिळी बसणें.

काढा करून त्यांत साखर, तूप, दूध, मिरपूड घालून द्यावा. जिव्हास्तंभ, बुद्धिजाड्य, मूकत्व, यांजवर. हळद, वेखंड, कोळिंजन, पिंपळी, सुंठ, शाहाजिरें, अजमोदा, ज्येष्ठीमध, यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें.

---

## कामला.

कामला, ह्मणजे (कावीळ) हा रोग पांडुरोगाची उपेक्षा झाली असतां आणि अत्यंत पित्तल पदार्थ सेवन केले असतां होतो व स्वतंत्र कारणानेंही होतो. ती कावीळ कुंभकामला व हलीमक. यांभेदें करून दोन प्रकारची आहे.

कावीळ रोगाचें कारण व लक्षण. ज्वरांश किंवा जीर्णज्वर असतां तेलकट पदार्थ भक्षणानें व शरीरांत ज्वरांश असतां मैथुन केल्यानें धातु क्षीण होऊन त्यायोगानें अथवा स्त्रीचे निदिध्यासामुळें स्वप्नावस्था फार होत्ये तेणेंकरून हा धातू अतिक्षीण झाली असतां, तेलकट पदार्थ खाण्यांत आल्यानें व अतिपित्तल पदार्थांच्या सेवनेंकरून व बाजीकरणाचीं औषधें सेवन करून अति मैथुन केल्यानें व रक्त व मांस दूषित होऊन मनुष्याचे डोळे व त्वचा व नखें पीतवर्ण होतात. मल मूत्र पीत व रक्तवर्ण होतात. पिंवळे बेडका सारिखा शरीराचा वर्ण होतो. इंद्रियें विकळ होतात. दाह व अग्निमांद्य, दुर्बळपणा, अरोचक, इत्यादि लक्षणें होतात.

**कुंभकामला व हलीमक यांचें लक्षण.** कावीळ बहुत दिवस राहिली असतां कोष्ठामध्यें वातादि दोष कुपित होऊन त्यांपासून कुंभकामला होत्ये. तिचें लक्षण. मळमूत्र हीं कृष्णवर्ण किंवा पीतवर्ण होतात. अंगाला सूज, डोळे रक्तवर्ण, ओकारी हा रोग कष्टसाध्य. पांडुरोगाचीच कांहीं अवस्था विशेष हलीमक रोग आहे, त्यांत ग्लानि, दमा, भ्रम, आणि स्त्री विषयीं अगदीं अप्रीति इत्यादि लक्षणें होतात. हाही कष्टसाध्यच आहे.

**कामलेवर उपचार.** देवकापशीच्या बोंडाचा रस अथवा नागरमोथ्याचा रस अथवा देवडांगरीचा रस नाकांत घालावा. त्रिफळा, अडुळसा, किराईत, निंबकाड्या, कुटकी, गुळवेल, यांचा काढा द्यावा, ह्मणजे कावीळ व पांडुरोग जातात. गेरू, तुरटी, हळद, आंवळकाठी हीं थंड पाण्यांत उगाळून अंजन करावें. गाईच्या दुधांत सुंठीची पूड टाकून घेत जावें.

**कामला, कुंभकामला, हलीमक, यांजवर.** कुटकीचें चूर्ण साखरेबरोबर द्यावें. आंवळकठी, त्रिकटू, हळद यांचें चूर्ण मध व तूप साखर यांत द्यावें. लोहभस्म मध व तूप यांत द्यावें. द्रोणपुष्पीचे रसांत हिंग उगाळून अंजन करावें. देवडांगरीचे फळाचें चूर्ण २ तांदूळ भार नाकांत ओढावें. तेणेंकरून नाकांतून पिंवळा स्राव होऊन दोन प्रहरांनीं कावीळ उतरती. कडूदोडकीचें चूर्ण नाकांत ओढावें. हरभऱ्याचे दाळीचें पुरण ह्मणजे दाळ शिजवून त्यांबरोबरीनें गूळ घालून नुसतें पुरण तीन दिवस खावें. तृषा लागल्यास पुरणाचें वेळण काढून ठेवावें तें प्यावें. दुसरें कांहीं खाऊं नये. दररोज सकाळीं एक तांबडा ऊंस खावा. श्वेत पलांडू, गूळ व त्यांत थोडी हळद घालून रात्रीं निजतांना अथवा सकाळीं खावें. प्रमाण शक्तिपाहून चतुर्थांश अर्धा अथवा सगळा खावा.

---

## पांडुरोग.

**पांडुरोगाचें कारण.** अति संभोग बहुजनोपभुक्त स्त्रीशीं संग करणें रोगी, विटाळशी, बाळंतीण अशा स्त्रियांशीं संग करणें शरीरांत तादृश मैथुनशक्ति नाहीं ह्मणून वाजीकरणाचीं औषधें खाऊन अति मैथुन केल्यानें एकाएकीं शुक्र धातू क्षीण होतो. तेणेंकरून पांडुरोग जडतो व दुर्लभ य परस्त्रीवर अतिवासना ठेवणें व स्त्रीलाभ न झाल्यामुळें तिच्या

---

१ गांखाहुनी.

विषयसंभोगाकडे मन लावून फार मैथुनादिकें करून शुक्रपात करणें व स्वप्नावस्थेंत शुक्रपात होणें व अति मद्यपान करणें आंबट पदार्थ अतिशय खाणें, मृद्भक्षण, मीठ, दूध, उडीद, पिष्टान्न, तीळ, मत्स्य यांचें अतिभक्षण, दिवा निद्रा, अतितीक्ष्ण पदार्थ भक्षण, अतितेलकट पदार्थ खाणें अति गांजा ओढणें इत्यादि कारणांनीं व शोकानेंही पांडुरोग होतो. अति तंबाकू खाणें हेंही एक कारण आहे.

**पांडुरोगाचें पूर्वरूप.** त्वचेचें किंचित्विदारण, तोंडास थुंका, माती खाण्यावर वासना, हात पाय गळणें, डोळे सूजीर होणें, मलमूत्राला पिंवळेपणा, अग्निमांद्य, अकाळीं क्षुधा, कामाचा कंटाळा, मन उदासीन होणें. यत्किंचित् ज्वर, ओकारी, कधीं श्वास, कधीं खोकला हीं लक्षणें होतात. व कामलेची उपेक्षा केली असतांही पांडुरोग होतो.

**पांडुरोगाचें असाध्यलक्षण.** बाहू, पोटऱ्या, मस्तक यानां सूज, देहास कृशता, गुद, शिश्न, वृषण यानां सूज, ज्वर, दमा, सुका खोकला, अतिसार, मोह, इत्यादि असाध्य लक्षणें जाणावीं.

**पांडुरोगावर.** पुनर्नवा, निंबसाल, कडूपडवळ, कुटकी, सुंठ, बाळहरीतकी, दारूहळद, गुळवेल, यांचा काढा द्यावा, म्हणजे पांडुरोग, दमा, खोकला, उदरशूल, सूज हे रोग दूर होतात. हरीतकीचें चूर्ण तूप व मध यांत कालवून द्यावें. मंडूर ताकांत द्यावा. पथ्य ताक भात. त्रिकटू, त्रिफळा, वावडिंग, नागरमोथे, चित्रकमूळ, यांचें चूर्ण तूप व मध यांत कालवून त्यांत मंडूर घालून द्यावा. अथवा नुस्तें चूर्ण ताकांत द्यावें. गोखरूचा काढा करून त्यांत मध साखर घालून द्यावा. गोखरू, धणे, गुळवेल यांचे काढ्यांत मध व साखर घालून द्यावा. गुळवेलीचें सत्व तूप व मध यांत द्यावें. भोजनांत प्रारंभीं भासाभर हिंगाष्टक चूर्ण चतुर्गुणित तुपाशीं प्रथम ग्रासाबरोबर दररोज खावें, तेणेंकरून जठराग्नि प्रदीप्त होऊन आ-

हार यादनो. प्रकृतीचें तारतम्य पाहून अभ्रक भस्म अनुपान योजून द्यावें. गंधक, पारा, यांची गुंजभार कज्जली तूप व मध यांज बरोबर द्यावी. पथ्य करावें. किंवा वंग भस्म सेवन करावें. पित्तोद्भव पांडुरोग असल्यास प्रवाल भस्म अनुपान योजून द्यावें. शुद्ध केलेला गंधक समभाग साखर तूपसाखर यांबरोबर मासा अथवा दोन मासे किंवा अधिक दोन सांज द्यावा. वर आंबट खाऊं नये. सुवर्ण माक्षिक ही दिलें असतां हिताव-ह होईल.

---

## क्षयरोग.

**क्षयरोगाचें कारण.** अतिमैथुन, फार मार्ग चालणें, व्रण, शोक, ज्वर, विषमाशन[1], मलमूत्राचे वेगाचा अवरोध, हाय घेणें, खंत घेणें, कांहीं एक मोठी आफत गुजरल्यामुळें, मनास अति खेद करणें इत्यादि कारणांनीं कुपित केलेले वातादि दोष रसादि धातूंचा शोष करून क्षय उत्पन्न करितात. व कामलेची आणि पांडूची उपेक्षा केली असतां क्षयरोग लागतो.

**क्षयाचें पूर्वरूप.** श्वास, अंगशैथिल्य, कफयुक्त थुंकी, तालुशोष, ओकारी, अग्निमांद्य, पडसें, मोह, खोकला, नेत्र शुभ्रवर्ण, हात पाय डोळे यांची नम्रता, इत्यादि लक्षणें होतात.

**क्षयाचें असाध्यलक्षण.** खोकला, अतिसार, पार्श्वशूळ, स्वरभेद, अरुचि, ज्वर, हीं लक्षणें किंवा रक्तस्राव, खोकला, ज्वर अथवा बल, मांस यांचा क्षय झाला असतां तोही असाध्य.

**क्षयावरउपचार.** अडुळशाच्या पानांचा रस किंवा काढा मध घालून द्यावा ह्मणजे क्षय, दमा, यांचा नाश होतो. खडीसाखर १८ भाग, वंश-

---

[1] अकाळीं थोडें किंवा फार खाणें.

लोचन ८ भाग, पिंपळी ४ भाग, एलची दाणे २ भाग, दालचिनी १ भाग, हीं एकत्र खलून पिठाप्रमाणें चूर्ण करावें. याचें नाव सीतोपलादिचूर्ण हें चूर्ण मध व तूप यांत दोन दोन मासे सांज सकाळ द्यावें. ह्मणजे क्षय, खोकला, दमा, अग्निमांद्य, अरुचि, पार्श्वशूळ, ज्वर, श्लेष्मविकार, रक्तपित्त, हातापायांचा दाह हे रोग दूर होतात. पारा १ गंधक १ शंखभस्म ५ कवडीभस्म ६ मिरीं १२ टांकणखार पान्याचे चतुर्थांश यांचें एकत्र चूर्ण अनिवारीक करून तुपांत द्यावें. सोन्याचा वर्ख १ व लोणी व मध व खडीसाखर एकत्र करून खावी.

द्राक्षासव. द्राक्षें २०० तोळे त्याचे दसपट पाणी घालून चतुर्थांश उतरावा. त्यांत गूळ ८०० धायटीचीं फुलें ५० वावडिंग ४ गहुला ४ पिंपळी ४ दालचिनी ४ एलचिदाणे ४ तमालपत्र ४ नागकेशर ४ मिरीं ४ तोळे यांचीं चूर्णे आंत घालून दवडून कांहीं दिवस ठेवावें नंतर भक्षिलें असतां कास, श्वास, उरःक्षत, राजयक्ष्मा हे रोग दूर होतात. बकरीचें मांस ४०० तोळे, पाणी १०२४ याचा चतुर्थांश काढा उतरून त्यांत तूप ६४ भाग घालून पुनः कढवावें नंतर त्यांत भुयकोहळा ४ शतावरी ४ आसंध ४ डुकरकंद ४ ज्येष्ठमध ४ गुळवेलाचें सत्व ४ चांदवेल ४ चिकणामूळ ४ या औषधांचें चूर्ण घालून खालीं उतरावें. नंतर साखर ३२ मध १६ घालून दवडून ठेवावें. नित्य दोन अथवा चार तोळे द्यावें. सुवर्णमालिनी वसंत द्यावा.

उरःक्षतक्षयाचें कारण, बलवंताशीं मल्लयुद्ध करणें, अति आयास करणें, अंगावर अतिभार घेणें, अश्वादिकांपुढें धांवणें, मोठे मोठे दगड उंचलणें, एकाएकीं दुरून धांवत येऊन उडी मारणें, महान दीत पोंहणें, अतिमैथुन, अति मद्यपान, अति गांजा ओढणें, इत्यादि कारणांनीं वातादि दोष कुपित होऊन त्यापासून उरांमध्यें क्षत होतें तेणें करून

हृदयांत फार वेदना उत्पन्न होतात. बल, कांति, जठराग्नि, हीन होतात. ज्वर, दैन्य व तोंडावाटे काळसर, पीतवर्ण दुर्गंधयुक्त आणि पूरक्त मिश्रित असे कफाचे बडके निरंतर पडतात. हा रोग प्रायः असाध्य आहे.

उरःक्षतावर. लाखेचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ज्येष्ठमध व चिकणामूळ यांचा काढा करून त्यांत दुधी व पिंपळी, वंशलोचन यांचें चूर्ण घालून द्यावा. मोत्यांचें भस्म अथवा पोवळ्याचें भस्म अथवा दोन्ही भस्में तूप व मध यांत द्यावीं. प्रकृती पाहून कास, श्वास प्रकरणीं उरःक्षत कासावर जे उपचार सांगितले आहेत, त्यांतून ही योजावे.

---

## नाडीव्रण.

**नाडीव्रणाची संप्राप्ती.** जो अविवेकी मनुष्य व्रण संबंधी जी सूज ती पक्क असतां किंवा अपक्क असतां तिची उपेक्षा करितो व कुपथ्य करितो तेणेंकरून तो व्रण पूय, त्वचा, मांस, शिरा, नाडी, इत्यादिकांचें विदारण करून मार्ग पाडितो व आंत लांबट घर करितो व पू नाडीसारिखा वाहात असतो. म्हणून यास नाडीव्रण म्हणतात.

**नाडीव्रणावर.** शस्त्रक्रिया व डाग, क्षारादिक हे उपाय करावे. आंबाड्याचा गीर, हळद, कापशीचे मुळाची साल, चुना, यांचें एकत्र चूर्ण करून मध व तूप यांत खलून सुताची वात त्यांत भिजवून व्रणांत घालावी. बोरीची अंतर्साल अथवा रान बोरीची साल व गेळफळ, धोत्र्याचें फळ, चिकणी सुपारी व पांढरी लसूण हीं सर्व एकत्र वाटून त्यांत निवडुंगाचा चीक घालून गोळा करावा. त्याची वात करून व्रणांत घालावी. रोजनी घालीत जावी. सर्व प्रकारचे व्रणावर अर्धतोळा गंधक पावशेर दुधांत द्यावा.

**सद्योव्रण व आगुंतकव्रण.** शस्त्रांदिकांचे प्रहारापासून जे व्रण

होतात. व विष लिप्त शस्त्रापासून जे व्रण होतात त्यांजवर तादृश उपाय न झाला असतां तो हाडा पावेतों पोंचतो. याच प्रमाणें शल्य व्रण ह्मणजे कंटकादि रुतून त्याचें शल्य निघाल्या सारखें वाटल्या मुळें उपेक्षा जहाली असतां तें शल्य रक्त, मांस भेदून आंत घर करितें; मग पू वाहूं लागतो व मोठा ठणका लागतो. तें जर बाहेर काढिलें नाहीं तर अधिक व्यापी करितें तें शल्य निघाल्यावर ही त्या व्रणास उपाय केला पाहिजे.

**सद्योव्रणावर.** दूर्वांचा अंगरस, निंबाचें तेल, कांपला, दारुहळदीचे साळीचा कल्क, हीं एकत्र करून मंदाग्नीवर कढवून तेल सिद्ध झालें ह्मणजे लावावें.

**व्रणरोग.** वातादि दोष अत्यंत दुष्ट झाले असतां पित्त वाताचे वेगानें रक्त दूषित होऊन फार खोल व्रण होतात. मग एकास उपाय होतच आहे इतक्यांत दुसरे ठिकाणीं असे जागोजाग होतात. त्यास गंभीरव्रण ह्मणतात. याची उपेक्षा झाली असतां त्याचीं छिद्रें मांसास विदारण करून हाडापावेतों पोंचतात. व मूत्रघातादि रोगानें त्या मूत्राचा बाह्यस्रावी तें गात्र रुद्ध होऊन शिरांमध्यें शिरतें तेणें करून रक्त मांसादि दूषित होऊन सर्व मज्जादिकांचा पू होऊं लागतो. मग तो जागोजागीं फुटून बाहेर पडतो. आतां जो व्रण अंतर्मुख आहे त्याचें नुसतें गुल्म असतें किंवा कठीण पुटकुळी सारिखा असतो व घट्ट असतो, ठणका फार व काळें करून पक्क होणारा असतो हा व्रण कोंपर, गुडघा, इत्यादि सांध्यांवर असला तर फारच कठीण.

**व्रणावर उपचार.** व्रण प्रथम तेल लावून शेकावा. नंतर उन्हापाण्यानें शेकावा. मग पुरचुंड्यानीं शेकावा. चवथ्यानें रक्त काढावें नंतर फुटे असा उपाय करावा. मग शोधन करावें नंतर व्रण भरून येई असा लेप किंवा मलम पट्टी करावी. त्रिफळेचे काढ्यांत गुग्गुळ द्यावा. कडुनिंबाचीं पानें व कडू पडवळ याचे काढ्यानें व्रण धुवावा. निंबाचीं पानें वाटून मधांत कालवून बांधिलीं

असतां व्रणाचें शोधन होतें.

जात्यादिघृत. जाई, कडुनिंब, कडूपडवळ यांचारस व कडुकी, दारुहळद, उपळसरीचें मूळ, मंजिष्ठ, वाळा, मेण, मोरचूत, जेष्ठीमध, करंजबीज हीं समभाग घेऊन वाटून कल्क करावा. त्या कल्कांत समभाग तूप घालून एकत्र कालवून मंदाग्नीवर तें घृत सिद्ध करावें तें घृत लाविलें असतां भिचरा होऊन व्रण भरून येतो.

पारदादिमलम. पारा १ गंधक १ मुरदाडशिंग २ शंखजिरें २ कपिलाचूर्ण ६ मोरचूतभाजलेला अर्धभाग आणि तूप ४८ हीं एकत्र चांगलीं खलून लावावीं शोधन होऊन व्रण भरून येतो.

अनुभवीकमलम. शेंदूर ३ तोळे गेरू १ मुरदाडशिंग १ मोरचूत ॥ आणि मेण १ प्रथम तिळांचें तेल ६ तोळे घेऊन त्यांत मेण टाकावें अग्नीवर ठेऊन पातळ झालें ह्मणजे शेंदूर टाकावा. आणि मंदाग्नीनें कढ येऊं द्यावा. नार येऊन चिकट झाला ह्मणजे बाकीचीं औषधें घालून एका पात्रांत ओतून ठेवावें. त्याची पट्टी दिली असतां कसाही व्रण, सद्योव्रण, नाडीव्रण, गळूं, खांडुक असलें तरी बरें होतें.

अग्निदग्धव्रण. अग्नीनें दग्ध झाल्यामुळें रक्तप्रवाहिनी नाडींतून निरंतर रक्त वाहाण्याचा जो वेग तो कुंठित झाला असतां अग्निदाह[1] क्षत होतें त्याची उपेक्षा झाली असतां तें क्षत लौकर बरें न होतां मांस भेदून हाडास झोंबतें.

अग्निदग्धव्रणावर. पटोलीचा[2] कल्क व शिरसेल एकत्र करून मंदाग्नीवर कढवून ठेवावें तें लावावें ह्मणजे व्रण बरा होतो. शिरगोळा भाजून बारीक करावा नंतर त्यांत तेल घालून खलावें तें मलम भाजलेल्या जाग्यावर लावावें. याप्रमाणें राळेचें मलम पाण्यांत धुवून लावावें. अथवा केंस

१ अग्नि दाहानें जो व्रण होतो तो. २ पटोली ह्मणजे पडवळ.

जाळून तेल्यांत खलून मलम करावें तें लावावें किंवा मुरिगेल ही फार उपयोगी पडतें.

---

## अस्थिभंग.

अस्थिभंगावर. कांहीं निमित्तानें हाड मोडलें किंवा ठेंचलें असतां प्रथम थंड पाणी वर शिंपावें किंवा धार धरून ओतावें थंड पाण्यानें धोपटावें, डोळ्यानां थंड पाणी लावून सावध करावें नंतर तांबडे मातीचा लेप करावा आणि ती जागा चांगली बांधावी. मंजिष्ठ, मोहाची साल, चिंचेचा पाला एकत्र वाटून ऊन करून लेप करावा. शतधौत घृत, तांदुळांचें पीठ एकत्र मळून वर बांधावें. पंचवल्कल[1] यांचे सालीचा काढा करून त्याणें शेकावें. सांधरूखाची साल ठेंचून मोडलेले हाडावर तीन दिवस बांधावी ह्मणजे हाड सांधून बरें होतें. बाभळीची साल १ त्रिफळा ३ त्रिकटू ३ आणि गुग्गूळ ७ भाग हीं एकत्र कुटून गोळ्या करून द्याव्या. बाभळीचे सालीचें चूर्ण मधांत द्यावें.

---

## भगंदर[2].

भगंदराचें कारण. मूळ व्याधीचे परिणाम व गरमी भरली असतां तदुपशमनार्थ अति दुःसह औषधें सेविल्यानें व तिखट पदार्थांचें अतिसेवनानें व रूक्ष पदार्थांचे अतिसेवनानें व अतिजागरणानें भगंदर रोग उत्पन्न होतो व गरमीची उपेक्षा केली असतां ही भगंदर रोग उत्पन्न होतो.

भगंदराची संप्राप्ती. गुदाचे बाजूस अंगुल द्वय प्रमाण देशाचे ठाईं अति दुःसह पुटकुळी होऊन फुटून गुद, बस्ति, व भग यांचें विदारण करितें. यास्तव या रोगाला भगंदर ह्मटलें आहे.

---

१ वड, उंबर, पारोसापिंपळ, नांदरूखी, वेतस २ भगेंद्र असें ह्मणतात.

भगंदराचें पूर्वरूप. असें कीं कंबर व जवळचे फळ्याचीं हाडें यांस पीडा व गुदाला दाह व कंडू आणि ठणका इत्यादि उपद्रवानीं भगंदराचें पूर्वरूप जाणावें.

भगंदरावर. प्रथम रक्त काढावें, सोन्याची शलाका तापवून तिनें क्षत करावें मग औषधोपाय करावा. निवडुंग, रुई यांचा चीक एकत्र करून दारुहळदीची वात करून त्यांत भिजवून व्रणांत घालावी. ह्मणजे भगंदरव्रण होऊन नाडीव्रण हा बरा होतो. त्रिफळेचे रसांत मांजराचें हाड उगाळून लेप करावा. पारा, गंधक यांची कज्जली करून कोरफडीचे रसांत मर्दन करून गोळा करावा. तो ताम्र पात्रांत ठेवून त्याजवर भस्म दडपावें. मग तें पात्र चुलीवर ठेवून एक दिवस पर्यंत मंद अग्नि द्यावा. थंड झाल्यावर काढावें, नंतर निंबूचे रसांत सात पुटें द्यावीं. एक गुंजभार ती मात्रा तूप व मध यांजबरोबर द्यावी. प्रथम शस्त्रानें फाड करून मग रोपण करावें हा उपाय सर्वोत्कृष्ट आहे.

---

## उपदंश[1].

उपदंशाचें कारण. ज्या स्त्रिया बहुत पुरुषांशीं संग करितात अशा स्त्रियांशीं संग झाल्यानें अथवा दुःख भरलेले स्त्रीशीं अथवा जिचे योनींत कारणांतरानें निरंतर गर्मी असत्ये, अशा स्त्रीशीं संग केल्यानें किंवा हस्ताचे अति कठोरस्पर्शानें किंवा कामातुर झालेल्या स्त्रीचे दंत नखांचा अभिघात झाल्यानें व मैथुना नंतर चांगलें क्षालन[2] केलें नाहीं तर किंवा दीर्घ व कर्कश अशा केशांनीं दुष्ट अथवा रोगोपद्रवानें दुष्ट जी योनी तिच्या दोषेंकरून व रजस्वला व बाळंतीण अशा स्त्रियांशीं संग केल्यानें व तिखट पदार्थांच्या अति भक्षणानें शिश्नाचे ठाईं जो रोग होतो त्यास गर्मी (दुःख) ह्म-

---

[1] उपदंश ह्मणजे गर्मी. [2] क्षालन ह्मणजे धुणें.

दलें आहे. हा रोग दुःखभरलेल्या पुरुषाच्या संगानें स्त्रियांसही होतो.

उपदंशावर. पटोल, निंबसाल, त्रिफळा, गुळवेल, खेरसाल यांचा काढा करून त्यांत गुग्गूळ घालून द्यावा. रुईचें मूळ, हिंगूळ, बिबवे अथवा हरताळ हीं एकत्र कुटून बिलमेंत घालून गुरगुडी ओढावी. तोंड येईल, नंतर रोग बरा झाल्यावर पटोल, खेरसाल व बाभळीची साल यांचे काढ्यानें गुळण्या कराव्या. सांबाचा डींक, चिकणी सुपारीची राख, बोरीचे सालीचें चूर्ण, शंखजिरें, हीं एकत्र खलून गाळून ठेवावें तें चूर्ण क्षतावर घालून दडपून बसवावें. त्रिफळेचे काढ्यानें अथवा माक्याचे रसानें व्रण धुवावा. लवंगा पारा १ शिरी १ अक्कलकारा १ वावडिंग १ रुमामस्तकी १ ओवा ४ जुनागूळ ४ बिबवे सर्सारे ३५ पारा व बिबवे एकत्र कुटून मळून त्यांत पारा मिळून गेला ह्मणजे गूळ घालून पुनः मळावें. नंतर राहिलेले औषधांचें चूर्ण घालून कुटून गोळ्या सुमारें पांचमासे करूनठेवाव्या एक गोळी प्रातःकाळीं खावी. वर विडारवावा. पथ्य दूधभात व कडू वर्ज्य. हें औषध सातदिवस घ्यावें मोठाउपदंश, संधिशोफ, अस्थिशोफ, संधिशूळ, आणि कुष्ठ हे रोग जातात. मोरचूत १ लवंग १ पांढराकात १ बाळहर्तकी ४ सर्व्यांचा एकाजागीं खलकरून लोखंडी कढईंत घालून चाळीस निंबांचा रस आटेतोंवरत्यानें खलावें. नंतर गोळ्या २०० कराव्या. दोनवेळ एकेक गोळी तुपांत घ्यावी. तांदूळ, तूप व गहूं खावे वरकड वर्ज्य. रसकापूर तोळा १ मोरचूत तोळे २ बाळहर्तकी ४ त्यांस ५० निंबांचे रसाची भावना द्यावी. आणि चांगलें खलावें. त्याच्या गोळ्या तुरीप्रमाणें कराव्या दररोज सांजसकाळ साध्याबर्फीच्या तुकड्यांत गोळी घ्यावी. दांतास लावूंनये पथ्यगव्हांची पोळी, तूप, साखर खावी. वरकड वर्ज्य याप्रमाणें सात दिवस करावें. वृद्धदारू, सुंठ, बिबवे, वाळा, हर्तकी, आसंध, गोखरू यांचें चूर्ण करून तें एक तोळा चूर्ण ताकांत घालून त्यांत एक तोळा गूळ घालून कालवून द्यावें.

गर्मीचे चठ्ठ्यांसमलम. रसकापूर, पांढरा कात, मुर्दाडशिंग, शंखजिरें, मायफळ आणि सुपारीचा कोळसा हीं औषधें बारीक करून त्यांत खलून लावावा. इंद्रियामध्यें चट्टे होतात त्यास त्रिफळेच्या काढ्याची पिचकारी देणें अथवा तुरटीची लाही पाण्यांत विरघळून त्याची पिचकारी द्यावी. त्यापाण्यांत थोडासा कातही कधीं घालावा. दन्त्यांच्या पाण्यांत थोडासा मोरचूत घालून त्याचीही पिचकारी देतात. ह्याउपायानीं शांती न झाल्यास इंद्रियजुलाब ही द्यावा. त्याचीं औषधें सोरा१. कबाबचिनी १. वेलदाणे १. रेवाचिनी १. ह्यांचें चूर्ण करून पाणी व दूध समभाग करून प्रातःकाळीं ६मासे चूर्ण द्यावें. मूत्रसाफ होऊन रोग वाहून जातो.

गर्मी. आंत होऊन शिश्नाचे वरले संधीत (ह्मणजे वंक्षणावर) लांबट मोठ्यागांठी येतात. त्यांस बद ह्मणतात. त्यांची उपेक्षा झाली असतां मोठ्या कष्टानें व बहुकाळानें पिकतात. फुटायास ही विलंब लागतो आणि ती वेदना अति दुःसह होते. शिश्नासही ठणका लागतो फुटल्यावर पू वाहूं लागतो त्यांत कुपथ्य झालें असतां तो पू शिश्नावाटे ही वाहूं लागतो. असें झालें ह्मणजे तो रोग लवकर बरा होत नाहीं यास्तव त्याच वांच्या चांगल्या गांठी बांधल्या इतक्यांत त्यांस पुष्कळ जळवा लावून रक्त काढवावें व निंबाचा पाला थोडें पाणी घालून कुटून त्यांत हळद, तूप घालून ऊन करून त्याचे पल्यानें बांधावें तितक्यानें बरें न होई तर पुनः जळवा लाव्या. ह्मणजे हलके पडोन यत्किंचित् राहिलेले रक्ताचा पू होतो तथापि त्याचा निचरा होऊन लेपादि साधारण उपायानीं लौकर बरें होतें. हा रोग स्त्रियांस ही होतो. दुसरा उपाय चुना व बिबवा एकत्रकरून त्याजवर पट्टी बसवावी. कोंबड्याचे आंड्यांतील बलक काढून त्यांत शेंदूर व रेवाचिनीचा शिरा बारीक करून फडक्यास लावून पट्टी द्यावी ती ओढून धरिते. लसूण व बिबवे आणि शेवग्याचीसाल हीं एकत्र कुटून बदावर पिंडी बांधावी ह्मणजे

कसाही बद कठीण असला तरीं बसतो.

## शूकरोग.

(शूकरोग ह्म० शिश्नाचे ठाईं जो रोग होतो तो) जो कामांध, मूर्ख मनुष्य-स्त्री विषयाचे विषयीं लुब्ध होऊन अकस्मात शिश्न फार मोठें व्हावें ह्मणजे विषय चांगला होईल अशा इच्छेनें वात्स्यायनादि शास्त्रोक्त भल्लातकादि लेप इत्यादि उपचार करितो. उपचारांत विपर्यास पडला असतां शिश्नाचे ठाईं लिंगाशीं ह्मणजे लिंगावर पुळी, गळवासारिखी सूज इत्यादि रोग होतात. ते अठरा प्रकारचे आहेत. ते मृदुस्थानीं व चेतनेंद्रियावर होतात. अत एव मोठ्या तजविजीनें उपचार करावे.

शूकरोगावर. जळवा लावून रक्त काढावें, तूप प्यावें विरेचन व इंद्रिय रेचन द्यावें. त्रिफळा व गुग्गूळ एकत्र करून गोळ्या करून द्याव्या. वरकड शास्त्रोपचार मलमाच्या पट्या इत्यादि उपचार तजविजीनें करावे.

## मेदोरोग.

मेदोरोगाचें कारण व लक्षण. कफकारक आहार व मधुर अन्न व मधुररस व स्निग्धान्न ह्मणजे गोधूम व पिष्टादिकांचे घृतपक्वपदार्थ यांचें भक्षण, भोजनावर लागलेंच निजणें, दिवानिद्रा, व्यायाम न करणें इत्यादि कारणानीं मेद वाढतो. तेणेंकरून अन्यधातू जे अस्थिमज्जादिक त्यांचें पोषण होत नाहीं. तेणेंकरून तो मनुष्य सर्व कर्माविषयीं अशक्त होतो आणि अल्पश्वास, तृषा, निद्रा, मोह, श्वासावरोध, झोंपेंत घोरणें, शरीराचे ठायीं ग्लानी, शिंका, घामाला दुर्गंध, अल्पशक्ति, अल्पमैथुन, इत्यादि उपद्रव होतात. त्या मेदाचें मुख्यस्थान उदर यास्तव ज्यास हा रोग होतो त्याचें प्रथमतः पोट मोठें होतें व त्या मेदानें वायु रुद्ध झाला असता-

तां कोष्टाग्नीचे ठायीं विशेष संचार करूं लागतो. तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होऊन आहाराचा शोष करितो यास्तव मनुष्यानें भक्षिलेलें अन्न लवकर जीर्ण होऊन भूक लागते. कदाचित् भोजनाची वेळा चुकली असतां मोठा घोर विकार होतो. अथवा जठराग्नि मंद पडून त्यापासून अनेक व्याधी होतात. प्रमेहपीटिका, ज्वर, भगंदर, विद्रधी, वातरोग, यांमधून एकादा किंवा अनेक व्याधी होतात. व विशेषें करून अग्नि व वायु हे विशेष उपद्रव करीत होत्साते शरीरादि धातूंस जाळितात. तो मेद कुपित झाला असतां एकाएकीं वातादि दोष कुपित होऊन मोठा घोर उपद्रव करून मनुष्यास मरणोन्मुख ही करितात. मेदाचे योगेंकरून शरीर फार मोठें झालें असतां उदर, स्तन, कुल्ले हे चालते वेळेस लदलदां हालतात. व विसर्प, भगंदर, ज्वर, अतिसार, मेह, अर्श, श्लीपद इत्यादि व्याधी जडतात.

मेदोरोगावर. प्रातःकाळीं थंड आणि स्वच्छ पाणी समान मध घालून घेत जावें. व्यायाम करावा. नमस्कार घालावे. किंवा दंड काढावे. त्रिकटू, एरंडाचें मूळ, त्रिफळा, वावडिंग, यांचें चूर्ण करून त्यांत ८० गुग्गूळ घालून कुटून गोळ्या कराव्या. शुष्क झाल्यावर त्रिफळेचा काढा घालून पुनः गोळ्या कराव्या. हें औषध १४ दिवस घेतलें असतां सर्व वायूरोग व मेदोरोग दूर होतात. एकवाल पारदभस्म मधांत घेत जावें. पोत घ्यावा ह्मणजे मेदोरोग, प्रमेह, हे रोग जाऊन शरीर कृश होतें. पोत वाहात आहे तों पावेतों अंमळ अशक्तपणा येतो, परंतु मेद व प्रमेह अगदीं नाहींसे होतात.

---

१ श्लीपद ह्मणजे एक हात किंवा एक पाय मोठा सजतो. २ हळखुंड दिव्यावर भाजून लाल करून नर्म भाजतात त्यापेक्षां दुसरी एक सुलभ क्रिया आहे ती अशी कीं, पोत घेण्याच्या जागीं भुसराची पट्टी द्यावी फोड आला ह्मणजे फोडून हरभऱ्याची भिजलेली डाळिंबी बांधावी. ह्मणजे सात होतें नंतर मेणाची गोळी बसवावी.

कृमिरोगाचें साधारण कारण व लक्षण. भक्षिलेलें अन्न जिरलें-नाहीं तोंच फिरून खाणें, निरंतर मधुराम्ल खाणें, उडीद पावटे यांचें भक्षण, भाजी फार खाणें, विरुद्धाहार, दुग्धादिसेवन, मिष्टान्न व गूळ यांचें भक्षण, व्यायाम न करणें, दिवानिद्रा इत्यादि कारणानीं कृमिरोग होतो. या रोगापासून ज्वर, निस्तेजपणा, शूळ, हृदयाला पीडा, ओकारी, भ्रम, अन्नाचा तिरस्कार, अतिसार, कंडू, तोंडाला पाणी सुटणें, श्वास, ढेंकर, अग्निमांद्य, अन्नाचें अपाचन, मळाचा भस्मा, पांडुता इत्यादि उपद्रव होतात.

कृमिरोगावर. खैराचीसाल, कुड्याचीसाल, अथवा इंद्रजव, निंबसाल, वेखंड, निशोत्तर, त्रिकटु, त्रिफळा यांचे काढ्यांत गोमूत्र घालून द्यावा. पळसाची बी (ह्मणजे पळसपापडा) कुटून भिजत घालावी. तें पाणी गाळून घेऊन त्यांत मध घालून द्यावें. नागरमोथे, उंदिरकानी, त्रिफळा, देवदार, शेवग्याची साल यांचा काढा करून त्यांत पिंपळी व वावडिंगांचें चूर्ण घालून द्यावा. दाळिंबाचे सालीचा काढा करून त्यांत तेल घालून तीन दिवस द्यावा. पारा, गंधक, अजमोदा, कुचला, पळसपापडी यांचें चूर्ण मधांत द्यावें. सुंठ, वावडिंग, बिबवा, यांचें चूर्ण मधांत द्यावें. त्रिकटु, त्रिफळा, इंद्रजव, काडेचिराईत, नेड, वेखंड, वावडिंगें यांचा काढा करून गोमूत्र घालून द्यावा. नुसते वावडिंगांचा काढा गूळ घालून द्यावा. बिबव्याचीं शेवतें पाडून तीं दह्यांमध्यें द्यावीं. खाजकुहिलीचें वरचें कुसूं पाडून तें दह्यांत द्यावें. कापूर व केशर गुळांत द्यावें (त्यांत पळसबी व खाजकुहिली पारा व बिबवा यांचें औषध बारावर्षांचे आंतले वयाचे मुलांस देऊंनये) पुदिन्याचे रसांत इंद्रजवाचें चूर्ण थोडा हिंग घालून द्यावें. सबज्याचा रस व पुदिन्याचा रस एकत्र करून द्यावा. महाळुंगाच्या सालीचा काढा करून द्या॰

**प्रमेहाचें कारण.** उगेंच बसणें, फार निजणें, दहीं, मेंढा, मत्स्य कूर्म व जलसन्निध राहाणारे प्राणी यांचें मांस, दूध व गुळाचे पदार्थ व गुळी सा-खर व सर्व कफ करणारे पदार्थ यांचें अति सेवन व फार पाणी पिणें हीं सर्व प्रमेहाचीं कारणें आहेत.

**प्रमेहाचें पूर्वरूप.** दांत, जिव्हा, गळा, टाळू यांचे ठायीं मलाचीउत्पत्ति हात पायांचा दाह, आंगास चिकटपणा, तृषा, श्वास, या लक्षणानीं प्रमे-हाचें पूर्वरूप जाणावें.

**प्रमेहाची संप्राप्ती.** कफ हा बस्तिगत मेद आणि मांस व शरीर जक्लेद यातें दूषित करून दहा प्रकारचे प्रमेहांस उत्पन्न करितो. तसेंच पित्त अत्यु-ष्ण पदार्थांचें सेवनानें कुपित होऊन मेदादिकांस दूषित करून सहा प्रकार-चे प्रमेहांस उत्पन्न करितें. तसाच वायूही स्वोपादान कारणानें दूषित झाला असतां रसादि सप्त धातूंचें आकर्षण करून चार प्रकारचें प्रमेहांस उत्पन्न करितो. पुष्कळ व गढूळ मूत्र होणें हें प्रमेहाचें सामान्य लक्षण होतें.

**प्रमेहाचें असाध्य लक्षण.** ज्वर, तृषा, अतिसार, दाह, अतिदौर्बल्य, अरोचक, अन्न न पचणें, बहुमूत्रत्व, इतकीं असलीं तर तो असाध्य जा-णावा. व आई बापाच्या संबंधाचा आहे तर तोही औषधीं साध्य नाहीं.

**प्रमेहावर व धातपडल्यावर.** आंवळ कठीचे काढ्यांत दोन मासे हळद व मध घालून द्यावा. गुळवेलीचा रस काढून त्यांत मध घालून द्यावा. पाषाण भेदाचें चूर्ण मधांत द्यावें. तांबें, कथिल, मीठ, घेऊन कथिलाचा पत्रा करून त्यांत तांब्याचा पत्रा गुंडाळून वरखालीं मीठ घालून तें ए-काशरावांत घालून मातकापड करून गजपूट द्यावें. थंड झाल्यावर-काढावें. तें भस्म अनुपान योजून दिलें असतां प्रमेह, अग्निमांद्य, कास, श्वास हे रोग दूर होऊन धातूची वृद्धि होते.

**रक्तप्रमेहावर.** खजूर, पुष्करमूळ, टेंभुर्णी, गुळवेल, यांचा काढा करून

थंड झाल्यावर मध घालून द्यावा. त्रिफळेचें चूर्ण, हळद, साखर, हीं मधां-न द्यावीं. जुनागूळ १ भाग, शुद्ध गंधक ॥ यांच्या गोळ्या करून द्याव्या. वर दूध प्यावें. नागभस्म १ वाल, आंवळकाठी, हळद, व मध यांत द्यावें. चंद्रप्रभावटी द्यावी. साजूक तूप तोळे ४ बिबवे सुमारें ८ घेऊन तुपांत कढवावे. बिब्याचा अर्क निघाल्यानंतर बिब्याचे तुकडे काढून टाकावे. नंतर त्यांत ५ मासे रेवाचिनीचें चूर्ण घालून प्यावें.

---

## वातरक्त.

वातरक्त ह्मणजे रक्तपित्त त्याचें सामान्य कारण व लक्षण. खारट, आंबट, तिखट आणि उष्ण, यांचें अतिसेवन, अजीर्ण, मलीन, शुष्क असें मत्स्यादि भक्षण, पेंड, मुळा, कुलित्थ, पावटे यांचें अतिभक्षण, भाजलेले तिळांची कोंद, उसांचा रस, दहीं, कांजी, आंबलेलें अन्न, ताक, ताडी, मद्य, यांचें अतिसेवन इत्यादिकारणानें प्राय: सुकुमार व स्थूळ असा मनुष्यांचें शरीरांतलें रक्त वायूसह वर्तमान कुपित होऊन पायांत असतें. नंतर त्या दुष्टवायूशीं मिळतें. या रोगांत वायूचें प्राबल्य यास्तव यास वातरक्त ह्मटलें आहे. या रोगांत पित्त व कफ दूषित होऊन दूषित झालेल्या वायूशीं मिळोन ते रक्ताला नासतात. पायांस स्पर्श केला असतां दुखतात, बधिर होतात, पित्तरक्तें करून पाय दाहयुक्त असतात. पायांस तांबुस वर्ण सूज येती, कफदोषानें कंडू सुटते, जड असतात, थंड व बधिर असतात. याप्रमाणें त्रिदोषाचे व्याप्ती मुळें सर्व लक्षणें होतात.

वातरक्ताचें असाध्य लक्षण. जें वातरक्त गुडघ्यापावेतों व्यापून भेगी पडून फुटून पसरतें व ज्वरादिक उपद्रव होतात व एक वर्ष झालेलें व ज्यांत बळ मांस यांची क्षीणता असल्ये तें वातरक्त असाध्य जाणावें.

वातरक्ताषर. पूर्वी स्नेहनादिक उपचार व रक्तमोक्ष अथवा रेचन

वमन द्यावें. गुळवेलीचे काढ्यांत एरंडेल घालून द्यावें. अथवा नुसता च काढा द्यावा. गुळांत बाळहर्तकीचें चूर्ण घालून गोळी नित्य खावी. वर्धमानपिंपळीही द्यावी. हरताळ २ भाग. पारा १ तुरटी ५ भाग यांचा एकत्र खल करून नंतर पुनर्नव्याचे रसांत एक दिवस खल करून वडी करावी, नंतर शरावांत घालून मातकापड करून रानशेणी त गज पूट द्यावें नंतर खलून ठेवावें. तें भस्म एक. दोन किंवा तीन तांदूळ प्रमाण अनुपान योजून द्यावें. मंजिष्ठ, त्रिफळा, कटुकी, वेखंड, हळद, निंबसाल, गुळवेल, देवदार, निशोत्तर, खैरसाल यांचा काढा घेतला असतां सर्व कुष्ठें व वातरक्त दूर होतात. मिरीं १ हरताळ १ मनशीळ १ रुईचा चीक १ कळलावी १ कुचला १ अतिविष १ निंबसाल १ मोथे, इंद्रजव १ गोमूत्र ४० यांचा चतुर्थांश काढा उतरून त्यांत तेल ५ तोळे घालून कढवावें आणि तें लावावें कडूनिंबाच्या पानांचा आंगरस, किंवा तो गाईचे दुधांत वाटून रस काढावा. तो घेत जावा. खजुराचा बलक काढून त्यांत एरंडेल घालून देत जावें. ह्या० वातरक्त, धनुर्वात, हे रोग नाश पावतात. आंवळकाठी एरंडेलांत तळून साखरेबरोबर सांज सकाळ फकी मारून वर उष्ण पाण्याचा घोट घ्यावा. गुळवेल, सराटे, आंवळकाठी यांचा काढा करून त्यांत एरंडेल अथवा मध घालून घेत जावें. मेण, मंजिष्ठ, राळ, - कावळी. यांचें तेल करून आंगास लावावें. एरंड्या, अडुळसा, गुळवेल यांचा काढा एरंडेल घालून द्यावा. शुद्ध केलेला नुसता गंधक दुधांत द्यावा. गंधक रसायण ही वातरक्तावर प्रशस्त आहे. कैशोरक गुग्गूळ ही फार गुणकारी आहे.

**विषूचिका[1] ह्म० मोडशी व अग्निमांद्य. मोडशीचें साधारण कारण व तिचें लक्षण.** मोडशी अजीर्णापासून होती. व गात्रांनां रूपांनीं टोंचल्या सारिख्या वेदना होतात. मूर्छा, अतिसार, ओकारी, तृषा, शूळ, भ्रम, काहली, कंप, भय इत्यादि लक्षणें होतात.

**असाध्य लक्षण.** मूत्रावरोध, निद्रानाश, अन्नावर अप्रीति, मोह, अतिशोष, दांत, ओंठ, नखें काळीं होणें, ओकारीनें पीडित होऊन डोळे व शब्द खोल जाणें, शरीराचे सांधे सुटणें, हीं लक्षणें होतात.

---

१ विषूचिका पटकी, महामारी, हे रोग मोडशीपासूनच होतात, कारण मोडशीचीं आणि पटकीचीं लक्षणें व निदान हीं प्रायः एकच आहेत व जीं औषधें मोडशीवर सांगितलीं आहेत त्यांतून कित्येक औषधें पटकीवर दिलेलीं आणि तेणें करून तीं माणसें त्या रोगांतून उठलेलीं आहेत; परंतु प्राणवायु व अपानवायु यांची शृंखला सुटल्याचे पूर्वीं उपाय योजला पाहिजे. हा रोग बहुत करून धास्तीनें अधिक वाढतो. व दुःसाध्यही होतो. दुर्गंधीमुळें जी हवा व पाणी नासलें जातें तेणें करून ज्वरादि अनेक रोग उद्भवतात हें सर्व संमत आहेच. तथापि ज्वर आणि पटकी या रोगाचें व नासलेलें हवा पाणी यांचें तर सामानाधिकरण्यच आहे. पटकीचा रोग जितका शहरांत व्यापक होतो, तितका गांवढ्यांत होत नाहीं व जेथें जत्रा (यात्रा) भरते तेथें मनुष्यांचे अति संमर्दानें मळ, मूत्र, स्वेद, ऊष्मा हीं अति दुर्गंध युक्त पसरतात. तेव्हां दुर्गंध हवा व पाणी यांपासून पटकीचा रोग पसरतो. एका विद्वानानें असा शोध काढला आहे कीं, काळ्या तोंडाचे (ह्मणजे विषमुख) असे जंतु त्या दुर्गंधानें व नासलेल्या हवेच्या वाऱ्यानें पोटांत लवकर होऊन वाढतात. हा रोग सांक्रामिकही आहे, ह्मणजे एकाचे संसर्गानें दुसऱ्यास होतो. दुसरें असें कीं, हा वारा झाला असतां वांचायाची आशा नाहींच अतएव एकाची अवस्था पाहून धास्तीनें दुसऱ्यास ही होतो.

**मोडशी व अग्निमांद्य व अजीर्ण यांवर.** लसूण, संचळ, जिरें, सेंधव, त्रिकटु, हिंग यांचें चूर्णाच्या निंबूचे रसांत बोरा एवढ्या गोळ्या कराव्या. ती एक गोळी द्यावी. तेणें करून अजीर्ण, मोडशी, अग्निमांद्य, हे रोग दूर होतात. पारा १ भाग, गंधक २ लोहभस्म ।। अर्धभाग, पिंपळी मूळ १। चित्रक मूळ १। सुंठ १। लवंग ।। संचळ १ सागीरखार १ मिरीं २ या सर्वांचें चूर्ण एकत्र करून हरभऱ्याचे आंबींत ७ दिवस खल करून तीन अथवा ४ वाल प्रमाणें एकेक गोळी करावी. ती उष्णोदकाबरोबर द्यावी. शोष पडल्यास लवंगांचा अष्टमांश काढा द्यावा. महाकुंभीचें मूळ, त्रिकटु, हळद, करंजबीज यांचें चूर्ण करून ठेवावें त्यांचे कांजींत अंजन करावें. हिंग, वेखंड, बीडलोण, सुंठ, ओंवा, बाळहरतकी यांचें चूर्ण ताकांत अथवा उष्णोदकांत घेतलें असतां आनाह वायु शूळ, अर्श, अग्निमांद्य, मलावरोध, उदर, मोडशी, यांचा नाश होतो. त्रिकटु, लवण, बीडलोण, सैंधव, टांकणखार, संचळ, निशोत्तर, चित्रक, जिरें, शाहाजिरें, जवखार, सज्जीखार, हरीतकी, वावडिंगें, पिंपळमूळ, चवक यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें अर्ध तोळा चूर्ण ताकांत अथवा उष्णोदकांत द्यावें, ह्मणजे उदर, शूळ, गुल्म, वातविकार, आनाह वायु, प्लीहा हे रोग दूर होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. लसूण, गंधक, जिरें, सैंधव, त्रिकटु, हिंग, यांचें चूर्ण निंबाचे रसांत द्यावें. निंबाचे आणि आल्याचे समभाग रसांत सैंधव व साखर व थोडा हिंग घालून द्यावें.

**हिंग्वाष्टक चूर्ण.** त्रिकटु, चित्रक, सैंधव, ओंवा, जिरें, शाहाजिरें, पादेलोण हीं समभाग व यांचा आठवा भाग हिंग यांचें चूर्ण करून ताकांत अथवा भोजनसमयीं प्रथम ग्रासीं तूप भाताशीं द्यावें, ह्मणजे गुल्म, आम, अग्निमांद्य, मोडशी, यांचा नाश होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. चिंचेचा पाला, हिरडे दळ, त्रिकटु, सैंधव, बीडलोण, वावडिंग, जिरें, शाहाजिरें, ओंवा, पादेलोण, यांचें चूर्ण ताकांत किंवा तुपांत द्यावें. सुंठ ५ भाग, पिं-

पळी ७ पादेलोण २ ओंवा २ लवण २ आंवळकाठी २ या सर्वांचें चूर्ण ताका-च्ये निवळी शीं द्यावें. त्रिकटु, चित्रक, रानशेर, वावडिंगें, करंजबीज, हिरडे दळ, यांचें चूर्ण व तत्समान शर्करा, एकत्र करून प्रातःकाळीं शक्ति पाहून घ्यावें. लवण, अजमोदा, ओंवा, पिंपळी, सुंठ, हिंग, व सर्वांचे सम-भाग हिरडे दळ, या सर्वांचें चूर्ण ऊष्णोदका बरोबर अथवा तुपा बरोबर-द्यावें. या चूर्णास वैश्वानर चूर्ण ह्मणतें आहे.

पटकीवर उपचार. चिंच १ भाग, बिबवे ८ एकत्र वाटून पांढऱ्या कांद्याच्या रसांत कालवून फडक्यांत घालून गाळावें आणि तो रस प्यावा, ह्मणजे ओकारी, ढाळ, हे बंद होतात, जे सविष जंत असतात, तेही पडून मरतात. हें ओषध साधारण जंतांवर ही चालतें.

जातीफलादि गुटिका. १ जायफळ, १ सेंधव १ हिंगूळ १ कपर्दिकाभस्म १ सुंठ १ अफू १ धोत्र्याचें बीं १ पिंपळी हीं ओषधें समभाग घेऊन निंबाचे रसांत किंवा धोत्र्याचे बियांचे काढ्यांत अथवा भांगेच्या काढ्यांत भावना देऊन गुंजे प्रमाणें गोळ्या कराव्या. महामारी वर देणें झाल्यास पैसाभार ताक हिंग हरभऱ्या एवढा भाजून आणि शेंदेलोण मासाभर एकत्र करून-त्यांत एक गोळी द्यावी. ह्मणजे, तत्काळ ढाळ व वांती बंद होतात. ही गोळी विड्यांत दिली असतां वीर्य वृद्धि होते. मूत्रकृच्छ्र, प्रमेह बरे होतात. चंद्रजोतीचे कीट गुळांत देणें, ह्मणजे ढाळ, वांति, आणि शोष बंद होतात.

त्या रोगांत शोषावर काढा. कोष्ठ ।. नागरमोथे ।. वडाच्या पारंब्या ।. ज्येष्ठमध ।. साळीच्या लाह्या मूठभर ह्यांचा काढा करून देणें. शेंदेलोण १ मासा, अफू १ मासा, भर्जित हिंग १ मासा त्यांचें चूर्ण करून ताकाचे गरगटांत टाकून द्यावें. मोंगली एरंडाची मुळी ताकांत उगाळून हिंग व सेंधव लावून पाजावें, हें अनुभविक आहे.

**अरुचीस कारण.** वात, पित्त, कफ, यांस कोपविणारे पदार्थांचें भक्षण, शोक, भय, क्रोध, अतिलोभ, मनास उद्वेगकरणारे व चिळसवाणे पदार्थ भक्षण तसेंच अन्न व रूप यांचें दर्शन व दुर्गंध या कारणानें अरुचि रोग होतो.

**अरुचीवर.** संचळ, द्राक्षें, मिरें, जिरें, शाहाजिरें, बडीशोप, आमसोलें, डाळिंब यांचे दाणे, यांची चटणी करून मध व गूळ घालून खावी. चिंच व गूळ यांत पाणी घालून कोंळून त्याचें पन्हें करून त्यांत दालचिनी, एलची दाणे, मिरीं यांची पूड घालावी. त्याचा तोंडांत चूळ भरावा. आल्याचा रस व लिंबूचा रस व त्यांत मनूका घालून कोंळून त्यांत जिरें व मिरें यांची पूड व साखर व सैंधव घालून रुचिकर करून द्यावें. आमसोलें व गूळ किंवा साकर व एलची दाणे यांची चटणी करून खावी. आंवळकाठी, हिंग, मिरची, सुंठ, जिरें, डाळिंबाची साल, माहाळुंगाचें बीज यांचें चूर्ण करून द्यावें. माहाळुंगाचा गीर व सैंधव तुपांत तळून द्यावें. ह्मणजे अरुचि जाते.

---

## छर्दि.

**छर्दिचें[1] कारण.** अति अजीर्ण व अतिखारट, अतिस्निग्ध, अतिप्रियपदार्थ यांचें भक्षण, व अतिशीघ्र भोजन करणें, अतिपातळ पदार्थ खाणें व अकाळीं भोजन करणें, श्रम, भय, उद्वेग, व अतिचिळसवाणे पदार्थांचें दर्शन किंवा भक्षण व तशा पदार्थांचे दुर्गंध त्या कारणांनीं ओकारी होते व स्त्रियांस गर्भ राहिला असतां ओकारी लागते व कृमीपासून ही ओकारी लागते.

**ओकारी पासून उपद्रव.** तृषा, उचकी, श्वास, ज्वर, खोकला, मोह, हृदयव्यथा, तमकश्वास, हे उपद्रव होतात. व तृषा, श्वास, खोकला, व ओकारीला, मलमूत्रा सारिखी घाण येते, ती असाध्य जाणावी.

**ओकारीवर.** बाळहिरडा, आंवळकाठी, मध, लाह्या हीं समभाग घेऊन

---

[1] छर्दि ह्मणजे ओकारी.

त्यांत १६ तोळे ऊन पाणी घालून हातानें चोळून कुस्करून गाळून द्यावें. दा-लचिनी, तमालपत्र, एलची, त्रिकटु, लवंगा, जिरें, बचनाग, पिंपळमूळ यांचें चूर्ण करून मधांत द्यावें. सैंधव तुपांत द्यावें. लाह्या, मसुरा, मूग, जव यांची पेज काढून सैंधव घालून मधांत द्यावी. चंदन उगाळून त्यांत आं-वळकाठीचें चूर्ण व मध घालून द्यावें. पित्तपापड्याचे काढ्यांत मध घालू-न द्यावा. वावडिंग, त्रिफळा, सुंठ, यांचें चूर्ण मधांत द्यावें. पिंपळाचे झाडा-वरच्या खपल्या जाळून पाण्यांत विझवून तें पाणी गाळून द्यावें.

त्रिदोषोत्थवांतीवर. धणे, तुरटीची लाही, साळीच्या लाह्या, लवंगा, नाग-केशर, पिंपळी, बोरांच्या आंठ्या, नागरमोथे, चंदन, यांचें चूर्ण मध व खडीसाखर घालून द्यावें. बोरांच्या आंठोळींतला मगज १ पिंपळी १ मोरां-च्या पिसांचें भस्म १ हीं औषधें एकत्र करून तीनमासे चूर्ण साखर व मध यांत देणें, म्हणजे ओकारी बंद होईल. जुन्या नरटांची राख करून पाण्यांत किं-वा मधांत देणें. टांकणखाराची लाही करून ती दुधांत किंवा मधांत देणें. वा-ळलेल्या लिंबाची राख करून मधांत द्यावी. अमरवेलीच्या रसांत शंखभ-स्माला भावना देऊन तें गुंजभर मधांत देणें. जायफळ दुधांत उगाळून पाजावें. हे योग वांतीवर प्रशस्त व अनुभूत आहेत.

---

## हिक्का म्ह० उचकी.

उचकीवर. रेणुकबीज व पिंपळी यांचा काढा हिंग घालून द्यावा. अ-लित्यांत स्त्रीचें दूध घालून नाकांत घालावें. पिंपळीचें चूर्ण साखरेंत द्यावें. मोराचे पिसांचें भस्म व पिंपळीचें चूर्ण मधांत कालवून वारंवार चाटावें. महाळुंगाचे रसांत मध व संचळ घालून द्यावें. धमासाचे काढ्यांत मध घा-लून द्यावा. माशांची विष्ठा दुधांत कोळून नस्य करावें. भारंगमूळ साख-रेच्या पाकांत चूर्ण करून देणें. सुवर्णमाक्षिक भस्म मध व तूप यांत देणें.

सोन्याचा व सर्व ओव्यांत देणें.

## स्वरभेद.

स्वरभंगावर. गाईचे दुधांत आंवळकाठीचें चूर्ण घावें. भोजनोत्तर तूप, मिरपूड घावी. पिंपळी, पिंपळमूळ, मिरें, सुंठ, यांचें चूर्ण गोमूत्रांत घावें. त्रिकटु त्रिफळा, जवखार यांचें चूर्ण मधांत घावें. कोळिंजन, बोरीचें मूळ, तोंडांत धरून पाणी गिळावें. ज्येष्ठीमधाचा काढा सैंधव व मध घालून घावा. थोरीचा पाला तुपांत परतून चूर्ण करावें. त्यांत थोडेंसें सैंधव घालून तें नेहमीं तोंडांत टाकीत जावें. अतएव चक्का दहीं घेऊन त्यांत खडीसाखर चारोळे घालून भक्षावें रात्रौ कढत कढत दूध प्यावें.

## तृष्णा.

तृष्णा. (म्हणजे शोष) त्याजवर. मधुरदहीं १२८ भाग, साखर ६४ तूप ४ मध ४ मिरपूड २ सुंठीची पूड २ एलची दाणे २ हीं सर्व एकत्र कालवून कल्हईचे भांड्यांत ठेवावीं त्यांतून थोडें थोडें घावें. सोनें, रुपें, लोखंड, तापवून पाण्यांत विझवून तें पाणी घावें. पाण्यांत साखर अथवा मध घालून घावें. काळीं द्राक्षें व ज्येष्ठीमध यांचा काढा घावा. तांदुळांचें धुवण मध घालून घावें. थंड पाणी व मध एकत्र करून शेर भर पाजावें. वमन होईल. नंतर तृषा व दाह शमेल. बकरीचे मांसाचा काढा करून त्यांत मध व साकर घालून घावा. तूप व दूध एकत्र करून प्यावें. हजरत जहूद तांदुळांच्या धुवणांत घावें. हिरादखन मधांत उगाळून जिभेस चाटन करावें. नानाप्रकारचीं सरबतें घावीं.

मूर्छेचें कारण. शरीराची क्षीणता, बहुदोष व्याप्ति, विरुद्धाहार, मळमूत्रांचा अवरोध, सत्वगुणाचें राहित्य याकारणांनीं वातादि दोष कुपित होऊन चक्षुरादि इंद्रियें व मनोवाहिनी नाडी थांबत जाऊन मूर्छेला उत्पन्न करितात.

मूर्छेचें स्वरूप. संज्ञा (ह्मणजे चेष्टा) यातें वाहणाऱ्या नाडी व शिरा व स्रोतोवाहिनी नाडी या सर्व वातादि दोषांनीं आच्छादित होऊन शरीरांत अकस्मात तमोगुण वाढून सुखदुःखानुभावक ज्ञान नाहींसें होतें आणि मनुष्य काष्ठावत् पडतो. याव्याधीचें नांव मूर्छा किंवा सन्यास.

मूर्छेवर. द्राक्ष, गुळवेल, सुंठ, पुष्करमूळ, पिंपळमूळ, यांचा काढा करून त्यांत पिंपळी व मध घालून द्यावा. धमाशाचा काढा तूप घालून द्यावा. बाळहरितकीचा काढा तूप घालून द्यावा. पारद भस्म अथवा रससिंदूर, पिंपळी व मध यांत द्यावा. हळद व साखर थंड पाण्यांत द्यावी. त्रिदोषजन्य मूर्छा असल्यास नेत्रांत सुंठीचें अथवा लवंग, सुंठ यांचें अंजन करावें. पायांस जळते बिब्बे दाबावे. नवसागर व चुन्याची कळी एके शिशींत भरून तिचें तोंड बंद करून ठेवावें, तें शिशीचें तोंड उघडून ती हुंगावी.

---

## दाह.

दाहरोगावर. तूप १०० पाण्यांनीं धुवून आंगास लावावें. धणे अर्धवट कुटून रात्रीं भिजत घालावे. सकाळीं तें पाणी गाळून साखर घालून द्यावें. वाळा, चंदन, वाटून लेप करावा. कमळाचीं पानें व केळीचीं पानें यांजवर निजवावें. रक्तजनित दाह असल्यास रक्त काढावें. वेळूचे सालीचा काढा करून थंड करून मध घालून द्यावा. ह्मणजे रक्तजन्य दाह दूर होतो. पारा, गंधक, चंदन, कापूर, जटामांसी नागरमोथे एकत्र करून गोळी करून तोंडांत धरावी.

## दाह.

चंदनादि चूर्ण. अगर उंची तोळा १ तगर १ वंशलोचन १ चंदन पांढरा १ वाळा १ खडीसाखर १ त्यांचें चूर्ण करून दुधांत द्यावें. रक्तचंदन पैसाभार तांदळांचे धुवणांत खडीसाकर घालून भक्षावें. कचोरा, वाळा, गुलाब कळी, खडीसाखर, ह्यांचें चूर्ण तांदळांचें धुवण किंवा दूध यांत कालवून देणें. गुळवेलीचें सत्व, जिरें खडीसाखरेशीं द्यावें.

---

## अपस्मार.

अपस्मार. (ह्मणजे फेंपरें) याजवर. अक्कलकाऱ्याचें अथवा वेखंडाचें चूर्ण मधांत द्यावें. पथ्य दूधभात. नागरमोथ्यांचें चूर्ण एक वर्णीगाईचे दुधांत द्यावें. कोहळ्याचे गिरांत ज्येष्ठीमध उगाळून तीन दिवस द्यावी. व उन्माद रोगावर प्रथमतः जें औषध सांगितलें आहे तेंही द्यावें. पांढऱ्या कांद्याचा रस नाकांत पिळावा. गनशोणी गोंवऱ्यांची राख रुईचे चिकांत भिजवून वाळवावी, तिचें नस्य द्यावें. यावर ब्राह्मीचीं औषधें प्रशस्त सांगितलीं आहेत.

---

## उन्माद.

उन्माद रोगाची संप्राप्ति. भय, श्रम, शोक, काम, अत्यभिमान, द्रव्यमद, विद्यामद, सौंदर्यमद, विरुद्धभोजन, देव, गुरु, तपस्वी, यांची अमर्यादा व छळ करणें व वातादि दोषांस क्षुब्ध करणारे असे पदार्थांचें अतिसेवन या कारणानें वातादि दोष वाढून आपल्या निव्याचा मार्ग सोडून अन्य ह्मणजे मनोवाहिनी नाडींत शिरून चित्तास भ्रम करून स्थिती विरुद्ध करितात त्याचें नांव उन्माद याला कोणी उन्मत्तवायूही ह्मणतात.

उन्माद रोगाचें सामान्य स्वरूप व लक्षण. कारणावांचून हांसणें गाणें, नाचणें, मौन करणें, निर्लज्जपणा, बुद्धिविपर्यास, रोदन, एकांतीं

कांहीं सांगितलें असतां बाहेर प्रकट करणें, भ्रम इत्यादि लक्षणांनीं उन्माद रोग जाणावा. या रोगाचे बहुत भेद सांगितले आहेत या सर्वांवर औषधोपचार खालीं सांगितल्याप्रमाणें सर्वांवर एक सारिखेच आहेत.

उन्मादरोगावर. त्रिकटु, हिंग, सैंधव, वेखंड, कुटकी, शिरीषबीज, करंजबीज, पांढऱ्या मोहऱ्या हीं सर्व औषधें गोमूत्रांत घाटून वड्या कराव्या ती वडी उगाळून अंजन केलें असतां चातुर्थिक ज्वर, उन्माद, फेंपरें हे रोग दूर होतात. धोत्र्याच्या चार अथवा पांच बिया तुपांत द्याव्या. नवसागर, चुन्याची कळी एकत्र करून कुपींत भरून तें हुंगावयास द्यावें. जुनाद्राक्षासव प्यावयास द्यावा. डोळ्यांपुढें कांदे चिरावे त्यांचे बिंदु डोळ्यांत चांगले शिरून झणझणेल असें करावें.

---

## हृद्रोग.

हृद्रोग व उरोग्रह यांचें कारण. अत्युष्ण, अतिगुरु, आंबट, तुरट, कडू यांचें अतिसेवन, श्रम, दंडादि प्रहार, भोजनावर भोजन, अति चिंता इत्यादि कारणांनीं उरोग्रह, हृद्रोग हे उत्पन्न होतात. ऊर ओढून घेतल्या सारिखें वाटतें तो उरोग्रह. व हृद्रोग ही तसाच आहे. अतएव हा उरोग्रह हृद्रोगाचा भेद आहे. वातादि दोष कुपित होऊन रस धातूंस दूषित करून हृदयाप्रत जाऊन हृदयास पीडा करितात. हा रोग होतांक्षणीं रक्त, मांस, कवळ, यकृत[1] यांची कुत्सित वृद्धि होऊं लागते. व हृदयांत सुईनें टोंचल्या सारिखें होतें तृषा. व कंठतालुशोष, कफ टेंकर अंगजाड्य, तोंडाला लाळ इत्यादि लक्षणें होतात.

हृद्रोगावर. जवखार, ओंवा, सैंधव, आम्लवेतस, हरीतकी, वेखंड, हिंग, यांचें चूर्ण उष्णोदकांत द्यावें. म्हणजे हृद्रोग, गुल्म, शूळ, अग्निमांद्य

---

१ काळजाचर उजवे कडे पोटांत रोग होतो तें.

हे रोग दूर होतात. कपिला १ निशोत्तर १ निवडुंगांचा चीक २ आंवळ्याचा रस ४ वतूप ४ मध ४ दूध १ सैंधव १ हीं एकत्र करून अग्नीवर पक्क करून घृत राहील तें द्यावें. ह्मणजे हृद्रोग, गुल्म, शूळ, प्लीहा, उदर, डबा, हे रोग दूर होतात. महाळुंगाचे रसांत पिंपळीचें चूर्ण व लोणी घालून द्यावें, ह्मणजे शूळ, क्षय, हृद्रोग, हे दूर होतात. बकुळीचे फुलांचा हार घालावा. फुलें हुंगावीं. आणि अंतसालीचा काढा द्यावा.

---

## अश्मरी ह्म० मुतखडा.

अश्मरीचें कारण व लक्षण. विरुद्धाहारानें, व मूत्रावरोधानें किंवा अन्यकारणानें वायु कुपित होऊन बस्तीमध्यें शिरून मूत्र, शुक्र, कफ, पित्त यांतें शोषून बस्तिमुखाचे ठायीं क्रमेंकरून पाषाण गुटिके सारिख्या ग्रंथि करितो. तिचे ठायीं बस्तीला फुगोटी व ऊर्ध्वाधो भागीं पीडा व मूत लालसर आणि तुटक, बस्ति, शिश्न, वृषण यांत शूळ व मूत होत असतां तिडीक व कष्टानें मूत्र स्राव होतो.

शुक्राश्मरीचें लक्षण. शुक्र धातूच्या वेगाला मैथुन मिळालें नसतां किंवा मैथुन काळीं त्या शुक्राचे नैसर्गिक गतीचा अवरोध केल्यामुळें ती शुक्र धातू आपले कोशापासून भ्रष्ट होऊन शिश्न व वृषण यांचे मध्यभागीं आली असतां तेथचा वायु कुपित होऊन शुक्र धातूचें शोषण करून ग्रंथि रूप करितो. त्या रोगानें नांव शुक्राश्मरी हा रोग मोठ्यासच होतो.

मुतखड्याचें असाध्य लक्षण. नाभी व वृषण यानां सूज व पीडा व मुतणें अगदीं बंद, हीं लक्षणें झालीं असतां असाध्य रोग जाणावा.

मुतखड्यावर उपचार. आंकोळीचें मूळ, गोखरू, तुळशीचें मूळ पाषाणभेद, एरंडमूळ, पिंपळी, ज्येष्ठीमध, कडु वृंदावनीचें मूळ, निर्गुंडीचें मूळ, सुंठ, यांचा काढा सात दिवस द्यावा, ह्मणजे खडा झरून पडतो

मेंढीचे दुधांत मध व गोखरूचें चूर्ण घालून घ्यावें. थायवरण्याची साल, त्रिफळा, गोखरू, सुंठ यांचा काढा करून त्यांत जवखार व गूळ घालून घ्यावा. पाषाणभेदाचे काढ्यांत शिलाजित अथवा सोरा व साखर घालून घ्यावा. तुषोदकांत हळद व गूळ घालून घ्यावें. चंद्रप्रभावटी घ्यावी. कुश, काश, गोखरू, हिरडेदळ, आंवळकाठी, पाषाणभेद, धमासा, यांचें चूर्ण मध घालून घ्यावें. एलची, पाषाणभेद, शिलाजित, पिंपळी, गोखरू यांचें चूर्ण गुळाबरोबर अथवा तांदळांच्या धुणाबरोबर घ्यावें. भिडीक व आग एतद्विशिष्ट मुतखड्यावर. पाषाणभेद, हिरडेदळ, धमासा, थाहव्याचा मगज, गोखरू यांचा काढा मध व साजूक तूप घालून घ्यावा. अडुळसा, एलची, ज्येष्ठीमध, पाषाणभेद, दारुहळद, कावळी, सराटे, एरंडमूळ, यांचा काढा; मुतखडा, मूत्रकृच्छ्र, मूत्राघात, यांचा नाश करितो. लोहचुंबकाचा खडा तांदळांच्या धुवणांत उगाळून तीनमासे घ्यावा. ह्मणजे खडा विरून पडतो.

---

## मूत्रकृच्छ्र (उन्हाळी.)

मूत्रकृच्छ्राचें कारण. अतिव्यायाम, तीक्ष्णौषधांचें सेवन, रूक्षपदार्थ, मद्य, अतिनिद्रा यांचें सेवन, शीघ्रगामी, वाहनावर बसून गमन करणें व अजीर्ण इत्यादि कारणांनीं मूत्रकृच्छ्र होतें. वातादि दोष कुपित होऊन मूत्राशयांत शिरले असतां मोठ्या कष्टानें मुतायास होतें.

मूत्रकृच्छ्रावर. लकड्या पाषाणभेद, थाहव्याचा मगज, धमासा, वाळहर्तकी, गोखरू यांचें चूर्ण मधांत घ्यावें. गोमूत्रांत सुरा अथवा केळीचे कांद्याचा रस घालून घ्यावा. गाईचे दुधांत गूळ घालून किंचित्उष्ण करून घ्यावें. अथवा साखर घालून घ्यावें.

शर्कराश्मरीवर. पाषाणभेदाचा काढा घ्यावा. भुंब्याचे पाल्याच्या र-

सांत सोरा घालून द्यावा. चंद्रप्रभा वटी द्यावी. तिळांच्या काड्याची राख पाण्यांत द्यावी. कांकडीचें बीं हजरतजहूद यांची बुकी तांदळाचे धुणांत द्यावी. सागाचें बीं पाण्यांत उगाळून द्यावें.

---

## मूत्राघात.

मूत्राघाताचें स्वरूप. पीडा अल्प असून जो मूत्राचा प्रतिबंध फार होतो. तो मूत्राघात. आणि मूत्र कृच्छ्रांत पीडाफार आणि मूत्राचा अवरोध थोडा, बाकी सर्व एक सारिखेंच आहे.

मूत्राघातावर. गाईचें दूध ७. मध १ तोळा, तिळांच्या पेंडीची राख १ तोळा, हीं एकत्र करून दिलीं असतां मूत्राघात, दाह हे रोग दूर होतात. गोखरूंचा काढा, शिलाजित व गुग्गूळ घालून द्यावा. धणे, गोखरू यांचा काढा तूप घालून द्यावा. चंद्रप्रभावटी द्यावी.

---

## भस्मकरोग.

भस्मक रोग. गांजा, हिंग, मोहऱ्या, गंधक, इत्यादि अति तीक्ष्ण पदार्थांचें व ताम्रभस्माचें अतिसेवनानें व काक मांस, मार्जारमांस, भक्षणानें पित्त अति कुपित होतें. तेणें करून तीक्ष्णाग्नी होतो. तो कितीही भक्षिलें असतां त्याचें पचन न होतां भस्म होऊन नेहमी प्रदीप्त असतो. तोच भस्मक रोग वात, पित्त, कफ, हे क्रमें करून वृद्ध, अतिवृद्ध व तीक्ष्ण झाले असतां हा रोग होतो. याला तीक्ष्णाग्नीही ह्मटलें आहे.

भस्मकरोगाचें लक्षण. तृषा, दाह, मूर्छा, दौर्बल्य, स्निग्ध भक्षणानें

---

१ मंदाग्नि, विषमाग्नि, तीक्ष्णाग्नि, आणि समाग्नि असे जठराग्नीचे प्रकार मागें भी सांगितले आहेत. त्यांत समाग्नी वांचून इतराग्नीपासून नानातऱ्हेचे रोग होतात त्यांचा विस्तार तेथें लिहिला आहे. त्यांत ह्या तीक्ष्णाग्नी भस्मक रोगोत्पादक आहे.

कांहीं शम व पुनः क्षुत्क्षोभ हीं सर्व लक्षणें झालीं असतां मरण समीप जाणावें.

**भस्मकरोगावर.** वारंवार क्षीरभक्षावें. म्हशीचे दुधांत केळ्याची शिखरण करून वारंवार भक्षावी. बोरीची अंतरसाल थंड पाण्यांतवाटून घ्यावी. भुयकोहळ्याचा रस दूध व तूप घालून द्यावा. गुरु, स्निग्ध, शीतळ असें अन्नपान करावें. पित्तनाशक रेच द्यावें. दुधांत एरंडेल द्यावें. तुपांत एरंडेल द्यावें. म्हशीचें दूध, दहीं व तूप भक्षावें. पायसान्न भक्षावें. तूप केळी खावीं. दिवसास निजावें. तांदूळ, शर्करा, कमळें, अथवा कमळास शेळीचे अथवा म्हशीचे दुधांत शिजवून खावे. केळीचे कालाचें पाणी काढून पीत असावें. उंबराचे मुळांतलें पाणी ताडी काढतात त्याप्रमाणें काढून तें पीतजावें. दुसरें पाणी देऊंनये. याप्रमाणें सात दिवस केलें असतां भस्मक रोग दूरहोतो.

---

## गंडमाळा.

**गंडमाळांवर.** कांचनाचे सालीचा काढा करून त्यांत सुंठीची पूड घालून द्यावा. पांढरे गोकर्णीचें मूळ, इंद्रवारुणीचें मूळ, वेखंड, देवदार, शेवग्याचें मूळ, हीं गोमूत्रांत उगाळून लेप करावा. कडूदुधे भोपळ्याचा रस शिरसेल एकत्र करून अग्नीवर पक्क करावीं रसजळालाह्मणजे तें तेल लावावें.

**गलग्रंथीवर.** हरताळ गोमूत्रांत उगाळून लेप करावा. चित्रांदरीचें तेल करून लावावें. वायवरण्याचे काढ्यांत मध घालून द्यावा. चुना, गूळ आणि घेरोसा एकत्र करून लेप करावा. ह्मणजे गालफडाची सूज उतरते.

**अपची अर्बुद व ग्रंथि यांजवर.** व्रण चिकित्सा करावी. ह्मणजे व्रणावर जे उपाय सांगितले आहेत ते योजावे.

---

## अंत्रवृद्धी.

**अंत्रवृद्धीचें कारण व लक्षण.** वायूला कुपित करणारे, आहार व व्यायाम, जलांत बुडणें, मूत्रादिकांचे वेगाचा निरोध करणें व अमामवेग औषधादिकें करून उपस्थित करणें व आंगावर अतिशय भार घेणें, फार मजल करणें व चढ उतर करणें, अवघड जागेचे शिरेस दुखावणें, बलाढ्यपुरुषाशीं अंगयुद्ध करणें, सखल जाग्यांत अवचित पाय पडणें इत्यादि कारणानीं वायु क्षुब्ध होऊन आंतड्यांत शिरतो, मग उपेक्षा केली असतां अधोवाही होऊन अंड संधीचे द्वारें वृषणांत शिरतो व वृषण वाही धमनीतें दूषित करून वृषणांतील गोळ्या व कोश यांची वृद्धी करितो. त्याला वृद्धि, अंडवृद्धि, अंत्रवृद्धि, अंतर्गळ ह्मटलें आहे. बंदर किनाऱ्यावरील अतिदाट वस्तीचीं शहरें ज्यांत घाण फार व मांस मत्स्य यांचे अतिदुर्गंधीनें पाणी व हवा अगदीं नासलेली तशा शहरांत विशेष वास झाल्यानें त्या पाण्यापासून ही हा रोग जडतो. प्रायः असे शहरांत हा रोग बहुतांस असतो.

**अंत्रवृद्धीवर.** दुधांत एरंडेल घालून द्यावें. रास्ना २ ज्येष्ठीमध २ गुळवेल २ एरंडमूळ ओलें ४ चिकणामूळ २ गोखरू २ यांचा काढा एरंडेल घालून द्यावा. अथवा नुसताच काढा द्यावा. वृषणावर एरंडेल नित्य जिरवावें. नारायण तेल जिरवावें. जव, निंब, पुनर्नव्याचें मूळ, हीं औषधें बारीक वाटून एरंडाच्या पानाला लावून तीं पानें वृषणावर बांधावीं. एरंडेल तेलांत हरीतकीचें चूर्ण द्यावें. तिळवणीचा रस हरभऱ्यांचे काढ्यांत द्यावा. हरीतकी संचल व एरंडेल एकत्र करून द्यावें. तंबाकूचीं पानें शिळारस लावून बांधावीं. नवाच उपद्रव झाला असल्यास खालीं डोकें वर पाय करून उभें गडावें. पायांचे आंगठे कळ लागे तोंपर्यंत बांधावे. हा रोग उत्पन्न होतांक्षणींच ज्या आंगची शीर फुगली असेल तिजवर बिबा घालावा. त्यावर कळीच्या ताज्या चुन्याचा टिक्का द्यावा. ह्मणजे कळ मरून वृषण ओसरतो. सागरगोट्याचे बी बारीक करून एरंडेलांत कालवून तंबाखूचे पानास

लावून तें पान रात्रीं बांधावें. चुना आणि उंची नवसागर एके जागीं खलून तंबाखूचे पानावर सारवून तें वृषणावर बांधावें. ह्मणजे सर्व अंगाला खरखर होऊन वांती होते. फार वांति होऊं लागल्यास सोडावें ह्मणजे एक दोन दिवसांनीं अंड बसतो. महाळुंगाच्या कापट्या काढून पाण्यांत उकळाव्या त्या पाण्याची वाफ अंडास द्यावी. नंतर त्या कापट्यांनीं साहत साहत शेकावें. नंतर उत्तम ब्रांडी घेऊन फ्लानेलचे वस्त्रावर थोडीशी शिंपून तें अंडावर बांधावें. दरपन टाइलांत फडकें भिजवून वर बांधावें. ऊन पाण्याची धार वृषणावर धरावी. व नेहमी शेकीत जावें. असे अनेक योग आहेत; परंतु अनुभवीक मात्र येथें लिहिले आहेत.

---

## विद्रधी.

**विद्रधीचें लक्षण.** वातादि दोष कुपित होऊन त्वचा, मांस, रक्त, मेद, यांतें दूषित करून हाडाप्रत जाऊन पोंचतो व ज्याचीं मुळें फार आंत असतात व जो उत्पत्ति काळापासून पीडायुक्त असून वाटोळा अथवा लांबट अशा ज्या ग्रंथिरूप सुजेला उत्पन्न करितात. तो विद्रधी ह्मटला आहे. त्यांत सन्निपात विद्रधी प्रायः असाध्य, जो अंतर्मुख तोही असाध्य.

**विद्रधीवर.** प्रथम रेचन द्यावें व रक्त काढवावें. वड, उंबर, पिंपळ, पारासा पिंपळ, वेतस यांच्या साली शेवग्याचे सालीचे काढ्यांत उगाळून उन करून लेप करावा. एरंडमूळ वाटून तेलांत अथवा तुपांत कालवून ऊष्ण करून लेप करावा. जव, गहूं, मूग, यांचें पीठ कालवून ऊष्ण करून बांधावें. त्रिफळेचे काढ्यांत निशोत्तर द्यावें. कणकीचें अथवा हरभऱ्याचें पोटीस बांधावें.

**अंतर्मुखविद्रधीवर.** पुनर्नव्याचें मूळ व वायवरण्याची साल यांचा काढा द्यावा. शेवग्याचे ओले चिकांत सेंधव व हिंग घालून द्यावें. विद्रधी

पिकविण्यास चिकण्याचा पाला वाटून त्यांत लवण घालून वर बांधावें. कणीक, हळद, मीठ, हीं दुधांत शिजवून कोमट बांधावें. ओले अंजीर ठेंचून ऊन करून वर बांधावे. गोरखूल व साबण उगाळून लेप करावा. गुळवाशीचीं पानें तूपलावून ऊन करून एकावर एक असे थर द्यावे. गळूं पिकण्यासही हेच उपचार करावे.

---

## श्लीपद.

श्लीपदाचें कारण. ज्या देशामध्यें सर्वकाल सांचलेलें पाणी असतें तेंच सर्व पितात व सर्व ऋतूंत सर्द हवा असते. त्यादेशांत हा रोग फार असतो. यारोगास हत्तिपद ही ह्मणतात.

श्लीपदावर. प्रथम रक्त काढावें. गोमूत्रांत हळद व गूळ घालून द्यावें. हरीतकी एरंडेलांत तळून चूर्ण करून गोमूत्रांत द्यावें. पिंपळी, त्रिफळा, देवदार, सुंठ, पुनर्नवा, वर्धारा यांचें चूर्ण तोळाभर कांजींत घालून द्यावें. धोत्रा, एरंडमूळ, पुनर्नवा, निर्गुंडी, शेवग्याची साल हीं एकत्र करून वाटून लेप करावा. रुईचें मूळ कांजींत उगाळून लेप करावा.

---

## ग्रंथिरोग.

ग्रंथिरोग. वातादि दोषानें मांस व रक्त हीं दूषित होऊन मेद, शिरा, यांतें दूषित करून वाटोळी उंच आणि गांठीसारिखी सूज उत्पन्न करितात. त्याला ग्रंथिरोग ह्मटलें आहे. तो अनेक प्रकारचा आहे. याजवर अर्बुदांत सांगितल्या प्रमाणें उपाय करावे.

---

## अर्बुद.

अर्बुदानें कारण व लक्षण. शरीराचे ठायीं वातादिदोष कुपित होऊन

---

१ आड संधींत शिरलेला वायु पायांत शिरून पाय हत्तीचे पायासारिखा होतो. तो श्लीपद.

रक्त व मांस यांनें दूषित करून गाठोळा स्थिर व हळू हळू वेदना करणारा ज्यांचीं मुळें खोल गेलीं व चिरकालें करून पिकणारा व वृद्धिंगत होणारा असा मांसाचा ग्रंथि उत्पन्न करितो त्यांचें नांव अर्बुद व रक्तार्बुद रोग यांत विशेष भेद नाहीं इतकाच विशेष कीं मांसार्बुद व रक्तार्बुद हे प्रकार ग्रंथिरोगांत नाहींत व हे दोन्ही रोग आणि विद्रधी यांत ही फारसा भेद नाहीं अतएव विद्रधीवर जे उपाय सांगितले आहेत ते योजावे. व व्रणचिकित्सा ह्मणजे व्रणावर जी चिकित्सा सांगितली आहे ती योजावी.

---

## उदर.

**उदराचें कारण व लक्षण.** अग्निमांद्य असतां व अजीर्ण असतां खाणें, विरुद्धाहार, भोजनावर भोजन, व्यायाम न करणें, पाणी फार पिणें, इत्यादि कारणांनीं वायु कुपित होऊन स्वेदवाहिनी ज्या शिरा यांचा अवरोध करितो. उदरस्थ वायु व अग्नि व अपान वायू हे दूषित होऊन पोटांत ज्या रोगाला उत्पन्न करितात त्याला उदर ह्मटलें आहे.

**उदराचें सामान्य लक्षण.** पोट फुगी, चालण्याचें असामर्थ्य, दौर्बल्य, अग्निमांद्य, सूज, ग्लानि वायु सह वर्तमान पुरीषोत्सर्ग, दाह, तंद्रा, पोटावरच्या शिरा दिसूं लागणें, पायांवर सूज, मलसंकोच, क्षुधानाश, इत्यादि लक्षणें जाणावीं. ह्या रोग वातोदर, कफोदर, पित्तोदर, सन्निपातोदर, जलोदर, प्लीहोदर, नागोदर, कच्छपोदर इत्यादि अनेक प्रकारचा आहे.

**उदराचें असाध्य लक्षण.** पोट कठीण असून तेल लाविल्यासारिखें नळनळीत व वरती हिरव्या शिरा तरारलेल्या, पायांवर व डोळ्यांवर सूज अन्नाचा तिटकारा, शोष, शिश्नास वक्रता, असें झालें असतां असाध्य जाणावा. आणि रेच दिला असतां वारंवार पोट भरतें तोही असाध्य जाणावा.

**उदरावर.** प्रथमतः वमन रेचन द्यावें. पिठीसाखर व मीठ समभाग घेऊन

अनि बारीक वाटून गोमूत्रांत घालून प्रातःकाळीं व सायंकाळीं प्राशन करीत जावें. निशोत्तर ४ निवडुंगाचा चीक ४ नूप ४ पाणी ८ भाग एकत्र करून कढवावें. चीक व पाणी जळालें ह्मणजे उतरून ठेवावें. आणि सामर्थ्य पाहून द्यावें.

**प्लीहोदरावर.** शेवग्याचे सालीचा काढा करून त्यांत पिंपळी व मिऱ्यें यांचें चूर्ण घालून द्यावा. चित्रक ३ भाग. हरीतकी ३ भाग, शाहाजिरें १ वावडिंगें ३ तीन गुळांत कुटून ७ गोळ्या करून सात दिवस द्याव्या.

**उदरारिरस.** पारा १ भाग, मोरचूत १ जेपाळ बीज १ हीं औषधें वाहव्याच्यागिरांत व निवडुंगाच्या चिकांत एकेक दिवस मर्दन करून मासाभार गोळ्या कराव्या. रोज एकेक गोळी द्यावी. पथ्य जुन्या चिंचेचें मधुरसार आणि भात अथवा गाईचें दुधाचें मधुरदहीं आणि भात.

**जलोदरारिरस.** पिंपळी १ भाग, मिऱ्यें १ ताम्रभस्म १ कांटे धोत्र्याचे मुळ्यांचें चूर्ण १ जेपाळबीज ४ यांचा निवडुंगाचे चिकांत एक दिवस खल करून पाण्याबरोबर ४ वाल प्रमाणें द्यावें.

**इच्छाभेदीरस.** सुंठ १ मिऱ्यें १ पिंपळी १ पारा १ गंधक १ टांकणखार १ जेपाळ बीज ३ भाग हीं एकत्र मर्दन करून थंडपाण्या बरोबर वाल अथवा दोनवाल प्रमाणें द्यावें. वर जितके पाण्याचे घोट घ्यावे तितके दाळ होतील. मग ताक भात खावा. वावडिंग, सज्जिखार, हरीतकी, हीं समभाग व यांतील एका औषधाचा चतुर्थांश निवडुंगाचा चीक हीं एकत्र खलून उन्हापाण्याबरोबर घ्यावीं. वावडिंग व हरीतकी यांचे काढ्यांत दोन मासे गुग्गूळ घालून द्यावा. कडुवृंदावनें ह्मशीचे मुतांत शिजवून तीं द्यावीं व नेमून वर पाजावें. कुमारी आसवांत वज्रक्षार व घोडाचोळीची मात्रा घालून द्यावें. ओंवा, अजमोदा, किरमाणी, खुरासनी, सुंठ, मिरें, पिंपळी, यांचें चूर्ण करून कडुवृंदावनाच्या फळाच्या रसांत गूळ घालून अवलेह करावा. आणि तो दररोज एकतोळा प्राशन जावा.

**गुल्माचें कारण व लक्षण.** विरुद्धाहार, अग्निप्रदीप्त नसतां जड पदार्थांचें भक्षण, व्यायाम न करणें, नर्षांतून एक दोन वेळां दाल्ळ न घेणें इत्यादि कारणानी वातादिदोष कुपित होऊन पोटांत दोहों कुशींत उरांत नाभीचे ठिकाणीं बस्तींत गांठी उत्पन्न करितात. त्या गांठी आंब्याचे बांठी एवढ्या अथवा ल्हान व चल अथवा अचल अशा असतात. कधीं कधीं मोठ्याच्या ल्हान होऊन पुनः अधीक मोठ्या होतात. हा गुल्मरोग वातगुल्म, पित्तगुल्म, कफगुल्म, सन्निपातगुल्म इत्यादि भेदें करून अनेक प्रकारचा आहे.

**गुल्माचें पूर्वरूप.** फार ढेंकर, मलबद्धता, अन्नाचा तिरस्कार, आंतडीं कुरकुर वाजणें, दुखणें, पोट फुगणें, अग्निमांद्य, हें गुल्मरोगाचें पूर्वरूप जाणावें.

**रक्तगुल्माचें लक्षण.** स्त्री नूतन बाळंतीण असतां अथवा अपक्व गर्भपात असतां व ऋतुकाळीं कुपथ्य पदार्थ सेविल्यामुळें वायु कुपित होऊन तिचे गर्भाशयाचे ठायीं रक्ताला जमवून शूलयुक्त व दाहयुक्त अशा गुल्माला उत्पन्न करितो. त्या गुल्माचीं विशेष लक्षणें. हा गुल्म बहूत दिवस पिंडीभूत असून अवयव नसतां गर्भासारिख्या दुसण्या मारितो व शूल करतो आणि आर्तव प्रतिबंध, स्तनाच्या बोंड्या काळ्या होतात व हा रोग गर्भाशयांत होतो अतएव आणखीही गर्भचिन्हें होतात. हा रोग स्त्रियांसच होतो. या रोगाची चिकित्सा दहा महिन्यानंतर करावी.

**गुल्माचें असाध्यलक्षण.** जो गुल्म फार दिवस राहिल्यामुळें उदर व शिरा यांस व्यापून कांसवासारिखा उंचवट होतो तो असाध्य. व अरुची, अशक्तता, हृदयव्यथा, खोकला, ज्वर, श्वास, ओकारी, तृषा, झांपड, अतिसार, पडसें व नाभि, हात, पाय, यांवर सूज येते तो गुल्म असाध्य जाणावा.

**गुल्मावर उपचार. वातगुल्मावर.** सज्जिखार, ओलिंजन, वेनकीचा

क्षार हीं एकत्र करून तेलांत द्यावा. पित्तगुल्मावर. निशोत्तर, त्रिफळा यांचा काढा द्यावा. रेणुक बीज मधांत द्यावें. द्राक्ष व हरीतकी यांचा काढा गूळ घालून द्यावा. त्रिफळेचें चूर्ण साकरेंत द्यावें. वर उष्णपाणी द्यावें. कफगुल्मावर. पंचमूळ (शालिपर्णी, पृष्ठिपर्णी, रिंगणी, डोरली, गोखरू) यांचा काढा द्यावा. जुनें वारुणी मद्य द्यावें. त्रिदोषगुल्मावर. वायवरण्याचा काढा द्यावा. पारा १ पिंपळी ४ गंधक ४ हरीतकी ४ यांचा खल करून बाहव्याचे गिरांत व निवडुंगाचे चिकांत पुनः खल करून माष प्रमाणे गोळ्या कराव्या यास गुल्मारीरस ह्मणतात. ती एकेक गोळी मधांत द्यावी. पथ्य दहीं भात. शंखद्राव एक किंवा दोन वाल सुंठीचें चूर्णांत अथवा हरीतकीचें चूर्ण व सैंधव हीं एकत्र करून त्यांत द्यावा. रक्तगुल्मावर. तिळांच्या काढ्यांत त्रिकटू, हिंग, भारंगमूळ, यांचें चूर्ण घालून तो द्यावा. ह्मणजे रक्तगुल्मरोग नाश पावतो. व विटाळ गेला असल्यास तोही येतो. त्रिफळेचे काढ्यांत मासाभर गुग्गूळ घालून द्यावा. रिठ्यांचे पाण्यांत कडू वृंदावनीचें मूळ उगाळून द्यावें. किंवा इंद्रवारुणीचें ओलें मूळ योनींत ठेवावें. हीं औषधें केली असतां रक्तगुल्म गळून पडतो. बेंबीजवळ जळवा लावाव्या ह्मणजे गुल्म गळून पडतो. नंतर शांतोपचार करावे.

---

## शूळ.

शूळरोगाचें कारण व स्वरूप. वातशूळ. वातक्षोभक जे रूक्षादि पदार्थ तुरट, कडू, मोड आलेलें धान्य, शुष्कमांस, शुष्क भाज्या व सांकपावटे इत्यादि पदार्थांचें भक्षण व अतिशीतळ जलप्राशन, जेवणावर लागलेंच जेवणें, अतिव्यायाम, अतिमैथुन, अतिजागर, मळ, मूत्र, वायु, यांचे वेगाचा रोध करणें, अतिशोक अतिहास्य, इत्यादि कारणांनीं वायु कुपित होऊन तो हृदय, पाठ, कंबर, बस्ति यांत शिरून शूळ

ला उत्पन्न करितो. हा प्रदोष समयीं व शीत काळीं व वर्षाकाळीं यानऋतुमु-ळें विशेष उद्भव करितो. पित्तशूळ. पित्तक्षोभक तीक्ष्ण उष्णादि पदा-र्थांचे अतिसेवनानें पित्त क्षोभ होऊन त्यापासून नाभीचे ठायीं व मस्त-कांत शूळ उत्पन्न होतो. व तो मोह, शोष, दाह, घर्म, भ्रम यांतें करितो. व हा मध्यरात्रीं दोनप्रहरीं व शरदृतूंत. विशेष पीडा करितो व पित्तशाम-क पदार्थ सेवनानें शमतो. कफशूळ. कफ प्रकोप मधुरादि पदार्थांचे अ-तिसेवनानें कफ क्षोभ होऊन त्यापासून आमाशयांत शूळ होतो. त्याशू-ळापासून लाळ, खोकला, अरुचि, बद्धकोष्ठ, इत्यादि उपद्रव होतात. व हा शूळ सूर्योदयीं व शिशिर ऋतूंत फार उपद्रव देतो. याचप्रमाणें द्विदोष जन्यशूळांत दोहोंचीं लक्षणें व त्रिदोषजन्यशूळांत तीहींचीं लक्षणें होतात. आमशूळ. हा शूळ आमांशापासून होतो. व आमांश अग्निमांद्या-पासून होतो. त्यास अग्निप्रदीपक व आमांशनाशक औषधें द्यावीं.

शूळावर. घोड्याची लीद पाण्यांत कुसकरून त्यांत हिंग घालून द्यावें. कुलथ्यांचा काढा, सुंठ, हिंग, बिडलवण यांचें चूर्ण घालून द्यावें. सुंठ, पे-खंड, हिंग, जिरें, शाहाजिरें, बचनाग, चित्रकमूळ, यांचें चूर्ण करून माक्या-च्या रसांत चण्याप्रमाणें गोळ्याकरून एकेक गोळी द्यावी.

शंखवटिका. चिंचेचे टरफलांची राख ४ पंचलवण ५ भाग (लवण, टांकणखार, बीडलोण, संचळ, सैंधव,) शंखभस्म २ हिंग १ मिरीं १ सुंठ १ पिं-पळी १ पारा ॥. अर्धभाग, गंधक ॥. बचनाग ॥. या सर्व औषधांचें चूर्ण निंबाचे रसांत खलून बोराचे आंठीप्रमाणें गोळ्या कराव्या. एकेक गोळी द्यावी, ह्मणजे शूळ, संग्रहणी, अजीर्ण, अरुचि, पक्तिशूळ, क्षयरोग दूर होतात. गेळफळ कांजींत उगाळून बेंबीवर लेपकरावा. सुंठ व एरंडमूळ यांचा काढाकरून त्यांत संचळ घालून द्यावा. आंवळकठीचें चूर्ण मधां-त द्यावें. हरीतकीचें चूर्ण गूळ व तूप यांत द्यावें. मंडूर गोमूत्रांत शिजवून

त्यांत त्रिफळेचें चूर्ण घालून मध व तूप यांत द्यावें. द्राक्षें व अडुळसा यांचा काढा द्यावा. घोड्याची लीद व हिंग यांचा अर्क काढून द्यावा. पारा १ गंधक १ बच नाग १ कवडीभस्म १ सैंधव १ पिंपळी १ सुंठ यांचा नागवेलीचे रसांत खल करून दोन गुंजे प्रमाणें गोळ्या कराव्या. ती एक गोळी द्यावी. लोकनाथ रसाची मात्रा अनुपान योजून द्यावी. हरिणाचें शिंग जाळून तें भस्म तुपांत देणें.

परिणामशूळ. अन्नाचा पाक होऊं लागला असतां जो शूळ होतो तो अन्नद्रव शूळ सर्वकाळ ह्मणजे अन्न जिरल्यापूर्वीं व नंतर व पथ्य केलें तरीं राहात नाहीं, निद्रा लागली ह्मणजे राहातो. ज्वरपित्तशूळ. तो आम्लपित्तापासून होतो. आम्लपित्ताचा नाश जहाला असतां तो शूळही बसतो. ह्मणून आम्लपित्त नाशक औषधें द्यावीं.

परिणामशूळावर. सुंठ, तीळ, गूळ, एकत्र कुटून गाईचे दुधांत शिजवून द्यावें. शंखभस्म ऊष्णोदकांत द्यावें. पुंद्रजवांची पूड ऊष्णोदकांत द्यावी. अथवा निंबाचे सालीचें भस्म ऊष्णोदकांत द्यावें. हिंग, सैंधव, जिरें, यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. टांकणखार, हरणाचे शिंगाचें चूर्ण, सोनें व तांबें यांचें भस्म, रस भस्म हीं आल्याच्या रसांत मर्दन करून नंतर शरावांत घालून मृदु गजपुट द्यावें. नंतर काढून खलून एक किंवा दोन गुंजा तें भस्म मध व तूप यांत द्यावें.

उदावर्ताचें कारण व लक्षण. क्षुधा, तृषा, निद्रा, श्वास, ओकारी, शिंक, जांभई, ढेंकर, शुक्रधातु, मळ, मूत्र, अधोवायु या प्रत्येकाचा त्रास जाहला जो वेग त्यांचा निरोध केला असतां वायु ऊर्ध्व गती होऊन नानाप्रकारची पीडा करितो तो उदावर्त वायु, त्यांत मळ, मूत्र, व अधोवायूंचा निरोध केला असतां मोठे घोर प्राणनाशक उपद्रव होतात व त्या ऊर्ध्व वायूचे बळानें मुखावाटे मळही पडतो.

---

१ कोणी यास पक्तीशूळ असेंही ह्मणतात.

**उदावर्त्ताचें असाध्य लक्षण.** अतिशोष, ग्लानि, क्षीणता, शूळ, विष्ठायुक्त वांती असें असल्यास तो असाध्य जाणावा.

**उदावर्तावर.** जवखार, सज्जीखार, पंचलवण, (टांकणखार, लवण, बीडलवण, सेंधव, संचळ,) चित्रक, ओंवा, त्रिकटु, बाळहिरडे, वावडिंग, निशोत्तर, वेखंड, यांचे चूर्णास निवडुंगाचे चिकाच्या सात भावना देऊन गोळ्या चण्यापेक्षां कांहीं मोठ्या कराव्या. ती गोळी दिली असतां उदावर्त, गुल्म, उदर हे रोग नाश पावतात. जवखार, साखर एकत्र करून घ्यावी. जेपाळबीज, पारा, गंधक, त्रिकटु, टंकणखार यांचें चूर्ण खलांत तीनदिवस घोटावें. आणि तें मासाभर चूर्ण तूप साखरेंत घ्यावें.

---

## कुष्ठरोग.

**कुष्ठरोग.** वमन, विरेचन, इत्यादि पंचकर्मांत न्यूनाधिक्य विषयाचें अतिसेवन, मद्य, मांस, दुष्टजल, यांचें अतिसेवन, जड पदार्थाचें अति भक्षण, अतिव्यायाम, अतिसंताप, अत्यजीर्ण, अतिश्रम, दही, लवण, माष, मुळे, मिष्टान्न यांचें अतिभक्षण, अतिदिवानिद्रा, पापकर्म, मळ, मूत्र, वांति, यांचे वेगाचा अवरोध, इत्यादि कारणांनीं वातादि दोष दुष्ट होऊन त्वचा, मांस, रक्त आणि रस यातें दूषित करून अठरा प्रकारचीं कुष्ठें उत्पन्न करितात. **सर्वकुष्ठांवर.** गाईचें दूध ८१. गंधक १ किंवा ॥. तोळा एकत्र करून प्यावें. पांढरे गोकर्णीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून लेप करावा. पारा, गंधक, मनशीळ, हरताळ, मिरें, हळद, आंबेहळद, शेंदूर, मोरचूत, टाकळ्याचें बीज, बावंच्या, जिरें, कडुजिरें, या सर्वांचें चूर्ण करून त्यांत निंबाचा रस व तूप घालून लोखंडाचे कढयांत लोखंडाच्या बत्त्यानें चार प्रहर घोटावें, नंतर लावावें. म्हणजे कोड, कंडू, नारूज, विसर्प इत्यादि रोग दूर होतात. महाव्याधिस्त्यांनीं शिरा काढाव्या. दर पांचव्या दिवसीं विरेचन व दर पक्षास वमन

द्यावें. औषधोपायही चालू ठेवावा. टाकळ्याचें बीज, रुईचा चीक, दांतीचें मूळ, वावडिंगें, सेंधव, घेरोसा, हळद, दारूहळद, रिंगणीमूळ, बचनाग, हीं सर्व औषधें वाटून लेप करावा. ह्मणजे सर्व कुष्टें विवर्णता हे रोग दूर होतात. खैराचे पंचांगाचा काढा करून ठेवावा. तेणें करूनच स्नान, पान, भोजन, उद्वर्तन, लेप हीं करावीं ह्मणजे सर्व कुष्टें जातात. खैरसाल, त्रिफळा, कडुनिंबाची साल, कडू पडवळ, गुळवेल, अडुळसा यांचा काढा द्यावा. ह्मणजे सर्व कुष्टें, विस्फोट, मसूरिका, हे रोग दूर होतात. खदिरसार, अथवा कात उगाळून लेप करावा. बावंची वाटून साहा महिनें पर्यंत लेप करावा

## खरूज.

खरजेवर. प्रथम रेचन द्यावें. पारा, गंधक, जिरें (खातीं व काळीं) आंबेहळद, हळद, मनशीळ, शेंदूर, मिरें, हीं तुपांत खलून लेप करावा. पारा, गंधक, धोत्र्याचें बीज, यांचा तेलांत खल करून लावावें. गंधक केळ्यांत खावा. ह्मणजे सारी खरूज बाहेर पडते. मग सायंकाळीं ह्मशीचें शेण आंगास लावून भरावें. ह्मणजे स्वच्छ होतें. चंदनी अत्तर चोळून चोळून लावावें आंवळकठी जाळून ती तेलांत खलून लावावी. कुष्टांवर औषधें सांगितलेलीं आहेत तीं ही करावीं. शुद्ध केलेला गंधक नुसता तुपाशीं किंवा ताकांत द्यावा.

## विसर्प.

विसाप, नायटे यांवर. प्रथम रक्त काढावें, एरंडेल तुपांत द्यावें. हळद, आंबेहळद, कोष्ट, कोळिंजन, जटामांशी, ज्येष्ठमध, नागर, एलचीदाणे, वाळा, श्वेतचंदन यांचें चूर्ण करून तुपांत खलून लावावें. गुळवेल, अडुळसा, त्रिफळा, खैरसाल, बाहव्याचा मगज, यांचे काढ्यांत एक टांक गुग्गूळ

घालून द्यावा. शिळेपाण्यांत चिकणे सुपारीचें चूर्ण करून टाकावें. आणि तें पाणी नित्य लावावें. बचनाग, कुचला, आणि मोरचूत, दह्यांत उगाळून १४ दिवस लेप करावा. शतधौत घृतांत रसकापूर हा खलून लावावा. खरजेवर आणि कुष्ठांवर सांगितलेलीं औषधेंही करावीं.

## विस्फोटक.

विस्फोटकांवर. प्रथम रेचन द्यावें. एरंडेल तुपांत द्यावें. किराईत, कुटकी, ज्येष्ठीमध, वाळा, पित्तपापडा, अडुळसा, मोथे, त्रिफळा, कुडेसाल यांचा काढा द्यावा. चंदन, नागकेशर, तांदुळजा, शिरसाचीं सालें, जाईचा पाला हीं औषधें वाटून लेप करावा.

## नारू.

नारूवर. आमलीचें बीं गोमूत्रांत वाटून लेप करावा. निर्गुंडीचे पाल्याचा रस दोन तोळे, व गाईचें तूप दोन तोळे एकत्र करून द्यावें. असें सात दिवस करावें. शेवग्याचे मुळाची साल कांजींत वाटून त्यांत सैंधव घालून पुनः वाटून लेप करावा. शेवग्याची साल चांफ्याचे अंकुर आणि लसूण एकत्र करून वाटून नारूवर पिंडी बांधावी. एका दिवसांत नारू जळून जातो. टांकण खाराचे लाहीचा रस किंवा सहा मासे दहीं आणि जोंधळ्यांच्या लाह्यांचें पीठ यांत कालवून देणें. सायंकाळ पावेतों उपवास करून नंतर पथ्य द्यावें. कोणी तुरटीची लाही देतात. या उपाया पेक्षां नारूचेंठिकाण पाहून शस्त्रानें फाडावें. नंतर बारीक आंकडीनें तो नारू ओढून

१ ज्यांत फार जिवंत पाणी नसतें व त्याचा प्रवाह नाहीं व त्यांत लुगडीं वगैरे धुतलीं जातात अशीं जीं लहान तळीं यांचें पाणी व नासलेलें पाणी पिण्यापासून नारू होतात. सोलापुरच्या वस्तीला हा रोग फार आहे.

काढावा. धोत्र्याचीं पानें विड्यांत खावीं. किंवा धोत्र्याचे पाल्याचा रस एक किंवा दोन तोळे वतिनकेंच तूप एकत्र करून द्यावें. ह्मणजे अंमल येईल. त्या सउनार दुसरे दिवशीं दह्रीं भात खावा. रुईचे चिकाचा लेप करावा.

## नेत्ररोग.

नेत्ररोगाचें कारण. उन्हानें अंग संतप्त असतां शीतोदकानें स्नान करणें, दूर दृष्टी देऊन निरंतर पाहणें, यथाकाळीं निद्रा न करणें, घाम, धूळ, आणि धूर, यांचा नेत्रांस स्पर्श होणें. ओकारीचा निरोध व अति ओकाऱ्या देणें. पातळ अन्न व पाणी यांचें अतिसेवन, वात, मळ, मूत्र, यांचा अति रोधकरणें, निरंतर क्रोध, रोदन, शोक करणें, अतिमद्यपान करणें, ज्याकरून जें करावयाचें तें न करणें, बाष्परोध करणें व अतिसूक्ष्म पदार्थांचें निरंतर अवलोकन करणें, अनवाणी निरंतर चालणें, तापकारक पदार्थ निरंतर पाहणें, उष्ण तेजाकडे पाहणें, गांजा, तंबाकू यांचें अतिसेवन करणें, तीक्ष्ण पदार्थांचें अति भक्षण करणें, हात, पाय, यांचें कठोर पदार्थांशीं अति संघर्षण होणें, कफ, वात, पित्त यांचा अति क्षोभ या कारणांनीं नेत्रांस रोग होतात.

नेत्ररोगांवर. शुद्ध केलेला बिबळा, सैंधव, हळद, यांची वस्त्रगाळ पूड करून पाण्यांत कालवून गवी निजते वेळीं डोळ्यांवर बांधावी. असें तीन दिवस केलें ह्मणजे लाली, ठणका, गळ, खुपऱ्या, यांचा नाश होऊन स्वच्छ होतात. शेवग्याच्या पाल्याचा रस व मध एकत्र करून अंजन करावें. ह्मणजे वातादि दोष जाऊन दृष्टी निर्मळ होते. काळीसारवर वस्त्रगाळ करून घालावी. गाईचे शेणाचें वस्त्रगाळ पाणी घेऊन त्यांत पिंपळी उगाळून अंजन करावें, ह्मणजे रातांधळें जातें. पिंपळी मधांत उगाळून नअंजन करावें त्याणें डोळ्यांतलीं फुलें जातात. गेरू, सुर्मा, बाळहर्तकी,

ारुहळद, सैंधव, यांचा लेप डोळ्यांवर करावा. प्रथम रक्त काढावें व वि-
ेचन द्यावें. त्रिफळेच्या पाण्यानें किंवा काढ्यानें नेत्र धुवीत जावे. व आंत
ी अंजन करावें. ज्येष्ठमध, गुळवेल, त्रिफळा यांचा काढा शनैः काढोंघा-
ा. नेत्रांवर शिंपावा. त्रिफळेचें चूर्ण रात्रौ मध व तुपांत द्यावें. नयनामृत
अंजन. पारा, शिसें समभाग व भ्रास कपूर चतुर्थांश हीं एकत्र खलून कुपीं-
त ठेवावीं. मग शिशाचे सळईनें डोळ्यांत घालावें. डोळे येतात त्यांवर लेप.
कापूर, हळद, लोध्र, तुरटी, निंबूच्या बिया, अफू, रक्तयाबोळ, यांचा निंबूच्या
रसांत खल करून लेप करावा. निंबूरसांत दांनवण, अफू यांचा लोखंडी
तव्यावर खल करून लेप करावा. लोखंडाचा कीस आणि दांनवण एकत्र
करून निंबाच्या फांकीवर घसावें आणि पिंवळ्या फडक्यांत पोचंडी बां-
धून ती डोळ्यांत फिरवीत जावी. ह्मणजे डोळ्यांत अन्हळ फिरतात ते
आणि कंडू, लाली, वगैरे सर्व विकार दूर होतात. सल्फेट् ऑफ् जिंक ह्म-
णजे जस्ताचा क्षार पाण्यांत विरघळवून त्याच्या वड्या घालाव्या ह्मणा-
जे खुपऱ्या, लाली कमी होते. शेंदूर ।· जस्ताचें फूल ।· कापूर ।· मोरचु-
ताची लाही एकमासा, पांढरा कात ।· मुरदाडशिंग ।· हीं औषधें गाईचे
लोण्यांत खल करून त्यांवर विहिराचा शेवत्यांचे समारें १० किंवा बारा
थेंब पाडावे. तांब्याचे परातींत तांब्याच्या भांड्यानें खलावें आणि सु-
मारें वीस पंचवीस पाण्यानें धुवावें. नंतर डबींत भरून ठेवावें तें नि-
त्य रात्रौ डोळ्यांत घालावें. ह्मणजे खुपऱ्या, लाली, कंडू, गळती वगैरे
सर्वविकार दूरहोतात. अहिऱ्यावर. अहिऱ्याची आंगठी फिरवावी. हळ-
कुंड वरणांत शिजवून त्याचें पाण्यांत अंजन करावें. ह्मणजे लाली-अ-

१ शिशाचा रस करून त्रिफळेचे पाण्यांत अथवा काढ्यांत ओतावा. याप्रमाणें पं-
चवीस वेळा किंवा पन्नास वेळा करून त्या शिशाची सळई करावी. ती सळई
नुसती डोळ्यांत फिरविली असतां गुण भारी होतो.

हिरा श्वेत पुष्प जातें. कुरुंदाचे निसण्यावर लोखंड घांसून ती पूड वस्त्रगाळ करावी. आणि ती खुपऱ्यांवर चोळावी. लेंकराच्या कुपऱ्या ह्मणेंन बऱ्या होतील. धुरानें डोळ्यांस विकार होतो त्यास. गूळ, किंवा गुळीसाखर डोळ्यांत घालावी. पाणी गळून डोळे चांगले होतात. डोळे चिकचिकीत होऊन पाणी गळतें आग होते त्यांवर. हिरडा, आंवळकाठी, व खडीसाकर उगाळून अंजन करावें. किंवा त्रिफळेचें अथवा त्रिफळा उगाळून अंजन महिन्यांतून चार पांच वेळा नेहमी करीत जावें ह्मणजे डोळ्यास विकार कधींही होत नाहीं. व दृगिंद्रिय निर्मळ राहतें. नुसती आग होते किंवा तेज कमी झालें तर. प्रातःकाळीं गाईचें लोणी, खडीसाखर, एलची दाणे, जायपत्री, बदाम, हीं एकत्र करून खावीं. ह्मणजे डोळ्यांची आग शांत होऊन तेज येतें. गुलाबपाणी डोळ्यांत घालीत जावें. शिशाचें भस्म, खडीसाखर स्त्रीचे दुधांत कालवून अंजन करावें. डोळ्यांवर सारा येतो, फुलें पडतात, खुपऱ्या येतात त्यांजवर. जस्ताचें फूल खडेसाखर, समभाग एकत्र करून घड्यापडे तोंपर्यंत खलून ती पूड रात्रीं निजते वेळीं डोळ्यांत घालावी. ह्मणजे सर्व विकार दूर होतात. खुपऱ्यांवर. मोरचुताची सळयी फिरवावी त्याणें खुपऱ्या झडतात. काडीखार पाण्यांत विरघळवून त्याचा थेंब डोळ्यांत सोडावा. जस्ताचे फुलाची क्रिया. चांगलें जस्त आणून त्याचा रस करून किंवा जाड पत्रे तापवून लाल झालें ह्मणजे गाईचे ताकांत विझवावें. याप्रमाणें सात भावना द्याव्या. नंतर त्रिफळेचे पाण्यांत किंवा काढ्यांत तशाच सात भावना द्याव्या. पुढें याप्रमाणें गोमूत्रांत सात भावना. निंबूचेरसांत सात भावना. देऊन पुनः याचप्रमाणें त्रिफळेच्या रसांत भावना द्याव्या. नंतर कोरफडीचे बारीक तुकडे करून कुस करून त्यांत त्या पत्र्यांचा चूर घालून उन्हांत वाळवावें. याच प्रमाणें करून नंतर त्याचें भस्म करावें. अथवा जस्ताचे भस्मास चवरसां-

गितले प्रमाणें भावना द्याव्या आणि घट्ट वस्त्रानें गाळून ठेवावें. **श्वेत फुलें पडतात त्यावर.** करंजाचे बियाचे चूर्णास पळसाचे फुलांच्या रसाच्या किंवा फुलें सुकलीं असल्यास फुलांचे काढ्याच्या अथवा साळीचे रसाच्या सात भावना देऊन गोळी करावी, ती पाण्यांत उगाळून अंजन करावें. गाईचे दह्यांत सुंठ उगाळून अंजन करावें. पुनर्नव्याचें मूळ तुपांत उगाळून अंजन करावें. **लाल फुलें पडतात त्यांवर.** समुद्रफेण व खडीसाखर यांची वस्त्रगाळ बारीक पूड करून घ्यावी. पाथरीचे पाल्याचे रसानें अंजन करावें. **रातांधळ्यास.** पिंपळी गोमूत्रांत उगाळून अंजन करावें.

---

## मुखरोग.

**मुखरोगांचें कारण.** हा रोग चौऱ्याहात्तर प्रकारचा आहे. तो मत्स्य, महिष, वराह, यांचें मांस अतिभक्षण आंवळे, मुळे, उडदांचें वरण, दहीं, दूध, मीठ, काकवी, यांचें अतिभक्षण, पालथें निजणें, दांत न घांसणें, धूम्रपान, वमन, गंडूष, शिरावेध, हीं यथोक्त काळीं न करणें ईहींकरून मुखरोग उत्पन्न होतात. या रोगांत त्रिदोषांचा संबंध असतो; पण कफ विशेष असतो.

**मुखरोगांवर.** जाईचीं पानें, त्रिफळा, धमासा, दारुहळद, गुळवेल, मनूका यांचा काढा मध घालून द्यावा. अर्जुन, सादडा, वाळा, कडूपडवळ नागरमोथे, हिरडेदळ, कुटकी, ज्येष्ठीमध, बाहव्याचा मगज, चंदन यांचा काढा द्यावा. कडूपडवळ, सुंठ, त्रिफळा, मेंदी, कुटकी, मोथे, गुळवेल, यांचा काढा मध घालून द्यावा. वड, उंबर, पिंपळी, जांभळी, नांदरुखी, यांचे पल्लवांचा काढा करून त्यानें गुळण्या कराव्या. जिरें कुटून त्याच्या पाण्यांत रक्तचंदन उगाळून त्यांत एळूचीची पूड, व तुरटीची लाही घालून गुळण्या कराव्या. बाभळीची व जांभळीची अंतसाल यांचा काढा करून त्यांत तुर-

स्तकास लेप करावा. कोळिंजनाची पूड नाकांत ओढावी. माथेशूळ राहतो. गुळवेल, किराईत, त्रिफळा, हळद, दारुहळद, गांठेहळद, कुडूकी, यांचा काढा करून त्यांत गूळ घालून द्यावा. ह्मणजे अर्धशिशी, कर्णशूळ, भ्रूशूळ, शंखशूळ, हे रोग दूर होतात. गुंजेचें मूळ उगाळून नस्य द्यावी. ह्मणजे सूर्यावर्त, (डोळ्यांपुढें चक्रें येतात तीं) रातांधळें, नेत्रांस पटळें येतात तीं व मस्तकशूळ, हे रोग दूर होतात. एरंडमूळ, सुंठ, शेवग्याचें मूळ, पडवळ, पाहाडमूळ, कोळिंजन, टाकळ्याचें बीज, हीं औषधें धान्याम्ल[1]ांत वाटून मस्तकास लेप करावा. ह्मणजे सर्वप्रकारचे मस्तकरोग जातात. आंवळकाठीचें चूर्ण साखर व तूप एकत्र करून प्रातःकाळीं घ्यावें. कपाळदुखी राहते. बदाम आणि केशर, गाईचे तुपांत उगाळून नस्य करावें. बदामाची खीर दुधांत तीन रोज प्रातःकाळीं भक्षावी. साधी बरफी तीन दिवस उषःकाळीं खावी.

---

## रक्तपित्त.

रक्तपित्ताचें कारण व स्वरूप. ऊन्ह, अग्नीचा शेक, परिश्रम, शोक, मार्गक्रम, मैथुन, इत्यादि कांचे अतिसेवनें करून तीक्ष्ण, उष्ण, खारट, आंबट पदार्थांचे अतिसेवनें करून पित्त क्षुभित होऊन रक्तास क्षुब्ध करितें. मग ऊर्ध्व मुखादि कांवाटे व अधोभागीं गुदावाटे रक्त पडूं लागतें तें रक्तपित्त होय.

रक्तपित्ताचे उपद्रव. अन्न न पचणें, वांति, तृषा, श्वास खोकला, बलहानि, पांडुता, भोजन केलें असतांही दाह, भ्रम, मस्तक तापणें, अतिसार, क्षुधानाश, इत्यादि उपद्रव होतात. मुखावाटे रक्त पडतें, तें साध्य, गुदवाटे पडतें तें कष्टसाध्य, व जें उभय मार्गानें पडतें तें असाध्य.

---

[1] तंदुलादि धान्याची पेज काढून आंबवितात ती. कांजी.

रक्तपित्तावर. अडुळशाचा रस, व मध समभाग करून घ्यावा. अडुळसा, मनुका, बाळहरतकी, यांचा काढा द्यावा. बकरीचे दुधांत मध व साखर घालून द्यावें. गाईचे दुधांत पांचपट पाणी घालून कढवावें. पाणी जळालें ह्मणजे तें दूध द्यावें. आंवळ्यांचा अथवा हरीतकीचा मुरंबा द्यावा. आंवळकठीचें चूर्ण साखर आणि तूप एकत्र करून द्यावें. ज्येष्ठीमध, धणे, रक्तचंदन, अडुळसा, वाळा, यांचा काढा, मध, साखर घालून द्यावा. ह्मणजे शोष, दाह, रक्तपित्तज्वर, यांचा नाश करितो. शंखजिरें, तूप, साखर, हीं एकत्र करून द्यावीं. दुधाची साय द्यावी. द्राक्ष, बेदाणे, धणे, यांचा काढा साखर घालून द्यावा.

---

## शीतपित्त.

शीतपित्त. शीतळ वायूचे संपर्के करून कफ व वायु हे दुष्ट होऊन पित्ताला मिळून अभ्यंतरीं रक्तादि धातूंचे ठाईं व बाहेर त्वचेचे ठाईं प्रवेश करून गांधी उत्पन्न करितात. त्यानां कंडू, व पीडा, व दाह हे उपद्रव असतात. शीत पित्त व उदर्द यांत फारसा भेद नाहीं ह्मणून पृथक् सांगितलें नाहीं.

शीतपित्ताचें पूर्वरूप. तृषा, अरुची, हृदयव्यथा, दाह, हात, पाय, गळणें, अंगजाड्य, आरक्तनेत्रता, ह्या लक्षणानीं पूर्वरूप जाणावें.

शीतपित्तावर. सेंधव तुपांत उगाळून लावावें. त्रिफळेचें चूर्ण मधांत द्यावें. शिरस, हळद, कोष्ठकोलिंजन, टाकळ्याचें बीज. यांचें चूर्ण शिरसेलांत कालवून लेप करावा. मिरपूड तुपांत कालवून चोळावी. निर्गुंडीच्या पाल्याच्या रसांत गाईचें तूप घालून तीन दिवस देणें.

---

आम्लपित्ताचें कारण. विरुद्ध, दुष्ट, अथवा आमललेलें किंवा विषादिकानीं दुष्ट, व पित्त प्रकोपकारी असें अन्नपान यांचे अतिसेवनानें पित्त दुष्ट होऊन वर्षाकालीन जल, औषधी तद्गत वि दाहादिक पित्ताचीं कारणें तिहीं करून संचित होऊन आम्लपित्त रोग होतो त्या आम्ल पित्तानें आहाराचा दुष्ट पाक होतो. आयासा वांचून श्रम होतो. ओकारीचे उद्गारसे येतात. आंगावर कंडू युक्त मंडळें, फोड, ढेंकर, उरांत व गळ्यांत जळजळतें व तृषा दाह, मूर्छा, यांतें उत्पन्न करितें. आणि हिरवें, पिंवळें, तांबडें, असे दुर्गंध युक्त पाणी तोंडावाटे पडतें अथवा गुदावाटे पडतें. आंगास गांधी, व पिंवळेपणा येतो व दररोज बासें अन्न पडतें.

आम्लपित्तावर. प्रथम वमन द्यावें. कडूपडवळ, कडूनिंब, अडुळसा, यांचा काढा द्यावा. गेळाचे फळांचें मगजांतील चूर्ण मधांत द्यावें तेणेंकरून वांति होते. नंतर निशोत्तराचें ढाळक देऊन मग औषध द्यावें. किराईत, निंबसाल त्रिफळा, पडवळ, अडुळसा, गरमाळा, पित्तपापडा, माका यांचा काढा मध घालून द्यावा. चित्रकमूळ, धमासा, एरंडमूळ, जव, यांचा काढा द्यावा. द्राक्षें, हरीतकी, साखर, यांच्या गोळ्या करून द्याव्या. आंवळकाठी वाटून त्यांत साखर घालून द्यावी. आमसोलें, एलची दाणे, साखर यांची चटणी करून द्यावी. कूष्मांड पाक द्यावा. महाळुंगाचा पाक द्यावा. हत्तीच्या शेणाचा आपरस काढून त्यांत हिंग भाजून घालून ऊन करून पाजावा. सुंठीचें चूर्ण-साहाभासे. गेरू तोळाभर याचा विड्याच्या पानाच्या रसांत खल करून वाटाण्या प्रमाणें गोळ्या कराव्या. दररोज सांजसकाळीं दूध आणि बतासे या अनुपानांत द्याव्या. सूतशेखराची मात्रा अनुपान योजून द्यावी. गोरखचिंचेचा मगज तोळे ९ शेवग्याचा रस तोळे ४ माक्याचा रस तोळे ४ कवठाचा गीर तोळे ८ आल्याचा रस तोळे १८ हीं सर्व एकत्र करून खलावीं यत्याच्या बोराच्या आठा प्रमाणें गोळ्या बांधाव्या. ती नित्य एकेक गोळी-

आल्याचा रस व खडीसाखर यांत द्यावी. अथवा नारळाच्या पाण्यांत द्यावी. पथ्य गोधूम, यव, तांदुळ, यांचें अन्न, गाईचें दूध व तूप मुगांचें वरण, दोडक्याची भाजी, इत्यादिक खावें. मीठ, तिखट, व तेलकट आंबट इतके जिन्नस वर्ज्य करावे.

---

## तारुण्यपीटिका.

व्यंग ह्मणजे वांग[1]. तारुण्यपीटिकायांवर. शिराकाढाव्या. लोध्र, धणे वेखंड, यांचा थंड पाण्यांत लेप करावा. गोरोचन, मिरीं यांचा लेप करावा. अर्जुनसादडा याची साल, मंजिष्ठ, अडुळसा, हीं वाटून लेप करावा. गाईचे दुधांत गोकरणीचें मूळ व सोनामुखी वाटून लेप करावा. वडाच्या पारंब्याचे अगरडे, कोळिंजन, लोध्र, मंजिष्ठ, शेंवरीचीं पानें, मसुरांचें पीठ, अतिविष, चंदन, हीं औषधें दुधांत वाटून तोंडास लेप करावा ह्मणजे शरचंद्राप्रमाणें मुख होईल. जुनी पेंड, कोंबड्याची विष्ठा, हीं मुतांत खलून लेप करावा. हिंगणबेट, वाळा, हीं थंड पाण्यांत वाटून लेप करावा. कांटेसांबरीचे कांटे पाण्यांत उगाळून लेप करावा.

---

## इंद्रलुप्त.

इंद्रलुप्त ह्मणजे चाई. त्यावर चारोळ्या, ज्येष्ठीमध, कोळिंजन, सैंधव, जाईचीं पानें, कण्हेर, चित्रक, बाहवा, हीं औषधें तेलांत पक्क करून तें तेल लावावें. पारव्याची विष्ठा पाण्यांत लावावी.

केंश गळून पडतात त्यावर. चंदन, ज्येष्ठीमध, त्रिफळा, नीळ, कमळ, नेवाळी, वडाचे पारंब्याचे अगरडे, जटामांसी, याचें चूर्ण करून त्यांत गुळवेलीचा रस व तेल घालून उन्हांत पचन करावें तें तेल लावावें. केंशन-

[1] वांग म्हणजे ज्या मुरमाच्या पुटकुळ्या व रक्ताच्या योगानें लहान गुळमासारिख्या तोंडावर येतात त्या.

येतात. हस्तिदंताचे मशीरीस दारुहळदीचे रसांत भावना द्याव्या आणि ती लावा- वी. केश वाढतात. व काळेही होतात. गव्हांचे कोंवळे अंकूर वाटून लावावे.

केश काळे होण्यास. नीळ कमळ व दूध एकत्र करून भुईंत पुरून ठेवा वें. मग काढून लावावें. चंदनादि तेल. चंदन, ज्येष्ठीमध, मोरवेल, त्रिफळा निळें कमळ, नेत्राळी, वडाच्या पारंब्या, गुळवेल, लोहचूर्ण, जटामांसी उपळसरी, माक्याचा रस, तेल, हीं एकत्र करून मंदाग्नीनें पक्क करावीं. तीं लावावीं. केश चांगले काळे येतात. लोहचूर्ण, माक्याचें चूर्ण, त्रिफळा, काळी माती, यांचा कल्क द्यावा.

स्तन व कान मोठे होण्यास. येरखंड, वाळा, लोध्र, तूप, राळ, गेरू, ज्येष्ठी- मध, मेण हीं सर्व औषधें शेळीचे दुधांत खलून लावीत जावें व हेंच- औषध पायांस व मुखास लाविलें असतां मृदुता येते.

---

## वल्मीक.

वल्मीक. ह्मणजे वारुळा सारिखा गुडघ्यावर रोग होतो. त्यास. रक्त का ढावें. नंतर डाग द्यावे. मनशीळ, हरताळ, बिबवे, बारीक एलची, अगरू- चंदन, निंबसाल, जायीचीं पानें, मुरदाडशिंग, हीं सर्व औषधें कुटून ते- लांत कढवून तें तेल लावावें. अति जुनें तूप घेऊन त्याच्या वाती त्या व- ल्मीक रोगाचे छिद्रांतून घालाव्या.

---

## गुदभ्रंश.

गुदभ्रंश. ह्मणजे जगेरू येतें त्याजवर. गाईचें शेण ऊन करून त्या णें शेकावें. घोसराचीं कोंवळीं पानें सारखे बरोबर खावीं. कोबी, चित्रक चुका, सुंठ, पाहाडमूळ, जवखार, हीं औषधें ताकांत वाटून खावीं. चित्र दराचें मांस शिजवून त्याणें शेकावें. कांटेसांवरीचा डीक आणि चिकण

सुपारी यांचें चूर्ण करून त्याणें आंत दडपावें, रुखाडूं पाण्यांत उगाळून लेप करावा.

---

## शोथ.

सूजेवर. पुनर्नवा, देवदार, सुंठ, वाळा, यांचा काढा गोमूत्र घालून द्यावा. पिंपळी, सुंठ, यांचें चूर्ण गुळांत द्यावें. ह्मणजे सूज, आमशूळ, अजीर्ण हे रोग दूर होतात. त्रिफळेचें चूर्ण गाईचे दुधांत अथवा गोमूत्रांत द्यावें ह्मणजे शोफोदर नाश पावतें. माक्याच्या रसांत मिरपूड घालून द्यावी व आंगास ही लावावी. बचनाग, सुंठ, पुनर्नव्याचीं मुळें गोमूत्रांत उगाळून लेप करावा. पांढरी घेटोळी, रास्ना, देवदार, सुंठ, लाजाळू, हीं औषधें पाण्यांत वाटून रस काढून त्यांत तोंडलीचे पानाचा रस चौपट घालून तें सारें तिळांच्या तेलांत घालून तेल अवशिष्ट राही पर्यंत कढवावें. तें तेल आंगास लावावें. सुंठ, कुटकी, चिराईत, यांचें चूर्ण उन्हा पाण्याबरोबर द्यावें. पाहाडमूळ, हळद, धायटी, सोथे, कडुजिरें, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, या औषधांचें चूर्ण उष्णोदकाबरोबर द्यावें किंवा कडुभोंपळ्याच्या रसांत द्यावें. ह्मणजे कशीही दुःखसाध्य सूज असली तरी जाते. धोत्र्याच्या पानाचा रस त्यांत गुग्गूळ घालून उष्ण करून लावावा. व घोंसाळीचे पानाचा रस गोमूत्रांत घालून उष्ण करून लावावा. धोत्र्याचे पानाचा रस व कांगोणीचा रस व घोंसाळीचा रस व माक्याचा रस हीं एकत्र करून त्यांत अफू घालून उष्ण करून लावावा.

वातरोगावर. तुळशीचा आगरस, मिरपूड, आणि तूप, हीं एकत्र करून भक्षिलीं असतां वातविकार दूर होतो. वायुरोगप्रकरणीं जीं औषधें सांगितलीं आहेत, त्यापैकीं कांहीं येथें योजावीं. गंधकरसायन अनुपान योजून द्यावें. हेमगर्भाचे मात्रेचे दोन वेढे आल्याचे रसांत तुळशीचा रस घा-

ळून त्यांत उगाळून द्यावें. रससिंदुराची मात्रा द्यावी. पोटांतल्यावायूस. सज्जिखार, संचळ, मध, हीं एकत्र करून त्यांत गव्हा इतका हिंग घालून द्यावें. एरंडेल तेल सुंठीचे काढ्यांत द्यावें. योगराज गुग्गूळ अनुपान योजून द्यावा.

पित्त रोगावर. गाईचे दुधांत एरंडेल द्यावें गुळवेलीचा रस व साखर एकत्र करून द्यावें. किंवा तूप, आणि खडेसाखर हीं एकत्र करून द्यावीं. आमसोलें, एलचीदाणे, साखर, यांची चटणी खावी. आंवळकाठीची पूड, त्याचे दुप्पट साखर, त्याचे दुप्पट साजूक तूप हीं एकत्र करून द्यावीं. गाईचे दुधांत तूप व साखर घालून प्यावें. पिकलेले डाळिंबाचा रस काढून त्यांत खडीसाखर घालून द्यावी. पिकलेलें केळें व तूप मिळोन खावें लोण्याचा तक्रांश काढून टाकून त्यांत खडेसाखर घालून खावें. आंवळ्याचा मुरंबा खावा. गुलकंद खावा. प्रवाळ भस्म आंवळ्याचे मुरब्यांत व तूपसाखरेंत सेवन करावें. सूतशेखर द्यावा. मौक्तिक भस्म द्यावें.

कफावर. गुळवेलीचा काढा मध घालून घ्यावा. ज्येष्ठीमधीचा काढा मध अथवा साखर अथवा दोन्हीं घालून घ्यावा. भारंग मूळ, अडुळसा, यांचा काढा मध साखर घालून घ्यावा. पिंपळीचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. बेहेडे दळ, व त्याचे दुप्पट साखर यांचा चहा करून घ्यावा. एलचीदाणे, सेंधव, तूप, मध, हीं एकत्र करून घ्यावें. सुंठ व तिचे चौपट खडेसाखर घालून काढा करून घ्यावा. आल्याचे रसांत द्विगुण खडेसाखर घालून चाटण करून द्यावें. अथवा गूळ घालून चाटण करून घ्यावें. आल्याचा रस, मध, साजूक तूप थोडेसें व साखर एकत्र करून द्यावें. गोमूत्रांत ज्येष्ठीमध व बेहेडा उगाळून अवलेह द्यावा. नुसतें गोमूत्र ही घ्यावें. थोर फडीचा बलक काढून त्यांत सेंधव, हळद, व मध घालून द्यावें. गोमूत्रांत हळद घालून द्यावें. क्षयरोग प्रकरणीं सीतोपळा चूर्ण सांगितलें आहे तेंही द्यावें.

त्रिदोषावर. वात, पित्त, कफ, हे क्षुब्ध झाले असतां कंठाचे अधोभागीं

आहेत तोंपर्यंत उपाय चालवावा. आल्याचा रस व तुळशीचा रस यांत ज्येष्ठीमध उगाळून व मध घालून द्यावें. अत्युष्णतेनें कंठ व त्याचा अधोभाग कोरडा पडला असल्यास खरकादलेल्या आल्याचा रस, तुळशीचा रस, व त्यांत गाईचें साजूक तूप व मध घालून हेमगर्भमात्रेचे एक दोन वेढे उगाळून थोडें थोडें द्यावें. पिकलेले डाळिंबाचा रस व आल्याचा रस खडेसाखर यांची चाचणी करून त्यांत रससिंदूर मात्रा द्यावी. अडुळशाचीं पिकलेलीं पानें गरम करून त्याचा रस काढून तो रस व आल्याचा रस एकत्र करून त्यांत थोडा तुळशीचा रस घालून व मध घालून ज्येष्ठीमध उगाळून द्यावें.

---

# स्त्रीरोग.

## प्रदर.

प्रदराचें कारण व लक्षण. विरुद्ध आहार करणें, तेलकट, निरवद, आंबट, खाणें, मद्याचें अतिसेवन, अजीर्ण, गर्भपात, अतिमैथुन, अतिव्यायाम, फार भार घेणें, दिवानिद्रा, रात्रीजागरण, संभोगाविषयीं आतुर असतां न मिळणें, गरमी, फार उपवास करणें, अति श्रम त्याच्या योगामुळें त्याचा रुणा लागणें, वांकडें तिकडें आंग करून निजणें, इत्यादि कारणानीं स्त्रियांचा ऋतु व धातु दूषित होऊन स्रवूं लागतात. त्याला प्रदर किंवा धुपणी ह्मणतात. त्याचे प्रकार दोन आहेत. एक रक्तप्रदर आणि दुसरा श्वेतप्रदर ज्यास सोमरोग असें ह्मणतात.

प्रदरावर. अडुळसा, दारुहळद, चिराईत, बिबवा, नागरमोथे, रसांजन, बाळबेल, यांचा काढा मध घालून द्यावा. उंदरांच्या लेंड्यांचें तीन मासे चूर्ण गाईचे दुधांत कालवून देणें. खडशेरणीच्या पाल्याचें चूर्ण तुपांत द्यावें ह्मणजे शूळ युक्त प्रदर बंद होतो. खडीसाखर व जिरें यांचें चूर्ण करून तें तांदळांच्या धुवणांत द्यावें. पांढऱ्या जास्वंदीच्या कळ्या तुपांत तळून द्याव्या.

दर्भाचें मूळ तांदळांचे धुवणांत वाटून देणें. तांबड्याविटकरीचें चूर्ण मेणांत खलून देणें. कांटेसांव्रीचे सालीचें चूर्ण दुधांत द्यावें. कथल्यागोंद रात्रीं पाण्यांत भिजत घालून दुसरेदिवशीं प्रातःकाळीं शर्करा घालून देणें. पथ्य दहींभात. याप्रमाणें तीन दिवस औषध घेतलें असतां कसाही रक्तस्राव होत असला तरी बंद होईल. बाभळीच्या शेंगा, बाळ आंबे, कांटेसाव्रीची साल, आणि गोंधणीचे बियांचें चूर्ण करून दुधांत १४रोज देणें पथ्य अळवणी हा योग मोठा अनुभवीक आहे.

सोमरोग ह्मणजे पांढरी धुपणी तिजवर. पिकलेलें केळें, आंवळ्यांचा रस व साखर हीं एकत्र करून द्यावें. उडदांचें पीठ, ज्येष्ठीमधाचें चूर्ण, भुयकोहळ्याचें चूर्ण हीं मध, साखर आणि गाईचें दूध एकत्र करून त्यांत द्यावीं. तांदुळजाचें मूळ व रसांजन तांदळांचें धुवण व मध यांत द्यावीं. पिंपळाचें बीं आणि हरणाचें शिंग ताकांत उगाळून मधमिश्रित करून द्यावीं. घायपात (ज्यास पांढरी हरताळ ह्मणतात.) त्याचें भस्म करून तीनमासे पाण्यांत घालावें पाण्याचा रंग दुधासारिखा झाला ह्मणजे घ्यावें. आणि त्याच प्रमाणें योनिप्रक्षालन करावें. (हें औषध मूत्रकृच्छ्रावर ही योजावें. गोपीचंदन तोळा१ तुरटी तीनमासे एकत्र खलून त्याला गजपूट द्यावें. तें गुंजाप्रमाण साखरेशीं घ्यावें. दिवस ७ पथ्य अळवणी. कांटेसांव्रीच्या काढ्याचें चूर्ण साखरेंत द्यावें.

योनिरोगाचीं[1] साधारण लक्षणें. योनीमध्यें सुया टोंचल्या सारिखी पीडा, मुंग्यालागल्या सारिखें होतें, ताठपणा, फेनयुक्त असून काळें थोडें असें आर्तव वाहतें, आडसंधि व बरगड्या, यांचे ठाई पीडा हीं लक्ष-

---

१ दुष्टभोजन, अतिमैथुन, दुष्टार्तव, बीजदोष आणि दैव इत्यादि कारणावरून वीस प्रकारचे योनिरोग होतात ते.

गें होतात. वरची लक्षणें असून अति मैथुनानें योनी सुजलेली असतां तिला अतिचरणा ह्मणतात. अति लहान स्त्रीशीं मैथुन केलें असतां तिची पाठ, मांड्या, तंगड्या आणि आड संधि यांच्या ठाईं पीडा होऊनजी योनी दुष्ट होते तिला प्राकूचरणा असें ह्मणतात. मलमूत्रादिकांची बलानें प्रवृत्ति केली असतां वायु दुष्ट होऊन योनीला पीडा करून फेस युक्त रज कष्टानें सोडितो त्या व्याधीला उदावृत्ता असे ह्मणतात. जेव्हां वायु दुष्टार्तवोत्पन्न पुत्राचा नाश करितो. तेव्हां जात घ्नी असें ह्मणतात. अति भोजन करून सुरत काळीं वेडे वांकडे अवयव करून निजणाऱ्या स्त्रीचा वायु अन्नानें ऊर्ध्व पीडित होऊन योनि द्वारांत राहातो आणि वांकडे पीडा युक्त करितो तिला अंतर्मुखी ह्मणावें. वातल आहार सेवन करणाऱ्या मातेच्या ठाईं वायु कुपित होऊन तिलाजी कन्या होते तिच्या योनीचें द्वार फार बारीक होतें तिला सुची मुखी ह्मणतात. ऋतुकाळीं वेग रोध केल्यानें वायु दुष्ट होऊन मलमूत्राचा सांडा करून योनीचा शोष करितो तिला फार वेदना होते तिला शुष्का ह्मणावें. ज्या स्त्रीच्या गर्भाशया पासून साहा किंवा सात दिवसांनीं वायु शुक्र सोडितो व पीडा करितो तिला वामिनी ह्मणतात. स्त्रीगर्भाचे ठाईं बीज दोषानें योनी वातपीडित झाली असतां स्त्री पुरुष संगाचा द्वेष करिते व जिला स्तन नसतात ही षंढा ह्मणावी. वायु दुष्ट होऊन योनी मुख आणि गर्भ कोष्ठ यांचा स्तंभ करून वांकडी स्थानच्युत मांस वर आलेली व अति पीडा युक्त योनी करितो. तिला महा योनी ह्मणतात. स्वदूषणांनीं पित्त दुष्ट होऊन योनीमत जाऊन दाह, पाक, मोहऱ्या लाविल्या सारखी पीडा, दुर्गंध, आणि ज्वर ईहीं करून योनी युक्त होते. अत्यंत कढत, दुर्गंध युक्त, निळें, पिंवळें, काळें, असें आर्तव होतें ती पैत्तिकी पीडा जाणावी. रक्ताचा स्राव फार झाला ह्मणजे रक्त योनी ह्मणावें अभिष्यंदि पदार्थांनीं कफ कुपित होऊन योनी थंड, कंडुयुक्त, बुळबुळीत

आणि स्रावयुक्त करितो तिलाश्लेष्मिकी पीडा ह्मणावें. वातपित्त दुष्ट झा-
ल्यामुळें आर्तव क्षीण होतें, आणि योनिदाह, विवर्णता, कृशता, ह्यांनीं यु-
क्त होते. तिला लोहितक्षया ह्मणतात. पित्तल योनीला पुरुषसंग झाला अ-
सतां पित्तवायूनें योनि दुष्ट होते, सुजते, हात लाववत नाहीं. निळें, पिंवळें
रक्त वाहतें, कंबर आडसंधी, दुखतात आणि ज्वर येतो. तिला परिप्लुता-
ह्मणावें. वातकफरोगानें व्याप्त, पांढरें आणि बुळबुळीत रक्त वाहणारी.
तिला उपप्लुताह्मणतात. मैथुनानंतर योनिप्रक्षालन न केल्यामुळें किडे प-
डून कंडू सुटते आणि कंडू सुटल्यामुळें मैथुनेच्छा फार होते तिला विप्लुता
ह्मणतात. अकाळीं रक्त वाहण्यानें कफ, रक्त, दुष्ट होऊन वायू कुपित होतो.
तो योनीमध्यें कर्णिका उत्पन्न करितो तिणें करून रजोमार्ग बंद होतो ति-
ला कर्णिनी ह्मणावें. वात, पित्त, कफ, योनि व गर्भाशय यांमध्यें राहून आपआ-
पले उपद्रव करितात. ती सन्निपातिनी ह्मणावें. याप्रमाणें जे योनिरोग हो-
तात त्यांमुळें योनीमध्यें शुक्र ठरत नाहीं आणि शुक्र न धरल्यामुळें गर्भ-
धारण न होतां, प्रदर, योनिकंद, गुल्म इत्यादि भयंकर रोग उत्पन्न होतात.

**योनिरोगांवर.** योनिरोग बहुधा वायूपासून होतात. ह्मणून त्यांवर
स्निग्ध व स्वेदन करावें ह्मणजे शेकावें. स्थानभ्रष्ट झाली असल्यास ठिका-
णीं सारखी बसवावी. शिवणमूळ, त्रिफळा, मनुका, कांसवद्याचें मूळ, आं-
बेहळद, हळद, गुळवेल, कोरांटयाचें मूळ, शतावरी, पुनर्नवा, फालसें हीं
औषधें तोळा तोळा घेऊन सर्वांचे सोळापट पाणी घालावें अष्टमांश उर-
वून त्यांत शेरभर तूप घालून घृत सिद्ध करावें. तें नित्य भक्षिलें असतां
योनिसंबंधी सर्व वातविकार दूर होतात. आणि गर्भ राहातो. शतावरीचें
ओलें मूळ १०० पळें कुटून रस काढावा त्याच्या भारंभार दूध घालावें. तूपचा-
रशेर, जीवनीयगण, द्राक्षें चारोळ्या, चिकणा, सहदेवी, ज्येष्ठीमध, हीं
तोळा तोळा घेऊन कुटून त्यांत घालावीं आणि घृत सिद्ध करावें. थंड झा-

त्यावर मध आणि पिंपळी आठाठ पळें टाकावी आणि साखर १० पळें घालून दररोज तोळाभर तें नूप खावें. ह्मणजे रक्तदोष, योनिदोष आणि शुक्रदोष हे दोष दूर होतात. धातुवृद्धि व गर्भधारण होतें.

**फलघृत, सर्व योनिरोगांवर.** मंजिष्ठ, कोष्ठ, तगर, त्रिफळा, साखर, येरंड, आंबेहळद, खातीहळद, ज्येष्ठमध, मेदालकडी, ओवा, कुटकी, शतावरी, हिंग, काकळी, आसकंद, भुईकोहळे, ही औषधें तोळातोळा घेऊन कुटावीं ८ शेर पाणी घालून काढा करून शेरभर उरवावा. त्यांत ४ शेर दूध व शेरभर गाईचें तूप घालून घृत तयार करावें. हें घृत सर्व योनिदोषांवर प्रशस्त आहे, आयुष्य वाढविणारें, पौष्टिक, बुद्धिप्रद आणि गर्भाधानास परम उत्कृष्ट आहे. हें ऋतुकाळीं प्राशन केलें असतां गर्भ राहातो. मृतवंध्या आणि गर्भिणी यांसही फार प्रशस्त आहे.

**योनिकंदावर.** उंदराचें मांस तेलांत तळून त्यांत फडकें भिजवून तो बोळा योनींत धरावयास द्यावा व अर्शप्रकरणोक्त क्रिया करावी.

## संतति होण्याचा उपाय.

कोणी एका सिद्धानें लोकोपकारार्थ हा उपाय सांगितला आहे. स्त्रियांना संतति प्रतिबंधक सात प्रकारच्या खोडी असतात. त्या येणेप्रमाणें.

१ फूल फिरतें त्यायोगानें त्यांत बिंदु पडत नाहीं ह्मणून गर्भ धरीत नाहीं.

२ फुलांत वायु असतो तो गर्भ ठरूं देत नाहीं.

३ फुलावर मांस वाढतें ह्मणून बिंदु जाण्यास वाट नाहीं.

४ फुलावर कृमी पडतो तो बिंदु खाऊन जातो.

५ फुलावर जाळें चढलें ह्मणजे बिंदूचें रक्त होतें.

---

१ योनींत मोड येतात त्यावर.

६ फुलावर शितळाई असली तर बिंदूचें पाणी होतें.
७ पैशाचिक पीडेनें बिंदु नाहींसा होतो.

## वरीलखोडी जाणण्याचा प्रकार.

ऋतू काळीं संभोग केल्यावर स्त्रीचे शरीरांत कशी भावना होते तें स्त्रीस विचारावें व त्यावरून कोणती खोड आहे तें पाहावें.

१ स्त्रीच्या सर्वसंधी दुखत असल्यातर फूल फिरलें आहे असें जाणावें.
२ अंग भोंवत असलें तर फुलांत वायु आहे असें समजावें.
३ मान दुखत असली तर फुलांत मांस चढलें आहे असें जाणावें.
४ पोठऱ्या दुखत असल्यातर फुलावर कृमि पडले असें जाणावें.
५ मांड्या दुखत असल्यातर फुलावर जाळें धरलें असें समजावें.
६ ऊर दुखत असला तर फुलांत थंडी आहे असें जाणावें.
७ कांहींच दुखत नसल्यास पैशाचिकपीडा आहे असें जाणावें.

## त्याप्रत्येकखोडीवरउपाय.

१ फूल फिरलें असलें तर. सरड्यांचा मगज, कोंबड्याचे पित्तांत खलून कापूस भिजवावा. तो योनींत धरून वर पुरुषानें रमावें याप्रमाणें तीन ऋतूपर्यंत तीन तीन दिवस करावें ह्मणजे पुत्र संतान होईल.

२ फुलांत वायू असल्यास. द्दीपद्राक्षें तोळे २ तिळेलांत खलून कापूसभिजवून योनींत धरून वरचे प्रमाणें करावें.

३ कृमी पडलातर. साबणाचे पाण्यांत सज्जिखार, हिरडा, आणि बेहेडा कुटून वस्त्रगाळ करून टांकावा आणि बारीक खल करून त्यांत फडकें भिजवून योनींत थोडा धरायास द्यावा. नंतर संग करावा.

४ फुलावर मांस वाढलें असलें तर. जिरें, हत्तीच्या मागल्या पायांचीं नखें कुटून तुपांत तळावीं आणि त्यांत कापूस भिजवून योनींत ठेवावा. बाकी वरचे प्रमाणें करावें.

५ फुलावर जाळें चढलें असल्यास, गुळ, बाळ अंबा, आणि आलें हीं तीन्हीं समभाग घेऊन कुटावीं, आणि फडक्यास लावून तें योनींत ठेवावें. किंवा धायटीचें फूल तेलांत खलून त्यांत कापूस भिजवून तो योनींत धरावा. नंतर संभोग करावा.

६ फुलावर शीतळाई असल्यास. कोष्ठकोळिंजन, शाहाजिरें, जायफळ, जायफळाचें फूल, हीं औषधें वस्त्रगाळ करून तिळांचें तेलांत तळावीं त्यांत कापूस भिजवून योनींत धरावा.

७ पैशाचिक पीडा असल्यास. कुंकू, केशर, आणि कस्तुरी पाण्यांत खलून त्या गंधानें खालीं लिहितों तो मंत्र कागदावर लिहून कातड्याचे ताइतांत घालून ऊद दाखवून स्त्रीचे वामहस्तास बांधावा. तो मंत्र येणेंप्रमाणें.

" अल्लाहेमयाजालअशिलाकरिमवलकलंकदीनबलकिबेरियालियाहयालिसदहियाबंदीइशीअब्वेहे रहिमान्यारहिमानायाभसदेयाफरिद्याबिचित्रायारबिलालहीलाहियाकरिमायादीरहिमानभीयारहिमान् "

स्त्री अस्पर्शा झाली ह्मणजे पोटळी करून योनींत धरावयास द्यावी. तीन दिवस तीन पोटळ्या द्याव्या. चौथे दिवशीं पोटळी न ठेवितां सायंकाळ पावेतों उपोषित राहून रात्रौ दूधभात खावा. संगझाल्यावर पुरुषानें स्त्रीच्या ओंटीवर थंड पाणी शिंपडावें तिला हींव वाजल्या सारिखें झालें ह्मणजे समजावें कीं, गर्भ राहिला. याप्रमाणें ऋतुकाळ आहे तोंपर्यंत करावें. पोटळी ही असूं द्यावी. आणि संभोग होई तोंपावेतों असावा. आणि पाणी शिंपडीत जावें जे दिवशीं थंडी वाजून येईल ते दिवशीं कार्य झालें ह्मणून समजावें. एके पाळीस न झालें तर तीन चार पाळ्या पर्यंत सदहू क्रम चालवावा. ह्मणजे ईश्वर कृपा करील पोटळी सोराष्ट्रीची करावी

**गर्भवृद्धीवर.** एरंडमूळाचा काढा करून त्यांत खडीसाखर घालून १४ दिवस देणें नंतर गाईचे तुपांत मासाभर केशर खलून सात किंवा १४ दिवस द्यावें. व मैथुनवर्ज्य

**गर्भिणीसरक्तस्त्रावहोतोत्यास.** गर्भिणीला वर्ज्य जे आहारादिक सांगीतले-आहेत त्यांचें सेवन झाल्यामुळें अथवा कांहीं रोगामुळें रक्तप्रवाह होत असला तर त्यावरउपाय. आंत बाहेरस्निग्ध व शीत चिकित्सा करावी. वाळा, कमळ, रक्तचंदन, क्षीरीवृक्षांच्या साली हीं ओषधें पाण्यांत वाटून तूप घालून त्यांत फटकी भिजवून योनींत ठेवावी आणि ओटीवरही ठेवावी. शतधौत घृत अंगास चोळावें. खडीसाखर, मध, नीलकमळ, रक्तकमळ, नागकेंशर, यांचा काढा करून त्यांत तूप व मध घालून पाजावें. शिंगाडे, कचरा, यांची लापशी द्यावी. गहुलाकमळकंद, कोंवळीं उंबरें, हीं दुधांत शिजवून तें दूध प्यावें. मध, साखर तोंडीं लावून तांबड्यासाळींचा भात खावा.

**गर्भपातझालाअसतां.** गर्भकोष्ठ शुद्धी करितां व पीडेचा विसर होण्यासाठीं तीक्ष्ण मद्य सामर्थ्यानुरूप पाजावें. मद्य पिण्यास योग्य नसेल तर लघुपंच मूळांचा काढ्यांत शिजवलेली पेज तूप घातल्या खेरीज द्यावी.

१ पहिल्या महिन्यांत गर्भ स्त्रवत असला तर. ज्येष्ठिमध, सागाचें बीं, भुयकोंहळे, देवदार, यांचें चूर्ण दुधांत द्यावें.

२ दुसऱ्यामहिन्यांत गर्भ स्त्रवत असला तर. आपट्याचीसाल, काळे तीळ, मंजिष्ट, शतावरी, त्यांचें चूर्ण दुधांत द्यावें.

३ तिसऱ्यामहिन्यांत गर्भ स्त्रवत असलातर, गुळवेल, भुई कोंहोळा, गहुला, उपळसरी, यांचें चूर्ण दुधांत देणें.

४थ्या महिन्यांत गर्भ स्त्राव. धमासा, उपळसरी, रास्ना, पद्मकाष्ठ, ज्येष्ठमध, यांचें चूर्ण करून दुधांत द्यावें.

५ व्या महिन्यांत गर्भ स्त्रा० डोरली, रिंगणीं, शिवणमूळ, वड, पिंपळी, उंबर, इत्यादि क्षीरी वृक्षांच्या पारंब्या आणि साल यांचा काढा किंवा चूर्ण करून घृत युक्त करून द्यावें व वरून प्यावें.

६ सहाव्या महिन्यांत गर्भस्त्रा० पिठवण, चिकणा मूळ, शेवग्याची साल, गोखरू

ज्येष्ठमध, त्यांचें चूर्ण दुधांत द्यावें. किंवा काढा करून द्यावा. वर दूध प्यावें.

७ व्या महिन्यांत गर्भस्रा॰ शिंगाडे, कमळांच्या देंटांतले पांढरे तंतु, मनुका, कसेरा, आणि ज्येष्ठीमध, यांचें चूर्ण करून दूध व खडीसाखर घालून लापशी करून द्यावी.

८ आठव्या महिन्यांत गर्भस्रा॰ कवठ, बाळबेल, डोरलीमूळ, कडूपडवळ, ऊंस, भारंगमूळ, त्यांचें पाणी व चतुर्थांश दूध घालून काढा करून दूध उरलें म्हणजे प्यावें.

९ नव्या महिन्यांत गर्भस्रा॰ उपळसरी, धमासा, भुयकोंहळा, (त्यांतून दूध निघतें) किंवा कावळी, आणि ज्येष्ठीमध, त्यांचाही दूध व पाणी घालून क्षीरपाकविधीनें काढा करून दूध प्यावें.

१० दहाव्या महिन्यांत गर्भस्रा॰ नुसत्या कावळीच्या रसांत किंवा काढ्यांत दूध शिजवून पाजावें. अथवा ज्येष्ठीमध, सुंठ, देवदार, त्यांच्या काढ्यांत दूध शिजवून द्यावें.

---

## गर्भधारणास.

श्रीगंध, कृष्णागरू, केशर त्यांचें चूर्ण मासाभर, गाईचें दूध पावशेर, जास्वंदीच्या फुलांचा रस तीन मासे, कंकोळ दोन मासे एकत्र करून द्यावी. पथ्य मधुर आहार. हें औषध देण्याचे पूर्वी आंगांतून इतर व्याधी काढून टाकावे. त्याचा उपाय. हरताळभस्म ७ दिवस तुपांत द्यावें. शिवलिंगीचें फळ चौथे दिवशीं गिळावें. नागकेशराचें चूर्ण दुधांत द्यावें.

**गर्भधारणोपाय.** १ केळ १ कापूर तोळा १ वंशलोचन तो॰ ही औषधें केळीच्या पानांत गुंडाळून आधले दिवशीं संध्याकाळीं तुळशीचे झाडाखालीं पुरून ठेवावीं, दुसरे दिवशीं सकाळीं काढून चौथे दिवसापासून तीन रोज भक्षावीं. आणि संभोग करावा, म्हणजे गर्भ राहील.

**गर्भधारणयोग अनुभविक.** १ जायफळ १ लवंग १ कापूर १ केंशर १ हिंगूळ ५ रुद्रवंती त्या औषधांचा दुधांत १ दिवस खल करून गोळी हरभऱ्या एवढी बांधावी. ती चौथे दिवशीं खाऊन वर दूध प्यावें. पथ्य दूधभात या प्रमाणें तीन दिवस करावें आणि प्रत्यहिं संभोग करावा. असें तीन ऋतू पर्यंत केलें असतां वंध्या असली तरी पुत्रिणी होईल.

**योनिशूळावर.** शेंदेलोण १ अफू १ रक्तबोळ १ आंबेहळद १ हीं सदई औषधें कुटून पाण्यांत वाटून गोळी करून ती योनींत धरावी, ह्मणजे योनीशूळ राहातो. कडुवृंदावनीचें मूळ, मेंढीच्या तुपांत किंवा दुधांत उगाळून योनीचे आंत लावावें. वेलाचा पाला अथवा काचरी, काळेंजिरें, अडुळसा, त्रिकटु, एरंडमूळ, हीं औषधें उष्णोदकांत उगाळून पोटांत द्यावीं. व योनींतही लेप करावा. अथवा काळ्याधोत्र्याचीं पानें दोन किंवा तीन बारीक वाटून सेंधव व तूप घालून वस्त्रांत पोटळी करून योनींत धरावी. ऋतुकाळचाही शूळ राहातो.

**ऋतुप्राप्तिहोतनसल्यास.** तिळांचा काढा करून त्यांत गूळ घालून द्यावा. कडुवृंदावनीचें मूळ योनींत ठेविलें असतां रजोदर्शन होतें. कडुवृंदावनीचीं फळें ओण्याबरोबर खावीं. पिंपळाचीं व चिंचेचीसाल पाण्यांत उगाळून खावीं ह्मणजे न्हाण येतें.

**गर्भिणीचे ओकारीवर.** धण्याची पूड व साखर स्वच्छ तांदळांचे धुवणाबरोबर द्यावी. तांदुळज्याचे रसांत प्रवाळ भस्म द्यावें.

**गर्भिणी व बाळंतिणी यांचे रक्तस्त्रावावर.** कोथिंबीर अथवा धणे, नागरमोथे, वाळा, (काळा व पांढरा) लाजाळू, गुळवेल, वावडिंग, पित्तपापडा, धमासा यांचा काढा करून तो थंड झाल्यावर द्यावा. रक्तस्त्राव, ज्वर, अतिसार, यांचा नाश होतो. बोळबद्धरस योजावा.

**वातादिविकारानें स्त्रियांचे नासलेल्या दुग्धावर.** कावळी, भाहाडमूळ

देवदार, किराईत, बडीशोप, कुटकी, गुळवेल, सुंठ, यांचा काढा करून द्यावा.

**बाळंतरोगावर.** दश मुळांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. देवदार, चेरखंड, कोष्ठ, पिंपळी, सुंठ, किराईत, कायफळ, मोथे, कुटकी, धने, हरीतकी, गजपिंपळी, रिंगणी, गोरखरू, धमासा, अतिविष, गरोळ, कांकडशिंगी, शाहाजिरें, यांचा काढा करून त्यांत सैंधव व हिंग घालून द्यावा. याप्रमाणें निकाढाही द्यावा. वैद्यजीवनोक्त अर्कादिकषायही द्यावा.

**सौभाग्यसुंठ.** सुंठ ३२ तूप ८० भाग, दूध २५६ साखर २०० शोपा ४ शाहाजिरें ४ त्रिकटु ४ त्रिसुगंध ४ (तज, तमालपत्र, एलची) ओंवा ४ बडीशेप ४ चवक ४ चित्रकमूळ ४ मोथे ४ यासर्वांचा एकत्र अवलेह करावा. रोज एक किंवा दोन तोळे घ्यावा. ह्मणजे बाळंतरोग, वळीपलित, अग्निमांद्य, आमवात, हेरोग दूर होतात. आणि बळ व कांती हीं उत्तम होतात.

**प्रतापलंकेश्वर.** पारा १ अभ्रक १ गंधक १ चित्रक ३ लोहभस्म ४ शंखभस्म ८ रानशेळीचें भस्म १६ बचनाग १ हीं एकत्र करून माक्याच्या रसांत चांगला खल करून वाल प्रमाण गोळ्या कराव्या. आल्याच्या रसांत अथवा दुसरें अनुपान योजून त्यांत द्याव्या. दांतखिळी, प्रसूतिवायु, व वायुरोग, व श्लेष्मरोग अर्शोरोग, सन्निपात, ज्वर, व सर्व रोग दूर होतात.

**योनिसंकोचह्मोण्यास.** मायफळाचें चूर्ण व तुरटीची लाही हीं एकत्र करून बारीक वस्त्रांत पोटळी बांधून आंत भरावी.

**निर्लोमकरण.** हरताळ १ राळ २ चुना ४ यांत पाणी घालून किंचित् उष्ण करून लेप करावा ह्मणजे केश गळतात. हरताळ १ शंखचूर्ण ५ पळसाचें भस्म १ हीं एकत्र करून चोळावीं.

**स्तनरोगास.** इंद्रवारुणीचें मूळ १ कोरकंडाचें मूळ १ हळद १ यांचा पाण्यांत उगाळून लेप करावा.

**स्तनांत दूधयेण्यास.** भुयकोहळ्याचा रस दूध घालून द्यावा. शतावरी-

चारस दूध घालून द्यावा.

**बाळांचे रोगावर.** पिंपळी, मंजिष्ठ, कांकडशिंगी, नागरमोथे, यांचें चूर्ण मधांत द्यावें. ह्मणजे ज्वर, ओकारी, अतिसार, श्वास, कास, हे रोग दूर होतात. वाळा १ धायटीचीं फुलें, १ बेलकाचरी १ गजपिंपळी. १ यांचें चूर्ण मधांत द्यावें; ह्मणजे अतिसार दूर होतो. एक महिन्याचें मूल होई तोपर्यंत एकेक वावडिंगाचें चूर्ण मधांत द्यावें आणि वर दूध पाजावें. २ दुसरे महिन्यांत दोन वावडिंगांचें चूर्ण द्यावें. याप्रमाणें दरमहिन्यास एकेक वावडिंग वाढवीत जावें. ह्मणजे कधीं च रोग व्हावयाचा नाहीं. भद्रमुस्ता १ हरीतकी १ कडूनिंब १ पडोळ १ ज्येष्ठीमध १ यांचा काढा द्यावा. ह्मणजे सर्वप्रकारचे ज्वर जातील. सुंठ १ अतिविष १ मुस्ता १ वाळा १ इंद्रजव १ यांचा काढा अतिसारावर द्यावा. कडुकीचें चूर्ण मधांत द्यावें. ह्मणजे उचकी राहात्ये. **बालार्क.** कलखापरी १ प्रवाळभस्म, १ मृगशृंगभस्म, हिंगूळ, श्वेतमिरीं, कचोरा, केशर, यांचा पाण्यांत खल करून गोळ्या वालप्रमाण कराव्या. आणि अनुपान योजून गोळी द्यावी. ह्मणजे कृमि व तज्जन्य रोग, व दुसरे रोग दूर होतात. मुलांस ऐनार लागतो त्यास दीपन, पाचन होई असें औषध द्यावें. व आईचें दूध पाजूं नये. नागरमोथे, अतिविष कांकडशिंगी. यांचें चूर्ण मधांत द्यावें. ह्मणजे ओकारी, खोंकला, ताप हे रोग दूर होतात. धायटी, मंजिष्ठ, उपळसरी, लोध्र, यांचा काढा किंवा घरोसा उगाळून ठिकरी विझवून द्यावा. मंजिष्ठ, लोध्र, नागकेशर पिंपळी, वाळा, यांचा घरोसा काढा किंवा चूर्ण मधांत द्यावें. ह्म० अतिसार बंद होतो.

**बाळांचे अतिसारांवर दाळिंबपाक.** जायपत्री ३ मासे, खसखस १ तोळा, वेलदोडे ३ मासे, बडीशेप १ तोळा, अफू १ वाल, जायपत्री व सुंठ १ मासा व पिंपळी अर्धा मासा, या औषधांचें चूर्ण करून हिरवे डाळिंबाचे डोळ्यांत भरून वरून एरंडाचीं ओलीं पानें गुंडाळून कुंफाट्यांत पक्क करून तें डाळिंब त्या औषधांसुद्धां वाटावें. आणि त्याच्या गोळ्या चण्याएव-

ह्या कराव्या. ती गोळी ताकांत अथवा तांदळांचे धुवणांत रोज १ वेळ अथवा सांज सकाळीं द्यावी. मुरडा होऊन आंव पडत्ये त्यावर. बडीशेप, बाळहिरडे, सुंठ, आंवळकाठी, मुरडशेंग, हीं औषधें तुपांत तळून त्यांचें चूर्ण करून तें चूर्ण व इंद्रजवांचें चूर्ण अशीं साखरे बरोबर द्यावीं.

**आगपेणीवर उपचार.** शमीचा पाला गाईचे दह्यांत वाटून लेप करीत जावें. तांदळांच्या कण्या दूर्वांचे रसांत अगदीं बारीक वाटून लेप करीत जावा.

**मस्तकावर पुरूळ येतो त्यावर.** सुकड, मेलागर, हीं गुलाब पाण्यांत उगाळून लेप करावा. गेरू, रक्तचंदन, गुळें भरमाती, यांचा थंड पाण्यांत अथवा गुलाबपाण्यांत वाटून लेप करावा. हा उपचार आगपेणीवरही करावा. गोपीचंदनाचा लेप करावा.

**घामोळें येतें त्यावर.** सुकड, धणे, वाळा यांचा गुलाब पाण्यांत लेप करावा. आंवळकाठी, धणे, वाळा, नागरमोथे यांचा गुलाबपाण्यांत अथवा थंड पाण्यांत लेप करावा. चण्यांचें पीठ थंड पाण्यांत कालवून लावावें. आणि सुकूं द्यावें. मग स्नान करावें. सुवासिक चंदन लेप करावा.

**पुटकुळ्या आल्यावर.** कांहीं ओशट लागल्यानें फोडासारिख्या किंवा गुळमासारिख्या होतात त्यांवर उपचार. पिंपळाची साल व चिटकर एके ठिकाणीं उगाळून लेप करावा. रक्तचंदन, खडी, वाटून गरम करून लेप करीत जावा. रेशाचिनीचें लांकूड पाण्यांत उगाळून लेप करावा.

**भोंवळ येते तिजवर.** खडीसाखर, बेदाणा समभाग घेऊन मोठ्या बोरा एवढ्या गोळ्या करून त्यांत एकेक गोळी लवंग घालून ती गोळी दाढेंत धरावी. भोंवळ आणि ओकारी बंद होते. धमाशाच्या काढ्यांत गाईचें तूप घालून तो पाजावा.

**पोटदुखीवर.** एक निंबू चिरून त्याचे एका फोडीवर डिकेमाली भरून दुसरे फांकीचा रस तिजवर पिळून डिकेमाली भरलेली फांक चिरल्यावर

ठेवून खतखतूं द्यावी मग काढून चोंखावी. ह्मणजे पोट दुखी बंद होते. जठराग्नि प्रदीप्त होतो व कोठा शुद्ध होतो.

**अजीर्णामुळें किंवा दुसरे कुपथ्यामुळें ढाळ होतात त्यांवर उपचार.** एका निंबाच्या दोन फांकी कराव्या. एका फांकीवर शेंदेलोण, संचळ, हीं घालावीं. दुसरे फांकीवर खडीसाखर आणि सुंठ घालावी. मगत्या दोनी फांकी निखाऱ्यांवर निरनिराळ्या खत खतून चांगल्या खतखतल्या ह्मणजे काढून घेऊन अंमळ गरम आहेत तोंच प्रथम शेंदे लोणवाली फांक चोंखून त्यावर सुंठ साखर वाली फांक चोंखावी. इतक्यानें ढाळ बंद होत नाहींत तर सुंठ साखरवाली फांकीवर बाजरी इतका हिंग, आणि तितकीच अफू घालून वर सांगितल्या प्रमाणें करावें. ढाळ बंद होऊन भूकही चांगली लागते. धणे, एलचीदाणे, खडीसाखर, यांचा काढा करून तो घेत जावा. पेपरमींठ १ भाग, कोलम्‌वाटर २ भाग, असीं दोन पैसेभार पाण्यांत घालून द्यावें. चारपैसेभार दहीं घेऊन त्यांत एक पैसाभार खसखस घालून वाटून तें द्यावें.

**बाळांचे रोग.** बहुतकरून मुलांचे प्रकृतीचें मान पाहून तदनुसार व्यवस्था न ठेविल्यामुळें हे रोग जडतात. व त्यांस आणखीही अनेक कारणें आहेत. एकतर त्या अवस्थेंत अतिकाळजीनें संगोपन करावयाचें तें स्त्रियांचे आधीन असतें, आणि अर्भकास तर वाचा इत्यादि निवेदन सामर्थ्य नाहीं हें तर उघडच आहे. तेव्हां रोदनादि कारणा वरून अनुमानानें अभ्यंतर रोग जाणले पाहिजेत. मग प्रथमतः औषधोपाय व्हावयाचा तो तितक्या आस्थेनें सत्वर घडत नाहींत. कारण अज्ञानांध स्त्रियांस बाहेर बाधा दृष्ट पडणें इत्यादिकांवर जसी विशेष श्रद्धा बसून गेली असते तितकी औषधोपायांकडे नाहीं त्यामुळें अत्यावश्यक जो औषधोपाय तो करण्यापूर्वी अंगारे, धुपारे याजविषयींचा उपाय अगोदर पाहातात. इकडे बाल्यावस्थेंत सप्तधातूंचे अति मृदुत्वामुळें व शैथिल्यामुळें व्याधि सत्वर प्रबळ होतो. व आ-

डाणीं वैद्याचे औषधानें विकोपास जातो असेंही घडतें.

दुसरें असें कीं क्वचित् जननी दुग्ध दोष असतो तो ध्यानांत येत नाहीं. क्वचित् श्रीमंतांचे घरांत दाई ठेवितात तिचें दुग्ध त्यास मानत नाहीं. व जसें जननीदुग्ध पथ्यास पडतें तसें दायीचें दूध पथ्यकारक होत नाहीं. मग एका दायीचें मानत नाहीं ह्मणून दुसरी ठेवावी. तिचेंही मानत नाहीं तेव्हां तिसरी ठेवावी असें झाल्यानें मुलाची प्रकृती बिघडल्ये, ती सोयीवर येणें कठीण. यास्तव जननीचेंच दुग्ध असावें. गाढवीचें दुग्ध मुलांस प्रशस्त आहे, कारण गाढवीचें दूध आंगावरचे दुधाप्रमाणेंच पातळ असोन त्यांत क्षारांश विशेष असतो, त्यामुळें ते विकार होत नाहींत. गाईचें दूध पाजणें झाल्यास एकाच गाईचें पाजीत जावें. त्या गाईस पसा दोनपसे वाळंत शेपा आणि कोंवळें मीठ ओंजळभर व तुरीचें फोल हें घालावें. ज्या गाईच्या दुधावर लोणी फार थोडें येतें त्या गाईचें दूध पाजावें.

या दुग्ध दोषामुळें असें होतें कीं, प्रथम पोटांत अतिशय दुखूं लागतें तेणें करून तें मूल अतिशय रडूं लागतें त्याजवर समयीं जर उपाय केला नाहीं तर तेवेंट उत्तरोत्तर अधिक होऊन कष्टसाध्य होतात. व ती पोटदुखीची त्याला सवय लागले. मग तें करून रडवें आहे ह्मणून त्याला अफू देतात. तेणें करून अवष्टंभ होऊन ओकारी व बद्धकोष्ट असे अनेक विकार होतात.

तान्हे मुलास जें गाईचें दूध पाजितात त्याची साय नीटपणें काढली पाहिजे. ह्मणजे असें, एकवेळ खर्पूस तापवून तें खालीं उतरून तसेंच राहूं द्यावें. मग साय चांगली जमली ह्मणजे ती काढून पुनः अमळ तापवून नंतर फिरोन साय येईल ती काढून तसेंच राहूं द्यावें. मग घट्ट फडकें दुहेरी करून त्याजवर गाळून मग तें दूध पाजीत जावें; याप्रमाणें मुळापासून तजवीज ठेविली पाहिजे. रोज रात्रो त्याचे जननीनें निजतेसम-

र्यीं विड्यांत अर्धमूठ बाळंत शोफा खात जाव्या व सकाळीं ही अर्धमूठ खाव्या, ह्मणजे दुग्ध निर्विकार होतें.

लहानपणीं मुलांचा जठराग्नि लघु आणि पातळ अशा पदार्थांचा मात्र पाक करितो. त्यामुळें दुधावरचें सायडें न काढिलें तर पोटांत त्याचें पचन न होतां सायटें आंतड्यांशीं चिकटून राहातें मग त्यावर नवीं पुटें बसोन त्यापासून अनेक रोग होतात. याच प्रमाणें जननीचे खाण्यांत थावडें आलें तर दूध दुर्विकार होऊन विक्रिया जडते.

लहान मुलांची प्रकृती कफप्रधान असते आणि वायूही प्रायः ऊर्ध्वगतिक असतो. आणि जठराग्नीतर वरसांगितलेप्रमाणें असतो, तेणेंकरून प्रायः कफाश्रयाचे रोग विशेष होतात आणि कृमीही होतात.

**पोटांतले रोग.** (ससणी (श्वासिनी) आंकडी, तीन प्रकारचा डबा, कुवल, आणि एक साधारण पोटांतलें असे रोग होतात.

**ससणी.** ह्या रोग वर सांगितले कारणांनीं कफानें जाळें होऊन तें वायूचे नैसर्गिक गतीस अवरोध करितें. तेणें करून तो अवरुद्ध वायु क्षुब्ध होत्साता इतस्ततः सवेग संचार करूं लागतो. तो वायु नर कोणतेही प्रकारें आपला गमन मार्ग खुला करावयास यत्न करीत असतो; परंतु त्याचे त्यास वेग संचारानें पोटांतील आणखी कफांश एकत्र होऊन त्या जाळ्यास येऊन मिळतो, तेणें करून त्या वायूस अधिक अवरोध होऊन त्या ऊर्ध्वगतिक वायूचा जोरानें तें जाळें वर चढतां चढतां काळजास व्यापून पुढें कंठावरोध होतो. या ससणी प्रमाणें अतिसत्वर वर्धिष्णु असा प्राणघातक दुसरा रोग नाहीं.

हा रोग कफसमुद्भूत आहे ह्मणून कित्येक वैद्य या रोगावर उष्णोपचार करितात. त्यायोगें गुण तर क्वचित्, प्रायः अवगुण मात्र होतो. कारण उष्णोपचारानें त्या अतिनाजूक बाळाचें तोंड आंतून होरपळल्यासारिखें होऊन कंठरु

करतो. मग कांहीं औषध पाजिलें असतां तें झोंबतें तेणेंकरून तें बाळक फार व्याकूळ होतें. इतकेंच नाहीं तर कंठाचे गर्ई वात वाहिन्या धमन्या आहेत त्या सुकून चिंबून जातात. छाती सकते व वर सांगितलेले कफ जाळ्याचा पातळपणा कमी होऊन घट्ट होतें तेणेंकरून वायूचे ऊर्ध्वगतीस अधिक अवरोध होऊन रोग प्रबळ होतो.

**ससणीवर.** मोठा हिरडा [redacted]डा, ज्येष्ठीमध, चहाचे पाण्यांत अथवा ऊष्णोदकांत उगाळून त्यांत थोडेसें सेंधव आणि मध घालून तें चाटवीत जावें. प्रकृतीचें तारतम्य पाहून त्यांतच रेवाचिनीचा एकादा वेढा उगाळावा. हिरडा, बेहेडा, आणि कोंहोळ्याची एक बी, हीं एकत्र उगाळून थोडें पाजावें.

डिकेमाली, रेवाचिनी, आणि एळ्या (काळा बोळ) यांचीं उन्हापाण्यांत खरड करून पोटावर घालावी. परंतु बेंबीवर घालूं नये. विड्याचीं पिकलीं पानें यांस एरंडेल लावून तीं कोमट कोमट पोटावर ठेवावीं व तशा पानांनी पोट शेकीत जावें. दारुकराची पुडी देऊन वर दोन बोंडलीं चहा पाजावा. दारुकराची पुडी या रोगावर प्रशस्त आहे.

त्या मुलाचे मुतांत हिरडा, बेहेडा उगाळून त्यांत थोडेसें सेंधव घालून थोडें थोडें पाजीत जावें, गुळांत चण्याचे डाळिंबाहून कमी पापडखार घालून त्यांत थोडेसें आंग दूध घालून पाजावें ओकारी होईल. हें औषध दोन तीन महिन्यांचे मुलास देऊं नये.

**गरळा.** विड्याचीं पानें, सुपारी, कात, आणि चुना, यांचा यथायोग्य विडा करून त्यांत चिमूटभर ओंवा, अर्धी मूठ बाळंतशोपा, व रंगारी हिरडा अर्धा व थोडेसें पादेलोण घालून विडा चांगला चावून सर्वांचें एकरूप होऊन रसाळ झाल्यावर तो रस बोंडल्यांत गाळून दोन तीन बोंडलीं पाजावीं. हा गरळा आठ दाहा दिवसांनीं घालण्याचा हमेशा परिपाठ ठेवावा. म्ह० कफजन्य, वातजन्य, विकार व दुसरे कांहीं विकार होऊं पावत नाहींत

आंकडी. ह्मणजे वतारल्या सारिखें होणें, हारोग ऊष्णापासून वायु क्षुब्ध होऊन एका एकीं त्या ऊष्ण प्रकोपासहित मस्तकांत शिरून सर्वांगअसतां वारल्या सारिखा होतो, तेणें करून हस्तपादाद्यवयव थर थरहोऊन डोळे वारले जातात. इतक्यांत जर तत्काळ मक उपाय न झाला तर तो स्वस्थानीं येण्यास महा कष्ट पडतात. महाराष्ट्र देशांत हा रोग झाला असतां तें मूलवतारतें मगत्यासलोक बाहेर बाधाझाली अशी कल्पना करितात.

या प्रमाणें आंकडीचा प्रादुर्भाव झाला असतां त्याचे डोळे उघडे न ठेवितां हातानें हळूच पापण्या मिटवून ठेवाव्या. जशी डोळ्यांच्या पुढें आंधेरी किंवा मिरगी अथवा चक्कें येऊं लागलीं असतां डोळे मिटून धरल्यानें तिचा जोर कमी पडतो. त्याचप्रमाणें डोळे मिटून धरिले असतां आंकडीचाही जोर कमी होतो. डोळे उघडे ठेविले तर अधिक जोर येतो.

आंकडीवर. तत्क्षणीं पांढरा कांदा नखानें थोडासा चिरडून नाकाशीं धरावा, हळूच हुंगवावा, ह्मणजे तत्क्षणीं आंकडी उतरते. गुलाबजळ काफ्राचे बोळ्यानें टाळूशिवाय सर्व मस्तकास व कानामागें व कपाळावर आणि डोळ्यांवर लावावें, मोगहिरडा थंड पाण्यांत उगाळून हिरड्यांस व जिभेखालीं व थोडासा जिभेलाही लावावा. इतक्यानें उपशमन न होईतर हिरडा व आंवळकठी आणि थोडीशी खडीसाखर अशीं उगाळून अंजन करावें, आणिकांद्याचा उपाय पधून मधून चालू ठेवावा. यारोगाचा शिवाय कांद्या सारखा दुसरा नाहीं. कांद्याचे हुंगण्यानें आंकडी उतरल्यावरही वर सांगितल्या प्रमाणें अंजन करावें व हिरडा उगाळून हिरड्यांस लावावा. कारण या आंकडीचा भरंवसा नाहीं फिरून ही राहून राहून चढते. यास्तव वरसांगितल्याप्रमाणें प्रयोग केला ह्मणजे वारंवार होऊं पावत नाहीं.

ज्या मुलाचे मस्तकांत उष्णता फार असते त्यांस प्राय: आंकडीचा

रोग होतो.

डब्बा. हा रोग दुधाचें सायटें किंवा अशा प्रकारच्या पदार्थांचें सेवन झाल्यानें पोटांत सायत्या सारिखा किंवा वेडक्या सारिखा आकार होऊन आंतड्यांस चिकटून राहातो मग उत्तरोत्तर त्यावर सायच्या सारिखीं पुटें बसून बसून तो वाढत जातो. मग त्याचा आकार डब्या सारिखा जमतो. त्यास खालीं किंवा बाजूस अथवा वर छिद्र असतें तें त्याचें तोंड. त्यांत जो ऊर्ध्वमुख असतो तो साध्य, बाजूस तोंड असतें तो कष्टसाध्य आणि अधोमुख असतो तो बहुधा असाध्य.

हा रोग साहामहिन्याचे उपरांत वयाचे मुलास होतो.

कवळू. ह्मणून रोग आहे तो पोटांत डावे बाजूस खापरखुंटी सारिखा होत असतो तो समय विशेषीं विघळून पसरतो. समयविशेषीं आत्मस्थितीवर ही असतो.

डब्यावर. कडूवृंदावन ह्मशीचे मूत्रांत शिजवून त्यामूत्रास्कद्यां खलावें. मग तें वालभर घेऊन एक गुंजभर पापडखार अथवा संचळयाची पूड आंज बरोबर मधांत द्यावें. अथवा गोमूत्रांत कालवून द्यावें. याप्रमाणें नित्यक्रम चालवावा. सकाळ, सांज, किंवा सकाळीं मात्र द्यावें. गोमूत्रांत साखर आणि मीठ समभाग घालून तें पाजीत जावें. एळिया (काळाबोळ) डिकेमाली एकत्र करून पाजावी. खबुतरांची अथवा पारव्यांची विष्ठा मधांत चाटवावी. तोळाभर पापडखार, एक मोठें वांगें अशीं कल्हईचे भांड्यांत शिजवून त्याचा गोमूत्रांत खल करून त्यांतून दोनवाल घेऊन गुळाचेपाण्यांत पाजीत जावें. रिंगणी आणि डोरली यांचे काढ्यांत तोळाभर पापडखार खलून तें एकेक बोंडलें पाजावें.

बाह्योपचार. बेंबीच्यावर तीन बोटें जागा टाकून तेथें बिबव्याचेंबा-

हुलें काढावें व बेंबीचे दोहों बाजूंस बेंबीपासून दोन तसूंचे अंतरावर दोन फुल्या काढाव्या. तो बिबवा चिडण्यासाठीं केळीचे पानास दिवेल लावून त्याजवर बांधावें, पुढें त्या बिबव्यास मलमाच्या पट्या लावून धा-हातें ठेवावें. वांगें कुंफाट्यांत घालून भाजून काढून त्यांत सज्जीखार घालून तें पोटावर बांधीत जावें.

डब्यावर जे उपचार सांगितले आहेत तेच कवल्वरही योजावे.

**बाळघुटी.** सुरवारी हिरडा, बेहेडा, अतिविष, नागरमोथें, इंद्रजवांचा एक दाणा, वावडिंगांचे तीन दाणे, अक्कलकारा, ज्येष्ठीमध, हीं औषधें अर्धमूठ बडीशोप व चिमुटभर घालून शेप घेऊन अर्धवट कुटून तिचा वस्त्रा करून त्या पाण्यांत उगाळावी. मग त्यांत जोंधळ्या इतकी सैंधवाची पूड घालून थम घ घालून तें बोंडलेंभर पाजावें. या प्रमाणें मूल एक महिन्याचें झाल्यावर नित्य क्रम चालवावा. या औषधांत सर्वांपेक्षां हिरडा जास्त उगाळावा. त्याचे खालोखाल ज्येष्ठीमध. शरदृतु आणि वसंतऋतु यांत वर सांगितलेले पाण्यांत उगाळलेली घुटी मानत नसल्यास गुळकंदाचे पाण्यांत उगाळावी. मूल साहामहिन्याचें झाल्यावर घुटी दोन अडीच बोंडलीं पावेतों वाढवावी आणि सैंधव चण्याचे डाळिंबा इतकें घालावें.

याप्रमाणें नित्य क्रम चालत असतांही जर ताप आला तर याच घुटींत कांडे चिराईत उगाळावें आणि रात्रीं निजतांना बडीशेपेच्या काढ्यांत खडीसाखर घालून पाजावी. खोकला झाल्यास त्याच घुटींत बदामाचें सालपट काढून तो उगाळावा. सुका खोकला असल्यास ज्येष्ठीमध, बदाम अधिक उगाळून दुसरीं कमीं उगाळावीं. पोट दुखूं लागलें तर जोंधळ्या इतकी डिकेमाली उगाळावी. मळशुद्धि साफ होत नसल्यास बाळहिरडा उगाळावा. किंवा बाहव्याची शेंग कुंफाट्यांत घालून तिचा मगज काढून तो मगज थोडासा त्याच घुटींत घालून द्यावी. तितक्यानेंही मळ साफ न होई तर

सोनामुरवीचे पाण्यांत घुटी उगाळावी.

ओकारी लागली तर अक्कलकारा कमी करून सर्वांपेक्षां नागरमोथा अधीक उगाळावा.

फार हंसूं लागलें तर हिरडा, बेहेडा कमी करून जायफळाचे दोन वेढे उगाळावे.

उचकी फार लागलीतर नुसती कुटकी उगाळून चाटवावी. लहानपणीं मुलांस खारीक उगाळून चाटवितात; परंतु तें अगदीं अप्रशस्त.कारण,ते-णेंकरून पोटांत जाळें बांधलें जातें. व कोठ्यांत गरमी होत्ये,त्या योगें का-ळेंकरून रक्त पडूं लागतें व ककाखोकला लागतो.

कृमी व जंत. यांवर उपचार. वावडिंगें दाणे समारें १६ किंवा १७ प्रकर-माणी ओंवा एक चिमूट, इंद्रजव दाणें समारें ६ मोठा हिरडा, बेहेडा, उन्हा पा-ण्यांत उगाळून आंत सैंधव आणि मध घालून पाजावें. एरंडेल उन्हा पा-ण्यांत द्यावें. खाजरें अळूं याचा कांदा जाळून त्याची राख मधांत किंवा पा-ण्यांत द्यावी.

नागर गोटीचीं पानें समारें ७,पळस पापडीच्या बिया दोन,धणे स-मारें १ मासा, वावडिंगें एक मासा, वाकुंभा १ मासा हीं औषधें अर्धवट कुटून रात्रीं पाण्यांत भिजत घालून ठेवावीं. दुसरे दिवशीं सकाळीं कुसकरून तें पा-णी घेऊन आंत खडेसाखरेची पूड घालून द्यावें. कापूर गुळांत द्यावा. ध-ण्याचे पाण्यांत सताप्याचे पाल्याचे रसाचे चार साहा थेंब घालून द्यावें.

लहान मुलांस. पोटांत रोग होतो त्याचें कारण आईचें कुपथ्यानें दूध नासलें जातें हें मुख्य कारण आहे. वर वर दूध घालतात तें चांगलें तापवून थंड झाल्यावर त्याचें सायदें काढलें न काढलें व घुटी देण्याची हयगय हो-ते त्यामुळें पोटांतले रोग अनेक प्रकारचे होतात.

लहानमुलांचेपोटांतल्येरोगांवर. औषधें. कशीयर. ससाचें रक्त किं-

वा त्या रक्तावें फडकें कुंवळून पाजावें. डबा होतो त्यावर. कडू वृंदावनीचें फळ, ह्मशीचे मूत्रांत उगाळून तें थोडेसें पाजावें. उडतें होतें त्यावर व ससणी वगैरे दुसरे अनेक रोगांवर: गोरोचन,व हळद विड्याचे रसांत द्यावी. विड्याबरोबर कडूजिरें खाऊन त्याचा गरळा हळद घालून द्यावा. कारलीचे पाल्याचा रस काढून त्यांत हळद घालून पाजावा. ह्मणजे उलटी व मळशुद्धि होऊन पोट साफ होईल. सतापाचे पाल्याचा रस व बाबीचा रस एकत्र करून मध घालून पाजावा. विड्याचे रसांत सोनचांप्याचे फुलांतली कळी व शुद्ध केलेलासज्जीखार घालून पाजावी. चवधारी निवडुंगाची पानें आणून शेकून त्याचा रस काढावा. त्या रसांत एळ्या (काळा बोळ) हिरडा अथवा रेवाचिनीचा शिरा घालून खतखतून ओढाधरेसा पोटावर लेप करावा. बेंबीवर घालूं नये. गोमूत्र एक दोन वेळा गाळून त्यांत हळद घालून पाजावें व रोगाचें प्राबल्य असल्यास हिरडाही त्यांत उगाळावा. बाफळीची बी विड्याचे रसांत अथवा दुधांत अथवा पाण्यांत उगाळून पाजावी. गुळांत सज्जीखार द्यावा,ह्मणजे पोटांतलीं जळमटें पडून साफ होईल. उत्कृष्ट दारूचे दोन चार थेंब बोंडलेंभर पाण्यांत घालून पाजावे फार ऊष्णोपचार झाल्यानें गळा, छाती, कोरडा पडून मूल जायां होतें. यास्तव शक्ति तारतम्य व रोगाचें तारतम्य पाहून औषध योजावें. घसा व छाती यांला कोरड पडली असल्यास ज्येष्ठीमध व बडीशेप कुटून त्यांचा उकाळा करून त्या पाण्यांत पुनः ज्येष्ठीमध व थोडासा अक्कलकारा उगाळून त्यांत थोडें सेंधव व मध आणि खडीसाखर घालून चाटवावें. गाईचें साजूक तूप, मध, व सेंधव आणि त्यांत आल्याचे रसाचे एक दोन बिंदु अशीं एकत्र करून चाटवावीं; परंतु पोटांतला रोग नसेल तर हें तुपाचें औषध योजावें.

**मदात्यय, पानात्यय.** सुरा व मद्य प्राशन करावयाचा काळ व परिमा-

ण मानः काळीं दंतधावनादि शरीरशुद्धीचीं कर्मेंकरून आपलें सामर्थ्य पाहून चारतो- ळ्यापासून साततोळे पावेतों सुराअथवा मद्य घ्यावें. दोनप्रहरीं स्निग्धपदार्थ गोधूमादि पिष्टान्न व मांस इत्यादिकांसहवर्तमान प्राशन करावें रात्रीचे प्रारंभ समयीं तितकेंच अथवा प्रकृतीला मानेल व अंतःकरण सुस्थितीवर राहील इतकें घ्यावें. याप्रमाणें यथोक्त काळीं व यथोक्त परिमाण नित्य सेवन केलें अ- सतां तें मद्य रसायन रूप होऊन आयुष्याची व शरीराची वृद्धि करितें, बल बुद्धिप्रद होतें. अमृतासारिखें शरीरास हितकारक होतें. यांत अंतर पडूनरी- ती पेक्षां अधिक व अनियमित काळीं सेवन केलें असतां तेंच मद्य विषासा- रिखें दाहादिक उपद्रव करून मदात्यय रोगास उत्पन्न करितें. मदात्यय म्ह- णजे मदें करून प्राणहानि तो मदात्यय रोग बहुत प्रकारचा आहे.

१ सुरा व मद्य यांचे गुणदोष निघंट प्रकाशांत गुणदोष प्रकरणांत मद्य प्रकरणीं लिहिले आहेत. ही सुरा अमृतासारिखी हितकारक आहे. हिचा अनुभव पाहातां सुरा सेवन करणारे हिंदू वगैरे यांजपेक्षां सुरा सेवनकर- णारे प्रत्यंत वासी युरोप खंडाधिस्थ लोक शरीरानें सुदृढ व मेहेनती व दीर्घायू असे आहेत. त्या देशांत सुरा इतकी उपयोगांत घेतली ती सदर्हू तिचे गुणावरून व थंड हवेमुळें असें वाटतें. आतां ती अतिसेवनानें अ- पाय कारक ही गोष्ट स्वतंत्र आहे. अन्नही अतिसेवन केलें असतां अपा- य कारक होतें. ही गोष्ट न्याय संमत आहे. जो आपल्यास जीवायुःपराक्र- मास्पद त्याचा अतिक्रम केला असतां त्यापासून विपरीत फळ कां मिळूं नेयं?

याचप्रमाणें ताडी, माडी, खजुरी, हीं मद्यें सदर्हू प्रमाणें सेविलीं अ- सतां हितकारक आहेत. परंतु प्रायः कैफ करणारे पदार्थांत इतकी वशी करण शक्ति आहे कीं मनुष्यांस ते आपले अगदीं स्वाधीन करून टा- कितात. म्हणून मनुष्यांनीं असल्या पदार्थांविषयीं हितापुरता संबंध ठेवावा.

मदात्ययरोगावर. महाळुंगाचे आंतील केसर व डाळिंबाचे दाणे घावे.

द्राक्षें, आंवळे, खजूर यांचा हिम करून द्यावा. आंवळ्याचे रसांत साखर-घालून त्यांत पारा १ गंधक १ यांची कज्जली घालून द्यावी. निंबू आणि बतासे यांचें सर्बत द्यावें. पिकलेले महाळुंगाचा रस साखर घालून द्यावा. आंवळ्यांचा मुरंबा द्यावा. गुलकंदाचे पाण्यांत थोडासा निंबाचा रस घालून तें द्यावें. धण्याचें पाणी काढून त्यांत खडेसाखरेची पूड घालून आंत प्रवाळ भस्म द्यावें. मध, खजूर, द्राक्षें, आंबसोलें, डाळिंब, व फालसें यांचें सर्बत द्यावें. जुने चिंचेंत साखर घालून तें निंबाचे रसांत द्यावें.

---

## वाजीकरण. कामोद्दीपक.

धातुपुष्टऔषधें. क्षुद्र कोंहळे वाटून तुपांत गोळी करून खावी. वर दूध प्यावें. कवचबी जाचें व तालिमखान्याचें चूर्ण साखरेबरोबर खावें. वर धारोष्ण प्यावें. गोखरू, शतावरी, खिरन्याचें बीज, मुद्रा, अतिबला यांचें चूर्ण रात्रीं दुधांत द्यावें. स्वर्णमाक्षिकादिकचूर्ण. स्वर्णमाक्षिक, रससिंदूर, लोहभस्म, हरीतकीचें चूर्ण, शिलाजित, वावडिंगचूर्ण, हीं औषधें एकत्र खलून घृतांत द्यावीं. आसंधपाक, महाकूष्मांडपाक, गोखरूपाक, सालंमिश्रीपाक, हे द्यावे. मोचरसाचें चूर्ण ॥ तोळा खडीसाखर ४ तोळे गाईचें दूध पक्का पावशेर इतकें एकत्र करून द्यावें. उडदांचा काढा करून त्यांत गाईचें दूध गाईचें तूप, व साखर घालून द्यावें. शतावरी, चिकण्याचें बीज, कवचबीज खिरन्याचेंबीज, गोखरू, तीळ, उडीद यांचें चूर्ण करून आटलेलें गाईचे दुधांत अथवा साखर घालून त्यांत द्यावें. एक किंवा दोन गुंजा शुद्ध केलेली अफू साखरेंत खावी. वर आटलेलें दूध प्यावें. ज्येष्ठीमधीचें चूर्ण मध व तूप घालून प्यावें. वर दूध प्यावें. आंवळकाठी, गोखरू यांचें चूर्ण व गुळवेलीचें सत्व हीं तिन्हीं तूप साखरे बरोबर सेवन करावीं. ह्मणजे वृद्ध असला तरीं अजरामर होतो. भुंई कोंहळ्याचे चूर्णाला अंगरसाच्यासात

भावना देऊन तें चूर्ण तूप व मध यांत घ्यावें. उटकटारी, गोखरू, कवचबीज यांचा दुधांत पाक करून तें सेवन करावें. उटकटारीचें चूर्ण दुधांत घालून पक्व करून त्यांत साखर घालून सेविलें असतां उत्कृष्ट पौरुष येतें. गाईचे तापलेलें दुधांत गाईचें तूप व साखर घालून घेतजावें. यासारिखा पथ्य व तेजोबल वर्धक, पुष्टिकारक प्रयोग दुसरा नाहीं. भांग १ चित्रकमूळ २ कायफळ २ कांकडशिंगी २ चिरफळी २ जायपत्री १ अभ्रकभस्म १ लोहभस्म. सर्वांच्यानिमे गूळ घालून बोराच्या आठळी एवढी गोळी करावी. ती गोळी सायंकाळीं खावी. वर दूध प्यावें. घुटका. लवंग १ जायपत्री १ दालचिनी १ पिंपळी १ अफू १ अक्कलकारा १ समुद्रशोकाचें बीं, आणि सर्वांबरोबर चिनी साखर घालून वाल प्रमाणें गोळी तीन घटिका दिवस उरला ह्मणजे ती घ्यावी. उतार निंबू.

स्तंभनगुटिका. कस्तूरी मासे ६ केशर तोळा १ रूमामस्तकी १ लवंग १ जायफळ १ अक्कलकारा १ जायपत्री १ एलची १ दालचिनी १ चोपचिनी १ कंकोळ १ तेजबळ १ मदनमस्त १ पिंपळमूळ १ उंटी गणबीज १ कवचबीज १ सरांटे १ मुंडी १ मालकांगोणी १ समुद्रफळ १ हिंगूळ १ मोचरस १ इंद्रजव १ शतावरी १ नागरमोथे १ काळीमुसळी १ नागकेशर १ सोनेरी वरख १ रुपेरी वरख १ पिस्त्यांचा मगज. १ तीन वर्षांचा जुना गूळ १ तीन वर्षांची जुनी अफू सर्वांबरोबर घालून गोळी बोरा एवढी करावी. ती दोन वेळा खात जावी. आंबट तेल कट तिखट वर्ज्य. गोळी घेतल्यावर जेवूं नये. हें औषध उत्कृष्ट वीर्यस्तंभक व पौष्टिक आहे. उतार निंबू.

बंदेज. कस्तूरी १ केशर १ जायफळ २ लवंग ४ अफू ४ भांगेचे बूट ४ एकत्र करून गोळी वाल प्रमाणें घ्यावी. चूर्ण. १ तालिमखाना १ मुसळी १ सरांटे १ साखर ४ गाईचे दुधांत ७ दिवस घ्यावें.

वीर्यवृद्धि आणि स्वप्नावस्थेवर चूर्ण. १ सालमिश्री १ सफेतमुसळी.

सरांटे १ तालिमखाना १ चिकण्याचापाला १ मेदिनीचापाला १ सरक्यांचामगज १ मुलतानीमाती १ रोहिषगवताचे गोंडे ९ खडीसाखर घालून दररोज तीन मासे चूर्णपावशेर दुधांत द्यावें. ह्मणजे धातु पुष्ट होऊन स्वप्नावस्था बंद होते.

घुटका. अफीण ३॥ मासे, केंशर ३॥ मासे, मिर्चें ७ मासे, जायफळ ७ मासे, जायपत्री ७ मासे, कस्तुरी १॥। मासे, लवंगा १७॥ मासे एकत्र करून मधांत खलावें. आणि गोळी १॥। वाल प्रमाणें करावी. उतार निंबू.

वाजीकरणावर घृत. पांढऱ्या कणेरीच्या मुळ्या पक्काशेर आणून ठेवाव्या त्यांत आठशेर पाणी घालून काढा करावा. चतुर्थांश उरल्यावर त्यांत दोनशेर ह्मशीचें दूध घालून आटवावें नुसतें दूध उरलें ह्मणजे त्यांत सोमल १ तोळा, जायफळ १ तोळा, जायपत्री १ तोळा, केंशर १ तोळा, लवंग १ समुद्रफळ १ हीं एकत्र वाटून टाकावीं. नंतर तें दूध विरजावें चांगलें चक्कादहीं बनलें ह्मणजे तें रवीनें घुसळून त्यांतील लोणी काढून घ्यावें. तें लोणी कढवून तूप करावें. तें तूप एकाशिशींत भरून ठेवावें. देण्याचाप्रकार. तें तूप एक बिंदू विड्याच्यापानास लावून नुसतें पान खावें. वर त्रयोदश गुण तांबूल खावा. ह्मणजे रतेच्छा फार होईल. पित्तप्रकृतीच्या मनुष्यांस हें अपकार करील. यास्तव प्रकृती पाहून द्यावें. शुद्ध हिंगूळाचा ३ मासे वजनाचा खडा घेऊन खापरावर ठेवावा. त्याच्या भोंवतालीं लवंगांची पाळ लावावी. आणि त्यावर पांढऱ्या कांद्याचा रस क्रमारें पावशेर काढून चरचेवर घालून खालीं विस्तव पेटवून तो रस आटवावा. नंतर तो खडा व लवंगा एकत्र खलून पूड करून ठेवावी. ती अनुपान योजून द्यावी. हा योग कामुक पुरुषांस सिद्ध होतो असा अनुभव आहे.

धातुपुष्ट औषधें. तालीमखाना १ तोळा, एलचीदाणे १ तोळा, व पांढरीं मिर्चें दाणे तीन चार यांची एकत्र पूड करून त्याचे साहा भाग करावे मग पिकलेलें तिधारी केळ्यांत त्या साहा भागांतला एक भाग भरून रात्रो

चांदण्यांत ठेवावें. सकाळीं दंत धावन केल्यावर तें केळें साल काढून खावें. या प्रमाणें दोन तीन मंडळें करावें. धातुस्थानीची गरमीजाऊन धातुपुष्ट होते. व मस्तकांतील गरमी जाऊन डोळ्यांस थंडावा येतो.

इसबगोल २भाग, एलची दाणें १भाग, व खडेसाखर तीन भाग, अशीं रात्रो पाण्यांत भिजत घालून सकाळीं खावीं किंवा याची फकी मारून वर गाईचे दुधाचे एक दोन घोट घ्यावे.

ज्योतिष्मती. खडेसाखर आणि एलची दाणें समभाग घेऊन एकत्र कुटावीं मग चार मासे ती पूड घेऊन चार मासे हिरवें दिवेल अथवा एरंड्याचे आंतला मोक घालून सकाळीं दंतधावन केल्यावर घेतजावें प्रकृतीचें मान पाहून वजन अधिकही वाढवावें. हें औषध सेविलें असतां मस्तकांतील उष्णता जाऊन मगज थंड होऊन डोळ्यांतील ही गरमी जाते. आणि डोळ्यांत तेज येतें.

बदाम १भाग, हिरवे दिवेल अथवा एरंड्यांतील मोक दोन भाग, एलची दाणें १भाग, हीं एकत्र कुटून त्यांत चार भाग खडेसाखर घालून चारभाग गाईचें साजूक तूप अशीं घालून तीं सारीं एकत्र कालवून रात्रों पोर्णिमेचे चांदण्यांत ठेवून सकाळीं आणावें. रोज सकाळीं चारमासे किंवा साहामासे घेतजावें. मस्तकांतील उष्णताजाऊन मस्तकांत मगज येऊन नेत्रांतील सर्व विकार दूर होऊन तेज येतें.

जवांचा एकशेर ओट एकशेर साजूक तूप आणि एकशेर खडेसाखर व तोळाभर पांढरीं मिऱ्यें आणि दोन तोळे एलची दाणे यांची पूड करून हीं सारी ओषधें एकत्र कालवून चांगलीं मळून एक रूप झालीं ह्मणजे कल्हईचे थाळींत थापून पोर्णिमेचे रात्रीं चांदण्यांत ठेवून सकाळीं आणावें. रोजसकाळीं चार किंवा पांच तोळे घेतजावें, वर गाईचे दुधाचा एक घोट घेत जावा.

गव्हांचा एकशेर रवा घेऊन त्यास गाईचे दुधाचा हात देऊन प्रहरभर दडपून ठेवावा. नंतर तुपांत परतावा. व एरंड्यांचा एकशेर मोक घ्यावा. तोही तुपांत परतावा. एकशेर खवा गाईचे दुधाचा तोही तुपांत परतावा. मग तीं सारीं एकत्र कालवावीं, आणित्यांत एलचीदाणे तीन तोळे, पांढरीं मिरें सहामासे, दुध्याभोंपळ्याचे बियांचे मगज पावशेर व बदामाचा मगज पावशेर हीं कुटून त्यांत घालावीं. पुनः सारीं एकत्र कालवून मग खडेसाखरेचा पाक करून त्यांत कालवून कल्हईचे भांड्यांत थापून वड्या पाडाव्या रोजचार किंवा पांच तोळे सकाळीं खात जावें. मस्तकांतील उष्णता जाऊन मस्तकांत मगज येतो. आणि डोळ्यांतील गरमी जाऊन तेज वाढतें. आणि धातू पुष्टहोते. वात आणि पित्त यांची शुद्धी होऊन रक्तवृद्धी होते.

दोन तोळे गाईचें लोणीं, दोन तोळे खडीसाखर, साहामासे एलचीदाणे, साहामासे नागकेशर, हीं सारीं एकत्र कालवून दोन मंडळें पावेतों रोज सकाळीं सेवन करावें.

---

## रसायनें.

### धातूपधातू व रसोपरस व विषोपविषें, व रत्नोपरत्नें, इत्यादिकांची शुद्धि व मारणें.

सप्तधातूंचीशुद्धि. सोनें १ रुपें २ तांबें ३ शिसें ४ कथिल ५ लोह ६ खर्पर ७ ह्मणजे जस्त ७ यांतूनज्या धातूची शुद्धि करावयाची असेल त्याचा रस करावा. अथवा पत्रे करून तापवून लाल करून तेल व ताक व गोमूत्र व कांजी यांत सातवेळा पृथक् पृथक् विझवावें. नंतर शेवटीं कुळिथाचे काढ्यांत व त्रिफळ्याचे काढ्यांत एकेक वेळ विझवावें. अथवा- केळीचे कांद्याचा रस काढून त्यांत सातवेळ विझवावें किंवा रुईचे चिकां-

त तीन वेळ विझवावें. ह्मणजे शुद्धि होते.

सप्तधातूंचें मारण. धातूचे पत्रे करून त्याचे चतुर्थांश मनशीळ व गंधक घेऊन रुईचे चिकांत वाटून पत्र्यास लेप करून शरावांत घालून मातकापड करून गजपूट द्यावें. या प्रमाणें बारा पुटें दिलीं ह्मणजे सर्व धातूंचें भस्म होतें.

दुसरा प्रकार. पत्र्यांचे चतुर्थांश पारा व गंधक यांची कज्जली घेऊन निंबूचे रसांत अथवा कोरकांड्याचे रसांत खल करून पत्र्यांस लेप करून वाळवून शरावांत घालून मातकापड करून गजपूट द्यावें ह्मणजे भस्म होतें.

तिसरा प्रकार. गेरू, सज्जीखार, बीडलोण, रुईचा चीक, नवसागर, कोरकांडें, गुंजा, यांचें चूर्ण व धातूचे पत्रे एकत्र थरोथरी मुशींत घालून ती मूस कोळशांत ठेवून अग्नि द्यावा. ह्मणजे भस्म होतें.

उपधातूंची शुद्धी व मारण. स्वर्णमाक्षिक ह्मणजे सोनामुखी ३ भाग सैंधव १ भाग, यांचें चूर्ण करून लोखंडाचे कढईंत घालून चुलीवर ठेवून खालीं अग्नि लावून जंबीरनिंबाचा रस त्याजवर घालून लोखंडाचे व त्यानें अथवा पळीनें घोटावें, लाल झाल्यावर चूर्ण काढून घ्यावें. ह्मणजे शुद्धि होते, नंतर कुळथाचे काढ्यांत अथवा गोमूत्रांत अथवा तेलांत खलून शरावांत घालून कापड माती करून गजपूट द्यावें ह्मणजे भस्म होतें. याच प्रमाणे सर्व उपधातूंची शुद्धि करावी. रौप्य माक्षिकाचें चूर्ण करून कर्टोली व मेंढशिंगी व जंबीर निंबू यांचे रसांत एकेक दिवस खलकरून उन्हांत तापविलें असतां शुद्ध होतें. नंतर त्याचें मारण सोनामुखी प्रमाणेंच करावें. मोरचुताचे चतुर्थांश पारव्याची विष्ठा व टांकणखार दशांश एकत्र खलून शरावांत घालून मातकापड करून रानशेणीच्या हलका अग्नि द्यावा. नंतर दह्यांत खलून त्याच प्रमाणें अग्नि द्यावा. अथवा मधांत खलू-

न अग्नि द्यावा. ह्मणजे शुद्धि होते.

अभ्रकाचें शोधन व मारण. काळा अभ्रक आणून कोळशांचे विस्त वांत भात्यानें फुंकून लाल करून दुधांत विझवावा. नंतर त्याचे वेगळे वेगळे पत्रे करून तांदुळजाचा रस व निंबाचा रस हे दोनी एकाजागी करून त्यांत ते पत्रे आठ प्रहर पर्यंत भिजत घालावे तेणेंकरून अभ्रक शुद्ध होतो. नंतर त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करून रुईचे चिकांत १ प्रहर पर्यंत खलून त्याची वडी करून त्याचे भोंवतीं रुईचीं पानें गुंडाळून शराव संपुटांत ठेवून कापड माती करून रानशेणींत गजपुट द्यावें. याप्रमाणें रुईचे चिकांत सात गजपुटें द्यावीं. नंतर वडाचे पारंब्याचे रसांत एक दिवस खल करून गजपुट द्यावें. याप्रमाणें तीन पुटें द्यावीं. ह्मणजे भस्म होतें.

दुसरा प्रकार. अभ्रक कुटून त्यांत निमे साळी घालून घट्ट फडक्यांत बांधून पाणी घातलेलें प्याल्यांत ती पुरचुंडी भिजत घालावी. मग चोळतां चोळतां त्या प्याल्यांत अभ्रक पडेल तो धान्याभ्रक घेऊन त्यास चिकणा, नागरमोथा, वडाचा चीक, अथवा पारंब्याचा रस, ओले हळदीचा रस यांत पृथक् पृथक् खल करून निरनिराळें गजपुट द्यावें. ह्मणजे लाल भस्म होतें.

तिसरा प्रकार. अभ्रकाचे समभाग कलमी सोरा गोमूत्रांत वाटून अभ्रकाचे पत्र्यांस लेप करून वाळवून सर्व पत्रे शराव संपुटांत घालून गजपुट द्यावें. ह्मणजे श्वेत भस्म होतें. शत पुटी व सहस्रपुटी अभ्रकाचें भस्म करणें तर कोरफडाचे रसांत खलून शराव संपुटांत घालून मात कापड करून गजपुटें द्यावीं. ह्मणजे रंगदार भस्म होतें.

लोहकीटाची शुद्धि व मारण. शंभर वर्षी पलीकडचें बहुत जुनें कीट घेऊन बेहेड्याचे लांकडांचे कोळशांचा अग्नि करून त्यांत कीट लाल करून बेहेड्याचे काढ्यांत गोमूत्र घालून त्यांत सात वेळा विझवावें नंतर कुटून

चूर्ण करावें मग गोमूत्रांत खलून शराव संपुटांत घालून भातकापड करून रानशेणींत गजपूट द्यावें ह्मणजे भस्म होतें. त्यास मंडूर ह्मणतात. दुसरा प्रकार. शुद्ध केलेल्या किटास त्रिफळेच्या काढ्याचीं पुटें २१ वीस व गोमूत्राचीं पुटें २१ वीस व कुमारी रसाचीं पुटें २१ वीस व पंचामृताचीं पुटें २१ वीस एकूण चौऱ्यायशीं ८४ पुटें दिलीं असतां मंडूर सर्वोत्कृष्ट होतो.

सुरमा व गेरू, हिराकस, टांकणखार, कवडी, शंख, शिंप, तुरटी, व मुरदाडशिंग यांची शुद्धि. सुरम्याचें चूर्ण करून जंबीर निंबाचे रसांत खलून एक दिवस उन्हांत ठेवावें, ह्मणजे सुरमा शुद्ध होतो. याच प्रमाणें गेरू इत्यादिकांची शुद्धि करावी.

मनशीळाचें शोधन. मनशीळाचे बारीक तुकडे करून फडक्यांत बांधून पुरचुंडी करावी. नंतर दोलायंत्रांत शेळीचें मूत घालून खालीं अग्नी लावून पक्क करावा ह्मणजे शुद्ध होतो.

हरताळाचें शोधन. हरताळाचे बारीक बारीक तुकडे करून फडक्यांत पुरचुंडी बांधून दोलायंत्रांत पक्क करावा त्याचा प्रकार. कांजींत १ प्रहर, कोहळ्याचे रसांत १ प्रहर, तिळांचे तेलांत १ प्रहर, व त्रिफळेच्या काढ्यांत १ प्रहर असा चार प्रहर शिजविला असतां शुद्ध होतो. किंवा चुन्याचे पाण्यांत शिजवावा ह्मणजे शुद्ध होतो.

कलखापरीची शुद्धी. कलखापरीचे तुकडे करून घोड्याचे मुतांत एक महिना भिजत घालावे. नित्य नवें मूत घालीत जावें. दुसरा प्रकार. मनुष्याचे मुतांत अथवा गोमूत्रांत सात दिवस भिजत घालावी. नंतर काढून धुवून पाण्यांत शिजवून पुनः धुवून वाळवून चूर्ण करून ठेवावें.

रसशुद्धि ह्मणजे पाऱ्याची शुद्धि. खड्याचा हिंगूळ घेऊन खलांत घालून कुटावा. नंतर निंबाचे रसांत एक प्रहर खलून डमरू यंत्रांत घालून पारा काढावा. तो शुद्ध होतो. दुसरा प्रकार. पारा आणून लसणीचे रसांत

सात दिवस खलावा. नंतर गाळून घ्यावा. तिसरा प्रकार. भुईंत खांच-खणून त्यांत तूस घालून अग्नि करावा. आणि त्याजवर खल ठेऊन त्यांत पारा घालावा. व त्याचे अष्टमांश लवण घालून एक मास पर्यंत खलावा. नंतर धुवून घ्यावा. चवथा प्रकार. पाऱ्याचे चतुर्थांश निंबाच्या रस आंत घालून खलावा. रस आटला ह्मणजे त्रिकटू व मोहऱ्या, लवण, चित्रक, चित्रकमूळ, हिंग यांचे काढ्यांत तीन दिवस खल करून गाळून घ्यावा. ह्म० उत्तम प्रकारचा शुद्ध होतो.

रसभस्म ह्मणजे पाऱ्याचें भस्म. पळींत गंधक घालून पातळ झाला ह्मणजे त्यांत पारा घालून घोंटावा. गंधक जळून गेल्यावर तें भस्म काढून ठेवावें. तें भस्म करावयाचा प्रकार. पाऱ्याचे समभाग गंधक घालून भस्म करावें तें रोगांचा नाश करितें. १, द्विगुणित गंधक घालून करावें तें क्षयरोगांचा नाश करितें. २, त्रिगुणित गंधक घालून करावें तें पौष्टिक होतें. ३, चतुर्गुणित गंधक घालून करावें तें तेज वाढवितें. ४, पंचगुण गंधक घालून करावें तें सिद्धि करितें ५, षड्गुण गंधक घालून करावें तें मृत्यूला जिंकितें ह्मणजे अपमृत्यु दूर करितें. ६

दुसरा मुख्य प्रकार. पाऱ्याचे अष्टमांश किंवा षोडशांश अथवा ३२ सांश आंत सुवर्ण घालून खलून लोण्याप्रमाणें गोळा करावा. आणि वर सांगितल्या प्रमाणें भस्म करावें.

गंधकाचें शोधन. लोखंडाचे कढईंत गंधकाचे समभाग तूप घालून चांगलें तापवून पातळ झालें ह्मणजे त्यांत गंधकाचें चूर्ण घालावें. तो गंधक तुपाबरोबर मिळाला ह्मणजे गाईचे दुधांत ओतावा. ह्मणजे शुद्ध होतो. अथवा दोलायंत्रांत गाईचें दूध गंधकाच्या दसपट घालून खालीं मध्यमाग्नि देऊन गंधक पक्व करावा. तोही उत्तम होतो.

हिंगुळाचें शोधन. हिंगूळ खलांत घालून मेंढीचे दुधाचीं पुटें ७ द्यावीं-

वाचा रसाचीं पुटें ७ अशा चवदा दिवस भावना द्याव्या. ह्मणजे शुद्ध होतो. **शिलाजित.** ग्रीष्मऋतूचे ठाईं पर्वतावर मोठ्या मोठ्या शिला असतात त्या उन्हानें तापतात तेणें करून त्यानां पाझर येऊन त्यांपासून रस गळून जमतो. त्याला शिलाजित ह्मणतात. तें शिलाजित गाईचे दुधांत व त्रिफळेच्या काढ्यांत व माक्याचे रसांत वेगळा वेगळा एकेक दिवस खल करून उन्हांत ठेवून कोरडें करावें, ह्मणजे शुद्ध होतें. शिलाजिताचे आभावीं सोरा घ्यावा. **समुद्रफेण.** निंबाचा रसांत खलकरून वाळवावा. ह्मणजे शुद्ध होतो.

---

**रत्नाचें शोधन व मारण.** हिऱ्याचें शोधन व मारण. व्याघ्रीकंद ह्मणजे गुहेरीकंद आणून वाटून त्यामध्यें हिरा घालून त्याची वस्त्रानें पुरचुंडी बांधून दोला यंत्रांत घालून कुळथांचे काढ्यांत तीन दिवस वेगळा वेगळा शिजवावा. ह्मणजे शुद्ध होतो. नंतर तो हिरा अग्नीमध्यें तापवून २१ वेळा गाढवाचे मुतांत शिजवावा. मग ढेंकुणा बरोबर हरताळ वाटून त्याचा गोळा करून त्यामध्यें तो हिरा घालून तो गोळा मुशींत ठेवून कोळशांमध्यें घालून अग्नि करून भात्यानें फुंकून तापल्यावर त्याजवर घोड्याचें मूत शिंपावें नंतर तो हिरा बाहेर काढून फिरून ढेंकुणामध्यें हरताळ वाटून पहिल्या प्रमाणें कृती करावी. असें सातवेळा केलें ह्मणजे हिऱ्याचें भस्म होतें. दुसरा प्रकार. हिरा, व सेंधव व कुळिथ, या तिहींचा काढा करून त्यांत हिरा तापवून २१ वेळा विझविला असतां भस्म होतें. वैक्रांताचें शोधन व मारण. प्रथम हिऱ्या सारिखें शोधन करावें. नंतर वैक्रांत मणी तापवून घोड्याचे मुतांत १४ वेळा विझवावा. मग मेंढशिंगीचीं पंचांगें आणून कुटून त्यांचा गोळा करून त्यांत तो वैक्रांत घालून मातीचे शराव संपुटांत ठेवून कापड माती करून रानशेणींत गजपूट द्यावें. याप्रमाणें सात वेळ

पुटें दिलीं असतां भस्म होतें. नीळ मणी व माणीक यांचें शोधन हिऱ्याप्रमाणें करावें. सर्व रत्नांचें शोधन व मारण. सूर्यकांत मणी व मोतीं व पोंवळीं यांला दोलायंत्रांत घालून जाईचे रसामध्यें १ प्रहर शिजविलीं असतां त्यांचें शोधन होतें. आतां यांचें मारण. कोरफडाचा रस व तांदुळजाचा रस व स्त्रीचें दूध या तिहीं मध्यें तो मणी व मोतीं व पोंवळीं व तशींच नाना प्रकारचीं रत्नें हीं सारीं तापवून तापवून एकेकांत सातवेळ विझविलीं असतां क्षणांमध्यें साऱ्यांचीं भस्में होतात. दुसरे प्रकारचें मारण. मोत्यांचें व पोंवळ्याचें मारण सोनामुखीचे मारणा प्रमाणें करावें. व हिऱ्याचें शोधन व मारण सांगीतलें आहे त्याप्रमाणें सर्व रत्नांचें करावें. तिसरा प्रकार. रत्न तापवून कुळथाचे काढ्यांत हिंग व सैंधव घालून त्यांत विझवावें. याप्रमाणें सातवेळा करावें ह्मणजे भस्म होतें.

---

विषोपविषांचीशुद्धि. सोमलाची शुद्धि. तांदुळजाचा रस दोलायंत्रांत घालून सोमलाचे बारीक बारीक तुकडे करून पुरचुंडी बांधून शिजवावा, ह्मणजे शुद्ध होतो. बचनागादिक विषांची शुद्धि. बचनागाचे तुकडे करून पुरचुंडी बांधून गोमूत्रांत घालून उन्हांत तीन दिवस ठेवावी. गोमूत्र नित्य नवें घालीत जावें. अथवा गाईचे दुधांत दोलायंत्रांत शिजवावा. ह्मणजे शुद्ध होतो. किंवा गोमूत्रांत शिजवावा.

जेपाळाचे बियांची शुद्धि. जेपाळाचे बियांतील गोळे घेऊन त्यांची फडक्यांत पुरचुंडी बांधून ३ दिवस ह्मशीचे शेणांत पुरून ठेवावी चवथे दिवशीं काढून ऊष्णोदकानें धुवून आंतील मोख काढून बारीक वाटून कोऱ्या मडक्याला लिंपून ठेवावा ह्मणजे निःस्नेह होतो. तो काढून चूर्ण करून ठेवावें. नंतर निंबाचे रसांत पांच सात भावना द्याव्या. ह्मणजे शुद्ध होतो. दुसरा प्रकार. जेपाळाचे गोळे पंचगव्यांत तीन दिवस भिजत घालावे. नंतर मोख

काढून अम्लवर्गांत दाहा दिवस ठेवावे. रस नित्य नवा घालावा. नंतर क्षारवर्गांत तीनदिवस ठेवावे. नंतर कुमारी रसांत तीन दिवस ठेवावे. नंतर गोंवऱ्यांचे राखेचे पाण्यांत ३ तीन दिवस ठेवावे. ह्मणजे दाह, वांती, भ्रांति, इत्यादिक दोष त्याचे दूर होतात. **+कळलावी कंदाची शुद्धि.** ह्याचे तुकडे करून अहोरात्र गोमूत्रांत ठेवावे. ह्मणजे शुद्ध होते. **कुचल्याचे बियांची शुद्धि** ह्यांस किंचित् तूप लावून निर्धूम अंगारावर भाजाव्या. ह्मणजे शुद्धि होते. **गुंजांची शुद्धि.** दोलायंत्रांत कांजी घालून पुरचुंडी बांधून १ एक प्रहर शिजवाव्या. ह्मणजे शुद्ध होतात. **धोत्र्याचे बियांची शुद्धि.** ह्या बिया गोमूत्रांत चार प्रहर भिजत घालून नंतर गोमूत्रांत शिजवाव्या. आणि वरचें सालपट काढून टाकावें. ह्मणजे शुद्ध होतात. **अफूची शुद्धि.** अफूला आल्याचे रसाच्या एकवीस भावना द्याव्या आणि वाळवावी. ह्मणजे शुद्ध होते. **रुई, कण्हेर, निवडुंग, इत्यादिक विषांची शुद्धि.** कळलावी प्रमाणें करावी. **भांगेची शुद्धि.** भांग शिजवावी किंवा कढईंत नुस्तीच भाजावी. आणि मडक्यांत पुरचुंडी बांधून स्वच्छ पाणी निघे तों पर्यंत धुवावी. ह्मणजे शुद्ध होते.

**मिऱ्यांची शुद्धि** मिरें आंबट ताकांत तीन घटिका भिजत घालावीं. नंतर वरचे फोल काढावें ह्मणजे शुद्ध होतात.

**पिंपळीची शुद्धि.** पिंपळीला चित्रकाचे काढ्याची भावना देऊन उन्हांत वाळवावी. ह्मणजे चांगली शुद्ध होते. ती रसायनांत योजावी.

**हिंगाची शुद्धि.** कमळाचे पानाचा रस काढून त्यांत हिंगाचा खडा टांकून प्रहर भर उन्हांत ठेवावा. ह्मणजे रसायनांत घालावयास उपयोगी होतो.

**पाषाणभेदाची शुद्धि.** पाषाण भेद दोला यंत्रानें दुधांत प्रहरभर शिजवावा. ह्मणजे शुद्ध होतो.

---

+ कळलावी ह्मणजे खड्यानाग

एरंडबीजाची शुद्धि. एरंड्यांची पुरचुंडी बांधून नारळाचे पाण्यांत ४ प्रहर पर्यंत दोलायंत्रानें शिजवाव्या.

लसूण शुद्धि. लसणाच्या बिया एक रात्र ताकांत भिजत घालाव्या. ह्मणजे दुर्गंध कमी होऊन शुद्धि होते.

गुग्गूळ शुद्धि. त्रिफळेच्या काढ्यांत गुग्गुळाची पुरचुंडी शिजवावी. ह्मणजे शुद्ध होतो.

---

## धातूपधातु रसोपरस इत्यादिकांचीं भस्में करण्यास पुटें द्यावयाचीं त्यांचा प्रकार.

महापूट. ह्मणजे दोन हात अचरस चवरस लांब रुंद व खोल अशी खांच खणून रान शेणींनीं अर्धी खांच भरून वर कापड माती केलेला शराव अथवा मूस ठेऊन वर दुसऱ्या शेणी घालून पूट द्यावें तें.

गजपूट व माहिष पूट. ह्मणजे दीड हात चवरस खांच खणून वर सांगितल्या प्रमाणें पूट द्यावें.

वराह पूट. ह्मणजे अरत्निमात्र हात प्रमाण चवरस खांच खणून त्यांत पूट द्यावें.

कुक्कुट पूट. ह्मणजे वीतभर चवरस खांच खणून त्यांत पूट द्यावें.

कपोतपूट. ह्मणजे वीतभर खांचेंत सात किंवा आठ शेणी घालून त्यांत पूट द्यावें.

गोंवर पूट. ह्मणजे भुईवर शेणीचा चूर निमे घालून त्याजवर शराव इत्यादि ठेवून वर दुसरा शेणीचा चूर घालून दडपून वर अग्नी द्यावा तें.

ज्यापुटास खांचेचें व गोंवऱ्यांचें प्रमाण नाहीं तेथें मृदु किंवा कठिण द्रव्य असेल तसें पाहून १०० शंभर अथवा ५० किंवा ३० रान शेणींत पूट द्यावें.

**कुंभपूट.** ह्मणजे मातीची घागर घेऊन तीस करांगुळी प्रमाणें चाळी-स पन्नास भोंकें पाडून त्यांत अर्धे कोळसे भरून त्याजवर मातकापड के-लेला शराव अथवा मूस ठेवून त्याजवर दुसरे कोळसे घालून पेटवूनचु-लीवर अथवा इटांवर ठेवावें. त्यांतील अग्नि तिसरेदिवशीं थंड झाल्यावर आंतील औषध काढून घ्यावें. यास कुंभ पूट ह्मणतात.

---

## आतां यंत्रेंकितीवकशींतीं सांगतों.

**डमरूयंत्र.** खालचें मडकें लहान आणि वरचें दुप्पट थोर अशीं दोनम-डकीं आणून त्याचे आंतून व बाहेरून खडूचा किंवा गोपीचंदनाचा चांगला



लेप करून वाळूं द्यावा. नंतर लहान मडक्यांत-सांगितल्या प्रमाणें संस्कारकेलेला हिंगूळ घा-लून त्याजवर मोठें मडकें पालथें घालावें आणि उभयतांचे तोंडाचे संधीस चुना १ भाग व कणी-कदोन भाग एकत्र कालवून लावून घट्ट होई असें करावें. त्यालाडमरूयंत्र असें ह्मणतात. तें यंत्र चुलीवर ठेवून खालीं अग्नि द्यावा. व वरचे मडक्याचे बुडावर ओली फडक्याची घडी घालून तिजवर पाणी घरचेवर घालीतजा-वें. वाळूं देऊं नये ह्मणजे हिंगुळांतील पारा निघून वरचे मडक्याचे तळासजा-ऊन लागतो तोकुंचीनें काढून घ्यावा. याप्रमाणें लहान यंत्र करून कापुराचें फूल काढावें; परंतु खालीं तुपांत भिजलेला कांकडा लावून ठेवावा. ह्मणजे फूल चांगलें निघतें.

**ऊर्ध्वनलिकायंत्र.** एक तपेलें आणून त्यांत द्रव्य घालून त्याचे तोंडा-वर करंड्या सारखें झांकणा मध्यें आंगठ्या एवढें भोंक पाडलेलें असें घट्ट बसवून त्याचे भोंकांत नळी बसवून तें तपेलें चुलीवर ठेवून खालीं अग्नि



द्यावा. आणि त्या नळीच्या तोंडा खालीं एक भांडें ठेवावें ह्मणजे त्या नळी वाटे त्या भांड्यांत अर्क पडतो त्या अर्कावर तेल येतें त्यास अत्तर असें ह्मणतात.

**वालुकायंत्र.** वाटोळी अग्निशिशी आणून तिजवर मातकापडें सात करावीं नंतर रुंद तोंडाचें मातीचें मडकें घेऊन त्याचे बुडास मोठ्या दाभणा एवढें छिद्र पाडावें. आणि जें रसायन करावयाचें असेल त्याची कज्जली



त्या अग्निशिशींत घालून ती कुपी त्या मडक्यांत छिद्रावर सारखीच उभी ठेवून तिचे बुडास पाण्यानें कालविलेली माती अथवा कणीक घट्ट हालेनाशी बसवावी. नंतर शिशीचे भोंवतीं गोडे पाण्यांतील वाळू गळ्या पर्यंत भरावी. आणि मडकें चुलीवर ठेवून जसा अग्नि सांगितला आहे तसा त्या यंत्राचे खालीं द्यावा.

**भूधरयंत्र.** सवाहात चवरस खाडा करून त्याचे मध्यभागीं वीतभर



चवरस अशी लहान खळगी करून त्यांत औषध घातलेलें शराव ठेवून दोन अथवा तीन अंगुळें मातीवर घालून दडपून त्यावर सांगितल्या प्रमाणें गोंवऱ्या घालून अग्नि द्यावा.

**दोलायंत्र.** काढे आदिं करून जीं द्रव्यें सांगेल तीं मोठ्या मडक्यांत घालावीं. आणि जें औषध शोधावयाचें



असेल त्याची पोतडी करून मडक्याचे तोंडावर काडी ठेवून तिला पोतडी

बांधून मडक्यामध्यें त्या द्रव द्रव्यांत किंचित् बुडे अशी लोंबत ठेवावी. आणि अग्नि लावावा, ह्मणजे पोतंडींतलें औषध पक्क होऊन शुद्ध होतें.

**गर्भयंत्र.** अर्क काढावयाचा तर एक भांड्यांत ईंट ठेऊन तिजवर वाटी ठेवावी. आणि भोंवतीं भांड्यांत द्रव्यें घालून त्या भांड्याचे तोंडावर दुसरी घटके सारखी वाटी ठेवावी. आणि माती लावून घट्ट करून त्या वाटींत पाणी घालून यंत्राचे खालीं मंदाग्नि लावावा नंतर खरचे वाटींतलें पाणी कढत झालें ह्मणजे काढून दुसरें पाणी घालीत जावें, याप्रमाणें केलें असतां वरचे वाटीचे बुडास वाफ जमून यंत्रांतले वाटींत अर्क अथवा तेल पडतें.



**पाताल यंत्र.** हातभर रुंद व खोल अशी खांच खणून त्या खांचेंत एक भांडें ठेवावें आणि दुसरे गाडग्यांत पाहिजे तें औषध घालून त्याचे तोंडावर छिद्र पाडलेला शराव ठेवून तें मडकें शरावासुद्धां खांचेंतल्या भांड्यावर पालथें ठेवून चुना व कणीक एकत्र कालवून त्याचा संधीला लेप करून घट्ट करावें. नंतर वरचे मडक्याचे बुडाबरोबर माती भरावी. नंतर मडक्यावर अग्नि करावा. ह्मणजे आंतले औषधाचें तेल निघून शरावाचे छिद्रावाटे खालचे भांड्यांत पडेल.



**तेजोयंत्र. लंबक.** एक तपेलें उभट गळ्याचें घेऊन त्यांत अर्धें भरे तों पर्यंत द्रव्य घालून त्यांत सांगितल्या प्रमाणें पाणी घालून त्याचे तोंडावर दोन नळ्यांचे लंबक ठेवून नंतर त्याचे संधीस कणीक व चुना कालवून लावावा मग चुलीवर ठेवून



खालीं मंदाग्नि लावावा. वरचें लंबकांत पाणी घालावें तें पाणी कढत झालें ह्मणजे वरच्या नळीनें सोडून पुनः दुसरें थंड पाणी घालीत जावें आणि खालचे नळी खालीं मोठे तोंडाचा शिसा ठेवून त्यांत अर्क पडेल तो घ्यावा. यायंत्राला लंबक असें ह्मणतात. कोणी नलिका यंत्र असें ह्मणतात.

## वसंत.

**सुवर्णमालिनी वसंत.** सोन्याचा चूर अथवा वर्ख १ तोळा व मोत्यांचा चूर २ हिंगूळ ३ पांढरीं मिरें ४ कलखापरी ८ तोळे या सर्वांचा एका जागीं खल्व करून त्यांत गाईचें लोणी २॥ तोळे घालून १ रोज खलून नंतर निंबाचा रस घालून ४२ दिवस खललें असतां हा वसंत फार उत्तम होतो. हा १ गुंज अथवा २ गुंजा मध पिंपळींत द्यावा. तेणेंकरून पुष्टि येते. आणि जीर्णज्वर, क्षय, कास, श्वास, शैत्य, गुदामय, वायु, गुल्म, हे रोग दूर होतात; आणि धातुगत ज्वर, रक्तविकार, कृशत्व, बालरोग, वृद्धांचे रोग, गर्भिणीचे रोग सूतिकारोग हेही दूर होतात. पथ्यास दूध व भात.

**लघुमालिनी वसंत.** कलखापरी ०१ पांढरीं मिरें ०॥ यांचा एकत्र खल करून त्यांत गाईचे दुधावरची साय ०८। घालून एक दिवस खलावें. नंतर निंबाचे रसांत ४२ दिवस खलावें नंतर गोळ्या करून ठेवाव्या. ही मात्रा एकवाल मध व पिंपळींत द्यावी. तेणेंकरून जीर्णज्वर, विषमज्वर, रक्तातिसार, प्रदर, नेत्ररोग, पित्तरोग, गलग्रहरोग, हे दूर होतात.

**अश्विनीकुमार.** वचनाग १ मिरीं १ सुंठ १ त्रिफळा ३ पिंपळी मूळ १ पिंपळी १ अभ्रक १ जेपाळाचें बीज १ हरताळ १ टांकणखार १ लवंग १ या औषधांचे चूर्ण करून पारा १ गंधक १ यांची कज्जली मिळवून खलावें नंतर गाईचे ०८॥ दुधांत खलावें. शुष्क झालें ह्मणजे त्यांत ०८॥ गोमूत्र घालून पुनः खलावें. याप्रमाणेंच माक्याचे रसाची भावना द्यावी. नंतर चण्या एवढ्या गोळ्या कराव्या. हें रसायन अनुपान योजून सर्व रोगांवर द्यावें.

**विश्वतापहरण.** बाळहिरडे, पिंपळी, ताम्रभस्म, कुचल्याचें बीं, जेपाळ, कुटकी, तेंड, पारा शोधलेला, गंधक शुद्ध केलेला, हीं समभाग घ्यावीं व प्रथमतः पारा आणि गंधक यांची कज्जली करावी. नंतर त्यांत बाकीचीं औषधें वस्त्रगाळितचूर्ण करून घालावीं आणि धोत्र्याच्या पाल्याच्या रसांत एक दिवस पर्यंत खल करावा. नंतर दोन दोन वाल वजनाच्या गोळ्या बांधाव्या. ती आल्याच्या रसांत नित्य दोन वेळ देत जावी. ह्मणजे नवज्वर दूर होतो. पथ्य मुगांचें कढण व भात.

**शीतारी रस.** ताम्रभस्म, गंधक, टांकण खाराची लाही, बचनाग, मोरचूत, पारदभस्म, कलखापरी, हरताळभस्म, हीं औषधें शुद्ध घेऊन कारल्याच्या पानाच्या रसांत एक घटिका खलावीं नंतर त्याच्या गुंजे प्रमाणें गोळ्या कराव्या. जिरें व खडीसाखर यांबरोबर द्याव्या, ह्मणजे एकाहिकादिक ज्वर शांत होतात. या मात्रेचें नांव शिवानीं शीतारी असें ठेविलें आहे.

**घोडाचोळी रस.** पारा १ बचनाग १ गंधक १ हरताळ १ त्रिकटुचूर्ण ३ त्रिफळा चूर्ण ३ टांकणखार १ जेपाळाचें बीज १ या औषधांचा माक्याच्या रसांत २१ दिवस खल करावा. नंतर २ गुंजा प्रमाणें गोळ्या करून वाळवून ठेवाव्या. त्या अनुपान प्रकरणांतील अनुपान योजून द्याव्या. त्या सर्व रोगांवर चालतात.

**पूर्णप्रतिज्ञा रस.** पारा १ गंधक १ तालक १ मनशीळ १ ताम्र १ हिंगूळ १ कलखापरी ६ ह्यांची कज्जली करून आल्याचा रस आणि निर्गुंडीचा रस यांच्या भावना द्याव्या. मात्रा गुंज प्रमाण चित्रकाच्या काढ्यांत देणें, ह्मणजे अष्टविध ज्वर दूर होतात. सन्निपातज्वर, जीर्णज्वर, शीतज्वर, इत्यादिकांवर अनुपान व रोग पाहून योजावी.

**बृहत्सुवर्णमालिनी वसंत.** सुवर्ण मासे ५ हिंगूळ मासा १ कस्तुरी मासा १ नागभस्म मासा १ कलखापरी मासा १ प्रवाळ भस्म मासे ७ मिरें मासे १६ गोरोचन मासा १ वंगभस्म मासा १ पिंपळी मासा १ सदर्हू औषधें खलून त्यांत लोणी सुमारें तीन मासे घालून ५० निंबाच्या रसाची भावना द्यावी. सुकल्यावर गोळ्या

वाल प्रमाणाच्या बांधाव्या. हें रसायन जीर्णज्वर, रक्त, प्रमेह, पांडु, क्षय, शूल, श्वास, कास, इत्यादि रोगांवर अनुपान योजून द्यावें.

शीतारी दुसरा. मोरचूत ३ भाग, शंखभस्म ५ हरताळ ६ भाग यांचा कोरफडीचा रसांत खल करून शरावांत घालून कुक्कुट पूट द्यावें. त्याची मात्रा गुंजप्रमाण पिठीसाखरे बरोबर देणें. ओकारी झाली तर दूध पाजावें. दूधभात पथ्य, महिनाभर गूळ वर्ज्य.

सन्निपात चिंतामणिरस. पारा १ भाग, गंधक १, अभ्रकभस्म १, ताम्रभस्म १ सुंठ १ मिरें १ पिंपळी १ भाग, भावना त्रिफळेचा काढा आणि द्रोणपुष्पीचा रस, अशा तीन भावना देणें आणि मात्रा गुंजभर, अष्टविधज्वर, शूळ, अजीर्ण हलीमक, इत्यादि रोगांवर अनुपान परत्वें योजावी.

बालसूर्योदयरस. पारा १ भाग, गंधक १ बचनाग १ ताम्र २ लोह २ कपर्दीभस्म ४ अभ्रकभस्म ५ मिरें, भाग दत्यांच्या पाण्यांत खल करून मात्रा बांधावी. ही सन्निपातज्वर, कास, श्वास, वांती, पांडु, प्लीहा, प्रमेह, प्रदर, मूत्रकृच्छ्र, इतक्या रोगांवर प्रशस्त आहे.

कालकूटरस. ११ बचनाग ३ पारा ५ गंधक ६ मनशीळ ४ ताम्र ६ टांकणखार ९ हरताळ ९ चित्रक १२ त्रिकटु १० त्रिफळा १ हिंग १ वेखंड सदहू ओषधांची कज्जली करून भावना देणें झाल्यास आल्याच्या रसाची १ चित्रकाचा काढा १ निंबाचा रस १ लसणीचा रस १ भारंगमूळाचा रस १ रुईच्या मुळांचा रस १ कळलावीचा रस १ धोत्र्याचे मुळांचा रस १ विड्याचे पानांचा रस १ शेवग्याचे सालीचा रस १ पंचकोलाचा काढा आणि पंचमूळांचा काढा सदहू बारा प्रकारचे काढे व रस काढून निरनिराळ्या भावना द्याव्या. गोळ्या गुंजप्रमाण बांधाव्या. अनुपान आल्याचा रस व मध, सर्वज्वरांवर व मोठ्या सन्निपातज्वरावर योजावा. ज्वरांत तांबूल खावा. स्नान करावें, चंदनाची उटी आंगास लावावी. दहींभात खावा. असा या कालकूटाचा पराक्रम आहे.

चंद्रशेखररस. १ पारा १ गंधक १ मिरें १ टांकणखार ४ खडीसाखर भावना मत्स्यपित्ताची गोळी वालप्रमाण अनुपान आल्याचा रस शीतोदक ताक वगैरे वर्ज्य. हा दाहपूर्वक ज्वरावर प्रशस्त आहे.

प्रमदानंदरस. १ पिंपळी १ हिंगूळ १ कपर्दी १ हेमबीज १ जायफळ १ टांकणखार १ बचनाग १ सुंठ, भावना निंबाचा रस १ धोत्र्याचा रस १ आणि भांगेचा रस यांत खल करून गोळी वाल प्रमाण बांधावी. अनुपान परत्वें ज्वर, ग्रहणी, कफ, शूळ, यांवर देणें आणि वाजीकरणही आहे.

वैष्णवीरस. १ हिंगूळ १ कुटकी १ बचनाग १ पेरखंड १ सुंठ १ मिरें १ पिंपळी ह्यांचा चित्रकाचे काढ्यांत खल करून गोळ्या वाटाण्या एवढ्या बांधाव्या ज्वर, शीतज्वर, वायु यांवर मध व आल्याच्या रसांत द्याव्या.

महांज्वरांकुश. १ पारा १ बचनाग ४ सुंठ ४ मिरें ४ पिंपळी ३ धोत्र्याचें बीं १ गंधक, सदहू औषधांचा निंबाचे व आल्याचे रसांत खल करून पूड करावी, मात्रा गुंजभर आल्याचा रस व मध यांत देणें, ह्मणजे ज्वर, विषमज्वर, (एकाहिक द्व्याहिक, त्र्याहिक, आणि चातुर्थिकज्वर) असला तरी तो शांत होतो.

हिंगुळेश्वर. १ पिंपळी १ हिंगूळ १ बचनाग हीं एकत्र करून खल करून ठेवावें मधांत दोन गुंजा देत जावें. ह्मणजे वातज्वर शांत होईल.

शितारी-तिसरा. १ पारा १ टांकणखार १ गंधक २ जेपाळ १ सैंधव १ मिरें १ चिंचेच्या टरफलांची राख १ साखर निंबाच्या रसांत एक दिवस खल करून दोन गुंजा ऊष्णोदकांत देणें ह्मणजे शीतज्वर दूर होतो.

ज्वरराजरस. १ पारा १ सुवर्णमाक्षीक २ मनशीळ ३ गंधक १० मुसळी ५ ताम्र ३ बिबवे या सर्वांचा एकाजागीं खल करून निवडुंगाचे रसांत भिजवून शरावांत ठेवून मुद्रा देऊन चार प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर चांगलें खलावें, चार गुंजा विड्याच्या पानाशीं द्यावें. तेणें करून अष्टविधज्वर शांत होतात. प्रातःकाळीं औषध घेऊन पथ्य ताक भात खावा.

ह्या वरच्या औषधांत १ भाग मोर चूत घालून तयार केलें तर चातुर्थिक ज्वरावर उपयोगी पडतें.

**प्राणेश्वररस.** १ पारा १ गंधक १ अभ्रक १ बचनाग १ मुसळीच्या काढ्यांतरवल करून मात कापड केलेल्या कुपींत घालून मुद्रा द्यावी. तीवाळ्यानंतर पूट द्यावें स्वांग शीत झाल्यावर कुपींतून काढून एकदिवस खलावें नंतर जिरें, चित्रक, हिंग, सज्जी खार, टांकणखार, गुग्गूळ, पंचलवण, धावड्याचाखार, मिरें, पिंपळी हीं सर्व पाऱ्याबरोबर घेऊन त्यांच्या काढ्यानें वेग वेगळाल्या सात भावना द्याव्या. हें औषध पांच गुंजा विड्याचे पानांत तीव्र नवज्वरावर देणें वरऊन पाणी पिणें, सन्निपातज्वर, शीतज्वर, दाहपूर्वज्वर, गुल्मशूळ, यांवर देणें, इच्छेस येईल तें भोजन देणें.

**नवज्वरेभसिंहरस.** पारा, गंधक, लोह, ताम्रभस्म, मिरें, पिंपळी, सुंट, हीं सर्व समभाग व बचनाग अर्धाभाग घालून आल्याचा रसांत दोन दिवस खल करावा, मात्रा दोन गुंजा आल्याच्या रसांत देणें, ह्मणजे महाघोर नवज्वर, संग्रहणी बऱ्या होतात.

**मृतसंजीवनरस.** ४ ताम्र ३ जेपाळ २ टांकणखार १ बचनाग ह्यासर्वांची सूक्ष्म कज्जली करून ठेवावी. ती दोन मासे मात्रा आल्याचे रसांत किंवा त्रिकटु, चित्रक, आणि सैंधव, त्यांशीं द्यावी. कापूर आणि चंदन यांची अंगास उटी द्यावी. ताकभात पथ्य, मैथुन मात्र वर्ज्य. सन्निपातज्वर, विषमज्वर, आमवात, वातशूळ, गुल्म, प्लीहा, जलोदर, शीत पूर्व आणि दाह पूर्व विषमज्वर आणि अग्निमांद्य इत्यादि रोगांवर ही मात्रा योजावी.

**भस्मेश्वर.** रानशेणीचें भस्म तोळे ४ मिरें मासे ९ बचनाग मासे ३ एकत्र चूर्ण करून ठेवावें पांच गुंजा आल्याचे रसांत द्यावें ह्मणजे सन्निपात ज्वराचा नाश होतो.

**संज्ञाप्रबोधप्रधमन.** वेखंड, लसूण, कुटकी, सैंधव, डोरली फल,

रुद्राक्ष, मेण, समुद्र फळ; हीं औषधें समभाग घेऊन रुईच्या चिकांत भावना द्यावी; नंतर मयूर पित्ताच्या तीन भावना देऊन चूर्ण करून ठेवावें. नंतर सन्निपात, कफाधिकवायु, अपस्मार, हलीमक, शिरोरोग, कर्णरोग ह्यांवर हें चूर्ण नाकपुड्यांत फुंकावें ह्मणजे सावध होतो.

त्रिभुवन कीर्तिरस. हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, टांकणखार, पिंपळमूळ, हीं सर्व समभाग, चूर्ण एकत्र करून त्याला तुळशीचा रस, आल्याचा रस, धोत्र्याचा रस, या तीन भावना देऊन एक गुंज प्रमाण गोळी करून आल्याचे रसांतून द्यावीं, ह्मणजे अनेक प्रकारचे ज्वर आणि तेराही सन्निपात यांनां दूर करितें.

संधिगसन्निपातारिरस. पारा १ गंधक २ यांची कज्जली, अभ्रकभस्म, १ मिरीं १ जवखार १ सज्जिखार १ टांकणखार १ शाहाजिरें १ त्रिकटु ३ त्रिफळा ३ सेंधव १ हीं सर्व एकत्र खलून त्याला चित्रकाचे मुळाचे काढ्याची भावना १ दिवस देऊन ५ गुंजा प्रमाणें गोळ्या करून मध व पिंपळी यांत द्यावी. अथवा उष्णोदकांत द्यावी.

मृतसंजीवनीरस. पारा १ गंधक २ यांची कज्जली अभ्रकभस्म १ लोहभस्म १ ताम्रभस्म १ बचनाग १ हरताळ १ कंकुष्ठ १ मनशीळ १ हिंगूळ १ चित्रक १ अतिविष १ त्रिकटु ३ सुवर्णमाक्षीकभस्म १ भांग १ निर्गुंडी १ नांदुरुजा १ या सर्व औषधांचें चूर्ण आल्याच्या रसांत ३ दिवस मर्दन करून नंतर निर्गुंडी व विजया व निंबू व करंजाची साल यांचे रसांत निरनिराळे एकेक दिवस खल करावा. मग कांचेचे कुपींत घालून वालुकायंत्रांत २ प्रहर मध्यमाग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर काढून पुनः आल्याच्या रसांत १ एक दिवस खलून १ गुंज प्रमाण मात्रा द्यावी. शिवाचा स्तव करावा. यास पथ्य दूध भात द्यावा. ह्मणजे अनेक सन्निपात दूर होतो.

त्रिनेत्ररस. पारा १ गंधक १ ताम्रभस्म १ गाईचें दूध ३ एकत्र खलांत

घालून मर्दन करावें. नंतर निर्गुंडीचे रसांत १ दिवस खल करून गोळा करून मुशींत घालून त्यावर कापड माती करून वालुका यंत्रांत घालून ३ तीन प्रहर अग्नि द्यावा. स्वांग शीत झाल्यावर बाहेर काढून त्याचा अष्टमांश बचनागाचें चूर्ण घालून एकत्र खलून ठेवावें. तें दोन गुंजा मात्रा पंचकोलाचे काढ्याबरोबर द्यावी. पथ्य शेळीचें दूध, भात, ह्मणजे रुग्दाह शमतो.

सन्निपातगजांकुश. सान्याचें भस्म १ ताम्रभस्म १ हरताळ १ स्वर्ण माक्षिक १ यांच्यासमान हिंग ४ यांचा आल्याच्या रसांत खल करावा. नंतर वांझ करटोली व कडू पडवळी व निर्गुंडी व रासना व कडूनिंब व चित्रक व धोत्रा, व कळलावी व पहाडमूळ व भांग व जंबीर निंबू यांचा रसांत ३ दिवस खल करून त्यांत सज्जीक्षार १ टांकणखार १ जवखार १ सेंधव १ रक्त्याबोळ १ बचनाग १ ज्येष्ठीमध १ यांचें चूर्ण करून त्यांत मेळवून खलून ठेवावें. ही मात्रा १ एक माष मात्र मधांत अथवा आल्याचे रसांत द्यावी. ह्मणजे चित्तविभ्रम दूर होतो.

सन्निपातविध्वंस रस. पारा १ गंधक १ हरताळ १ स्वर्णमाक्षिक भस्म १ ताम्रभस्म १ अभ्रकभस्म १ रक्त्याबोळ १ बचनाग १ धोत्र्याचें बीं १ वांझकरटोलीचा कंद, १ कडूनिंब १ बकाणानिंब १ कड्यानिंब १ यांची साल, कळलावीचीं मुळें १ हीं सर्व समान घेऊन चूर्ण करून निर्गुंडीचे रसांत व जंबीरनिंबाचे रसांत १ एक दिवस खल करून चण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. १ एक गोळी दशमुळांचे अथवा रुईचे मुळांचे काढ्यांत द्यावी. यास पथ्य दहींभात द्यावा. ह्मणजे कर्णक सन्निपात दूर होतो.

विश्वमूर्तिरस. स्वर्ण १ शिसें, तांबें, यांचा चूर ५ भाग व पारा ४५ भाग यांचा एकत्र खल करून तें चूर्ण घट्ट फडक्यांत बांधून जंबीराचे रसांत व कांजींत दोलायंत्र करून दोन दिवस पचवावें. नंतर गंधक ४५ भाग व

हरताळ ४५ भाग एकत्र करून खलून चूर्ण करून लोखंडाचे शरावांत अर्धे चूर्ण खालीं घालून त्याजवर दोलायंत्रांत पचविलेलें औषध ठेवावें. पुनः त्याजवर गंधक व हरताळ यांचें राहिलेलें चूर्ण घालून दडपून वर दुसरे लोखंडाचा शराव पालथा घालून कापड माती करून मातीचे पात्रांत खालीं वर मीठ घालून मध्यें तें शराव ठेवून ३ तीन दिवस मंदाग्नि देऊन पचन करावें. स्वांगशीत झाल्यावर काढून खलून ठेवावें. तें भस्म ४ गुंजा आल्याच्या रसांत द्यावें. अथवा रुईचे मुळीचे काढ्यांत मिरपूड घालून द्यावें. किंवा दशमुळांचे काढ्यांत द्यावें. ह्मणजे कंठकुब्जसन्निपात दूर होतो.

आनंदभैरवीरस. बचनाग १ त्रिकटु ३ टांकणखाराची लाही १ ताम्रभस्म १ धोत्र्याचें बीज १ हिंगूळ १ गंधक १ हीं सारीं औषधें एकत्र खलून मग विजया व आलें यांचे रसांत १ दिवस भावना द्यावी, नंतर चण्या प्रमाणें गोळ्या कराव्या आणि रुईचे मुळांचे काढ्यांत त्रिकटूची पूड घालून त्यांत ती एक गोळी उगाळून द्यावी. ह्मणजे शीत गात्र सन्निपात दूर होतो.

ब्रह्मवटी. पारा १ गंधक २ बचनाग १ अभ्रकभस्म १ लोहभस्म १ हीं सर्व खलांत एकत्र घोटून नंतर त्रिकटूचे काढ्यांत व आल्याचे रसांत १ दिवस खल करावा. नंतर शाहाजिरें, अजमोदा, एरण, ओंवा, ब्राह्मी, माका, भांग, कडुनिंब, गोकर्णी, शेचगा, इंद्रवारुणी, श्वेत विष्णुक्रांता, अडूळसा चित्रक यांचे रसांत पृथक् पृथक् एकेक भावना देऊन बोरांच्या आंठी प्रमाणें गोळ्या कराव्या, आणि आल्याच्या रसांत मिरपूड घालून त्यांत गोळी द्यावी. ह्मणजे संद्रिक बरा होतो.

मृतोत्थापन. पारा १ गंधक १ मनशीळ १ बचनाग १ हिंगूळ १ अभ्रकभस्म १ ताम्रभस्म १ लोहभस्म १ सुवर्ण माक्षिक भस्म १ हरताळ भस्म १ हीं सर्व एकत्र खलून आम्लवेतस १ जंबीर १ चांगरी १ बुका १ निर्गुंडी १ इंद्रवारुणी १ यांचे रसांत २ दिवस खल करून शरावांत घालून मात कापड करून भूधर

यंत्रांत चार प्रहर पचन करावें. नंतर काढून चित्रकाचे काढ्यांत २ प्रहर खलून माषमात्र गोळ्या कराव्या आणि त्रिकटु ३ चित्रकमूळ १ हिंग १ यांचें चूर्ण आल्याचे रसांत घालून त्यांत गोळी द्यावी. ह्मणजे प्रलापक शमतो.

रक्तष्ठीवीहर रस. पारा १ गंधक १ यांची कज्जली करून चित्रकाचे रसांत मर्दन करावी, नंतर लोहभस्म १ ताम्रभस्म १ माक्षिक भस्म १ हीं समभाग घालून मर्दन करावें आणि धोत्रा व त्रिफळा व कोरफड व धणे व आलें व कडूनिंब व ब्राह्मी व निर्गुंडी व भाका व चित्रक व कावळी व पांगारा व एरंड व कुडा, यांचा रस एकेक पल प्रमाण घेऊन त्यांत वेगळाल्या भावना द्याव्या. नंतर त्यांत त्रिकटूचें चूर्ण पाऱ्याबरोबर टाकून चणक प्रमाणें गोळ्या कराव्या ३ गोळ्या जिऱ्याच्या काढ्यांत द्याव्या. अथवा पंच कोलाच्या काढ्यांत द्याव्या. पथ्य दहीं भात थंड पाणी द्यावें.

पंचवक्त्ररस. पारा १ गंधक १ बचनाग १ मिरीं १ टांकणखार १ एकत्र चूर्ण करून धोत्र्याचे पाल्याचे रसांत १ दिवस खल करून नंतर त्याच्या २ दोन गुंजां प्रमाणें गोळ्या कराव्या. रुईचे मुळाचे काढ्यांत १ एक गोळी द्यावी, पथ्य मुगांचा यूष करून द्यावा ह्मणजे भग्ननेत्र सन्निपात दूर होतो.

जयमंगलरस. पारदभस्म १ ताम्रभस्म १ कांतभस्म १ तीक्ष्णभस्म १ पितळेचें भस्म १ लोहभस्म १ हरताळ १ माक्षिक १ यांचा एकत्र खल करून त्यांत त्रिकटु ३ बचनाग १ टांकणखार चित्रक यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून घालावें. नंतर अडुळसा, निर्गुंडी, वेलाचा पाला, यांच्या रसाच्या भावना एकेक दिवस देऊन शराव संपुटांत घालून भूधर यंत्रांत ४ प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत आल्यावर काढावें. आणि दशमूळाचे काढ्यांत २ अथवा ४ गुंजा द्यावें. ह्मणजे अभिन्यास बरा होतो.

वीरभद्ररस. पारा १ अभ्रकभस्म १ गंधक १ त्रिकटु ३ पंचलवण ५ बडीशोप १ जिरें १ जहाजिरें १ यांला आल्याचे रसांत १ दिवस भावना देऊन माष प्र-

माण गोळ्या कराव्या आणि चित्रक व आलें व सैंधव यांचे अनुपानांनं गोळी द्यावी. पथ्य दूध भात ह्मणजे जिव्हक बरा होतो.

महोदधिरस. पारा १ गंधक १ लोह १ बचनाग १ दालचिनी १ ताम्र १ वंग १ अभ्रक १ त्रिकटु ३ तमालपत्र २ नागरमोथे २ वावडिंग २ नागकेशर २ रेणुकबीज २ पिंपळमूळ २ हीं सर्व एकत्र करून जळपिंपळीच्या रसाच्या ३ तीन भावना द्याव्या. त्याच्या गोळ्या हरभऱ्या एवढ्या बांधाव्या. श्वास, खोकला मूळव्याध, भगंदर, हृदयशूळ, पार्श्वशूळ, कर्णरोग, संग्रहणी, उदरें, प्रमेह, मुतखडा. इतक्या व्याधींवर योजावा. पथ्य नाहीं यथेच्छ व्यापार करावा.

कनकसुंदररस. मिरें, गंधक, हिंगूळ, बचनाग, पिंपळी, टांकण खार, धोत्र्याचें बीं, हीं औषधें शोधलेलीं घ्यावीं. नंतर बारीक खलून भांगेच्या काढ्याची भावना द्यावी; आणि गुंजे प्रमाणें गोळ्या बांधाव्या. नंतर प्रकृतीचे व रोगाचें तारतम्यानें अनुपान योजून, संग्रहणी, ज्वर, अतिसार, अग्निमांद्य, इत्यादिकांवर देत जाव्या. ह्मणजे ते रोग दूर होतात.

दिनेशभैरव. जायपत्री, दालचिनी, लवंगा, अकूलकारा, पिंपळी, सुंठ, हिंगूळ, बचनाग, त्या साऱ्यांचें समभाग चूर्ण करून नागवेलीचे रसांत १ दिवस खल करावा. मग आल्याच्या रसांत १ दिवस खल करावा. नंतर गुंजे प्रमाणें गोळ्या करून अनुपान योजून द्याव्या ह्मणजे अतिसारादिक रोग शमतात.

चंद्रप्रभावटी. पारा, सुवर्णभस्म, ताम्रभस्म, खदिरसार, मोचरस, हीं सर्व एकत्र खलून कांटेसांवरीच्या मुळांच्या रसानें दोन प्रहर खल करावा. त्याची हरभऱ्या प्रमाणें गोळी करावी. ती तीन मासे जिऱ्याचे चूर्णाबरोबर योजावी ह्मणजे त्रिदोषात्मक अतिसार, ज्वर, हीं दूर होतात.

अतिसारेभसिंहरस. पारा १ हिंगूळ १ अभ्रक १ बचनाग १ गंधक १ हीं एकत्र खलून, पहाडमूळ, चित्रकमूळ, वाळवेल, सुंठ, यांच्या काढ्यांनीं, भिरनिरा-

ल्या भावना द्याव्या. मात्रा गुंज प्रमाण मधांत देणें ह्म० सर्वातिसार बंद होतो.

**चित्रांबररस.** पारा, अभ्रक, गंधक, हीं समभाग घेऊन थोडें तूप, घालून लो-खंडी कढयींत घालून पक्क करावें. लोखंडी दांड्यानें चाळवावें. नंतर चुलीव-रून उतरून जिऱ्याचे काढ्याच्या तीन भावना द्याव्या. मात्रा माषप्रमाण अ-नुपान योजून द्यावी. ह्मणजे संग्रहणी, रक्त, आम, शूळ, प्रवाहिका, हीं शां-त होतात.

**पंचामृत पर्पटी.** १ लोहभस्म १ अभ्रकभस्म १ ताम्रभस्म १ पारदभस्म, आ-णि शुद्ध केलेला गंधक सर्वांच्या दुप्पट ह्मणजे ८ तोळे हीं सर्व एकत्र खलावीं नंतर लोखंडाच्या कढईंत घालून खालीं बोरीच्या काष्ठांचा मंदाग्नि द्यावा, त्या-चा रस झाला ह्मणजे गाईचे शेणावर केळीचें पान पसरून त्यावर तो र-स ओतावा. आणि त्यावर त्वरित दुसरें पान बसवावें. थंड झाल्यावर त्या-च्या वड्या काढून ठेवाव्या. या मात्रेस पंचामृत पर्पटी असें ह्मणतात. ही ग्रहणी, क्षय, अतिसार, ज्वर, स्त्रीरोग, पांडुरोग, व कृत्रिम, विषजन्य[1] वि-कार, आम्लपित्त, मूळव्याध, अग्निमांद्य, इत्यादि रोगांवर दिली असतां त्या-चा नाश करिते. ग्रहणीवर देणें तर हिंग, सैंधव, जिरें, यांच्या चूर्णाबरोब-र द्यावी. पांडु व पित्तजन्य विकारावर नुसत्या जिऱ्याबरोबर देणें, इत-रांवर आपल्या युक्तीनें योजावें.

**लोकनाथरस.** पारा २ गंधक २ यांची एकत्र कज्जली करून पाऱ्याच्या चौपट कवड्या घेऊन त्यांत ती कज्जली भरावी. नंतर टांकणखार एक भाग घेऊन गाईचे दुधांत खलून त्या कवड्यांचे तोंडाला त्याची मुद्रा द्या-वी, नंतर शंखाचे तुकडे ८ आठ तोळे घेऊन त्यांतील अर्धे तुकडे पणतींत घालून त्यांजवर कवड्या ठेवून त्यांजवर दुसरे तुकडे घालून वर दुसरी प-

---

१ क्षीर व मत्स्य, जांबूळ आणि दूध इत्यादि संयोगानें विषरूप होतात, तीं.

णती बसवून कापड माती करून गजपुट द्यावें. आपाप थंड झाल्यावर काढू-न खलून कुपींत भरून ठेवावें, याला अनुपानें. अनुपान प्रकरणीं लिहिलीं आहेत. त्याप्रमाणें योजना करावी.

**क्षारताम्ररस.** शंखभस्म, ताम्रभस्म, कपर्दिकभस्म, लोहभस्म, मंडूरभ-स्म, टांकणखार, जवखार, त्रिकटु, सैंधव, त्यांस माका, अडूळसा, आणि आलें त्यांच्या रसाच्या भावना देऊन गोळी हरभऱ्या प्रमाणें करावी. अनुपान पर-त्वें अतिसार, ग्रहणी, अग्निमांद्य, शूळ, इत्यादिक दूर होतात.

**ग्रहणीगजकेसरी.** पारा, गंधक, अभ्रक, लोह, हिंगूळ, बाळवेल, बच-नाग, त्रिकटु, भांग, नागरमोथे, दाळिंबाची साल, इंद्रजव, जायफळ, मोच-रस, अतिवीष, धायटीचें फूल, कपित्थ, ओंवा, चित्रक, टांकण, सागरगो-ट्यांचा मगज, अफू, सर्वांच्या समान धोत्र्याच्या रसांत भावना देऊन गो-ळ्या तुरी प्रमाणें बांधाव्या, तेणेंकरून अतिसार, ग्रहणी, अग्निमांद्य, शूळ, पांडु, इत्यादि रोग बरे होतात. अनुपान ताक किंवा दधि मंड.

**ग्रहणीकपाटरस.** सुंठ, मिरें, पिंपळी, गंधक, टांकण, पारा, कपर्दिभस्म, बचनाग, समभाग घेऊन निंबाच्या रसांत खल करावा. मात्रा माषमात्र तूप, मिरें, आणि साखर एकत्र करून द्यावी.

**ग्रहणीवज्रकपाटोरस.** १ माक्षिक १ मौक्तिक १ सुवर्ण यांचें भस्म २ गं-धक ३ पारा त्यांचा कंवटाच्या रसांत खल करावा, नंतर तें औषध हरिणा-च्या शिंगांत भरून मध्यम पुट द्यावें. मग त्यांतून काढून चिकण्याच्या र-सांत सात दिवस भावना द्याव्या. आघाड्याच्या रसाच्या भावना ३ तीन, लो-ध्र, अतिविष, नागरमोथे, धायटीचें फूल, इंद्रजव, गुळवेल, त्या प्रत्येका-च्या तीन तीन भावना द्याव्या, त्याची माष प्रमाण मात्रा मिरपूड आणि मध यांत द्यावी. तेणेंकरून सर्व प्रकारचा अतिसार आणि संग्रहणी बंद होऊ-न अग्नि मंदीस होतो.

त्रिविक्रमरस. हिंगूळ, अभ्रक, टांकण, रक्तबोळ, एकत्र करून खल करावा. दोन गुंजा मधांत द्यावा. ह्मणजे रक्तातिसार व आमशूळ दूर होतो.

अग्निकुमार रस. १ पारा १ गंधक १ टांकणखार १ बचनाग २ कपर्दी भस्म २ शंख भस्म ८ मिरें हीं औषधें एकत्र करून निंबाच्या रसांत खल करावा गोळ्या गुंजप्रमाण बांधाव्या. अजीर्ण, अग्निमांद्य, शूळ, शैत्य, इत्यादिकांवर देणें. अनुपान आल्याचा रस, मध, किंवा विड्यांत देणें.

क्रव्याद रस. पारा ४ गंधक ८ ताम्र २ लोह २ एकत्र खलून लोखंडी कढईंत घालून चुलीवर ठेवावें, पाणी झालें ह्मणजे एरंडाच्या पानावर पर्पटी ओतावी. निवाल्यानंतर ती पर्पटी खलून निंबाची भावना द्यावी, नंतर पंचकोलाची भावना द्यावी. नंतर टांकणखार, बीडलोण, मिऱ्यें हीं तोळा तोळा घालून हरभऱ्याच्या आंबीच्या सात भावना द्याव्या. गोळ्या दोन माशांच्या बांधाव्या. देणें तर सैंधव आणि ताक यांत द्याव्या. ह्मणजे कसेंही गुरु अन्न भक्षिलें असलें तरी चार घटिकांत जिरून जातें.

अग्नितुंडावटी. १ पारा १ गंधक १ अजमोदा ३ त्रिफळा १ सज्जिखार १ जवखार १ सैंधव १ जिरें १ गंधबीड १ बिडलवण १ वावडिंग १ मीठ १ सुंठ १ मिरें १ पिंपळी १७ कुचल्याचें बीं शुद्ध करून चूर्ण करावें. आणि ह्या सर्वांचा खल निंबाचे रसांत करावा. आणि मिऱ्यां प्रमाणें गोळ्या बांधाव्या. अग्निमांद्य व अजीर्ण यांवर द्याव्या.

२रा महोदधिरस. १ बचनाग १ पारा २ जायफळ २ टंकण ३ पिंपळी ६ सुंठ ६ कपर्दभस्म लवंग ३ मासे सर्वांचा खल निंबाचे रसांत करून गोळ्या कराव्या. ही गुटिका अग्निमांद्यावर प्रशस्त आहे.

चिंतामणिरस. १ पारा १ गंधक १ ताम्र १ अभ्रक ३ त्रिफळा १ सुंठ १ मिऱ्यें १ पिंपळी १ जेपाळ द्रोण पुष्पीचे रसांत भावना देऊन बारीक कज्जली करावी. हें औषध अजीर्ण, ज्वर, शूळ, ह्यांवर ही मात्रा गुंज किंवा अर्धा गुंज

द्यावी. वातरक्तावर ही प्रशस्त आहे.

**अर्शःकुठाररस.** १पलें ताम्रभस्म १पलें लोहभस्म २सूंठ २मिरें २पिंपळी २कळलावी. २दंती २चित्रक २पिलूचें मूळ ५जवखार ५टांकणखार ५सैंधव ३२पळें गोमूत्र ३२पळें निवडुंगाचा चीक हीं सर्व एके जागीं करून गोळा होई तोंपर्यंत मंदाग्नीनें शिजवावें. तें औषध दोन महिने पर्यंत भक्षावें, ह्मणजे अर्शविकार दूर होतो.

**नित्योदितरस.** १पारा १अभ्रक १लोहभस्म १ताम्र १गंधक ५विषवें हीं सर्वे एकत्र करून सूरणाच्या रसांत तीन दिवस खल करावा. मात्रा मासाभर तुपांत द्यावी. ह्मणजे असाध्य जरी मुळव्याध असली तरी बरी होते. व सूज निघते.

**रससिंदूर.** १०पारा १०गंधक ५नवसागर यांची एकत्र कज्जली करून चित्रकाचे मुळाचे रसांत व धोत्र्याचे पाल्याचे रसांत व कोरकंडाचे रसांत एकेक दिवस खल करून कुपींत भरून वालुका यंत्रांत चार प्रहर अग्नि द्यावा. आपाप शीत झाल्यावर तें रसायन कुपींतून काढून ठेवावें. हा रससिंदूर अनुपान योजून सर्व रोगांवर द्यावा. कुपीस लेप करावयाचा प्रकार. वारूळाची माती अथवा पांढरी खडू ००॥ आणून वाटून बारीक करावी. लोहकीट कुटून गाळून ००॥ कणीक ००८१ यांचा एक दिवस खल करून मग फडक्याला ती माती लावून कुपीस लपेटून वाळवावें याप्रमाणें ७मात कापडें करून मग कुपींत औषध भरून वालुकायंत्रांत ठेवून पचवावें.

**कनकसुंदररस.** १गंधक १अभ्रक १लोह १पारा १माक्षिक १मौक्तिक १नागभस्म १प्रवाळ ८सुवर्ण या औषधांचा खल हंसपादीच्या रसांत तीन दिवस करावा. नंतर तें औषध कांचेच्या कुपींत भरून लवण यंत्रांत तीन दिवस अग्नि द्यावा. स्वांग शीत झाल्यावर काढून ठेवावें, तें अनुपानपरत्वें खोकला, गुल्म, ग्रहणी, पांडु, राजयक्ष्मा, रक्तपित्त, श्वास, इत्यादि रोगां-

वर योजावें.

सन्निपातभैरवरस. १ हरताळ १ गंधक १ पारा २ बचनाग ४ मनशीळ ४ टं-कण १४ हिंगूळ, हे निंबूच्या रसांत खल तीन दिवस आल्याच्या रसांत खल ती-न दिवस करून गोळी उडदा प्रमाणें करावी. ती सन्निपात ज्वर, अतिसार कफ, पांडु, अरोचक, कुक्षिरोग, उदावर्त, इत्यादिकांवर अनुपान योजून द्यावी.

आनंदभैरव. हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, गंधक, टंकण, निं-बाच्या रसांत चार प्रहर खल करावा. आणि गोळ्या वाटाण्या एवढ्या बां-धाव्या. त्या श्वास, कास, अतिसार, अजीर्ण, प्रमेह, सर्पदंश, वृश्चिकदंश यांजवर द्याव्या.

सर्वांगसुंदररस. सुवर्ण १ अभ्रक ३ पारा ५ गंधक ६ टंकण २ रौप्य ३ ताम्र ४ निंबाच्या रसांत खल करून लहानसें पुट द्यावें. नंतर चूर्ण करू-न त्याच्या बरोबरीनें मौक्तिक घालावें. हें औषध गुंजभर तूप साखरेशीं द्यावें. ह्मणजे मेह, ज्वर, अरुचि, क्षय, कास, पांडु, भ्रम, दाह, शूळ, इत्या-दि रोग शांत होतात.

राजचंडेश्वररस. १ पारा १ गंधक १ बचनाग, हिंगूळ, २ हीं एकत्र करून निर्गुंडी आणि आल्याचा रस ह्यांची भावना द्यावी. मात्रा गुंज प्रमाण आल्या-चा रस व मध एकत्र करून द्यावी. तैलाभ्यंग, स्नान, तृषा लागली तर ना-क पिणें. आंगास चंदनाची उटी लावणें, नसेंच तांबूल खावें. ऊंस, केळीं, पन्हि, इतकीं अपथ्यें आहेत तरीं राजचंडेश्वराला पथ्य होऊन तात्काळ ज्वर शांति होते.

मृत्युंजयरस. १ माक्षिक १ तालक १ ताम्र १ बचनाग १ मनशीळ १ जेपाळ १ गंधक १ पारा, त्यांचा मुसळीच्या रसांत खल करून कुक्कुट पुट द्यावें. मात्रा गुंज प्रमाण विड्याच्या पानांत योजावी. पथ्य दहीं भात. नवज्वर, स-न्निपातज्वर, तात्काळ शांत होतात.

बालज्वर हरश्चंद्रशेखररस. १ अभ्रक १ लोह १ ताम्र १ मंडूर १ रससिंदूर १ टंकण १ गोरोचन यांचें चूर्ण करून गोकर्णीच्या रसांत प्रहरभर खल करून उडदा येवढी गोळी बांधावी. नाना प्रकारचे ज्वर, बालज्वर, दूर होतात.

कुसुमाकररस. १ सुवर्ण १ अभ्रक १ रौप्य १ प्रवाल १ मोतीं २ माक्षीक ७ रससिंदूर खल करून गाईच्या दुधाची भावना ३ दिवस आणि माक्याचे रसाची भावना दोन दिवस करून मात्रा बांधून ठेवाव्या. दोन वेळ २ वाल प्रमाण अनुपान योजून द्यावी. ह्मणजे नाना प्रकारचे मेह, व्रण, भगंदर अनेक प्रकारचे ज्वर, मूत्रकृच्छ्र ८० प्रकारचे वातरोग दूर होतील. हा रस कश्यपानें सांगितला आहे.

सिद्धगणेश्वररस. १ पारा २ गंधक ३ अभ्रक खलांत घालून काळा धोत्रा, भांग, त्रिकटू, ह्यांच्या सात सात भावना देऊन ठेवाव्या. मात्रा वाल भार मध पिंपळींत देणें. ह्मणजे नवज्वर, एकाहिक, द्व्याहिक, वांति, हे रोग दूर होतात.

पाशुपतास्त्ररस. १ पारा १ रससिंदूर १ कांतलोह १ सुवर्ण १ अभ्रक १ रुपें १ मुरदाडशिंग १ शंख १ शिंप १ प्रवाळ १ तालक १ माक्षिक १ मोती १ सुरमा १ र+सांजन १ नागभस्म १ वंग १ कपर्दिभस्म. हीं औषधें समभाग घेऊन देवदारूच्या काढ्यांत १ एक महिना खल करावा. मात्रा दोन गुंजा मध साखरे बरोबर द्यावी. वर्ष किंवा साहा महिनें सेवन केल्यानें व्रण, मेहव्रण, गजचर्म, विसाप मुळव्याध, सन्निपातादिक, रोग बरे होतात. हा योग व्रणावर फार चांगला आहे.

वातगजांकुश. पारा भाग ८ कुचल्याच्या बिया भाग ८ गंधक ८ त्रिकटू तोळे १२ मात्रा गुंजभर अनुपान योजून द्यावी ह्मणजे ८० प्रकारचे वायु, ऊरुस्तंभ हे रोग दूर होतात.

---

+ रसांजन ह्मणजे दारुहळदीचा काढा शेळीचे दुधांत चतुर्थांश शेष जो. तें.

श्लेष्मविध्वंसनरस. १ पारा १ हरताळ १ ताम्रभस्म ३ गंधक त्यांचा कारली च्या रसांत खल करावा. नंतर गोळ्या घालून कुपींत भराव्या, आणि कुपीला सात कापड करून तोंड बंद करून वालुका यंत्रांत तीन प्रहर आंच द्यावी. स्वांगशीत झाल्यावर त्यांत बरोबरीनें मिऱ्यांचें चूर्ण आणि अष्टमांश बचनाग घालून माक्याच्या रसांत चांगला खल करावा. अनुपान योजून कफ, काम, श्वास, धानरोग, शूळ, विषूची, अग्निमांद्य, ज्वर, राजयक्ष्मा, ग्रहणी, अतिसार, ह्या रोगांवर द्यावा.

मेहांतकरस. १ सुवर्ण २ शिसेंभस्म ३ लवंगा ६ हिंगूळ त्यासर्वांचा खजुराच्यारसांत ३ तीन दिवस खल करावा अनुपान योजून द्यावा ह्मणजे सर्व प्रमेह दूर होतात.

मालिनीवसंत. सुवर्ण, मुक्ता, प्रवाळ, रौप्य, कलखापरी, हिंगूळ, गंधक, पारा, नीळभस्म, तारमाक्षीक, स्वर्णमाक्षीक, वंग, विष, नाग, वैक्रांत लोह, हीं औषधें समभाग खलांत घालून गुलाब पाणी, कारेसाळ्याचारस, उंसाचारस, दूध, नागरमोथ्याचा काढा यांच्या सात सात भावना द्याव्या. नंतर कापराची भावना देऊन गोळ्या बांधाव्या. आणि अनुपान परत्वें पित्त मेह, उष्णताप, बहुमूत्रता, मुतखडा, वांति, तृषा, मूत्राघात, सर्व प्रमेह हे रोग दूर होऊन वीर्य, पुष्टि, दृष्टि, अग्नि यांस तेज येतें.

शारभेश्वररस. १ पारा १ गंधक १ वत्सनाभ १ हिंगूळ १ टांकणखार त्या औषधांस चित्रकाच्या काढ्याची भावनाद्यावी. सुकल्यावर शरावांत घालून वालुका यंत्रांत ठेवून दोन प्रहर अग्नि द्यावा. नंतर चूर्ण करून त्रिकटूची भावना द्यावी, ह्या मात्रेनें वात, पित्त, कफ जनितज्वर, सन्निपातज्वर, शमतात.

मेहांतकरसायन. १ वंग १ नाग १ अभ्रक १ लोह १ कांत १ पारद १ ताम्र १ तीक्ष्ण १ हिंगूळ १ गंधक १ टांकणखार १ कलखापरी हीं औषधें खलांत-

घालून निंबाच्या रसानें भावना द्यावी, नंतर चकती करून शराव संपुटांत घालून पुट द्यावें स्वांग शीत झाल्यावर त्यांत कापूर, केंशर, दालचिनी, तमालपत्र, वेलचीदाणे, नागकेंशर, सुंठ, जायफळ, जायपत्री, हीं सर्व वरच्या औषधांच्या बरोबर घेऊन निंबाच्या अंतर्सालीच्या रसांत तीन दिवस खल करावा. पुनः त्याच्या गोळ्या करून सावलींत वाळवाव्या, खडीसाखर आणि लोणी, यांत द्याव्या ह्मणजे २०वीस प्रकारचे प्रमेह दूर होऊन सर्व रोग दूर होतात. शरीरपुष्टि होते, बळ वाढतें शरीराची कांती दिव्य होते. शतस्त्रिया भोगण्याचें सामर्थ्य येतें.

**पुष्पधन्वारस.** १ पारा किंवा रससिंदूर १ नागभस्म १ लोह १ अभ्रकभस्म ३ धोत्र्याचें बीज हीं खलांत घालून ज्येष्ठीमधाचा व कांटे शेवरीचा काढा करून भावना द्यावी, उसांच्या रसाची भावना, दुधाची भावना देऊन वाल प्रमाण गोळ्या कराव्या. ती तूप, साखर आणि मध यांत द्यावी. आणि वर दूध प्यावें. ह्मणजे अनेक स्त्री संभोगाचें सामर्थ्य येतें, शरीर कांति चांगली होते, मेह दूर होतात.

**महापूर्णचंद्रोदयमात्रा.** १ गंधक १ पारा १ ताम्र १ टांकणखार १ नागभस्म १ सुवर्णभस्म १ तारमाक्षीक १ सुवर्ण माक्षीक १ मौक्तिक १ कांत १ वंग १ अभ्रक १ कस्तूरी १ पोलादाचें भस्म १ चंदन १ केंशर १ कापूर ह्या औषधांचा मालतीचे रसांत खल प्रहर भर करावा. आल्याच्यारसांत वाल प्रमाण मात्रा योजावी, ह्मणजे कास, श्वास, मेह, कुष्ठ, रक्तदोष, राजयक्ष्मा हे रोग दूर होऊन धातु वृद्धि होते.

**हिरण्यगर्भरस.** १ सुवर्णभस्म १ रौप्यभस्म १ ताम्रभस्म १ प्रवाळभस्म १ पारदभस्म १ गंधक १ मनशीळ १ हरताळ १ कुटकी हीं औषधें समभाग घेऊन शेळीचे दुधांत खलावीं आणि मुशींत घालून गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर बारीक करून ठेवावें. अनुपान भेदें करून दोन वाल

योजावें. ह्मणजे वातज्वरादिक, द्वंद्वजज्वर, त्रिदोषज्वर, शांत होतील. राजोपचारानें पथ्य करावें.

**सिंदूरभूषणरस.** अभ्रक, रससिंदूर, गंधक, टांकणखार हीं समभाग घेऊन धोत्र्याचे रसांत खल करावा. उडदायेवढी गोळी मधाशीं सेवावी ह्मणजे अष्टादश कुष्टें, वातरोग, शूळ, प्रमेह, महाव्याधि दूर होतात. गर्भिणीसही प्रशस्त आहे.

**सिद्धलक्ष्मीविलासरस.** सुवर्णभस्म १ रौप्यभस्म २ ताम्रभस्म ३ कांत ४ तीक्ष्णभस्म ५ मंडूर ६ अभ्रक ७ वंग ८ नाग ९ मौक्तिक १० पोंवळें ११ आणि सर्वांच्या बरोबर रससिंदूर घालून जायपत्री, त्रिकटू, त्रिफळा, चातुर्जात, केशर आणि कस्तूरी, त्यांच्या सातसात वेगळाल्या भावना द्याव्या. त्याची मात्रा उडीद प्रमाण खडीसाखर, आणि मध, त्याशीं योजावी. ह्मणजे क्षयरोग, पांडु, कास, श्वास, जीर्णज्वर, गुल्म, प्रमेह, इत्यादि रोग दूर होऊन शरीर पुष्ट होतें.

**सिद्धसर्वेश्वररस.** १ स्वर्णमाक्षिक १ माक्षिक १ कलखापरी १ गंधक २ ताम्र २ टांकणखार २ सुवर्ण २ रौप्य २ प्रवाळ २ मौक्तिक २ हिंगूळ ३ वंग ३ लोह ३ नाग ३ रससिंदूर ३ अभ्रक ३ रत्नमणी ३ कांत हीं सर्व औषधें ज्येष्ठीमध, दालचिनी, पत्रज, एला आणि चित्रक त्यांच्या काढ्याच्या सातसात भावना द्याव्या, नंतर नागरमोथे, वाळा, त्रिफळा, अडूळसा, गुळवेल, कचोरा, कोरफड, भुईकोहळा, क्षीरविदारी, गोदुग्ध, मुसळी, उंसाचारस, त्याची भावना देऊन तो गोळा शरावांत घालून मृगांका सारिखें पुट द्यावें, नंतर पुनः कस्तूरीच्या दोन भावना द्याव्या. ही मात्रा मध पिंपळीशीं दोन वाल द्यावी ह्मणजे मेह, अर्श, ग्रहणी, जलोदर, वातव्याधि, ज्वर, कावीळ, पांडु, कुष्ठ, भगंदर, शुक्रक्षय, अनपत्यता, आणि जरा, हीं सर्व दूर होतात. कांति, बळ, वीर्य, पुष्टि हीं होतात.

**लघुमृगांकरस.** १ पारा १ सोनें २ मोतीं १ गंधक चतुर्थांश टांकणखार ह्या सर्वांचा कांजिका मध्यें एक दिवस खल करावा शरावांत घालून लवण पूरित पात्रांत घालून पक्क करावें. स्वांग शीत झाल्यावर खलून ठेवावें. तें तूप व पिंपळी अथवा मध पिंपळींत वालभर द्यावें. हाही क्षयादिकांवर प्रशस्त आहे.

**त्रैलोक्यचिंतामणिरस.** पारा, हिऱ्यानें भस्म, सुवर्ण, रौप्यभस्म, कांत, अभ्रक, गंधक, मौक्तिक, शंख, प्रवाळ, हरताळ, मनशीळ, हीं सर्व औषधें शुद्ध आणि समभाग घेऊन चित्रकाचे मुळांच्या काढ्यांत सात दिवस चांगला खल करावा. नंतर रुईच्या चिकानें तीन दिवस खल करावा. आणि पिंवळ्या कवड्या घेऊन त्यामध्यें तें औषध भरावें. नंतर रुईच्या चिकामध्यें टांकणखार खलून त्या कवड्यांचीं तोंडें लिंपावीं. नंतर त्या शरावांत ठेवून गजपूट द्यावें. स्वांग शीत झाल्यावर त्या कवड्यांस कटखलून चूर्ण करावें. त्या चूर्णा बरोबर रससिंदूर आणि रससिंदुराच्या चतुर्थांश वैक्रांत मण्याचें भस्म घालून रोगव्याचे मुळाच्या रसाच्या सात भावना द्याव्या. नंतर चित्रक मूळाच्या काढ्यानें २१ एकवीस भावना द्याव्या. मग आल्याच्या रसानें सात भावना द्याव्या. आणि त्याची बारीक कज्जली करून त्याच्या चतुर्थांश टांकणखार घालावा. टांकणखाराच्या चतुर्थांश बचनाग घालावा. आणि मिऱ्येंही बचनागा बरोबर घालावीं. नंतर, लवंग, सुंठ, बाळहिरडे, पिंपळी, जायफळ, हीं प्रत्येक औषधें बचनागाचे चतुर्थांश टाकावीं. आणि तें सर्व औषध महाळुंग आणि आलें त्यांच्या रसानें खलावें. त्या औषधाची मात्रा चार गुंजा भक्षावी. मागून मध पिंपळी चाटावी. म्हणजे सर्व रोगांची शांति होत्ये, अग्नि प्रदीप्त होतो. बळ वाढतें. कांति वाढते. वीर्यवृद्धि होते. विषदोषशमतो. वायु, विद्रधि, पांडु, शूळ, प्रदर, रक्तातिसार, मेह, प्लीहा, जलोदर, सुतरकडा, शोफ, हलीमक, उदर, मूत्रकृच्छ्र,

भगंदर, ज्वर, मुळव्याध, कुष्ट इत्यादि साध्य असाध्य रोग हा त्रैलोक्य चिंतामणि दूर करितो.

**राजमृगांक रस.** शुद्ध सुवर्ण भस्म भाग १ रससिंदूर ।।. ताम्रभस्म ।।. लोह ।।. वंग ।।. अभ्रक ।।. नागभस्म ।।. मौक्तिकभस्म २ प्रवाळ २ हिऱ्याचें भस्म २ या सर्वांची कज्जली करून रससिंदुराच्या चतुर्थांश टांकणखार घालून कांचेच्या कुपींत भरून त्या कुपीला मात कापड करावें, नंतर एका डेऱ्यांत मीठ भरून त्यांत ती कुपी ठेवावी आणि दोन प्रहर पर्यंत खैराच्या लांकडांचा मंदाग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर बारीक खलून सुंदर डब्यांत किंवा कुपींत घालून त्याची पूजा करावी. अनुपान तूप व मध आणि त्रिकटूचें चूर्ण घालून दोन गुंजा मात्रा द्यावी. खोकला, श्वास, मंदाग्नि शोफ, पांडुरोग, कफ, क्षयरोग, इत्यादिकांवर देणें.

**महाराजमृगांक.** शास्त्रोक्त रीतीनें गंधक मारण करावें. नंतर हिऱ्याचें भस्म करावें. मग रससिंदूर तयार करावा, त्या रससिंदुरानें सुवर्णाचें भस्म करावें, त्याप्रमाणें रुप्याचेंही भस्म करून ताम्र, कांत, नाग, वंग, आणि अभ्रक हीं समभाग घ्यावीं, नंतर मौक्तिक भस्म सर्वांच्या सामान घ्यावें, आणि रससिंदुराच्या दुप्पट गंधक आणि टांकणखार चतुर्थांश घालून जवांची कांजी करून त्यांत तीन दिवस खलावें. त्याचा गोळा करून सांवलींत वाळवावें. तो गोळा शरावांत घालून चार प्रहर अग्नि द्यावा, मग स्वांग शीत झाल्यावर खलून ठेवावें. ब्रह्मा, विष्णु, योगिनी, भैरव आदिकरून देवतांना बळी द्यावा. आणि तुपाचें हवन करावें. तें औषध सुवर्ण पात्रांत किंवा रौप्य पात्रांत ठेवावें. आणि त्याची पूजा करावी. क्षयरोगाच्या नाशार्थ हें औषध मोहोरी प्रमाणें द्यावें, अनुपान मध किंवा तूप आणि पिंपळी, सुंठ व मिरें यांच्या चूर्णाशीं देणें वर गाईचें दूध धारोष्ण घ्यावें. किंवा शेळीचें दूध घ्यावें, पथ्य चांगलें करावें. याप्रमाणें एक

मंडळ सेवन केलें असतां क्षयरोग शांत होतो. आणि अनेक प्रकारचे चांगले गूण होतात.

**रत्नगर्भपोटलीरस.** १रससिंदूर १हिऱ्याचेंभस्म १सुवर्णभस्म १रौप्यभस्म, १लोहभस्म १ताम्रभस्म आणि सर्वांबरोबर मिऱ्यांचें चूर्ण १मौक्तिकभस्म १माक्षिकभस्म १प्रवाळभस्म १शंखभस्म हीं सर्व चित्रकाच्या काढ्यानें सात दिवस पर्यंत खलावीं. नंतर मृगांका प्रमाणें पिवळ्या कवड्यांत भरून टंकण खारानें तोंडें बंद करावीं. आणि शरावांत घालून गजपूट द्यावें. नंतर त्या औषधाला निर्गुंडीच्या रसाच्या सात भावना द्याव्या, आर्द्रकरसाच्या सात आणि चित्रकाच्या २१ भावना द्याव्या. हें औषध तूप आणि त्रिकटूचें चूर्ण यांत द्यावें. ह्मणजे राजयक्ष्मा, ज्वर, पांडु, रक्तातिसार, हे रोग दूर होतात. हा रत्नगर्भ पोटली रस योगवाही ह्मणजे जसें अनुपान योजावें तसा गूण करितो.

**वसंतकुसुमाकररस.** २सुवर्ण भाग २रौप्य ३वंग ३नाग ३कांत ४रससिंदूर ४अभ्रक ४प्रवाळ ४मौक्तिक एकत्र खलून गाईचें दूध अडुळसा, कमळकंद, पांढरावाळा, काळावाळा, केळीचा कांदा ह्यांच्या वेगवेगळ्या सात सात भावना द्याव्या. शेवंतीच्या फुलांच्या भावना ७ मोगऱ्यांच्या फुलांच्या भावना ७ सर्वांच्या मागून कस्तूरीची भावना देऊन मात्रा तयार करावी. २गुंजा खडीसाखर व मध यांत द्यावी. बुद्धि, काम, आणि सुख यांची प्राप्ति होते, मेहावर प्रशस्त आहे. आणि धातुवर्धकही आहे. क्षय, कास, उन्माद, सर्पविष, शुक्रदोष, पांडुरोग, शूळ, मूत्रघात, अश्मरी हे रोग दूर होतात. त्यावर मिष्टान्न भक्षण करावें. ह्मणजे अत्यंत कामवृद्धि होते. शत स्त्री भोगण्यानें सामर्थ्य येतें.

**चंद्रकलारस.** पारा १ गंधक १ अभ्रक १ हिंगूळ १ कुटकी १ गुळवेलीचें-

सत्व १ पित्तपापडा १ पिंपळी १ चंदनचूर १ कावळी १ वाळा १ मनुका १ यांची सू-क्ष्म कज्जली करून नागरमोथे, दाळिंब, दूर्वा, केवड्याचें कणीस, दूध, सहदेवी, कोरफड, पित्तपापडा, सबजा, आणि शतावरी, इतक्यांचे यथा संभव रस व काढे करून भावना द्याव्या, नंतर मात्रा बांधाव्या. देणें तर जिरें खडिसाखर, दूध, किंवा रोग अवस्था पाहून अनुपान योजावें ह्मणजे नवज्वर, दाह, विषमज्वर, प्रदर, मेह, भ्रम, वांति, वगैरे रोगांची शांति होते.

**अष्टमूर्तिरस.** १ पारा १ हिंगूळ, १ मनशीळ १ सोमल १ हरताळ व मुरदाड शिंग १ तुरटी ।। सोनें ।। रुपें २ रस कापूर ६ गंधक या सर्वांची कज्जली करून मातकापड केलेल्या कुपीमध्यें घालून वालुकायंत्रीं पक्क करावें. अग्नि सोळा प्रहर देणें, प्रथम दीपाग्नि प्रहर ४ चार. मध्यमाग्नि प्रहर ८ आणि भडाग्नि प्रहर ४ नंतर स्वांग शीत झाल्यावर कुपीचे कंठीं रसायन लागतें तें घेऊन ठेवावें. वातरोग, सन्निपात, वायु, आणि कफजन्य कास आणि श्वास, इत्यादिकांवर योजावें.

**नारसिंहरस.** ४ नाग ३ वंग १४ पारा १५ गंधक ४ वचनाग त्यांचा माक्याच्या रसांत खल करावा, नंतर चित्रकाचे काढ्यांत एक दिवस खलावें, व आल्याची १ भावना द्यावी. त्याचा गोळा करून शरावांत ठेवून वालुकायंत्रीं सोळा प्रहर आंच द्यावी. थंड झाल्यावर पुनः ४ तोळे वचनाग घालून गोळ्या बांधाव्या. याची मात्रा दोन वाल योजावी, ह्मणजे राजयक्ष्मा, बहुमूत्रता, विद्रधि, श्वास, कास, विषमज्वर, बाळंतरोग, शूळ, मेह, शोफ, पांडुरोग, आणि गलरोग, यांच्या शांतीं विषयीं हा नारसिंह फार चांगला आहे.

**शांतिहृदयरस.** लोह, शंखभस्म, गंधक, पारा, हीं सम भाग औषधें खलांत घालून कोरफड, धोत्रा, आणि चुका, यांच्या रसानें खलावें. नंतर गोळा करून त्याणें सात मातकापडें करून पुट द्यावें. नंतर खलून ठेवावें. दोन वाल औषध अजमोदा आणि वावडिंग यांच्या चूर्णाशीं मध घालून

द्यावें. मागून पिंपळाच्या क्षाराचें पाणी पाजावें. ह्मणजे कृमि, वांति बंद होतात.

स्वच्छंदभैरवरस. पारा १ बचनाग १ गंधक १ जायफळ ॥. हीं एकत्र करून सर्व ओषधांच्या निमे पिंपळीचें चूर्ण घालावें आणि खल करावा. नंतर-अनुपान योजून शीतज्वर, सन्निपातज्वर, विषूची, विषमज्वर, जीर्णज्वर, मंदाग्नि, शिरोरोग, इत्यादिरोगांवर हा स्वच्छंदभैरव योजावा.

अश्वकंचुकीरस. १ पारा १ गंधक १ आंवळकाठी १ पिंपळमूळ १ निर्विषी १ पिंपळी १ मिरें १ मराठी १ वावडिंग १ पत्री १ लवंग १ हळद १ दारुहळद १ वेखंड १ खुरासणी १ ओंवा १ आल्याचा रस १ कोरफडीचा गीर १ माळकांगोणी १ गुळवेलीचें सत्व २ जमालगोटा तोळे १ मनशीळ १ पांढराचंदन १ कवचबीजाचा मगज १ लसूण, जेष्ठमध १ येणे प्रमाणें ओषधें कुटून वस्त्रगाळ करून शेळीचे दुधांत भिजवावीं. निर्गुंडीचीं पुटें तीन देऊन गोळ्या मिऱ्या प्रमाणें बांधाव्या, अनुपानें व गुण घोडाचोळीचे प्रकरणीं पाहावीं.

कामबोधरस. काळ्याधोत्र्याचें बीं तोळे ४ पारा १ गंधक १ आणि १ अफू यांची कज्जली करून धोत्र्याचे रसाच्या भावना ३ तीन देणें. गोळी वाल प्रमाण मधांत देणें. उतार निंबाचा अथवा आल्याचा रस.

सन्निपातभैरवरस. १ बचनाग १ ताम्र १ गंधक १ सोमल ४ पारा, ह्यांची एकत्र कज्जली करून निर्गुंडी आणि तुळस यांच्या रसाची भावना द्यावी. आल्याच्या रसांत तिळमात्र मात्रा द्यावी. ह्मणजे सन्निपातादिक सर्व रोग दूर होतात.

रामबाणरस. १ गंधक १ पत्रीहरताळ १ सोमल १ मनशीळ १ वंशलोचन १ कात १ हिंगूळ १ पिंपळी हीं ओषधें समभाग घेऊन नागवेलीच्या पानाच्या रसांत खल करावा. प्रहर ५ गोळी उडदा एवढी बांधावी ती कणिक आणि तूप यांत द्यावी. दिवस ७ आंबट, तेलकट, क्षार,

हीं वर्ज्य. गार पाणी पिउंन घे, ह्मणेंकरून वात, पित्त, कफ, भगंदर, मूळव्याध, गंडमाळा, श्वास, उरःक्षत, पांडु, हे रोग दूर होतात.

वातविध्वंसनरस. १पारा १गंधक १नागभस्म १वंगभस्म १लोहभस्म १ताम्रभस्म १अभ्रकनिश्चंद्र १पिंपळी १टांकणखार १सुंठ १मिरें ४॥ बचनाग हीं औषधें एकत्र करून सुंठ, मिरें, पिंपळी, यांच्या काढ्याच्या ३ भावना द्याव्या, त्रिफळेच्या ३ भावना, चित्रक, माका, आलें, निर्गुंडी, रुईचें मूळ, अक्कलकारा, फुई आंवळी, निंबू या प्रत्येकाच्या तीन तीन भावना द्याव्या. नंतर मात्रा बांधाव्या, वायु, शूळ, कफरोग, संग्रहणी, संनिपात, अपस्मार, शीत, पित्त, प्लीहोदर, कुष्ठरोग, सूतीचे बालरोग, इत्यादिकांवर ही मात्रा दोन गुंजा त्यात्या रोगांचा अनुपानें योजून द्यावी.

त्रिपुरभैरव. ४ वांफळी, ४ सुंठ, ४ मिरें, ४ टांकणखार, १बचनाग, ह्यांचें सूक्ष्म चूर्ण करून ठेवावें तें वायूवर योजावें.

वातारिरस. अफूनचा उंचा कुचल्याचें बीज नवें आणि मिऱ्यें हीं नवीं हीं औषधें समभाग घेऊन बारीक खलून गोळ्या बारीक बांधाव्या. त्यानुसत्या किंवा पाण्याशीं द्याव्या. वर विडा खावा ह्मणजे कुब्जत्व, पंगुत्व, गृध्रसीवायु, आमवायु, शूळ कफमिश्रितवायु, अवबाहुकवायु, शोफ, कंपवायु, धनानकवायु, कंबरेंतवायु, विषूची, अरुची, अपस्मार, आणि ग्रहणी. इतक्यांवर योजाव्या.

नृसिंहवडवानलरस. पिंपळमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक, लसूण, सज्जिखार, जवखार, पापडखार, त्रिफळा, ओंवा, पुनर्नवा, अजमोदा कोष्ठ, उन्हाळी, पाहाडमूळ, गोडासुरण, खारासुरण, कांडवेल, चिराईत, रेवाचिनी, जिरें, शाहाजिरें, गजपिंपळी, हीं सर्व समभाग आणि दांतीचें मूळ सर्वांच्या बरोबर, पंचलवणें, तेड, इंद्रजव, हीं सर्व समभाग घालून जेपाळ सर्वांबरोबर आणि मूळ सर्वांच्या दुप्पट घालून गोळ्या बोराच्या आंठोळी एवढ्या बांधाव्या. दररोज एकेक गोळी ऊन पाण्या-

शीं द्यावी. ह्मणजे आठ प्रकारचीं उदरें व पांच प्रकारचे गुल्म, पांडुरोग, सूज, कावीळ, तीनशेंशूळ, ८० ऐशीं वातरोग, अष्टादश कुष्टें, वीस प्रमेह अश्मरी, उदावर्त, मूत्रकृच्छ्र, मूळव्याध, अंडवृद्धि, अजीर्ण, ज्वर, कृमिदोष, विषमज्वर, इतके रोग दूर होतात.

वातराक्षसरस. पाऱ्याच्या योगानें मारून निरुत्थ झालेलें सुवर्ण १ रससिंदूर १ भाग, गंधक १ भाग, कांत १ भाग, अभ्रक १ भाग, चांगलें शुद्ध करून मारलेलें ताम्र १ भाग, हीं एकत्र करून पुनर्नवा, गुळवेल, पत्रक, निर्गुंडी, अडुळसा, ह्यांच्या रसानें तीन तीन दिवस खल करून शरावांत घालून लहानसें (७ किंवा ८ रानशेणींचें) पूट द्यावें. शीत झाल्यावर चूर्ण करून ठेवावें. हें ओषध गुंजभार अनुपान परत्वें द्यावें. तेणेंकरून वातरोग, ऊरुस्तंभ, वातरक्त, आमवायु, गात्रभंग, धनुर्वात, पक्षाघात, कंपवायु, संधिगतवायु, स्तनबाहिरी, शूळ, उन्माद, हे रोग दूर होतात.

लघुवातविध्वंसन. पारा १ भाग, गंधक पाऱ्याचे चतुर्थांश, १६ भाग, बचनाग, यांचा खल करून चित्रकाचे मुळाचे काढ्याची भावना द्यावी. अपस्मार, उन्माद, सर्वांगवायु, पक्षाघात, आमवायु, दांतखिळी, सर्वांगशैत्य, इत्यादि रोगांवर वालभर मात्रा योजावी.

कल्पतरुरस. १ शेप्यभस्म, पारा १, माक्षिक १, टांकणखार १ हिंगूळ १ मनशीळ २ गंधक शुद्ध २ ताम्र २ लोह, हीं सर्व औषधें एकत्र करून निंबाचे रसांत खल करावा. आणि सूर्य पुटें ३ तीन द्यावीं; तीन मासे बांधवीचें चूर्ण करून त्यांत मात्रा गुंज प्रमाण द्यावी. अनुपान उष्णोदक. योजलें ह्मणजे नाना प्रकारचीं कुष्टें, उदुंबर कुष्ठ, मंडल कुष्ठ, काळें कोड, पांढरें कोड जातें. व क्षयज्वर, धातुगतज्वर, ह्यांवर मध, पिंपळीशीं द्यावें. आणि शूळ, आमवात, सूतिकावात, उन्माद, पांडुरोग, यांवर हिरडे.

आणि गूळ त्यांत घ्यावा. सर्व रोगांवर आल्याच्या रसांत देणें.

लक्ष्मीविलासरस. १पारा १लोह १अभ्रक १गंधक ।. मनशीळ ।. सोनें यांची कज्जली करून त्रिफळा, क्षीरविदारी, ह्यांच्या रसानें खल करावा, तसेंच ज्येष्ठीमध, सांब्रीची साल, यांच्या काढ्याची भावना देऊन गोळा करावा. तो एरंडाच्या पानांत गुंडाळून तीन दिवस तांदळांच्या राशींत पुरून ठेवावा. नंतर चौथ्यादिवशीं काढून ठेवावें, त्याची मात्रा चार गुंजा मध आणि त्रिफळा, किंवा मध आणि पिंपळींत द्यावी, म्हणजे क्षय, कास, पांडु, गुल्मकी, व्रण, राजयक्ष्मा, हलीमक, अपस्मार इत्यादि रोग दूर होतात.

महालक्ष्मीविलास. १सुवर्ण १रौप्य १अभ्रक, १ताम्र १वंग १मंडूर कांत १लोह १नाग १मौक्तिक ह्या सर्वां बरोबर रस भस्म किंवा रस सिंदूर, सदहू औषधांची एकत्र कज्जली करून मध घालून खलावी. नंतर त्याचा गोळा करून तीन दिवस प्रखर उन्हांत वाळवावा. आणि शरावांत ठेवून पूट द्यावें नंतर चित्रकाच्या काढ्यानें आठ प्रहर खल करावा. म्हणजे तयार झालें. त्रिदोषजन्य क्षय, पांडुरोग, कामला, सर्व प्रकारचे वायु, शोफ, प्रमेह, नष्टवीर्यत्व, शूळ, कुष्ठ, अग्निमांद्य, ज्वर, श्वास, कास, इतके रोग दूर होऊन. तारुण्य प्राप्त होतें.

प्रमेहदर्पहारीरस. १रससिंदूर १रौप्यभस्म १वंगभस्म १कांतभस्म १अभ्रकभस्म सदहू औषधें खलांत घालून नागरमोथे आणि त्रिफळा, यांच्या काढ्यांत खल करावा. सर्व प्रमेहांवर दोन वाल मात्रा खडीसाखर आणि मध यांत द्यावी.

पूर्णचंद्रोदयरस. पुतळीच्या सोन्याचा कीस तोळे ४ पारा तोळे ३२ गंधक तोळे ६४ यांची कज्जली करून तांबड्या कापशीच्या फुलांच्या रसांत खल करावा. नंतर कोरफडीच्या रसांत खलावें. नंतर सात मात

कापडें केलेली कुपी घेऊन तींत ती कज्जली कुपीच्या मध्यापर्यंत भरावी. नंतर वालुका यंत्रीं ठेवून तीन दिवस अग्नि द्यावा. स्वांग शीत झाल्यावर कुपीच्या कंठाशीं जो आरक्त वर्ण रस लागतो तो काढून घ्यावा त्याचा घेण्याचा प्रकार, पूर्णचंद्रोदय तोळे ४ भीमसेनी कापुर तोळा १ जायफळ, सुंठ, मिरें, पिंपळी, लवंग, कस्तूरी, हीं तीन तीन मासे घालून विड्याचे पानाचे रसांत उडदा एवढ्या गोळ्या बांधाव्या. त्रयोदश गुण विडा तयार करून त्यांत दररोज गोळी खात जावी. ह्मणजे कशाही मदोत्थत स्त्रिया असल्या तरीं त्यांनां अकाळींच शिथिल करितो. गोळी सेवन केल्यानंतर वर आटींव दूध प्यावें. मांस भक्षण करावें, मांडे खावे. नवान्न, मिष्टान्न भक्षावें.

शंखद्राव रस. ५ सैंधव ५ सौवर्च्चल ५ बीड लवण ५ सांब्रीमीठ, १०मीठ, ५ मोरचूत पावशेर फटकी तोळे ९ व ४॥ नवसागर २। हिराकस २। टांकणखार २। सज्जिखार १९ सोरा पावशेर सर्व एकत्र करून ऊर्ध्व नलिका यंत्रानें अर्क काढावा. तो शंखद्राव. गुल्म, उदर, शूळ, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, अग्निमांद्य, संग्रहणी इत्यादिकांवर योजावा. यांत मांस नाशक गुण आहेत. आगपाणी आणि हा एकच आहे.

द्वितीयशंखद्राव. सोरा ००. तुरटी ०००९ आणि मीठ ००४॥. तीन्हीं औषधें मडक्यांत घालून त्याच्या तोंडाला सरपोस बसवून अर्क काढावा. अथवा एका कुपींत भरून तिला दुसरी कुपी जोडावी. आणि कणकीनें दोन्हीं कुपीचीं तोंडें संधित करावीं. अग्नि प्रहर भर द्यावा. तड तड वाजूं लागलें ह्मणजे चुलीवरून उतरावें. गुण पूर्वोक्त. देणें तर शंठीचे चूर्णांत किंवा पाण्यांत द्यावा.

प्रतापलंकेश्वर रस. पारा १ अभ्रक १ गंधक १ चित्रक ३ लोहभस्म ४ शंखभस्म ८ रानशेणीचें भस्म, बचनाग एकत्र करून माक्याच्या

रसांत खलून घाला प्रमाणें गोळ्या कराव्या. आणि आल्याच्या रसांत अथवा दुसरें अनुपान योजून द्यावी. ह्मणजे दांतखिळी, व प्रसूति वात, व वायुरोग, श्लेष्मरोग, अर्शोरोग, सन्निपात, ज्वर, व सर्व रोग दूर होतात.

सूतशेखररस. १ पारा १ सुवर्ण १ टांकणखार १ बचनाग, सुंठ, १ मिरें, १ पिंपळी १ धोत्र्याचें बीं १ गंधक १ ताम्रभस्म १ दालचिनी १ तमालपत्र १ वेलदाणे, १ नागकेशर, १ शंखभस्म १ वेलकाचरी, १ कचोरा सदर्हू औषधें बारीक करून माक्याच्या रसांत २१ एकवीस दिवस-खल करावा. गोळी गुंजेची बांधावी. अनुपान तूप व मध, किंवा दूध बतासा, योजावें. येणेंकरून आम्लपित्त, वांति, शूळ, गुल्म, कास, - ग्रहणी, अतिसार, गुत्त्वकी, क्षय, पित्तरोग, दूर होतात.

अग्निसूतरस. १ कपर्दिकाभस्म २ शंखभस्म पारा व गंधक यांची कज्जली ३ मिरें निंबाच्या रसांत खल करून गोळी वल्ल प्रमाण बांधावी अग्निमांद्य, ग्रहणी, शूळ, अजीर्ण, आणि प्रमेह, यांवर ताकाशीं योजावा. क्षयास खडी साखर आणि तूप यांत द्यावा. मद पिंपळींत दिला असतां ग्रहणी विकार दूर होतो.

त्रिपुरभैरव. १० गंधकतोळे १० पारातोळे १० हिंगूळ १ नवसागर १० रसकापूर ५ तुरटी सदर्हू औषधांची कज्जली करून पूर्णचंद्रोद या प्रमाणें १ भट्टी लावून रसायन तयार करावें. अग्नि सोळाप्रहर. पक्षघात वगैरे वायु उपदंशावर अनुपान योजून द्यावें.

समीरपन्नग. पारा १० गंधक १० सोमल १० हरताळ या औषधांची कज्जली करून वालुकायंत्रांत अग्नि द्यावा. हा रस, श्वास कासादि-कांवर अति प्रशस्त आहे.

पीयूषादिवटी. बचनाग १ केशर १ जायफळ १ मिरें १ जायपत्री १ ल-

वंग, १ अकूलकारा १. टेंस्याटांकणखार १. कस्तूरी मासाभर. आल्याच्या रसांत खल करून वाटाण्या प्रमाणें गोळ्या बांधाव्या. शैत्य, अजीर्ण, खोकला वगैरे वर विड्यांत द्याव्या. ज्याला थंड पाण्यानें स्नान सोसत नाहीं त्याणें सेवन केल्या असतां हितावह होतात.

गंधकरसायन. शुद्ध गंधक घेऊन त्यास गाईचे दुधाची भावना १ व त्या तुर्जीताचा काढा १ व गुळवेलीचा रस १ व हरीतकीचा काढा १ व बेहड्याचा काढा १ आंवळकठीचा काढा १ व सुंठीचा काढा १ माक्याचा रस १ यांची भावना वेगळी वेगळी १ द्यावी. शेवटीं आल्याच्या रसाची १ भावना देऊन १ माशा प्रमाणें गोळ्या करून वाळवून ठेवाव्या. आणि साखरे बरोबर गोळी द्यावी. ह्मणजे मंदाग्नि, कंडू, पामा, विषदोष, पांडुरोग, अंडवृद्धि, जीर्णज्वर, सर्व प्रमेह, वातामय, धातुक्षय, शूळ, कोष्ठगत रोग, १८ कुष्ठें, क्षय, हे रोग दूर होऊन धातूची वृद्धि होऊन बल प्राप्त होतें.

वडवानलरस. शुद्ध हरताळ भाग १ पारा १ शिंशाचें भस्म २ शुद्ध गंधक भाग २ मिरें भाग १६ यांचें चूर्ण करून तें नित्य गुंजभर घेऊन तुपांत द्यावें, ह्मणजे विषूची, सर्व प्रकारचे शूळ, प्लीहा, उदर, गुल्म, संग्रहणी, श्वास, खोकला, कफ, वायु, अग्निमांद्य, इत्यादिक सर्व रोग दूर होतात.

श्वासकुठार. पारा, बचनाग, मिरें, टांकणखार, मनशीळ, गंधक, हीं औषधें समभाग आणि मिरें आठभाग, हीं सर्व औषधें एकत्र करून, साहाभाग सुंठ, मिरें, पिंपळी, यांचें चूर्ण घालून एक प्रहर खल करावा. नंतर शरावांत घालून लहानसें पुट द्यावें. तें औषध गुंजभर विड्याचे पानाबरोबर द्यावें. ह्मणजे श्वास, कास, अग्निमांद्य, कफरोग, सन्निपात, अपस्मार, वगैरे दूर होतात.

उदयभास्कररस. १ पारा २ गंधक ८ ताम्रभस्म, २ मनशील भस्म,

३हरताळभस्म, ४मिरें २बचनाग शुद्ध हीं सारीं औषधें खलांत घालू-न निर्गुंडी, आलें, माका, व जयंती, या प्रत्येकाच्या रसांत सात सात दिवस खल करून गोळ्या उडदा एवढ्या बांधाव्या. त्या अनुपान योजून सर्व रोगांवर द्याव्या.

गर्भपाल रस. १सुंठ १मिरें १पिंपळी १दालचिनी १तमालपत्र १वेलची दाणे, १धने १जिरें शाहाजिरें १चवीक १मनुका १देवदार १शिसें भस्म १वंगभस्म १हिंगूळ शुद्ध ॥ लोहभस्म अर्धाभाग ॥ हीं सर्व औषधें एकत्र करून विष्णुक्रांताचे रसांत सात दिवस मर्दन करावें. नंतर मात्रा गुंजप्रमाण करावी, मनुकेच्या काढ्याचें अनुपान योजून द्यावी. गर्भिणीला प्रथम मासापासून नऊ महिने पर्यंत द्यावी. ह्मणजे गर्भिणीचे सर्व रोग दूर होतील.

बालसूर्योदयरस. १पारा २हिंगूळ ३गंधक ८कलखापरी २०नागभस्म ४अभ्रकभस्म हीं सदहू औषधें खलांत घालून कोरफडीचीं शंभर पुटें द्यावीं. आणि आल्याच्या रसाच्याही भावना तितक्याच देऊन माषप्रमाण गोळी करावी. ती दूध, तूप, मध, त्यांतून द्यावी, ह्मणजे सन्निपात ज्वर, जीर्णज्वर, पांडु, वांति, एकादशविध क्षय, भगेंद्र, मूळव्याध, अपस्मार, उन्माद, कावीळ, इत्यादि सर्व रोग दूर होतात.

३रा लोकनाथरस. १कपर्दिक भस्म १मंडूर ॥ तीक्ष्ण लोह ॥ पारा ॥ गंधक या औषधांची तीन दिवस कज्जली करून पुनर्नव्याच्या रसांत खलावें. नंतर कांडवेलीच्या रसाची भावना द्यावी. मग अडूळसा, सांत्वीण, चित्रकमूळ, यांच्या भावना द्याव्या. गोळा करून उन्हांत वाळवावा. सायंकाळीं शराव संपुटांत ठेवून कुक्कुट पुट द्यावें. निवाल्यावर पुनः खल करून त्याच्या बरोबरीनें मिऱ्यांचें चूर्ण घालावें. नंतर विड्याचीं पानें, आलें, माका, निर्गुंडी, शेगव्याचें मूळ, त्रिफळा, यांची-

एकेक भावना देऊन सावलींत वाळवावें. हें औषध मासाभर घेऊन मधांत घ्यावें, ह्मणजे क्षय, वात, पित्तोद्भव व्याधि, श्वास, कास, ग्रहणी, पांडु, हलीमक, हे रोग दूर होतात. आणि अग्नि प्रदीप्त होतो, व वीर्य वृद्धि ही होते.

**क्षयकुठार.** १ पारा १ गंधक १ नागभस्म १ लोह १ कांतभस्म १ तीक्ष्णभस्म १ अभ्रक १ मंडूर १ वंगभस्म १ हिंगूळ १ हरताळभस्म १ कपर्दिकभस्म १ टांकणखार १ पिंपळीचें चूर्ण हीं औषधें खलांत घालून कांटेसांबरीच्यासालीच्या काढ्यांत खलून नंतर निंबाचे रसांत खलावीं दिवस ७ नागरमोथे आणि देवदार यांच्या काढ्यांत ३ तीन दिवस खलावीं. माषप्रमाण खडीसाखर, मध, तूप, यांत द्यावीं. ह्मणजे राजयक्ष्मा, क्षय, पांडु, कामला, मधुमेह, इक्षुमेह, वातमेह, उदर, कास, श्वास, रक्तप्रदर, गुल्म, शूळ, इत्यादि रोग दूर होतात.

**चतुर्मुखरस.** १ पारा १ गंधक १ लोह १ अभ्रक ।। सोनें पावतोळा, सर्व औषधें खलांत घालून कोरफडीच्या रसांत खल करावा. नंतर त्याचा गोळा बांधून एरंडाच्या पानांत गुंडाळून तीन दिवस धान्याच्या राशीमध्यें पुरून ठेवावा. नंतर काढून सर्व रोगांवर योजावें. अनुपान त्रिफळा, मध, किंवा दुसरें चांगलेंसें योजावें, एकादशविध क्षय, पांच प्रकारचे कुष्ठ, पांडुरोग, प्रमेह, शूळ, श्वास, मेदोरोग, मंदाग्नि, हिक्का, अम्लपित्त, व्रण इतके रोग बरे होऊन शरीरपुष्टि पुत्रोत्पत्ति होत्ये.

**प्रमेहगजकेसरीरस.** १ कांतभस्म १ नागभस्म ३ वंगभस्म ४ अभ्रकभस्म, ५ शिलाजित ६ तरवडाच्या फुलांचें केशर, सर्व एकत्र करून निंबाच्या रसांत मर्दन करावें आणि मात्रा माष प्रमाण खडीसाखर तूप व मध यांशीं देणें ह्मणजे प्रमेह, अंगदाह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, सांद्रमेह, लालामेह, पित्तमेह, इत्यादि मूत्रविकार बंद होतात.

**प्रलयकालाग्निरस.** १ हिंगुळांतील पारा २ शुद्ध गंधक ३।। अभ्रक,

३॥ गोदंति हरताळ ३ मनशीळ २ टांकणखार ६ कलखापरी १ जेपाळ २ बचनाग २ हिंगूळ १ लोह १ ताम्र हीं सर्व औषधें खलांत घालून रुईच्या चिकानें खलावीं. नंतर निर्गुंडी, चित्रक, कोष्ठ, निंबू, कारली, यांच्या काढ्यानीं एकेक भावना द्यावी. नंतर त्या औषधांचा गोळा करून तांब्याच्या डब्यांत घालून मातकापड करून वालुका यंत्रांत ठेवून दोन प्रहर आंच द्यावी. निवाल्यावर काढून खलून ठेवावें. नंतर त्यांत गंधक, हरताळ, बचनाग आणि हिंगूळ हे एकेक भाग घालून पंचकोलांच्या काढ्यानें दोन प्रहर मर्दन करावें. मग दशमूळांच्या काढ्यानें तीन दिवस मर्दावें मात्रा वल्लप्रमाण करावी. अनुपान खारकेच्या बीमध्यें विषमज्वरावर सामान्यज्वरावर आल्याचा रस, इतरज्वरांवर अनुपान योजून द्यावी. दाह फार झाला तर दूधभात खावा, दहींभात ताकभात खावा. तांबूल भक्षावें, चंदनाची उटी लावावी. विहीर तळें यांत स्नान करावें.

मदनकामेश्वररस. १ पारा १ गंधक १ अफू हीं खलांत घालून नागवेलीच्या रसांत १ एक प्रहर खलावें. आणि वाल प्रमाण गोळ्या कराव्या त्यांपैकीं एक गोळी सायंकाळीं साखरे बरोबर खावी. त्यावर भोजन करूं नये, म्हशीचें दूध मात्र प्यावें. उतार निंबाचें सरबत प्यावें.

इच्छाभेदीरस. १ पारा १ टांकणखार १ मिऱ्यें १ गंधक १ सुंठ १ जेपाळ शुद्ध करून निंबाचे रसांत खल करून डब्यांत भरून ठेवावा. मात्रा वाल प्रमाण योजावी. आणि जितक्या गुळण्या घ्याव्या तितके दाच होतील. हें रेचक ज्वरादिकांवर फार चांगलें आहे.

शंखवटी. चिंचेच्या टरफलांची राख तोळे ४ पंचलवण[१] मिळून तोळे ४ हीं खलांत घालून निंबाचे रसानें भिजवावीं, नंतर शंखाचे तुकडे तोळे ४ घेऊन हातानें बारीक चूर्ण होई तोंपर्यंत तापवून ते निंबाचे रसांत विझ-

[१] पंचलवण- सैंधव, पादेलोण, बिडलोण, मीठ, बांगडखार.

द्यावे. मग सर्वांचा एकत्र खल करून मागून हिंग १ मिरें १ सुंठ १ पिंपळी १ बचनाग १. तीनमासे, पारा १. गंधक १. घालून बारीक खलावें. नंतर बोराच्या आंठोळी एवढ्या गोळ्या कराव्या. त्यांच्या सेवनें करून अग्निमांद्यापासून उत्पन्न झालेले रोग क्षणांत नाहींसे होतात. तसेंच शूळ, संग्रहणी, अजीर्ण, अरुचि, पक्तिशूळ, क्षय, इत्यादि रोग ही दूर करून ही शंखवटी आपल्या उपकारानें सर्वकाळ लोकांनें कल्याण करिते.

**प्रदररिपुरस.** पारा १ गंधक १ नागभस्म १ रसांजन ३ लोध्र ६ अडुळशाच्या पानाच्या रसांत खल करून दोन वाल प्रमाण गोळी मधांत देणें, ह्मणजे फार दिवसांचें दुःसाध्य जरी प्रदर असेल तरी आरोग्य करितें.

**बोलबद्धरस.** १ गुळवेलीचें सत्व १ गंधक १ पारा ३ रक्तबोळ, कांटेसांव्रीच्या सालीच्या काढ्यांत खलावें. त्याच्या तीन तीन माशांच्या गोळ्या बांधाव्या त्या मधांत द्याव्या, ह्मणजे प्रमेह, प्रदर, मूत्रकृच्छ्र, सुतखडा, इत्यादिक रोग बरे होतात.

**मल्लसिंदूर.** १ पारा १ रसकापूर ४ सोमल ५॥ गंधक हीं सर्व औषधें एकत्र खलून मातकापड केलेल्या कुपींत भरून वालुका यंत्रांत १६ प्रहर अग्नि द्यावा. आपाप शीत झाल्यावर रस काढून घ्यावा. हा यथायोग्य अनुपानें करून सेवन केलें असतां संपूर्ण वात व सन्निपातादिक दूर करितो.

**सूतिकाभरणरस.** सोनें, रुपें, ताम्र, प्रवाल, यांची भस्में, पारा, गंधक, अभ्रकभस्म, हरताळ, मनशीळ, सुंठ, मिरें, पिंपळी, हरीतकी, हीं समभाग घेऊन रुईच्या चिकांत खल करावा. आणि चित्रक मूळाचे काढ्यानें भावना १ पुनर्नव्याच्या रसाची भावना १ देऊन भूधर यंत्रांत गजपुट द्यावें, स्वांगशीत झाल्यावर काढून घ्यावें. यथायोग्य अनुपानाशीं अर्धगुंज द्यावें. ह्मणजे कसाहि बाळंतरोग विशेषें करून धनुर्वात

तसेच त्रिदोषोत्थ व्याधी यांतें नाश करितो पथ्य यथेच्छ द्यावें.

प्रतापाग्निकुमाररस. पारा, ताम्र, गंधक, बचनाग, सुंठ, मिरें, त्रिक्षार, पंचलवण, आल्याच्या रसांत खल करून कांचेचे कुपीमध्यें भरून वालुका यंत्रांत मंदाग्नीनें एक दिवस पचवावें, स्वांगशीत घेऊन त्यांत दशांश बचनाग घालून खल करून एक गुंज प्रमाण मात्रा आल्याच्या रसाशीं सन्निपातावर द्यावी. हा सर्व वातविकार दूर करितो.

लक्ष्मीनारायणरस. शुद्ध केलेला गंधक, टांकण खार, बचनाग, हिंगूळ, हरीतकी, अतिविष, काळा कुडा, अभ्रक, सेंधव, हीं औषधें समभाग घेऊन खलांत बारीक खलावीं आणि दांतीचे मूळांचे काढ्यांत व त्रिफळेचे काढ्यांत तीन दिवस खल करावा. आणि दोन वाल प्रमाण मात्रा आल्याच्या रसाशीं द्यावी. ह्मणजे ज्वर, सन्निपात, तरळ, विषमज्वर, अतिसार, ग्रहणी, आंव, रक्त, प्रमेह, शूळ, आणि सूतिकावात, ह्यांनें दूर करितो. पथ्य मिष्टान्न भक्षण करावें. अभ्यंगस्नान, कापूर लावलेलें पाणी, पुष्पं पिंवळाचंदन, नारळाचें पाणी, स्त्रीसंग, हीं यथेच्छ केलीं असतां ही गुण करितो.

कामेश्वररस. जायफळ, अक्कलकारा, काळ्या धोत्र्याचें बीं, जाईचीं फुलें, अफू, बचनाग, हिंगूळ, हीं औषधें समभाग घेऊन बारीक करून खसखशीच्या काढ्यांत खल करावा. एक गुंज प्रमाणें गोळी करून साखरेशीं द्यावी. ह्मणजे शतस्त्रियांशीं रतिकरण्यानें सामर्थ्य येतें.

कामदेवरस. रुपें १ हिरा २ सोनें ३ ताम्र ४ पारा ५ अभ्रक ६ गंधक ७ लोह ८ भाग हीं औषधें क्रमवृद्धीनें घेऊन कोरफडीच्या रसांत खल करून कांचकुपींत भरून मीठ भरलेल्या पात्रांत ठेवून हळू हळू अग्नि द्यावा. एक दिवस पचन झाल्यावर स्वांग शीत घेऊन रुईचे चिकाची भावना द्यावी. नंतर असगंध, कावळी, कुयली, मुसळी, तालीमखाना, त्यांच्या रसांच्या तीन-

तीन भावना द्याव्या. आणि शतावरीच्या काढ्याची १ भावना द्यावी. नंतर कस्तूरी, मिरें, कापूर, कंकोळ, इलाची, लवंग, हीं औषधें पहिल्या सगळ्या औषधांचे अष्टमांश घालून सर्व औषधांच्या बरोबरीनें साखर घालून ॥. तीन मासे औषध दोन पळें गाईचे दुधांत पचन करावें आणि दोन तोळे गाईचे दुधाशीं घ्यावें आणि मधुर आहार सेवन करावा, ह्मणजे सौंदर्य, बल, तेज, हीं वाढतात. आणि अनेक तरुणींशीं गमन केलें असतां-ही हानी होणार नाहीं.

अर्धनारीनटेश्वर. पारा, गंधक, बचनाग, शुद्ध टांकणखार, हीं सर्व एकत्र खलून सर्पाचे तोंडांत घालून मात कापड करून मृन्मय भांड्यामध्यें ठेवून खालीं, वर मीठ घालून भांड्याचें तोंड बंद करून चारप्रहर पर्यंत तीव्र अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर खलावें. एक गुंज नस्य करावें. ज्या नाकपुडींत नस्य केलें असेल त्या अर्धांगाचा ज्वर जाईल. हें कौतुकार्थ वैद्यानें करावें.

व्याधीहरण. ९ पारा ९ रसकापूर. ४॥ गंधक, याची सूक्ष्म कज्जली करून, कुपींत भरून वालुकायंत्रीं १६ प्रहर अग्नि द्यावा. नंतर काढून ठेवावा. हा रस उपदंशादि रोगांवर फार प्रशस्त आहे.

दरदसिंदूर. ९ शुद्ध पारा ९ रसकापूर ४॥ दरद. ५॥ शुद्ध गंधक या सर्वांची कज्जली करून काच कुपींत भरावी. ती वालुकायंत्रीं ठेवून क्रमवृद्धाग्नीनें १६ प्रहर पक्व करावी. नंतर स्वांग शीत झाल्यावर काढून घ्यावी. वातरोगावर नकाचें अनुपान योजून द्यावी. ह्मणजे ज्वर, सन्निपातादि रोग शांत होतात.

तालकेश्वररस. ४ हरताळ, ४ माक्षिक, ४ मनशीळ, ४ पारा, ४ टांकणखार, ८ गंधक, ८ ताम्र, त्यांची कज्जली करून साहा दिवस पर्यंत निंबाची भावना देऊन भूधर यंत्रामध्यें साहा पुटें द्यावीं, नंतर १६ सोळा तोळे लोह

भस्म घालून सर्वांचा तिसरा हिस्सा बचनाग घालून पुनः निंबाचे रसां त खलावें. याची दोन उडदा येवढी मात्रा ह्मशीच्या तुपांत देणें किंवा बावचीचें चूर्ण तोळा १ तूप व मध एकत्र करून त्यांत औषध देणें ह्मणजे सर्व प्रकारचीं कुष्ठें दूर होतात.

गलत्कुष्ठारिरस. पारा, गंधक, ताम्रभस्म, लोहभस्म, गुग्गूळ, चित्रक, शिलाजित, कुचल्याच्या बिया, त्रिफळा. हीं समभाग; अभ्रक भस्म, करंजाच्याबिया, हीं दोन औषधें चार चार भाग या प्रमाणें औषधें घेऊन बारीक करून खलांत घालून मधाची भावना १ व तुपाची भावना १ देऊन तुपाचे रावलेले भांड्यांत भरून ठेवावें. १ कर्ष प्रमाण दररोज घेतजावें. याला पथ्य शाल्योदन, दुग्ध, मधुत्रय. या प्रमाणें पथ्य केलें असतां ज्याचे कान, नाक, आंगुळ्या हीं गलत्कुष्ठानें सडलीं तरी मदनासारिखा सुंदर होईल, व हें औषध घेतल्या नंतर स्त्री संग करूं नये. आणि तो कुष्ठव्याधी फार असला तर पथ्य, पाणी, आणि भात इतकेंच करावें.

रत्नगर्भपोटलीरस. पाऱ्याचें भस्म, सुवर्णभस्म, रौप्यभस्म, नागभस्म, लोहभस्म, ताम्रभस्म, माक्षिक भस्म, प्रवाळ भस्म, शंखभस्म, हीं दाहा भस्में समभाग घेऊन सात दिवस पर्यंत चित्रकाचे रसाची भावना देऊन तें औषध पिंवळ्या कवड्यांत भरावें. मग टांकणखार रुईच्या चिकांत खलून त्याणें कवड्यांचीं तोंडें बंद करून मग लहान बोचक्यांत भरून गज पुट द्यावें. स्वांग शीत झाल्यावर काढून खलून निर्गुंडीच्या रसाच्या सात भावना देऊन व आल्याच्या रसाच्या भावना ७ आणि चित्रकाचे रसाच्या २१ भावना द्याव्या, ह्मणजे हा रस सिद्ध झाला, हा क्षयाचे निवारणार्थ मिरीं व तुपांत द्यावा, ह्मणजे आठ प्रकारचे महारोग, पांडु, ज्वर, अतिसार यांचा नाश करितो. व हा योग वा-

चाही आहे.

---

## गुटिका.

**चंद्रप्रभागुटिका.** १कचोरा २वेखंड ३नागरमोथा ४किराईत ५गुळवे-ल, ६देवदार ७हळद ८अतिविष ९दारुहळद १०पिंपळमूळ, ११चित्रक १२ध-ने. १३हिरडा १४बेहेडा १५आंवळकाठी १६चवक १७वावडिंग १८गजपिंप-ळी १९कुंद २०मिरें २१पिंपळी २२सोनामुखी २३स्वर्णमाक्षिक भस्म २४जव-खार २५साजिरखार २६सेंधव २७संचळखार २८बीडखार हीं अठ्ठावीस औषधें तीन तीन मासे प्रमाण व निशोत्तर १ दंतीमूळ २ तमालपत्र ३ दालचिनी ४ वेलची ५ वंशलोचन ६ हीं साहा औषधें एकेक कर्ष घे-ऊन साऱ्यांचें चूर्ण करावें; व लोहभस्म २ कर्ष, खडीसाखर चार कर्ष, शिला-जित ८ गुग्गुळ ८ कर्ष घ्यावा. मग हीं सारीं औषधें एका जागीं वाटून त्यां-त तें चूर्ण घालून कर्षप्रमाण ह्मणजे १२ मासे प्रमाणें गोळ्या बांधाव्या. कारण या रसायनाचे ठाई कर्ष शब्द चो हों शाणाचा[1] बोधक जाणावा. या गुटिकेला चंद्रप्रभा असें ह्मणतात. ही चंद्रप्रभा सारे रोग दूर करण्या-विषयीं विख्यात आहे. ही पासून २० प्रकारचे परेम व मूत्रकृच्छ्र व मूत्राघा-त, मुतखडा, मळबद्ध, शस्ळ, प्रमेह पिटिका, व अर्बुद व जेणेंकरून वृषण मोठा होतो तो रोग, पांडुरोग, कावीळ, हलीमक रोग, अंतर्गळ वायू, कमरे-चा शूळ, श्वास, कास, व पाय फुटतात तो, विचर्चिकारोग, कुष्ठ, मूळव्या-ध, कंडू, कयस्ट, भगंदर, दंतरोग, नेत्ररोग, स्त्रियांस धपणी लागते ती. पुरुषाचे धातुगतविकार, अग्निमांद्य, अवटणें, व वात, पित्त, कफ, यांचा-प्रकोप, हे सारे रोग दूर होतात. व ही चंद्रप्रभा बळ देणारी व रसायनी आ-हे असें जाणावें.

---

१ शाण ह्मणजे ४ मासे.

कांकायन गुटिका. १ओंवा २जिरें ३ धने ४ मिरें ५ विष्णुक्रांता, ६ अजमोदा ७ कळोजी हीं सात औषधें चार चार शाण प्रमाण व हिंग भाजून ६ शाण प्रमाण व जवखार, १ साजिखार २ सेंधव ३ संचळ खार ४ बीडखार, ५ समुद्रमीठ ६ बांगडखार ७ निशोत्तर ८ हीं आठ औषधें आठ आठ शाण प्रमाण दांती मूळ १ कचोरा २ पोखरमूळ ३ वावडिंग ४ डाळिंबसाल ५ बाळहिरडे ६ चित्रक ७ आम्लवेतस ८ सुंठ ९ हीं नऊ औषधें सोळा सोळा शाण प्रमाण घ्यावीं. मग हीं सारीं औषधें चूर्ण करून महाळुंगाचे रसांत गोळ्या कराव्या. यांना कांकायन गुटिका असें ह्मणतात. ही गुटिका तुपांत अथवा गाईचे दुधांत अथवा आंबट मद्यांत अथवा ऊन पाण्यांत, गुल्म रोग दूर होण्याविषयीं द्यावी. व ही गोळी मद्यांत घेतली असतां वात गुल्म दूर होतो. गाईचे दुधांत घेतली असतां पित्तगुल्म दूर होतो व गोमूत्रांत घेतली असतां कफ गुल्म दूर होतो. व दशमूळांचे काढ्यांत घेतली असतां त्रिदोष गुल्म दूर होतो, व उंटिणीचे दुधांत घेतली असतां स्त्रियांस रक्तगुल्म होतो तो दूर होतो. व हृद्रोग, संग्रहणी, शूळ, जलविकार, व मूळव्याध, हे रोग दूर होतात.

योगराजगुग्गूळ. सुंठ १ पिंपळी २ चवक ३ पिंपळमूळ ४ चित्रक ५ हिंग भाजून ६ अजमोदा ७ शिरस ८ जिरें ९ शाहाजिरें १० रेणुका ११ इंद्रजव १२ पाहाडमूळ १३ वावडिंग १४ गजपिंपळी १५ कुटकी १६ अतिविष १७ भारंग साल १८ वेखंड १९ मोरवेल २० हीं वीस औषधें शाण शाण प्रमाण घ्यावीं. व या औषधांचे दुप्पट त्रिफळा घ्यावी. मग हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे समभाग शुद्ध केलेला गुग्गूळ घेऊन बारीक वाटून गुळाचे पाका सारिखा पातळ करून त्यांत तें चूर्ण घालावें. मग वंगभस्म, रौप्यभस्म, नागभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, मंडूरभस्म, व रससिंदूर हीं सात भस्में पल पल प्रमाण त्या गुग्गुळांत

घालून सार्‍यांचा एक पिंड करून त्याच्या गोळ्या शाण शाण प्रमाण बांधून तुपाचे राखलेल्या मडक्यांत ठेवाव्या. याला योगराज गुग्गूळ असें म्हणतात. हा गुग्गूळ घेतला असतां त्रिदोष दूर करितो. व हें रसायन आहे व याला मैथुन, खाणें, पिणें यांचा निषेध नाहीं. पथ्य केल्यावांचून गुण येतो व यापासून सारे वायूचे रोग कुष्ठें, मूळव्याध, संग्रहणी, परमा, वातरक्त, नाभीचा शूळ, भगंदर, उदावर्त वायु, क्षयरोग, गुल्म, फेंफरें, शिरोग्रह, अग्निमांद्य, श्वास, कास, अवढणें, हे रोग दूर होतात. व हा योगराज गुग्गूळ पुरुषाचे धातूंचा विकार दूर करितो. स्त्रियांचे विटाळाचा दोष दूर करितो. व पुरुषास धातु वाढवून पुत्र देणारा होतो. व वंध्या स्त्रियानां पुत्र देतो व रास्नादिकांचे काढ्यांत घेतला असतां नानाप्रकारचे वायु दूर होतात. व काकोल्यादिकांचे काढ्यांत घेतला असतां पित्तरोग दूर होतात. आरग्वधादि काढ्यांत घेतला असतां कफ दूर होतो. दारुहळदीच्या काढ्यांत परमे दूर होतात. गोमूत्रांत घेतला असतां पंडुरोग जातो. शरीरांत मेद पुष्ट होऊन शरीर वाढलें असतां मधांत घ्यावा. कुष्टरोगास निंबाचे काढ्यांत घ्यावा. रक्तवायूवर गुळवेलीचे काढ्यांत घ्यावा, शूळ व सूज यांजवर पिंपळीचे काढ्यांत घ्यावा. उंदराचे विषावर पाडळीचे काढ्यांत घ्यावा. डोळ्यांचे रोगांवर त्रिफळेचे काढ्यांत घ्यावा, पुनर्नव्याचे काढ्यांत सारे उदर रोगांवर घ्यावा. याप्रमाणें अनुपानें जाणावीं.

गोक्षुरादि गुग्गूळ. अठ्ठावीस पळें गोखरू आणून थोडे कुटून त्यांत पाणी साहागुण घालून अर्धें पाणी राही तोंपर्यंत काढा करावा. मग शुद्ध केलेला गुग्गूळ सात पळ प्रमाण घेऊन चांगला वाटून त्या काढ्यांत घालून फिरून गुळाचे पाका सारिखा घण होई तोंपर्यंत पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचीं औषधें, येणेंप्रमाणें, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, नागरमोथे, हीं सात औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्यांत घा-

कांत मिळवून एक पिंड करून मग त्याच्या गोळ्या बांधाव्या. आणि द्याव्या तेणेंकरून परमा, मूत्रकृच्छ्र, स्त्रियांस धुपणी, लागल्येती, मूत्राघात, वातरक्त, वातरोग, धातूचा विकार, व सुतरवडा, हे रोग दूर होतात.

**कैशोरगुग्गूळ.** हिरडे १ बेहेडे २ आवळकाठी ३ गुळवेल ४ हीं चार औषधें एक प्रस्थ घेऊन थोडीं कुटून लोखंडाचे कढईंत दीड द्रोण पाणी घालून त्यांत तीं औषधें टाकून अर्धे पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा, मग शुद्ध केलेला गुग्गूळ १ प्रस्थ प्रमाण घेऊन बारीक वाटून त्या काढ्यांत मिळवून फिरून त्या लोहाचे कढयींत घालून लोहाचे पळीनें वारंवार घाटून गुळाचे पाका सारिखा घण होईतोंपर्यंत पाक करावा. त्यांत दुसरीं औषधें टांकावयाचीं तीं येणेंप्रमाणें. हरडा, बेहेडा, आंवळकाठी हीं तीन अर्ध अर्धपल प्रमाण व सुंठ, मिरें, पिंपळी, हीं तीन औषधें सहा सहा अक्षप्रमाण व वावडिंग अर्धे पळ, दांतीचें मूळ एक कर्ष, निशोत्तर १ एक कर्ष या साऱ्या औषधांचें चूर्ण करून त्या पाकांत टांकून मिळवून गोळ्याकरून मग शाण शाण प्रमाण गोळ्या बांधून तुपाचे रांधलेल्या मडक्यांत ठेवाव्या. याला केशोर गुग्गूळ ह्मणतात. हा गुग्गूळ कोमट पाण्यांत अथवा दुधांत अथवा मंजिष्टादि क्वाथ्यांत घ्यावा. व वैद्यानें या गोळ्या रोग्याचें शक्तितारतम्य व रोग तारतम्य पाहून अनुपान योजून द्यावा. तेणेंकरून सारीं कुष्टें व त्रिदोषापासून झालेलें जें वातरक्त तें, सारेव्रण गुल्म, प्रमेह, पिटिका, परमा, उदर, अग्निमांद्य, कास, सूज, हे रोग दूर होतात. व हा केशोर गुग्गूळ कांतिकारक आहे. व वासकादि काढ्यांत घेतला असतां डोळ्यांचे रोग दूर होतात. व वरुणादि काढ्यांत घेतला असतां गुल्मादिक रोग दूर होतात. खदिरादि काढ्यांत घेतला असतां व्रणरोग, कुष्ठरोग, हे दूर होतात. व आंबट, तिखट, अजीर्ण, व स्त्रीजवळ जाणें, मेहेनत करणें, ऊन घेणें, मद्यपिणें, रागें भरणें, हीं सारीं ज्यालागु-

णाची इच्छा आहे त्या मनुष्यानें वर्ज्य करून चांगलें पथ्य करावें ह्मणजे मनाजोगा गुण होतो.

संजीवनीगुटिका. वावडिंग १ सूंठ २ पिंपळी ३ बाळहिरडे ४ आंवळकाठी ५ बेहेडा ६ वेखंड ७ गुळवेल ८ भिलावा ९ बचनाग चांगलाशुद्ध करून १० हीं दाहा औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वाटून गोळ्या गुंज प्रमाण करून मग आल्याचे रसांत अजीर्णास व गुल्मरोगास, एकेक गोळी द्यावी. मोडवशीस दोनगोळ्या, सन्निपातास चारगोळ्या द्याव्या. ही गोळी मनुष्यास संजीवन करिते. ह्मणून हिला संजीवनी गुटिका असें ह्मणतात.

मरीचादिगुटिका. मिरें एक कर्ष १ पिंपळी कर्ष १ जवखार ॥ कर्ष, डाळिंबसाल २ कर्ष या चार औषधांचें चूर्ण करून आठ कर्ष गूळ घेऊन त्यांत तें चूर्ण टाकून गोळ्या तीन तीन माशांच्या करून द्याव्या. तेणेंकरून सारे कास दूर होतात. याविषयीं संशय नाहीं.

बृहत्सूरणादिवटिका. सूरण १६ भाग, वर्धारा १६ भाग, मुसळी ८ भाग, चित्रक ८ भाग, व हरडे. बेहडे, आंवळकाठी, वावडिंग, सूंठ, पिंपळी, भिलावा, पिंपळमूळ, तालीस पत्र हीं नऊ औषधें चार चार भाग व दालचिनी, वेलची, मिरें, हीं तीन औषधें दोन दोन भाग घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून त्याचे दुप्पट त्यांत गूळ घालून गोळ्या करून द्याव्या. तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होतो, व मूळव्याध, व वातकफापासून उत्पन्न झालीजी संग्रहणी ती, व श्वास, कास, क्षय, पोटांत डावेकडे कवळू रोग होतोतो, श्लीपद रोग, सूज, उचकी, परमा, भगंदर, व जेणेकरून पांढरे केंश होतात तो, पलितरोग, हे सारेरोग दूर होतात. व ह्यागोळ्या स्त्रीगमनाविषयीं इच्छा देतात, व बुद्धि देतात, व शरीराचीजरा दूर करितात.

द्राक्षादिगुटिका. गोस्तनीद्राक्षें ८०. सोनामुखी तोळे ४ सुरवारीहिरडे

तोळे ४ खडीसाखर तोळे ४ जायपत्री मासे ६ केशर मासे ३ सदहू प्रकारचे ओषधांचें चूर्ण करून द्राक्षांच्या ओलाव्यानें कर्ष प्रमाण गोळ्या बांधाव्या या पासून मलशुद्धि व मलाश्रित वायु, आम्लपित्त, पित्तवायु, हृत्शूल दीस वायु वगैरे रोग बरे होतात.

बहुशालगुड. कडुवृंदावन १ नागरमोथे २ सुंठ ३ दांतीमूळ ४ बाळहिरडे ५ निशोत्तर ६ कचोरा ७ वावडिंग ८ गोखरू ९ चित्रक १० तेजबळ ११ हीं अकरा ओषधें दोन दोन कर्ष घ्यावीं. सुरण ८ पळें, दविधारा पळें ४ व बिबे ४ पळें घ्यावे, मग हीं सारीं ओषधें थोडीं कुटून त्यांत दोन द्रोण प्रमाण पाणी घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून सान्या ओषधांचे तिप्पट गूळ घालून फिरून कढवून पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचें तें येणें प्रमाणें:-चित्रक, निशोत्तर, दांतीमूळ, हीं तीन ओषधें एकेक पल प्रमाण घ्यावीं. व सुंठ, मिरीं, पिंपळी, वेलची, आंवळकाठी, दालचिनी, हीं साहा ओषधें तीन तीन पळें घ्यावीं. मग सान्या ओषधांचें चूर्ण त्या पाकांत टाकावें. व तो थंड झाल्यावर मध १ प्रस्थ प्रमाण घालून पाकांत मिळवावी. हा बहुशाल याणें अर्श जातात.

---

## चूर्ण.

सुदर्शनचूर्णज्वरादिकांवर. हिरडा १ बेहेडा २ आंवळकाठी ३ दारूहळद ४ रिंगणी ५ मोतरिंगणी ६ कचोरा ७ सुंठ ८ मिरें ९ पिंपळी १० पिंपळमूळ ११ मोरवेल १२ गुळवेल १३ धमासा १४ कुटकी १५ पित्तपापडा १६ नागरमोथा १७ त्रायमाण १८ नेत्रवाळा १९ कडुनिंब २० पुष्करमूळ २१ ज्येष्ठमध २२ कुड्याचें मूळ २३ अजमोदा २४ इंद्रजव २५ भारंगमूळ २६ शेवग्याचें बीज २७ सोरटी माती अथवा लाही केलेली तुरटी २८ वेखंड २९ दालचिनी ३० पद्मकाष्ठ ३१ वाळा ३२ चांदरक्तचंदन ३३ अतिविष ३४ चिकणामूळ ३५ रानगांज

रानमाल ३७ वावडिंग ३८ नगर ३९ चित्रक ४० देवदार ४१ चवक ४२ पटोळपत्र ४३ जीवक, ऋषभक हे दोन मिळत नाहींत ह्मणून यांचे अभावीं विदारीकंद ४५ लवंग ४६ वंशलोचन ४७ पांढरें कमळ ४८ कांकोळी मिळत नाहीं ह्मणून तिचे अभावीं ज्येष्ठीमध ४९ तमालपत्र ५० जायपत्र ५१ तालीसपत्र ५२ हीं बावन्न औषधें समसमान घ्यावीं व साऱ्या औषधांचे निमे किराईत घेऊन साऱ्यांचें चूर्ण करावें याला सुदर्शन चूर्ण ह्मणतात. हें चूर्ण थंड पाण्यांत घ्यावें. येणेंकरून वात, पित्त, कफ, व सारे पुराणज्वर दूर होतात. याविषयीं संशय नाहीं. वातज्वर, पित्तज्वर, वातकफज्वर, पित्तकफज्वर, आगंतुकज्वर, धातुगतज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, मानसज्वर, शीतज्वर, व एकाहिकादिज्वर, हे दूर होतात. मोह, डोळ्यांवर झांपड पडते: ती, भ्रम, तृषा, श्वास, कास, पांडुरोग, व्हद्रोग, व कावीळ हे रोग दूर होतात. पाठीचा माज, पाठ, कंबर, गुडघे, कुशी, यांचा शूळ दूर होतो. याविषयीं दृष्टांत, कीं जसें दानवांचा नाश करणारें सुदर्शन चक्र आहे. तसें या साऱ्या ज्वरांचा नाश करणारें हें चूर्ण आहे असें जाणावें.

लघुगंगाधर चूर्ण. सर्वातिसारांवर. नागरमोथा १ इंद्रजव २ कोंवळें बेलफळ ३ लोध्र ४ मोचरस ५ धायटीफूल ६ या सहा औषधांचें चूर्ण करून ताकांत गूळ मिळवून त्यांत तें चूर्ण टाकून घ्यावें, तेणेंकरून सारे अतिसार दूर होतात. व प्रवाहिका ह्मणजे पातळ भस्त्रे बंद होतात. या चूर्णाला लघुगंगाधर चूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण मलाचा अवष्टंभ करणारें चांगलें आहे. असें जाणावें.

वृद्धगंगाधरचूर्ण- सर्वातिसारांवर. नागरमोथा १ टेंटू २ सुंठ ३ धायटीफूल ४ लोध्र ५ वाळा ६ कोंवळें बेलफळ ७ मोचरस ८ पाहाडमूळ ९ इंद्रजव १० कुडेसाल ११ आंब्याची कोय १२ अतिविष १३ लाजरी १४ या चौदा औषधांचें चूर्ण तांदुळांचे धुवणांत मध मिळवून घ्यावें. तेणेंकरून

नवाहिका ह्मणजे पातळ हगवण लागते ती दूर होते, सारे अतिसार व संग्रहणी हीं लवकर दूर होतात. याचूर्णाला वृद्धगंगाधरचूर्ण असें ह्मणतात, हें चूर्ण नदीचे वेगासारिखावेग अतिसाराचा असला तरी थांबवितो.

महालवंगादिचूर्ण. लवंगा तोळे २ कस्तूरी मासा १ गोरोचन मासा ०॥० चंदन २ जायपत्री २ जायफळ २ वेलदोडे ०॥० तमालपत्र २ धणे २ वाळा २ भारंगमूळ १ देवदार १ दारूहळद २ शाहासुसळी ४ ०॥० आसगंध १ केशर १ नागकेशर १ सुंठ १ मिरें १ धमासा १ काळांवाळा १ कोष्ठ १ भुईकोहळे १ सफेतसुसळी १ कमळकंद ०॥० सुवर्णमालिनी ०॥० लोहकांत ०॥० वंग ०॥० अभ्रक ०॥० मंडूर ०॥० धुवासारवर वज्जन पक्काशेर हीं औषधें एकत्र करून दररोज ६ मासे चूर्ण पावशेर दुधांत दोन वेळ घेत जावें, जीर्णज्वर, क्षय, अपस्मार, भ्रम, धातुक्षीणता, वगैरे सर्व रोग बरे होतात.

लवणत्रितयादिचूर्ण. सेंधव १ संचळ २ बीडलोण ३ साजीरवार ४ जवखार ५ बडीशेप ६ बाळंतशेप ७ वेखंड ८ अजमोदा ९ रानतुळस १० शेरणी ११ जिरें १२ शाहाजिरें १३ मिरें १४ पिंपळमूळ १५ पिंपळी १६ गजपिंपळी १७ हिंगभाजलेला १८ बाफळ्या १९ कचोरा २० पाहाडमूळ २१ कालोंजी २२ चित्रक २३ चवक २४ वावडिंग २५ अम्लवेतस २६ चिंचेची साल २७ निशोत्तर २८ दांतीमूळ २९ शतावरी ३० कडूवृंदावन ३१ भारंगमूळ ३२ देवदार ३३ अजमोदा ३४ धणे ३५ तुंबरू ३६ पुष्करमूळ ३७ बोर ३८ बाळहिरडे ३९ हीं एकूणचाळीस औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. मग त्या चूर्णास आल्याचे रसाचें पुट व महाळुंगाचे फळाचे रसाचें पुट अशीं दोन प्रकारचीं पुटें देऊन वाळवावें मग हें चूर्ण तुपांत अथवा जुन्या मद्यांत अथवा ऊन पाण्यांत अथवा बोरीचे काढ्यांत अथवा गाईचे ताकांत अथवा उंटिणीचे दुधांत अथवा दह्याचे निवळींत घालून

घ्यावें. याप्रमाणें जा अनुपानाचा ज्या रोगास उपयोग पडेल असें अनुपान योजून द्यावें. तेणेंकरून पोटांत उजवेकडेस यकृत् रोग होतो तो व डावेकडेस कवल् रोग होतो, तो, व कमरेचा शूळ, गुदरोग, कुशीचा शूळ, हृदय रोग, मूळव्याध, मलाचा अवरोध, अग्निमांद्य, गुल्म, व अष्ठीला या नामें करून वायूचा रोग आहे तो, व उदर रोग, उचकी, पोटफुगी, श्वास, कास, हे रोग दूर होतात. या औषधांचा काढा करून त्यांत तूप घालून फिरून तूप राही तोंपर्यंत कढवून गाळून तें तूप घेतलें असतां वर सांगीतले जे रोग ते येणेंकरून दूर होतात.

हिंग्वादिचूर्ण. भाजलेला हिंग १ एक, पाहाडमूळ २ बाळहिरडे ३ धनें ४ दाळिंबसाल ५ चित्रक ६ कचोरा ७ अजमोदा ८ सुंठ ९ मिरें १० पिंपळी ११ शेरणी १२ अम्लवेतस १३ रानतुळस १४ चिंचेची साल १५ जिरें १६ पोखरमूळ १७ येरबंड १८ चवक १९ साजीखार २० जवखार २१ सेंधव २२ संचळ २३ बीडलोण २४ समुद्रमीठ २५ बांगडखार २६ हीं सव्वीस औषधें कुटून चूर्ण करून तें भोजनाचे आधीं अथवा भोजनामध्यें घ्यावें अथवा बहुत दिवसांचें मद्य असेल त्यांत अथवा गाईचे ताकांत अथवा ऊन पाण्यांत घ्यावें तेणेंकरून वात कफापासून उत्पन्न झालें जें गुल्म तें, व हृद्रोग, व अष्ठीला यानामें करून पोटांत वायूचा रोग होतो तो, हृदय, बस्ति, कुशी, यांचे शूळ, योनिशूळ, मूत्रकृच्छ्र, मलबद्ध, पांडुरोग, अवढणें, उचकी, उजवेकडे पोटांत यकृत् रोग होतो तो, श्वास, कास, कंठरोग, संग्रहणी व मूळव्याध, हे सारे रोग दूर होतात. अथवा या चूर्णाला महाळुंगीचे फळाचा रस काढून सात पुटें देऊन गोळ्या करून घेतलें असतां वात कफापासून उत्पन्न झाले जे रोग ते दूर होतात.

चंदनादिचूर्ण. १ अगरउंची १ तगरउंची १ वंशलोचन १ चंदन चूर उ-

ची १ वाळा सर्व औषधांबरोबर खडीसाखर या सर्वांचें चूर्ण करून तो- न मासे नित्य दुवक्ता दुधांत द्यावें. ह्मणजे दाह, पित्त, मूत्रकृच्छ्र, आदि करून बंद होतात.

नाराचचूर्ण. पिंपळी कर्ष १ निशोत्तर ४ कर्ष, साखर १ पळ या साऱ्यांचें ए- काजागीं चूर्ण करून एककर्ष प्रमाण चूर्ण मधांत घेतलें असतां पोट फु- गी दूर होते. व मलबद्ध, उदररोग, व कफ व पित्त शूळ दूर होतात.

राजवल्लभचूर्ण. शुद्ध केलेला गंधक ४ तोळे १, सुंठ तोळे ४ हिरडे तोळे १ एक तोळा चित्रक, २ तोळे शाहाजिरें, ४ तोळे सेंधव सदहू औषधांचा निंबाच्या रसांत खल करून दोन माशांची गोळी बांधावी. ती बद्धको- ष्ठवायु, पित्त, इत्यादिकांवर योजावी.

सितोपलाचूर्ण. खडीसाखर १६ कर्ष, वंशलोचन ८ कर्ष, पिंपळी ४ कर्ष, वेलची २ कर्ष, दालचिनी १ कर्ष हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करून ठेवावें. या चूर्णाला सितोपलादिचूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण मध व तूप एकाजागीं करून त्यांत घेतलें असतां श्वास, कास, क्षय व हातापायां- चा दाह होतो तो, अग्निमांद्य, व जीर्ण शून्य पडते ती, पाठीचा शूल, अव- टणें व ज्वर, मस्तकादिकांत रक्तविकार होतो तो व पित्तविकार हे रोग दूर होतात.

तालिसादिचूर्ण. तालिसपत्र १ कर्ष, मिरें २ कर्ष, सुंठ ३ कर्ष, पिंपळी ४ कर्ष, वंशलोचन ५ कर्ष, एलची व दालचिनी, हीं दोन्ही अर्धा अर्धा कर्ष, व साखर ३२ कर्ष घ्यावी. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून घेतलें- असतां तोंडास रुचि येते. व अन्नपचन होतें. कास, श्वास, ज्वर, ओ- कारी, अतिसार, शोष, पोटफुगी, कवळ, संग्रहणी, व पांडुरोग हे सा- रे रोग दूर होतात. अथवा साखरेचा पाक करून त्यांत हें चूर्ण टाकून गोळ्या करून घेतल्या असतां चूर्णासारिखेच गुण होतात.

नारायणचूर्ण. चित्रक १ हिरडा २ बेहेडा ३ आंवळकाठी ४ सुंठ ५ मिरें ६ पिंपळी ७ जिरें ८ शेरणी ९ वेखंड १० अजमोदा ११ पिंपळमूळ १२ बडिशेप १३ रानतुळस १४ ओंवा १५ कचोरा १६ धणे १७ वावडिंग १८ कळोंजी १९ चाक २० पुष्करमूळ २१ साजीखार २२ जवखार २३ सेंधव २४ संचळ २५ बीडखार २६ समुद्रमीठ २७ बांगडखार २८ कोष्ठ २९ हीं एकुणतीस औषधें एकेक भाग, दोन भाग कवंडळी मूळ, तीन भाग निशोत्तर, तीन भाग दांतीचें मूळ, व ४ भाग पिंवळ्या निवडुंगाचें मूळ, अथवा पाला तें न मिळेल तर त्याचे अभावीं निवडुंग घ्यावें, आणि हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करावें, मग तें चूर्ण पाचनें करून व स्नेहादिकें करून ज्या रोग्याचा कोठा स्निग्ध झाला आहे, त्या मनुष्यास ढाळ होण्याविषयीं द्यावें. तेणेंकरून हृद्रोग व पांडुरोग, श्वास, कास, भगंदर, अग्निमांद्य, ज्वर, कुष्ठ, संग्रहणी, गळग्रह इतक्या रोगाचे ठाईं हें चूर्ण अनुपान योजून द्यावें. पोटफुगीवर मद्यांत घालून द्यावें, गुल्म रोगास बोरीचे काढ्याबरोबर द्यावें, मळशुद्धीस दह्याचे पाण्यांत द्यावें, अजीर्णास ऊन पाण्यांतून द्यावें, गुदाचे ठायीं कातरल्या सारिखी पीडा होत्ये तीस चिंचेच्या सालीच्या काढ्यांत, उदररोगास उंटिणीचे दुधांत अथवा गाईचे ताकांत, वातरोगास [1]प्रसन्नेबरोबर, मूळव्याधीस दाळींबाचे पाण्यांत द्यावें. तेणेंकरून हे सारे रोग दूर होतात, व हें चूर्ण तुपांत घेतलें असतां स्थावरविष, जंगमविष, हीं दोन प्रकारचीं विषें दूर होतात. या चूर्णाला नारायणचूर्ण असें ह्मणतात. या चूर्णापासून सारे दुष्ट रोग दूर होतात.

नंदपुडचूर्ण. काळें जिरें, १ डिकेमाली, १ सागरगोट्यांचा मगज १ पादेलोण, १ आंबेहळद, १ कुटकी १ सेंधव १ सदहू औषधांचें चूर्ण करून ऊष्णोदकांत द्यावें ह्मणजे सर्व प्रकारचे ज्वर दूर होतात.

---

१ मद्याचा भेद आहे.

पाचकचूर्ण. १चित्रकमूळ ॥हिंग भाजून१पिंपळमूळ १अजमोदा ॥ साजीखार ॥ सेंधव१ मीठ १सुंठ १पिंपळी १मिरें१ चवक १जवखार ॥ पादेलोण ॥ सांबरीमीठ, सदहू औषधांचें चूर्ण करून प्रथम महाळुंगाचे रसाची एक भावना द्यावी, नंतर दाळिंबाचे रसाचें एक पूट द्यावें तें अजीर्णव अग्निमांद्यावर देत जावें.

मलशुद्धीचें चूर्ण. सुरवारी हिरडेदळ तोळे २ सोनामुखी २ रेवाचिनी ॥ मिरें ॥ सुंठ १ पादेलोण ॥ १ सेंधव यांचें चूर्ण करून रात्रीं ऊन पाण्याशीं ३ तीन मासे घेत जावें ह्मणजे मल शुद्धी चांगली होते.

चोपचिनी चूर्ण. चोपचिनी पावशेर ॥ साखर तोळे ४ पिंपळी १ पिंपळमूळ १ मिरें १ लवंग १ अक्कलकरा १ खुरासनी ओंवा १ सुंठ १ वावडिंग १ दालचिनी १ सदहू औषधांचें चूर्ण करून प्रमेहावर व उपदंशावर व नंतु मेहावर व क्षीण शक्तीवर व उपदंशानें संधी धरले असतील तर द्यावें. अनुपान उष्णोदक.

आंवळ्यांची कोंचकई. इरसाल आंवळे ८०१ आणून जरा वाफ द्यावी. आणि ते वाटावे त्यांत हिंग, जिरें, मिरें, पिंपळी, सुंठ, धणे, दालचिनी, सेंधव, पादेलोण, हिरडे, मीठ, हीं बारीक करून घालावीं. आणि त्याच्या वड्या किंवा गोळ्या करून वाळवून ठेवाव्या, त्या मोठ्या रुचिकारक व पाचक आहेत.

---

## पाक.

आसगंधपाक. आसगंधाचें चूर्ण ४० तोळे, सुंठ २० पिंपळी १० मिरीं ४ दालचिनी ४ एलचीदाणे ४ तमालपत्र ४ लवंग ४ गाईचें दूध २०० मध १०० गोघृत ५० पिंपळमूळ ॥ जिरें ॥ तमालपत्र ॥ लवंग ॥ अगर ॥ वाळा चित्रकमूळ ॥ श्वेत चंदन ॥ खोबरें ॥ कमळ ॥ कुमामस्तकी ॥ वंशलोचन ॥ आंवळकाठी ॥ खैरसार ॥ कापूर ॥ धमासा ॥ पुनर्नवा ॥ अ-

जगंधा ॥ हुताशन ॥ शतावरी ॥ यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें. पाकाची कृती, असगंध, स्कंद, पिंपळी, व मिरीं, यांचें चूर्ण दुधांत घालून कालवून मंदाग्नीवर कढवून खवा करावा. मग तूप घालून भाजून गव्हांचे रव्या प्रमाणें कोरडा करावा, नंतर १२शेर साकरेची चांचणी करून त्यांत सिद्ध केलेला, खवा, व सर्व औषधांचें चूर्ण एकत्र कालवून घालावें. नंतर घांटून परातेला तूप चोळून त्यांत ओतून सारखा करून वड्या कराव्या.

गोरवरूपाक. गोरवरूचें चूर्ण ६४ तोळे, गाईचें दूध २५६ तोळे, अफू १तोळा, साकर धुवा कच्चे १६शेर, भुईकोहळा ४ कचोरा ४ स्करण ४ लाजाळू ४ मुसळी ४ नागरमोथे ४ भद्रमोथे ४ शतावरी ४ निवळीच्या बिया ४ भारंगमूळ ४ रासना ४ जिरें ४ शाहाजिरें ४ कांकडीचें बीज ४ गोरवरूचें मूळ ४ दाळिंब ४ बेलाचें मूळ ४ अर्जुन वृक्षाची साल ४ धोंटीची साल ४ सालफळी ४ बदामाचे गोळे ४ बेदाणा ४ आसंध ४ कवचबीज ४ केशर ४ बळबीज ४ खडी साखर ४ द्राक्षें ४ काळीं द्राक्षें ४ कमळाक्षांतील गोळे ४ जळपिंपळी ४ दालचिनी ४ अडूळसा ४ मोचरस ४ पुनर्नवा ४ रानउडीद ४ वेलची दाणे ४ भ्रास कापूर चारमासे, श्वेतचंदन ४ काळावाळा ४ सालमिश्री ४ चोपचिनी ४ ओंवा ४ आंकोळी ४ तालिमखाना ४ पुष्करमूळ ४ कापूर काचरी ४ देवदार ४ चित्रकमूळ ४ तमालपत्र ४ नागकेशर ४ गुळवेल ४ त्रिकटू १२ त्रिफळा १२ पिंपळमूळ ४ चवक ४ रुईचें मूळ ४ वावडिंग ४ चारोळी ४ कस्तूरी ४ शोपा ४ ज्येष्ठीमध ४ पद्मकाष्ठ ४ केळीचा कांदा ४ गुलाबाचें फूल १६ शेगव्याचीसाल ४ अक्रोड ४ लवंगा ४ लोध्र ४ कंकोळ ४ तालीसपत्र ४ रुमामस्तकी ४ शिंगाडे ४ तवकीर ४ मुरुडशेंग ४ गोडंब्या ४ काजूच्या बिया ४ रेणुकबीज ४ मंजिष्ट ४ खोबरें ४ खसखस ४ मोरवेल ४ अगर ४ वंशलोचन ४ कांकडशिंगी ४ मुंडी ४ कोशिंब ४ आहाळींव ४ महाळुंग ४ रससिंदूर ४ वंग-

भस्म ४ लोह भस्म ४ हिंगूळ ४ अभ्रकभस्म ४ माक्षिकभस्म ४ हेमगर्भ ४ वसंत मृगांक ४ या औषधांचें चूर्ण पाकांत घालावें. नंतर सुगंध द्रव्यें वड्या करायाचे पूर्वी घालावीं. तीं-चारतोळे केशराचें पाणी करून साखरेचे चाचणींत घालावें, जातुजांत १६ लवंग ४ जायफळ ४ एलचीदाणे ४ जायपत्री ४ यांचें चूर्ण वड्या करण्याचे पूर्वी घालावें. या पाकाची कृति दुधांत गोखरूचें चूर्ण घालून खवा करावा, बाकीची कृति पूर्वींसारिखीच करावी.

महाकूष्मांडपाक. पिकलेल्या कोहळ्यांचा कीस ४०० तोळे घेऊन त्यांतलें पाणी पिळून टेवावें. मग कल्हईचे पात्रांत घालून त्याला किंचित् वाफ द्यावी, नंतर गाईचे तुपांत तो कीस तळावा. त्यानंतर त्रिफळा ३ शतावरी १ कचोरा १ शोपा १ श्वेतचंदन १ वंशलोचन १ चिकण्याचें मूळ १ वावडिंग १ धणे १ मोथ १ षट्कटु ६ तालीमखाना १ आसंध १ वाळा १ अजमोदा १ निशोत्तर १ कोष्ठ १ कायफळ १ मुसळी १ गजपिंपळी १ तालीसपत्र १ जिरें १ शाहाजिरें १ द्राक्ष १ गोखरू १ वरधारा १ चित्रकमूळ १ ज्येष्ठीमध १ लवंग १ काळावाळा १ कांकडशिंगी १ पित्तपापडा १ कवचबीज १ कमळासांनीलगोले १ खारीक १ गोडंब्या १ कंकोळ १ शेरणी १ क्षयकोहळा १ जातुजांत १ जायपत्री १ सुवर्णमाक्षिकभस्म १ रौप्यमाक्षिक १ शिंगाडे १ सांवरीचा गाल १ यांचें चूर्ण वस्त्रगाळ करून घ्यावें. अभ्रकभस्म ४ ताम्रभस्म २ लोहभस्म २ धयासाखर ४०० केशर २ यांचा पाक करावा. पाकाची कृति सर्व औषधांचें चूर्ण व भस्में तळलेले कूष्मांडाचे किसांत कालवावीं. नंतर साखरेचे चाचणींत केशराचें पाणी घालून चाचणी झाली ह्मणजे तींत तो कीस घालून वाटून परातेंत थापून वड्या कराव्या त्या शक्ति पाहून दोन २ किंवा ३ तीन तोळे घाव्या, वर तांबूल भक्षावें हा पाक वृष्य व शुक्रधातू आणि रजस्वलास यांची शुद्धि करणारा व धातुवर्धक असा आहे, वात. पित्त, कफ, श्वास, जीर्णज्वर, ओकारी, प्रमेह, रक्तपित्त, आम्लपित्त, रक्त-

दोष, प्रदर, पांडुरोग, सूतिकारोग, अग्निमांद्य, मस्तकरोग, वलि, पलित, नेत्ररोग, दाह, वातरक्त, मूत्रकृच्छ्र, सर्वांगपीडा हे रोग दूर होतात.

कवच पाक. कुहिलीचे बीजांतील गोळे १२८ तोळे, गाईचें दूध २५६ गोघृत १२८ अगर २ जायपत्री २ जायफळ २ सुंठ २ लवंग २ अक्कलकरा २ जिरें २ पिंपळी २ त्रिजात ६ केशर २ कापूर मासे २ कंकोळ २ समुद्रसोखबीज २ गोडंब्या २ खुरासनी ओंवा २ वचनाग २ तालिमखाना ह्मणजे विखऱ्याचें बीं २ रससिंदूर २ नागभस्म २ वंगभस्म २ मुसळीकंद २ अजमोदा २ अफू २ हरीतकी २ मध १६ तोळे, खडीसाखर शेर १० पाकाची कृति. कवचबीज उष्णोदकानें धुवून वाळवून चूर्ण करून दुधांत घालून खवा करावा. मग गोघृत अर्धें आंत घालून भाजून तांबूस वर्ण ह्याप्रमाणें करावा, नंतर त्यांत औषधांचीं चूर्णें व भस्में घालून कालवावीं आणि साकरेची चांचणी करत्येवेळेस आंत केशराचें पाणी व तूप घालून घोटावें. तार येऊं लागली ह्मणजे त्यांत चूर्णें टाकून घोटून परातींत ओतून सारखा करून वड्या कराव्या. आणि एकेक वडी खावी. याचा गुण. काम, मेधा, धातू, कांति, व बल यांची वृद्धि करून श्वास, पांडुरोग, राजयक्ष्मा, कास, उचकी, सूज, मेद, वायुरोग धातुक्षय, खंज, बहुमूत्र, हे रोग दूर करितो.

सालंमिश्री पाक. ००।. सालंमिश्री ००९ सफेत मुसळी ४ सरांटे २ आसगंध २ तालिमखाना २ शतावरी २ अजमोदा १ केशर १ जायफळ १ जायपत्री १ लवंग १ कंकोळ १ वंशलोचन १ दालचिनी १ तमालपत्र १ नागकेशर १ बेदाणा ००।. पिस्ते ०. बदाम ९ चारोळी. यासदर्हू औषधांचा चाली प्रमाणें पाक करावा.

मुसळी पाक. ००।. मुसळीकंद चूर्ण ००१ दूध ००।. साखर १ सुंठ १ मिरें १ पिंपळी १ दालचिनी १ तमालपत्र १ नागकेशर १ शेरणी १ बडीशेप १ शतावरी १ जिरें १ ओंवा १ जायपत्री १ अजमोदा १ पिंपळमूळ १ आंवळकाठी १ कचोरा १ गोखरू १ धणे १ आसगंध १ बाळहिरडे १ मोथा १ समुद्रशोफ

लवंग १ ज्येष्ठीमध १ सांब्रीचाडीक १ शिंगाडे १ कमळाक्ष १ तवकीर १ कंकोळ १-अक्कलकारा १ वाळा १ चंदन ०।-फोलकाढलेले तीळ १ रौप्यभस्म २ अभ्रक २ लोह २ साकर सर्वांच्या दुप्पट घालून पाक करून वड्या ४ तोळ्यांच्या कराव्या. दररोज प्रातःकाळीं एक एक वडी खाऊन वर पावशेर दूध पीत जावें, ह्मणजे तेणेंकरून मंदाग्नि, गुल्म, मेद, अर्शोरोग, श्वास, कास, व्रण, क्षय, कावीळ, पांडुरोग, शुक्रदोष वगैरे दूर होतात.

बदामपाक. ०।१ बदाम ०१-खवा ००८४॥ बेदाणा ॥-लवंग ॥-जायफळ ॥-जायपत्री ॥-केशर ॥-वंशलोचन ॥-कमळाक्ष १ वेलदोडे १ दालचिनी १ तमालपत्र १ नागकेशर ।-अभ्रकभस्म ।-वंगभस्म ।॥-माक्षिकभस्म ॥-प्रवाळभस्म, ००२॥ साकर ०१।-तूप सदर्हू औषधांचीं यथायोग्य चूर्णे करून, बदाम व खवा तुपांत तळावे. नंतर साखरेची कच्ची चाचणी करून त्यांत सर्व औषधें घालून वड्या बांधाव्या आणि घेत जाव्या तेणेंकरून वीर्यवृद्धि होते, शरीर पुष्ट होतें, वातरोग दूर होतात. कोणी ज्वरांतून उठला ह्मणजे त्याच्या आंगीं शक्ति येते यास हा पाक फार उपयोगी आहे.

कुमारीपाक. ०१ कोरफडाचागीर ००२ दोनशेर साखर ००४ शेर दूध ०१।-तूप तांबड्यागाईचें १ वेळा १ लवंगा १ निम्यागोंद १ सूंठ १ समुद्रशोकाचें बीं १ जायफळ १ वंशलोचन १ केशर १ सालंमिश्री १ अक्कलकरा १ खारीक १ बदाम १ चारोळी १ विलायती ओंवा १ पुन्नाग ।-कस्तूरी तीन मासे. सदर्हू औषधांचा पाक वरचे प्रमाणें करून वड्या कराव्या. त्याच्या सेवनानें धातुवृद्धि पुष्ट होते आम्लपित्त दूर होतें.

कंदर्पपाक. ०१।-कांदे पांढरे ००२ दूध ०१-तूप ९ तोळे मध ००२ साखर १ तोळा दालचिनी १ जायफळ ॥-लवंग ॥-केशर ॥-पत्री ०००९ खोबा ००८४॥ कवचबीज ॥-ताम्रभस्म, या पाकाच्या योगानें षंढ असला तरी उत्कृष्ट वीर्यवान् होतो.

फणस पाक. ७८।. गरे ७२ साखर ७८. तूप १ तोळा लवंग १ दालचिनी १ जायफळ.।. शिसें भस्म या पाका पासून धातुपुष्टि फार होते.

पक्वाम्र पाक. ४ शेर पिकलेल्या उत्कृष्ट आंब्याचा रस ७१॥. खडी साखर ७१ तूप ४ तोळे, सुंठ १ मिरीं २ पिंपळी २ पिंपळमूळ २ नागर मोथे २ चवक २ धणे २ जिरें २ वेलची दाणे २ नाग केशर २ दालचिनी २ तालीसपत्र हीं औषधें वस्त्रगाळ करून आंब्याच्या रसाचा खवा करून त्यांत तीं औषधें मिळवून नंतर साखरेच्या पाकांत घालून वड्या बांधाव्या. त्याची मात्रा तोळे ४ दररोज भोजनाच्या आदीं भक्षावी, तेणेंकरून अरोचक, श्वास, कास, क्षय, पिनस, पडसें, प्लीहा, यकृत् इत्यादिकांचा नाश होतो. असे या पाकाचे गूण पाकावळींत लिहिले आहेत.

भूकूष्मांड पाक, भुंयकोहळ्याचे तुकडे करून कांजीत निवळत टाकावे नंतर पाण्यानें धुवून शेरभर दुधामध्यें शिजवावे, नंतर ते तुपांत तळावे. पिंवळे झाल्यावर साखरेचा पाक करून त्यांत औषधें घालावयाचीं तीं. ४ पिंपळी २ सुंठ २ मिरें २ जिरें २ आंवळकाठी २ दालचिनी १ वेलादाणे १ पत्रक २ शिंगाडे २ कचरा २ पिंपळमूळ २ चवक २ चित्रक ४ चारोळी ४ मुसळी १ लवंगा त्यांचें चूर्ण करून पाकांत घालून वड्या कराव्या. त्या तुपाशीं खाव्या. तेणेकरून रक्तपित्त, ज्वर, कास, कामला, तमकश्वास, भ्रम, ओकारी, तृषा, पंडुरोग, क्षत क्षय, अपस्मार, शिरोरोग, योनिशूळ योनिवाटे रक्तप्रवाह, अग्निमांद्य हे व्याधी दूर करून वीर्यवृद्धि, पुष्टि करितो.

नारीकेर पाक. ओले नारळ ५ फोडून पाणी निराळें ठेवावें. आणि नारळ किसून तुपांत भाजावा, त्या नारळाच्या पाण्यांत साखर ४॥ शेर घालून पाक करावा. त्यांत औषधें घालावयाचीं तीं १ असगंध १ जायफळ १ दालचिनी १ विलाची १ पत्रज १ नागकेशर १ वंशलोचन १ केशर १ लवंग.

१वेलदोडे ८कुहिलीचें बीं.८बदाम १सूंठ१जिरें १वावडिंग१चारोळी १जायपत्री हीं औषधें आंत टाकून या पाकाच्या वड्या कराव्या त्या
च्या सेवनें करून आम्लपित्त, क्षय, पांडु, अग्निमांद्य, रक्तपित्त, विष, वातरक्त, गृध्रसी, नेत्ररोग यांचा नाश होतो व हा, वाजीकरण आहे, बल्य, हृद्य, शुक्रवर्धक. इत्यादि याचे गुण आहेत.

खर्जूरपूरण पाक. खारका पक्का शेर आणून त्यांतील बिया काढाव्या आणि त्यामध्यें बादाम खाऱ्याचें बीं दुधांत वाटून भरावें वर सूतानें गुंडाळावें नंतर ६ शेर दूध घेऊन त्यांत खारका मंदाग्नीनें शिजवाव्या. दूध आटते वेळीं भांड्याचे तोंडावर फडकें बांधून त्यावर तोळाभर अफू बारीक करून विस्तरावी, त्यावर फडकें बांधून वर झांकण ठेवावें, दुधाच्या वाफेनें ती अफू द्रवित होऊन त्या दुधांत उतरत्ये. नंतर तें दूध आटवून खवा करावा. नंतर पक्का दोन शेर साखरेचा पाक करून तो पाक झाल्यावर त्यांत औषधें घालावयाचीं तीं १जायफळ १जायपत्री १ लवंग १गोखरू१दालचिनी १तमालपत्र १नागकेशर १वेलदोडे १समुद्रशोष १खुरासनीओंवा १अजवान १सफेतमुसळी १काळी मुसळी १कापूर १सालंमिश्री १कंकोळ १कवचबीज १अक्कलकरा १खसखस १लोध्र १त्रिफळा १कई कोहळे १बदाम १असगंध १पांढरी गुंज. हीं औषधें पाकांत घालून वड्या कराव्या त्या वड्या धातुक्षय, धातुस्राव, बिंदुस्राव, षंढता, अल्पवीर्यत्व, इत्यादि रोगांवर फारच प्रशस्त आहेत.

लशुन पाक. पावशेर लसूण सोलून रात्रीं ताकांत भिजत घालावा म्हणजे त्याचा उग्र गंध जातो, नंतर सकाळीं पाण्यानें धुवून घ्यावा, नंतर वाटून गोळा करून दोनदां पाण्यांत उकळावा नंतर तुपांत परतून त्यांत औषधें घालावयाचीं तीं, रास्ना, शतावरी, गुळवेलसत्व, कचोरा, सूंठ, देवदार, श्लेष्मवेल, ओंवा, चित्रक, बडीशेप, पुनर्नवा, त्रिफळा,

पिंपळी, वावडिंग हीं तोळातोळा घेऊन बारीक करून घालावीं. शीत आल्यावर त्यांत पावशेर मध घालावी. साखरेचा पाक करून त्यांत वरची औषधें घालून लेह करावा त्याची मात्रा पलप्रमाण दररोज भक्षावी, तेणेंकरून मृद्वात, अनुग्रह, आक्षेपक, कटी, ऊरु यांचा स्तंभ, सर्वांग संधित वायु हे रोग दूर होतात. हा लशुनपाक वर्ण, आयु, पुष्टि आणि बल अशीं देतो.

**अमृतभल्लातकपाक.** वाऱ्याच्या योगानें झाडावरून पडलेले बिब्बे ८८४ आणून विटकरीनें घोळसावे, नंतर धुवून वाऱ्यांत सुकत टाकावे. नंतर त्याचे तुकडे तुकडे करून चौपट पाण्यामध्यें उकळावे. चतुर्थांश उरल्यावर त्यांत बरोबरीनें दूध घालून खवा करावा. तो तुपांत परतून गोळा करावा नंतर साकरेचा पाक करून त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाटी, कापूर, जटामांशी, दालचिनी, पत्रज, वेखंड, खदीरसाल गुळवेल, चंदन, वाळा, कबाबचिनी, लवंग, मुसळी, काळी मुसळी, मोरवेल ओंवा, अजमोदा, तगर, मंजिष्ठ, गजपिंपळी, भुईकोहळा, जायफळ, रुमामस्तकी, जिरें, समुद्रशोष, मेंदालकडी, लोह, रसेंद्र, वंग, केशर, हीं तोळा तोळा घेऊन पाकांत घालून वड्या कराव्या, त्यांची मात्रा दोन दोन तोळे दररोज प्रातःकालीं भक्षावी. तेणेंकरून अष्टादश कुष्ठें, प्रदर, अग्निमांद्य, दंतसौंदर्य, सर्व वातविकार दूर होऊन वृद्धि, मेधा, आयु आणि पुष्टि ही चांगली होते.

**एरंडपाक.** ८८१ शेर एरंड्या आणून भाजून टरफलें काढावीं, त्यांतील अंतर्जिव्हा काढून मोरवावाटावे. नंतर चारशेर दुधांत घालून आटवून खवा करावा. नंतर तुपांत तळावा, साखर पक्के दोनशेर घेऊन पाक करावा, त्यांत सुंठ, मिरें, पिंपळी, दालचिनी, तमालपत्र, नागकेशर, वेखंड, पिंपळमूळ, चित्रक, चवक, गुळवेलसत्व, कचोरा, ओंवा, अजमोदा, हळद, दारुहळद, आसगंध, त्रिकणा, पाहाडमूळ, शेरणी, वावडिंग, गोखरू, कुड्या-

चीसाल, देवदार, वृद्धदारू, भुईकोहळा, हीं तोळा तोळा घेऊन चूर्ण करून या-लावीं, नंतर पाक आटवून ओतावा. वड्या कापून भांड्यांत ठेवावा. त्याची एक वडी नित्य भक्षावी. तेणेंकरून वात व्याधि, शूळ, शोथ, अंडवृद्धि, उदर, पोटफुगी, गुल्म, आमवात, कटिग्रह, उचकी, श्वास, कास, पक्षघात, पांगुल्य, आर्दितादि, वातरोग, अश्मरी, अर्शीरोग, बरे होऊन बल, वीर्य, पुष्टि, हीं होतात.

जिरेपाक. जिरें शेरभर ४ शेर दूध घेऊन त्यांत शिजवावें, त्याचा खवा करून तुपांत भाजावा नंतर दोन शेर साखरेचा पाक करून त्यांत दालचिनी, पत्रज, वेळा, नागकेशर, पिंपळी, सुंठ, जिरें, नागरमोथे, वाळा डाळिंबसाल, रसांजन, धणे, हळद, साळमिश्री, वंशलोचन, तवकीर, हीं प्रत्येक औषधें दोन दोन तोळे कुटून घालावीं, हा जिरेपाक किंवा अवलेह, प्रदर, रक्तपित्त, मुखरोग, प्रमेह, अश्मरी, जीर्णज्वर, दाह, पीनस अर्शीरोग, यांची शांति करितो.

सेवंतीपाक. कांटेशेवंतीचीं १०००० फुलें आणून तीं तुपांत तळावीं नंतर खडीसाखर दोनशेर घेऊन पाक करून त्यांत दालचिनी, पत्री वेलदोडे, नागकेशर, हीं चार तोळे, मनुका अच्छेर घ्याव्या, मध तोळे ४ गुळवेलसत्व ८ पळें घालून अवलेह किंवा पाक करावा. त्याच्या सेवनेंकरून जीर्णज्वर, श्वास, कास, क्षतकास, प्रदर, रक्तदोष, अर्श, नेत्ररोग शांत होतात.

मेथीपाक. ८०। मेथ्या ८०। सुंठ त्या दोहींचें चूर्ण करून दुधांत घालून शिजवावें, त्याचा खवा करून तो तुपांत परतावा, नंतर साखरेच्या पाकांत हीं औषधें घालावीं, मिरीं, पिंपळी, सुंठ, पिंपळमूळ, चित्रकमूळ, अजमोदा, जिरें, धणे, काकडी, बडीशेप, जायफळ, कचोरा, दालचिनी तमालपत्र, नागरमोथे, हीं औषधें पळ पळ प्रमाण घेऊन ६ तोळे सुं-

टीचें चूर्ण व ६ तोळे मिऱ्यांचें चूर्ण घालून वड्या किंवा लाडू बांधावे, त्याचें पल प्रमाण भक्षावें, तेणें करून आमवात, सर्व वातरोग, विषमज्वर, पांडुरोग, कामला, सर्व प्रमेह इत्यादि रोगांवर हा पाक प्रशस्त आहे.

कुटजावलेह. कुड्याची साल एक तुला प्रमाण घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घेऊन चवथाई पाणी राहील तोंपर्यंत काढा करून फडक्यांत घालून गाळून त्यांत गूळ तीस पलें प्रमाण घालून फिरून घट्ट होई तोंपर्यंत पाक करून नंतर त्यांत चूर्ण टांकावयाचीं तीं औषधें. येणेंप्रमाणें. रसांजन, मोचरस, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, लाजरी, चित्रक, पाहाडमूळ, लहान बेलफळ, इंद्रजव, वेखंड, भिलावा, अतिविष, वावडिंग, वाळा हीं अठरा औषधें पळपलप्रमाण घेऊन चूर्णकरून पाकांत टाकावीं व तूप एक कुडव प्रमाण टाकून पाक थंड झाल्यावर त्यांत मध एक कुडव प्रमाण मिळवावा. मग हा अवलेह शक्तीनें दुधांत अथवा ताकांत अथवा दह्यांत अथवा तुपांत किंवा पाण्यांत घ्यावा. व अन्न जिरमाणी पडलें असतां घ्यावा. आणि चांगलें पथ्य करावें, तेणेंकरून संपूर्ण मूळव्याधी लवकर दूर होतात. व दुष्टनाम आहे ज्यांचें असे भगंदरादिक रोग व अतिसार, अवटणें. वसग्रहणी, पांडुरोग, रक्तपित्त व डोळ्यांत कावीळ होते ती व आम्लपित्त, सूज, कृशता व प्रवाहिका रोग अतिसाराचा भेद आहे तो हे रोग दूर होतात.

कंटकारी अवलेह. रिंगणी एक तुला प्रमाण वजन घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राहील तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा, मग त्यांत चूर्ण घालावयाचीं तीं औषधें येणेंप्रमाणें:- गुळवेल, चित्रक, चवक, नागरमोथा, काकडशिंगी, सुंठ, मिरें, पिंपळी, धमासा, भारंगसाल, रासना, कचोरा हीं बारा औषधें पळपळ प्रमाण घेऊन चूर्णकरून त्या काढ्यांत घालावें व साखर २० पलें व तूप आठ पलें व शिरसेलतेल

०पलें हीं सारीं काढ्यांत घालून फिरून कढवून लेह करून थंड झाल्यावर त्यांत मध आठ पलें घालून मग वंशलोचन ४ पळें व पिंपळी ४ पळें यांचें चूर्ण करून त्याअवलेह्यांत मिळवून चांगलें बळकट मडकें घेऊन त्यांत तो अवलेह ठेवावा. आणि थोडा थोडा नित्य घेत जावा. तेणेंकरून उचकी व श्वास सारे, कास, दूर होतात.

आंवळ्यांचा मोरंबा. आंवळे चांगले इरसाल ०।१ एकशेर घेऊन त्यांनां कांट्यांनीं टोंचून दाबून ठेवावे. त्यांचें पाणी निघून गेलें ह्मणजे त्यांनां तुरटीचे पाण्यांत मध्यम रीतीनें शिजवावे आणि पिळून टांकावे, मग०।४ चार शेर साखरेचा पाक करून मळी काढून टाकावी आणि ते आंवळे त्या पाकांत घालून किंचित् शिजूं द्यावे. आणि पिळून घेऊन दुसरा ०।४ शेर साखरेचा पाक करून मळी काढून तो पाक सिद्ध जहाला ह्मणजे त्यांत आंवळे टाकावे व केशर ०।। तोळा घालून ठेवावा ह्मणजे मुरंबा जहाला हा चांगला पित्तशामक आणि पौष्टिक आहे.

आंब्याचा मोरंबा. आंबे चांगले इरसाल हिरवे घेऊन त्याची साल काढून दाबून ठेवावे, पाणी निघून गेलें ह्मणजे त्यांनां किंचित वाफ द्यावी व आंवळ्या सारिखा मुरांबा हाही करावा हा चांगला रुचिकर आहे.

नारळाचा शिरका. ५० शाळ्यांचें पाणी घेऊन कढईंत घालावें आणि मध्यमाग्नीनें काकवी सारिखें दाट होई तोंपर्यंत आटवावें. मग त्यांत केशर ०।। तोळा वंशपंगांचें चूर्ण १ तोळा टांकून उतरून घ्यावा. हा चांगला रक्तवृद्धि करणारा आहे व इतर औषधांच्या अनुपानाच्या उपयोगीं पडतो व पुष्टि देतो.

दाळिंबाचा शिरका. २० दाळिंबें चांगलीं पिकलेलीं रसदार अशीं घेऊन त्यांचा रस काढून कल्हईचे भांड्यांत आटवावा व आंत खडीसाखर १शेर टांकावी काकवी सारिखा दाट झाला ह्मणजे त्यांत ०।। तोळा केशर १ तोळा

एलचीची पूड घालून कुपींत भरून ठेवावा. पित्तावर व खोकल्यावर फार प्रशस्त आहे. निंबाचा शिरकाही याप्रमाणें करावा.

आल्याचा शिरका. आल्याचा रस काढून त्यांत पाणी घालावें नंतर साखर घालून पाक करावा. त्यांत केशर, एलची, जायफळ, जायपत्री, लवंग हीं घालून भरून ठेवावा. हा श्वास, कास, अग्निमांद्य, अरुचि इत्यादिकांवर प्रशस्त आहे.

आंबसोलांचा शिरका. रातांबे पिकलेले घेऊन रस काढावा त्यांत साखर घालून चांचणी करावी. हा पित्तावर फार प्रशस्त आहे.

आटरूषावलेह. अडूळशाच्या पानाला वाफ देऊन हातावर चोळून रस काढावा. त्यांत खडीसाखर घालून मधासारिखा पाक करावा. नंतर त्यांत बेहड्याचें चूर्ण व हळदीचें चूर्ण घालून ठेवावा आणि तो वरचेवर चाटीत जावा. तेणेंकरून खोकला, क्षय, कास, रक्तपित्त, श्वास हे जातात.

गुलकंद. उंच्या गुलाबाचीं पुष्पें घेऊन पाकळ्या काढाव्या त्या पुष्पांचा दुप्पट किंवा अडीज पट खडीसाखर घेऊन लाखलोट्यांत किंवा बरणींत पाकळ्यांचे व साकरेचे थरावर थर द्यावे आणि त्याचें तोंड बांधून उन्हांत टांगून ठेवावें म्हणजे पाकळ्या व साखर यांचा एकजीव होऊन गुलकंद होतो.

कंदर्पभूषणावलेह. पांढरे कांदे चांगले घेऊन त्यांना आवळ्यांप्रमाणें टोंचावे मग यत्किंचित् वाफ देऊन फडक्यानें पुसावे ते मधामध्यें टाकावे. आणि तें भांडें तोंड बांधून चुलीवर टांगून ठेवावें, ४ महिन्यानंतर काढून त्यांतील एकेक कांदा प्रातःकाळीं खात जावा. पथ्य मधुराहार चवदा दिवस खाल्यानें वीर्यवृद्धि चांगली होते व शरीरही पुष्ट होतें.

द्राक्षावलेह. द्राक्षें दुधांत वाटून तुपांत तळावीं, नंतर खडीसाखरेच्या पाकांत घालून कूष्मांडावलेहाचीं औषधें घालून भरणींत घालून ठेवावा. त्यापासून आम्लपित्त, रक्तपित्त, क्षय, पंडु, कामला, अशक्तता हे रोग दूर होऊ

न शरीर पुष्ट होतें. व अग्नि मंदीप्त होतो.

कूष्मांडावलेह. पिकलेला कोंहळा किसून गिराचें पाणी वस्त्रानें पिळून काढावे. नंतर सुकवून तुपांत परतावें, गव्हाळी रंगावर आलें म्हणजे उतरावें त्यांत बदाम तळून घालावे, खवा भाजून घालावा. आणि जायफळ, लवंग, जायपत्री, वेलदोडे, वंशलोचन, दालचिनी, तमालपत्र, नागकेशर, कमलकास ही औषधें बारीक करून चाळून एकत्र मिळवावीं. सर्व औषधांचे दुप्पट साखर घेऊन कोंहोळ्याच्या पाण्यांत पाक करावा. त्यांत केशर घालावें. चाचणी करून सर्व औषधें घालून आहाळून ठेवावें. त्या औषधांतून नित्य दोन दोन तोळे भक्षीत जावें. तेणेंकरून आम्लपित्त, दाह, भ्रम, शोष, क्षीणता, अग्निमांद्य दूर होऊन पुष्टि होते.

आर्द्रकावलेह. पावशेर आलें सोलून किसावें. नंतर थोडें तुपांत परतावें शेरभरगूळ अथवा साखर घालून पाक करावा त्यांत आल्याचा कीस टाकून त्यांत २ दालचिनी २ पत्रज २ वेळा २ नागकेशर २ लवंग २ बाळहिरडे २ भारंग मूळ. २ अडूळसा २ निंबाची साल २ देवदार २ असगंध २ जायपत्री २ जायफळ २ अगर २ मनुका हीं औषधें घालून भांड्यांत भरून ठेवावें. याच्या सेवनानें कास, श्वास, क्षय, मंदाग्नि, ह्रद्रोग, यांची शांति होते.

बिहीचामोरंबा. बिहीचीं फळें कापी काढून उकडावीं. नंतर खडीसाखरेचा पाक करून त्यांत केशर वगैरे मसाला टाकून फोडी घालाव्या हा पित्तावर फार चांगला आहे.

महाळुंगाचा मोरंबा. त्याची कृति वरचे प्रमाणें करावी हाही पित्तावर फार उपयोगी आहे.

याकुती. भांगेचे बूट ०।। अच्छेर आणून फडक्यांत घालून चांगली धुवावी. नंतर पोतडी बांधून चारशेर दुधांत टाकावी आणि तें दूध चांगलें आटवावें. त्याला विरजण लावून दहीं करून घुसळून लोणी काढून तूप

करावें. नंतर त्या तुपांत बदाम ८०॥. पिस्ते ८०॥. खवा ८०॥. खिसमीस ८०॥. चारोळी ८०॥. वगैरे न कून ८८०॥. साखरेच्या पाकांत तीं द्रव्यें घालावीं. त्यांत १ जायफळ १ जायपत्री १ वेलदोडे १ समुद्रशोषाचें फळ १ अफू १ केशर १ रुमाखुस्तकी १ कंकोळ २ सालंमिश्री २ सफेत मुसळी २ काळी मुसळी २ असकंद २ शतावरी २ कवचबीज २ गोखरू १ नागिमस्ताना १ अकलकारा १ सुंठ १ मिरें १ पिंपळी १ पिंपळमूळ हीं औषधें कुटून घालून राहिलेलें भांगीचें तूप त्यांत घालून बरणी भरून ठेवावी. ही याकुती अवलेहा सारिखी असावी. हिजपासून शुक्रस्तंभ, शुक्रवृद्धि उत्कृष्ट होते. हिला भांगीं मादकशक्ति विशेष आहे हिजवर अच्छेर दूध प्यावें. ज्याला कैफाची सवय नाहीं त्याणें हिचें सेवन करूं नये केलें तर फार थोडें करावें. उतार निंबू, ताक, भात.

---

## घृतें.

कल्याणघृत. त्रिफळा ३ हळद ४ दारुहळद ५ रेणुकबीज ६ काळीउपरसळी ७ पांढरी उपरसळी ८ बाघाटीमूळ ९ अथवारा ळे ९ रानगांजा १० रानभाल ११ देवदार १२ एलवालुक १३ तगर १४ कवंडळमूळ १५ दांतीमूळ १६ डाळिंबसाल १७ नागकेशर १८ निळेंकमळ १९ वेलची २० मंजिष्ठ २१ वावडिंग २२ कोष्ठ २३ पद्मकाष्ठ २४ जाईचीं फुलें २५ चंदन पांढरा २६ वाळीसपत्र २७ रिंगणी २८ हीं अठ्ठावीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचें चौपट पाणी घेऊन त्यांत तो कल्क व तूप एकेक प्रस्थ प्रमाण घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें, तेणें करून फेंफरें, क्षयरोग, ज्वर, उन्माद, वातरक्त, खोकला, अग्निमांद्य, पडसें, कंबरेचा शूळ, तृतीयकज्वर, चातुर्थिकज्वर, मूत्रकृच्छ्र, इसाप, पांयांला होसोतो. कंडू, पंडुरोग, सर्पादिक विषविकार, बचनागादिक विषविकार, परमा, हे रोग दूर होतात. हें तूप वांझबायकांस पुत्र देतें. व यांनु

पा पासून भूत बाधा दूर होते.

त्रिफळा घृत. हिरडा१ बेहडा१ आंवळकाठी,१ या तिहींचा आंगरस वेगळा वेगळा एकेक प्रस्थ घ्यावा. आंगरस न मिळेतर त्याचे आठगुण पाणी घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करावा त्याला आंगरस संज्ञा आहे तो रस एकेक प्रस्थ घ्यावा व अडुळशाचा रस एक प्रस्थ व माक्याचा रस एक प्रस्थ व शेळीचें दूध एक प्रस्थ हे सारे रस व दूध एकाजागीं करून त्यांत तूप एक प्रस्थ घालावें व त्यांत कल्क करून घालावयाचीं औषधें येणें प्रमाणें. १हिरडा २ बेहेडा ३ आंवळकाठी ४ पिंपळी ५ द्राक्ष ६ पांढरा चंदन ७ सेंधव ८ रिंगणामूळ ९ कांकोली १० क्षीरकांकोली या दोहोंचे अभावीं असगंध, मधाचे अभावीं ज्येष्ठीमध ११ मिरें १२ सुंठ १३ साखर १४ पांढरें कमळ १५ कमळ १६ पुनर्नवा १७ हळद १८ दारुहळद १९ ज्येष्ठीमध हीं एकोणीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तुपांत घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून तूप गाळून घ्यावें यास त्रिफळा घृत ह्मणतात. हें तूप पोटांत घेतलें असतां रातांधळे व मुंगसा सारिखे डोळे चक चक फिरून काजवे पुढें येतात तो रोग व डोळ्यां पुढें कंडू व डोळ्यांच्या रोगाचा भेद पित्त रोग व डोळ्यांतून पाणी पडतें तो रोग व डोळ्यांचे पटल रोग व डोळ्यांत तिमिर रोग होतो तो व मांसबिंदु व नेत्ररोगाचा भेद अजक रोग हे सारे रोग दूर होतात. याशिवाय दुसरे लहान मोठे राहिलेले जे डोळ्यांचे रोग तेही दूर होतात हें तूप नाकांतही घालावयाचे उपयोगीं पडतें.

कामदेव घृत. आसंध१ तुला प्रमाण व त्याचे अर्धे गोखरू घ्यावे.व रिंगणामूळ १ गुळवेल २ रानगांजा ३ विदारी कंद ४ शतावरी ५ पुनर्नवा ६ पिंपळमूळ ७ सुंठ ८ शिवणीचें फळ ९ कमळबीज १० उडीद ११ हीं अकरा औषधें दहा दहा पळ प्रमाण घेऊन थोडीं थोडीं कुटून सारीं एका

जागीं करून त्यांत पाणी चार द्रोण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणें प्रमाणें:- ज्येष्टिमध १ विदारीकंद २ आसगंध ३ हरणवेल ४ ज्येष्टीमध ५ रानमुंगी ६ रानउडीद ७ हीं जीवनीय गणाचीं औषधें जाणावीं. कोष्ठ ८ पद्मकाष्ठ ९ रक्तचंदन १० तमालपत्र ११ पिंपळी १२ द्राक्षें १३ कवचबीज १४ निळेंकमळ १५ नागकेशर १६ काळी उपरसळी १७ पांढरीउपरसळी १८ नागबळा १९ हीं एकुणवीस औषधें कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून काढ्यांत घालावा साखर दोन पळें घालावी व पांढऱ्या उंसाचा रस व तूप हीं दोन्हीं एकेक आढक प्रमाण त्या काढ्यांत घालून हलक्या अग्नीनें तूपशेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें. तेणेंकरून रक्तपित्त व उरःक्षतरोग व पंडुरोगाचा भेद हलीमकरोग व पंडुरोग व शरीराचा वर्ण फिरतो तोरोग व स्वरक्षय व वातरक्त व मूत्रकृच्छ्र व पाठीचा शूळ व डोळ्यांत कावीळ होत्ये ती व धातुक्षय व उरांत दाह होतो तो, शरीराची कृशता, शरीराचे तेजाचा क्षय हे सारे रोग दूर होतात. व हें तूप ज्यास्त्रियांस मुलें होत नाहीं त्यांस मुलें देतें, पुरुषास धातु उत्पन्न करितें, हृदयास प्रियकर होतें, बळ देतें, हें तूप रसायन आहे, याला कामदेव घृत असें ह्मणतात.

कासीसादि घृत. हिराकस १ हळद २ दारुहळद ३ नागरमोथा ४ हरताळ ५ मनशीळ ६ कपिला ७ गंधक ८ वावडिंग ९ गुग्गूळ १० मेण ११ मिरें १२ कुष्ठ १३ मोरचूत १४ पांढरेशिरस १५ रसांजन १६ शेंदूर १७ गंधाबिरोजा १८ रक्तचंदन १९ रेवरसाल, २० कडूनिंबाचीं पानें २१ करंजबीज २२ उपळसरी २३ वेखंड २४ मंजिष्ठ २५ ज्येष्ठीमध २६ जटामांशी २७ शिरस २८ लोध्र २९ पद्मकाष्ठ ३० बाळहिरडे ३१ टाकळ्याचें बीज ३२ हीं बत्तीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन चूर्ण करून ३० पळें प्रमाण तूप तांब्याचे भांड्यांत घालून त्यांत तें चूर्ण मिळवून सात दिवस उन्हांत ठेवून नंतर तें तूप आंगास लावावें, तेणेंकरून सर्व कुष्ठ

दाह, रक्तरुज, व पाय फुटतात तो विचर्चिका रोग व शिश्नास शूकरोग होतो तो विसर्परोग, वातरक्ता पासून विस्फोटक रोग होतो, मस्तकाचे फोड व उपदंश रोग ज्याला गर्मी ह्मणतात तो, नाडीत दाई जे दुष्ट व्रण होतात ते सूज भगेंद्र व सूजा हे रोग दूर होतात व हें तूप व्रणादिकांतें शोधन करितें आणि व्रणादिक भरून आणितें व जशी कांति पहिल्या होती तशी करितें.

वाजीकरण घृत. पांढऱ्या कण्हेरीच्या मुळ्या १ शेर आणून आठशेर पाण्यांत काढा करावा, चतुर्थांश उरवून त्यांत १ शेर दूध घालून त्यांत १ तोळे मोसल २ जायफळ २ जायपत्री २ केशर १ कस्तुरी घालून दूध आटवावें नंतर त्याला विरजण लावून दहीं करावें, तें घुसळून लोणी काढावें, तें लोणी कढवून तूप करून ठेवावें. तें तूप विड्याच्या पानाशीं बिंदुमात्र लावून विडा खावा. तेणेंकरून आंगांत हुशारी येऊन मंदवीर्य पुरुष असला तर सतेज होतो, आणि वीर्यस्तंभ होतो हें अनुभविक आहे.

---

## तेलें.

नारायणतेल. असगंध १ चिकणामूळ २ बेलफळ ३ पहाडमूळ ४ रिंगणी ५ मोठी रिंगणी ६ गोखरू ७ अतिबला ८ कडुनिंब ९ टेंटू १० पुनर्नवा ११ चांदवेल १२ एरंड १३ हीं तेरा औषधें दहा दहा पलें प्रमाण घेऊन थोडीं कुटून त्यांत पाणी चार द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा, त्यांत तिळांचें तेल १ आढक घालावें व शतावरीचा आंगरस १ आढक गाईचें दूध ४ आढक प्रमाण हीं त्यांत घालून नंतर त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. कोष्ट १ वेलची २ चंदन पांढरा ३ मोरवेल ४ वेखंड ५ जटामांसी ६ सैंधव ७ आसंध ८ चिकणामूळ ९ रास्ना १० बडीशोप ११ देवदार १२ रानगांजा १३ रानभाल १४ रानमुंगी १५ रानउडीद १६ तगर १७ हीं सतरा औषधें दोन दोन पळ प्रमाण घेऊन कल्ककरून

त्यांत घालून हलक्या अग्नीनें तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. याला नारायणतेल ह्मणतात. हें तेल नाकांत घालण्याविषयीं व प्यावयाविषयीं व बस्तिकर्माविषयीं योजावें. यापासून पक्षघात ह्मणजे अर्धांगवायु, हनुस्तंभ, मन्यास्तंभ, गलग्रहवायु, मांड्या, पोटऱ्या, व पाय इत्यादिकांचे ठाईं खल्ली याना नांवें करून वायु होतो तो. जा वायूनें बाहेरपणा येतो तो वायु, गतिस्तंभवायु, कटिग्रह हस्तपादादिगात्रांनें शोषण करणारा वायु, चक्षुरादिक इंद्रियांचा नाश करणारा वायु, रक्तविकार, धातुक्षय, ज्वर, क्षयरोग, अंत्रवृद्धि, व कुरंड, ह्मणजे जेणेंकरून वृषण मोठा होतो तो वायु, दंतरोग, मस्तकाचा वायु, पार्श्वशूळ, जेणेंकरून पंगुपणा येतो तो वायु, बुद्धिभ्रंश, कंबरेपासून पायांपर्यंत गृध्रसी, या नांवेंकरून वायु होतो तो व हे सारे वायु दूर होतात. याशिवाय दुसरे विषम वायु व्हान मोठे सर्वांगाचे ठाईं जे असतील तेही दूर होतात. या तेलाचे प्रभावें करून वांझ स्त्रियेला मुलें होतात, हें तेल आंगास लाविलें असतां मनुष्यास सुख होतें व हत्तीचे व घोड्याचे आंगास लाविलें असतां त्यांनाही सुख होतें. याविषयीं दृष्टांत- जसा नारायण देव दुष्ट दैत्यांचा नाश करितो तसेंच हें तेल साऱ्या वायूंचा नाश करितें.

महासुगंधतेल. कापूर १ अगर १ दालचिनी १ वोळ १ गुलछब्बू १ लाख १ कापूरकाचरी १ कचोरा १ धानकी पुष्प १ सातवीण १ एलवालुक १ तुळशीच्यां मंजुऱ्या १ पथ्थरफूल १ जटामांसी १ नागरमोथा १ एलची १ केशर १ गोरोचन १ दवणा १ विशेषधूप १ जायफळ १ कंकोळ १ सुपारी १ कस्तुरी १ तेल्या देवदार १ रेणुकबीज १ लवंग १ कोष्ठ १ वाळा १ जाईचीं फुलें १ गठोना १ नखला १ जायपत्री १ कांकडशिंगी १ कमळ १ पांचोचेतुरे १ कुंदरु अथवा कुंदाचीं फुलें १ मंजिष्ठ १ लोभा १ हीं औषधें कुटून त्यांत पाणी व तेल घालून मंदाग्नीनें कढवून सिद्ध करावें तें तेल लाविलें असतां जरा दूर होते, तेजवाढतें, बलप्राप्त होतें. कामवृद्धि होते, वंध्येस गर्भ राहातो आणि कंडु, स्वेद, विचर्चिका, मळ, दुर्गं-

धी, कुष्ट, हे रोग दूर होतात.

प्रसारिणी तेल. चांदवेल शंभर पळें वजन घेऊन त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा त्यांत तेल दह्यीं व कांजीं काढ्याचे समभाग घालून त्यांत चौपट गाईचें दूध घालावें, त्यांत कल्क करून टांकावयाचीं औषधें येणे प्रमाणें. ज्येष्ठीमध पिंपळमूळ, चित्रक, सैंधव, वेखंड, चांदवेल, देवदार, रास्ना, गजपिंपळी, भिलावे, बडीशोप, जटामांशी, हीं बारा औषधें तेलाचे अष्टमांश घेऊन कल्क करून तेलांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर गाळून तेल आंगास लावावें, तेणें करून वातश्लेष्म जन्यविकार, मनुष्य जेणें करून कुबडा होतो तो वायु, खंजवायु, जेणें करून पांगळा होतो तो वायु, गृध्रसी वायु, आर्दित वायु, हनु, पृष्ठ, शीर, ग्रीवा, व कटि यांचा स्तंभ हे सर्व वायु दूर होतात. याशिवाय दुसरे विषम वायु लहान मोठे जे असताल ते ही या तेलानें दूर होतात.

बला तेल. चिकणामूळ आठ प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत पाणी ३२ प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा; व दशमुळांचीं औषधें दहा आहेत तीं सारीं मिळून आठ प्रस्थ घेऊन त्यांत पाणी बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. कुळिस्थ, जव, बोरांच्या आंठ्या, हीं तीन औषधें वेगळीं वेगळीं आठ आठ प्रस्थ घेऊन त्या एकेकांत पाणी बत्तीस बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून वेगळे वेगळे गाळावे. मग ते पांची काढे एकाजागीं करून त्यांत गाईचें दूध आठ प्रस्थ घालून व तिळांचें तेल एक प्रस्थ घालावें. त्यांत चूर्ण टांकावयाचीं तीं औषधें येणें प्रमाणें. जीवनीयगणाचीं औषधें. ७ शतावरी ८ देवदार ९ मंजिष्ठ १० कोष्ठ ११ पथ्थरफूल १२ तगर १३ अगरू १४ सैंधव १५ वेखंड १६ पुनर्नवा १७ जटामांशी १८ पांढरी उपरसाळी

१९ काळी उपरसाळी २० तमालपत्र २१ वडीशेप २२ आसंध २३ वेलची २४ हीं चोवी-स औषधें तेलाचे चतुर्थांश घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून तेलशेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तेल गाळून घ्यावें, याला बलातेल म्हण-तात, हें तेल ज्या स्त्रियांस गर्भाची इच्छा आहे त्यांनी आंगास लावावें व ज्या पुरुषांची धातु क्षीण आहे त्यास व व्यायामादि परिश्रमें करून क्षीण आ-हेत गात्रें ज्या पुरुषांचीं त्यास व बाळंत स्त्रियांस योजावें, हें तेल विशेषें करून राजांस व सुखी मनुष्यांस योग्य आहे यापासून सारे वायुविकार दूर होतात.

लाक्षादि तेल. बोराची अथवा कुड्याची लाख २५६ तोळे घेऊन त्याला सें-त पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत मंदाग्नी लावून काढा करून गाळून घ्यावा त्यांत तिळांचें तेल ६४ व गाईचे दह्यांची निवळी २५६ घालू-न शोप १ आसंध १ हळद १ देवदार १ कुटकी १ रेणुकबीज १ मोरवेल १ कोष्ठ १ ज्येष्ठीमध १ श्वेतचंदन १ नागरमोथे १ रासना १ यांचें चूर्ण घालून मंदाग्नि लावू-न तेलशेष राही तोंपर्यंत कढवून नंतर तेल गाळून घेऊन आंगास लावावें तेणें करून सर्व विषमज्वर दूर होतात. व श्वास, कास, पडसें, व कंबरेचा व पाठीचा शूळ व वातप्रकोप व पित्तकोप, फेंपरे, उन्माद वायु, क्षय, राक्षसादि कांची पीडा, कंडू, आंगाला दुर्गंध येतो तो व शूळ, व शरीरास तिडका, हे सारे रोग दूर होतात. व गरोदर स्त्रीचे आंगास लाविलें असतां गर्भ पुष्ट होतो.

शतावरी तेल. शतावरी १ चिकणामूळ २ रानगांजा ३ चक्रभेंडीचें मूळ ४ रानभात ५ एरंडमूळ ६ आसंध ७ गोखरू ८ बेलमूळ ९ कसई १० कोरांटा ११ हीं अकरा औषधें दीड दीड प्रमाण घेऊन त्यांत पाणी चौपट घालून-चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून त्यांत तिळांचें तेल १ प्र-स्थ प्रमाण घालावें, गाईचें दूध एक प्रस्थ शतावरीचा रस १ प्रस्थ व पाणी

एक प्रस्थ हीं त्या तेलांत घालून त्यांत कल्क टाकावयाची औषधें तीं येणें प्रमाणें. शतावरी १ देवदार २ जटामांशी ३ तगर ४ चंदन पांढरा ५ बडीशेप ६ चित्रकमूळ ७ कोष्ठ ८ वेलची ९ पथ्थर फूल १० कमळ ११ ऋद्धीचे आभावीं वाराही कंद १२ मेदीचे आभावीं ज्येष्ठीमध १३ मोहाची साल १४ काकोलीचे अभावीं आसंध १५ जीवकाचे अभावीं वाराही कंद १६ हीं सोळा औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून गाईचे शेणाच्या गोवऱ्यानें मंदाग्नीनें तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून ध्यावें याला शतावरी तेल ह्मणतात, हें तेल कृष्णात्रेय ऋषीनें सांगितलें आहे पुरुषांनीं आंगास लाविलें असतां तो पुरुष स्त्रियांना नित्य प्रीतीकरून भोगितो. स्त्रियांनीं आंगास लाविलें असतां मुलें होतात. योनिशूळ, अंगशूळ, मस्तकशूळ, बंडाळ्यांत फवीळ रोग होतोतो, पंडुरोग, विषबाधा, गृध्रसी वायु, पोटांत डावेकडे गृध्रसी रोग होतोतो, शोष, पस्मा, दंडासारिखें मनुष्यास लवविते तो, दंडापतानक वायु, दाह युक्त वात रक्त, वंध्या स्त्रियांना धुपणी लागते ती, पोट फुगी, व रक्तपित्त, हे सारे रोग दूर होतात. आतां रानांतून शतावरी आणावयाचा प्रकार. नारायणी नमो ह्मणून नमस्कार करून उत्तरेकडे तोंड करून खैराचे लाकडानें या जागी खणावी व सर्व व्याधी साधनी असें ह्मणून उपटावी, कुमारजीयनी नमो ह्मणून नमस्कार करून आणून पाक करावा.

लवंगादि तेल. ५ लवंगा ५ नागर मोथे ५ वाळा ५ गुग्गूळ ५ चित्रकमूळ ५ चंदन ५ गहुला ५ कन्हेरा ५ बचनाग ५ पिंपळाची लाख ५ मंजिष्ठ ५ कुष्ठ त्यांचें वजन ५ तेल वज्जन पक्का शेर १ पाणी शेर ८ आणि मस्तु शेर १ घालून मंदाग्नीनें दोन तीन दिवस शिजवावें, तयार झालें ह्मणजे कुपींत भरून ठेवावें, हें वायु, जीर्णज्वर, क्षय, पांडु, यांजवर चांगलें आहे.

शिरस्याद्रकतेल. आल्याचा रस ८०. शेवग्याचा रस ८०. शेंडीचें दूध ८०.

पाणी शेर १ एकत्र करून तेल ०७. घालून कढवावें पाणी जळून तेल उरलें ह्मणजे गाळून ठेवावें हें तेल वायूला फार चांगलें आहे.

माषतेल. उडीद १ जव २ आळशीचें बीज ३ रिंगणी ४ कवच बीज ५ कोरांटा ६ गोखरू ७ टेटू ८ हीं आठ औषधें सात सात पळें घेऊन त्यांत पाणी सान्या औषधांचें चौपट घालून चौथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. व क्षपगाच्या सरक्या १ बोराच्या आंठ्या २ नागाचें बीज ३ कुळिथ ४ हीं चार औषधें चवदा चवदा पळें घेऊन त्यांत चौपट पाणी घालून चतुर्थांश पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा व बोकडाचें मांस एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत पाणी चवसष्ट पळें घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. मग तिळांचें तेल १ प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत सारे काढे मिळवावे. त्यांत कल्क करावयाचीं औषधें. गुळवेल, १ सुंठ २ कोष्ठ ३ रास्ना ४ पुनर्नवा ५ एरंडमूळ ६ पिंपळी ७ वडीशोप ८ चित्रकाचें मूळ ९ चांदवेल १० जटामांसी ११ कुटकी १२ हीं बारा औषधें अर्धअर्ध पळ घेऊन कल्क करून तेलांत घालून हलक्या अग्नीनें तेल शेष राही तोंपर्यंत कढवून गाळावें. हें अभ्यंग केलें ह्मणजे ग्रीवा, स्तंभ, अपबाहुक अर्धांग, आक्षेपकादि वायु जातात.

---

## अनुपानप्रकरण.

सर्व साधारण अनुपानें. सन्निपातास आल्याचा रस १ कासश्लेष्मविकारास अडुळशाचा रस व त्रिकटूचें चूर्ण २ ज्वरास व विषमज्वरास मध आणि पिंपळी ३ परतलेल्या ज्वरास किराईत व नागरमोथे व पित्तपापडा ४ संग्रहणीस ताक ५ जीर्णज्वरास मध व पिंपळी ६ जंतांस वावडिंग ७ मूळव्याधीस चित्रक व बिबवा ८ पांडुरोगास मंडूर ९ क्षयास शिलाजित. १० श्वासास भारंगमूळ व सुंठ ११ प्रमेहास आंवळकाठी हळद व शर्करा

युक्त त्रिफळा १२ तृषेस सोनें तापवून तें पाण्यांत विझवून तें पाणी १३ज्व-रास व तृषेस लोखंड तापवून पाण्यांत विझवावें तें पाणी १४त्रिदोषास आल्याचा रस व मध १५श्वासास हिंग व तूप १६आमवायूस करंज व गो-मूत्र, एरंडेल. १७ग्याहास त्रिफळा व पिंपळी १८विषांस शिरीष वृक्ष व सोनें १९कासास रिंगणी व त्रिकटू २० वातव्याधीस गुग्गूळ व लसूण व तूप. २१ रक्तपित्तास अडूळसा २२कफपित्तास व वाणी चांगली होण्यास वेखंड व अकूलकारा व मध २३ उदरास रेचन २४ वातरक्तास गुळवेल, व एरंडेल २५अर्दित वायूस उडदांचे वडे व लोणी २६मेदोरोगास मध व पाणी एकत्र करून २७मदरास लोध्र २८ अरुचीस महाळुंग अथवा डा-ळिंब २९ व्रणास त्रिफळा आणि गुग्गूळ ३०शोकास मद्य ३१ आम्लपित्तास द्राक्षें. ३२ मूत्रकृच्छ्रास शतावरी आणि कोंहळ्याचें पाणी ३३ नेत्ररोगास त्रिफळा ३४उन्मादास जुनेंतूप ३५निद्रेचा नाश झाला असतां ह्मशीचें दूध ३६कुष्ठा-स खैराचे साराचें पाणी ३७ श्वेतकुष्ठास बावंच्या आणि बोरवाडा ३८अजी-र्णास निद्रा व हरीतकी आणि उपोषण ३९अंडकारीस लाह्या ४० जत्रू-पासून वर जे वडे रोग होतात त्यांस तीक्ष्णौषधांचें नस्य ४१ पार्श्वशूला-स पुष्करमूळ ४२ मूर्च्छा रोगास शीतोपचार ४३ शरीर कृश झालें ह्मणजे मांसरस ४४मुतखड्यास शिलाजित ४५ मूत बंद झाल्यास कोंवळे मु-ळ्याचे पाल्याचा रस व सोरा एकत्र करून ४६ गुल्मरोगास वायवर्णाची-साल ४७ विद्रधीरोगास रक्तस्राव ४८ उचकीस लाखेचे रसाचें नस्य अथवा नवसागर व चुना व निंबूचा रस एकत्र करून वास घ्यावा अ-थवा १ मासा पाण्याबरोबर पोटांत द्यावें ४९ दाहास शीतविधि ५०भगं-दरास कुत्र्यानें हाड गाढवाचे रक्तांत उगाळून शंखपुष्पीचे रसांत मि-श्रित करून लावावें ५१ स्वर नीट होण्यास पुष्करमूळ मधांतून द्यावें. ५२शीतास व शैत्यास नागवेल व मिरीं. ५३

**अभ्रकभस्म.** एक गुंज अथवा ४ गुंजा भस्म मध आणि पिंपळी यांत द्यावें. ह्मणजे श्वास, कास, विषरोग, कुष्ठ, वायु, पित्त, कफ, कफक्षय, संग्रहणी, पांडुरोग, भ्रम, कावीळ, गुल्म, हे रोग दूर होतात. १ वावडिंग, सुंठ, मिरीं, पिंपळी, यांचे चूर्णांत वालभर द्यावें. ह्मणजे क्षय, पांडु, संग्रहणी, शूळ, आंव, कुष्ठ, श्वास, प्रमेह, अरुचि, कास, अग्निमांद्य, उदरसंबंधी व्यथा, हे रोग दूर होतात. आणि बुद्धि चांगली होते. व शुक्रधातुची वृद्धि होत्ये. २ वीस प्रकारचे प्रमेहांस मध, पिंपळी, शिलाजित यांत द्यावें ३ क्षयरोगास सोन्याचे वर्खांबरोबर द्यावें. ४ धातुवृद्धीस सोनें व रुपें यांचे वर्खांबरोबर द्यावें, अथवा भस्माबरोबर द्यावें. ५. रक्तपित्तास हरीतकी, गूळ, अथवा एलची दाणे, साखर यांजबरोबर द्यावें ६ क्षय, पांडु, मूळव्याध, यांस त्रिकटु, त्रिफळा, चातुर्जात, साखर, मध, यांजबरोबर द्यावें. ७ प्रमेह व मूत्रकृच्छ्र यांस एलची दाणे, गोखरू, भुयआवळी, खडीसाखर, गाईचें दूध यांजबरोबर द्यावें. ८ पुनः प्रमेहास गुळवेलीचें सत्व आणि खडीसाखर, यांजबरोबर द्यावें. ९ जीर्णज्वरास मध आणि पिंपळी यांत द्यावें १० नेत्ररोगास व धातुपुष्टीस त्रिफळाचूर्ण व तूप व मध यांत द्यावें. ११ व्रणरोगास मोरवेलीचें सत्व आणि त्रिकटूचें चूर्ण यांत द्यावें १२ बलवृद्धीस गाईचें दूध आणि क्षीरकंद यांत द्यावें. १३ मूळव्याधीस बिब्यांत द्यावें. १४ वायुरोगास सुंठ, पुष्करमूळ, भारंगमूळ, मध, आसंध यांचे चूर्णांत द्यावें. १५ श्लेष्मरोगास कायफळ, पिंपळी, मध यांत द्यावें. १६ जठराग्नि प्रदीप्त होण्यास व मूत्राघात व मूत्रकृच्छ्र व मूतखडा यांस सर्व क्षाराबरोबर द्यावें. १७ धातुस्तंभास भांगेंत १८ धातुवृद्धीस लवंग आणि मध यांत द्यावें. १९ पित्तास गाईचें दूध आणि साखर यांत द्यावें २० याशिवाय दुसरे रोग राहिले त्यांत युक्तीनें अनुपान योजून द्यावें. २१ यास पथ्य क्षार, आम्ल, द्विदल, कांकडी, कारलें, वांगें, कलिंगड, तेल हे पदार्थ बहुधा वर्ज्य करावे.

अश्विनीकुमाराची मात्रा. याच्या गोळ्या चण्याबरोबर कराव्या. तिडक्या परम्यांस ओंव्याबरोबर द्यावी. १ पिवळे परम्यास हळदींत २ पुरुषत्व येण्यास मधांत ३ ज्वरास सुंठीबरोबर ४ प्रमेहास तुळशीचे रसांत ५ पित्तवायूवर तांबूल आणि पिंपळींत द्यावी. ६ शीतज्वरास कापशीचे पाल्याचे रसांत ७ वायूस व शेंस्यास पिंपळमूळाबरोबर ८ मस्तकशूळास निंबाचे रसांत द्यावी. आणि मस्तकास लेप करावा. ९ एकाहिकज्वरास सुंठ, साखर, तुळशीचारस यांत द्यावी. १० त्र्याहिकज्वरास जिरें, गिरें, आणि तुळशीचा रस यांत द्यावी. ११ चातुर्थिकज्वरास माक्याचे रसांत द्यावी. १२ प्याह्यावर व उदरसंबंधी रोगावर इंद्रवारुणीच्या रसांत अथवा पिकलेल्या फळांतील गिरांत द्यावी. १३ जीर्णज्वरास खडीसाखरेंत १४ संताप झाला असतां पाण्यांत लेप करावा १५ श्वासरोगास सैंधवाबरोबर द्यावी. १६ मुखदुर्गंधीस दालचिनींत १७ कावेचे गंधारा कापशीच्या रसांत १८ बुद्धि वाढण्यास ब्राह्मीचे रसांत १९ रक्तातिसार व आमातिसार यांस जायफळाच्या काढ्याबरोबर २० शरीर पुष्ट होण्यास बदामाचे गोळ्यांत २१ जहरबाजरोगास निंबाचे पाल्याचे रसांत २२ सूतिकारोगास हळद व बाळंतबोळ व तूप यांत देणें. २३ स्वर चांगला होण्यास भांगेबरोबर द्यावी. २४ अस्थिगतज्वरास साखरेबरोबर देणें २५ पोटशूळास केळीचे कांद्याचे रसांत द्यावी. २६ नेत्रांस अधिक तेज येण्यास जायफळाबरोबर २७ बिंदुकुशादरोगास रेवाचिनींत २८ पंगुवायूस चित्रकाबरोबर २९ मूळव्याधीस टांकणखारांत ३० तृष्णारोगास दूर्वांच्या रसांत द्यावी. ३१ पित्तरोगास हरीतकी, सुंठ, साखर यांत ३२ पिशाचबाधेस गोळी उदवून गळ्यांत बांधावी ३३ चूर्ण, काढा, हिम, स्वरस, लेह इत्यादिक अनुपानें ज्या रोगास जीं योग्य असतील तशीं योजून द्यावी.

गंधक. शुद्ध करून त्याचें चूर्ण १ माशापासून १० मासे पर्यंत घ्यावें. मस्तकाचे व्रणावर व मस्तक शूळावर जवांचे कांजींत लेप करावा १ नासाशोषावर अर्कलावावा २ नेत्ररोगास त्रिफळ्यांत घ्यावा. ३ डोळ्यांतील फुलास मध अथवा तूप किंवा केळीचे कांद्याचा रस यांत अंजन करावें ४ कासरोगास गाईचें तूप व मिरीं अथवा पिंपळींत घ्यावें. ५. श्वासास रिंगणीचीं फळें व तूप यांत घ्यावें ६ स्वरभंगास मध व पिंपळींत घ्यावें. ७ हृदयशूळावर नागवेलीचे रसांत घ्यावें. ८ मोडशीवर जंबीर निंबाचे रसांत घ्यावें. ९ अजीर्णास आंवळकाठीचे चूर्णांत घ्यावें. १० संग्रहणीवर सुंठ आणि तूप यांत घ्यावें. ११ खरूज इत्यादिकांस तेलांत १२ मेहास गुळांत घ्यावें. १३ कुष्ठरोगास कडुनिंबाचे पंचांगाबरोबर घ्यावें. १४ व्रणास तुपांत. १५ ज्वरास बावच्याचे काढ्यांत १६ वायूस तुळशीच्या रसांत व तुपांत. १७ पित्तास, गोघृतांत १८ कफास सूंठ आणि सुंठ यांत १९ अजरामर व्हावयास एक टांकापासून एक तोळापर्यंत एक कर्ष अश्वमूत्र, अजामूत्र, सुंठ, गाईचें दूध, तूप यांत घ्यावें. २० श्वासास कासविंद्याचा रस अथवा आल्याचा रस व मध यांत देणें २१ ऋतु येत नसल्यास कोरकंडाचें मूळ आणि तूप यांत देणें. २२ जरा दूर होण्यास हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, माका यांचें चूर्ण समभाग करून त्यांत एक कर्ष घ्यावें. २३ महारोगास एक महिना २४ सर्व रोगांस सहा महिने घ्यावें २५ अष्टदश कुष्ठें व विषें यांस गंधक, पारा, निर्गुंडीचे रसांत खलून लावावा. २६ गलत्कुष्ठास गंधकाचें तेल लावावें. २७ विविधविषांवर पुनर्नव्यांत २८ नेत्ररोगास त्रिफळा, माका, मध आणि तूप यांत देणें. २९ शुद्ध गंधक पळें ५ माक्याचा रस १५ पळें एकत्र खलून घालवावा. त्याचे निमे हरीतकीचें चूर्ण आंत घालून एकत्र करून ठेवावें. तें चूर्ण मध आणि तुपांत २ महिनें घ्यावें, जरा दूर होऊन सामर्थ्यवान् हो-

ईल. ३० कुष्ठांवर तेलांत द्यावें आंगावर थंडपाणी शिंपीत जावें. ३१ गंधक १६ त्रिकटु ३ चूर्ण करून फडक्यावर पसरून त्याचा कांकडा करून तेलांत १ प्रहर भिजवावा नंतर चिमट्यानें उलटा धरून लावावा, त्यानें तेल पडेल तें ठेवावें. त्यांतील तेल ३ बिंदु व शुद्ध पारा १ वाल एकत्र करून मर्दून गोळी करावी, ती दिली असतां कास, श्वास, अर्शरोग, संग्रहणी, आंव यांतें दूर करिते. ३२ प्रथम वमन रेचनादि पंच कर्मे करून शरीर शुद्ध झाल्यानंतर गंधकाचें चूर्ण सेवन करावें त्याचा प्रकार. एरंडेलांत व त्रिफळा आणि गूळ यांत अथवा पाऱ्याचें भस्म १ मासा यांजबरोबर द्यावें. त्याचा गुण अर्श, भगंदर, दंतरोग, मंददृष्टि, धातुक्षय, हे रोग दूर होऊन यौवन प्राप्त होईल. व दिव्य दृष्टि होईल व दांत बळकट होतील १ एक वर्ष सतत घेतला असतां त्याचे मुतानें तांब्याचें सोनें होईल ३३ सर्व रोगांस अर्कक्षीर व स्नुहिक्षीर यांत वस्त्र भिजवावें नंतर गंधकाचें चूर्ण लोण्यांत खलून त्याचस्त्रास लेप करून कांकडे करावे. मग कांकडा दिव्यावर पेटवून प्याल्यांत उलटा धरावा जें तूप खालीं पडेल तें अनुपान योजून द्यावें. ३४ कुष्ठादिरोगांवर वाहव्याचे मुळाचे रसांत गंधक गाळून लेप करावा, अथवा १ तोळा गंधकाचें चूर्ण तेलांत प्यावें. आणि मिरीं व तेल व आघाड्याचा रस एकत्र मर्दून आंगास लावून उन्हांत बसावें, दोन प्रहरीं व रात्रीं ताक भात खावा. जागरण करावें प्रातःकाळीं म्हशीचें शेण लावून थंड पाण्यानें स्नान करावें.

घोडाचोळीची मात्रा. वातशूळ, कास, श्वास, राजयक्ष्मा म्हणजे क्षय यांस एक गोळी आल्याचा रस व पिंपळी आणि मध यांत द्यावी. अथवा मुळ्याच्या पाल्याच्या रसांत १ बलीपलिक रोगास मधांत देणें २ ज्वर व शूळ यांस शेगव्याच्या मुळांचा रस व गाईचें तूप यांत द्यावें ३ अजीर्णास दह्याचे निवळींत अथवा निर्गुंडीचे रसांत ४ शीतज्वरास कमळाचे पा-

त्याचा रस अथवा कमळबीज यांत ५ पांडुरोगास पुनर्नव्यांत ६ नेत्ररोगास निळपर्णीचे रसांत अंजन करावें. ७ पित्तज्वरास जिरें आणि साखर यांत ८ विषांस धुवणांत ९ अस्थिगत वायूस वेखंड व देवदार व कोष्ठ यांचे काढ्यांत १० पुरुषत्व येण्यास गोमूत्रांत ११ विरेचनास आल्याच्या रसांत १२ मूळव्याधीस जायफळांत १३ मूल होण्यास पुत्रजीवाच्या रसांत १४ सर्पविषास शिरीष वृक्षाचे रसांत अथवा गोघृतांत किंवा तांदुळज्याच्या रसांत अथवा निंबाचे रसांत लेप करावा. १५ वायूनें कंबर धरली तर त्यास वेखंड आणि ओंवा यांत १६ श्वासकासास अडुळशाचा रस व मध यांत १७ ज्वरास तुळशीचे रसांत अंजन करावें. १८ नित्यज्वरास कोरफडीचे रसांत १९ राताधळ्यास स्त्रीचे दुधांत अंजन करावें. २० अजीर्णज्वरास माक्याच्या रसांत २१ वेलाज्वरास आंवळकाठी बरोबर २२ पित्तज्वरास जिऱ्याबरोबर २३ दाहयुक्त पित्तज्वरास आंवळकाठी बरोबर २४ वातशूळास त्रिकटूचे चूर्णांत २५ सर्व शूळांस शेगव्याचा रस वतूप व मध यांत द्यावी. २६ महाव्याधीस पिंपळमूळाचे चूर्णांत २७ कासास थंड पाण्याबरोबर २८ पीनस व कर्णरोग व शिरोरोग व अर्धशिशी यांस जायफळाबरोबर २९ दांतांचे किडीस वावडिंगांचे चूर्णांत गोळी वाटून गोळी करून दांताखालीं धरावी ३० प्रसूतिवायूस तुळशीचा रस व मध, कोरफडीचा रस अथवा दुसरें अनुपान योजून द्यावी. ३१ संग्रहणीस जायफळ अथवा ह्मशीचें मूत अथवा ताकाची निवळी यांत ३२ अतिसारास गोमूत्रांत अथवा दह्यांत ३३ वांती होण्यास एरंडबीजा बरोबर ३४ विषास पिंपळी अथवा अक्कलकाऱ्यांत ३५ मंदाग्नीस टांकणखार अथवा कासविंद्याचा रस यांत ३६ ऊर्ध्वश्वासास त्रिफळेंत ३७ बुद्धी चांगली होण्यास ब्राह्मीचे रसांत.

३८ रोग न व्हावा अशी इच्छा आहे त्याणें नित्य भक्षावी ३९ वरि पडिल रोगास दुधीचे रसांत अथवा मधांत ४० कांतिवाढण्यास तांबूला बरोबर ४१ मस्तकव्यथेस त्रिकटु अथवा जवखारांत ४२ शीतज्वरास धत्तूरबीज अथवा जिरें यांजबरोबर ४३ सन्निपातास ओंव्या बरोबर ४४ पंचगुल्मास मोठे दुधीचे रसांत अथवा निर्गुडीचे रसांत अथवा चुन्यांत ४५ वायूस तुपांत अथवा शेळीचे दुधांत ४६ मुखरोगास कोरांट्याबरोबर ४७ सर्ववायूस त्रिफळेंत अथवा माक्याच्या रसांत अथवा आसंध व मध यांत अथवा ओंवा व विजया यांज बरोबर ४८ धनुर्वातास कुहिलीचे मुळांत ४९ प्रमेहास गाईचे दह्यांत अथवा भुयकोंहळीचे रसांत ५० धातुविकारास गोखरूंत ५१ धातुवृद्धीस तुपांत ५२ पूपरम्यास निर्गुडीचे रसांत अथवा शेळीचे मुळांत ५३ निडकपरम्यास सुपारीचे रसांत ५४ खांडुकास गुळांत ५५ दाळ होण्यास एरंडेलांत ५६ विंचवाचे विषास आल्याचे रसांत लेप करावा. ५७ घाम फार येत असल्यास माक्याच्या रसांत ५८ स्वर पडत असल्यास शेळीचे दुधांत ५९ भूतसंचारास निंबाचे रसांत अथवा निर्गुडीचे रसांत अंजन करावें ६० पित्तास आंवळकाठी व साखरेंत. ६१ उदरास त्रिफळेचें चूर्ण व एरंडेल यांत ६२ ज्वरास व उन्हाळे लागतात त्यांस उतारीचे रसांत ६३ सुजेस कांद्याचे रसांत अथवा माक्याचे रसांत अथवा मांग्रीचे रसांत किंवा साली बरोबर ६४ पांडुरोगास वरधान्या बरोबर अथवा पेजेंत ६५ डोळे दुखतात त्यांस कोलिस्त्या बरोबर ६६ सामर्थ्य येण्यास नागवेलीचे रसांत ६७ सर्व उदरास पिळूचे रसांत ६८ पित्तवायूस जिरें व मध यांत ६९ धातुस्तंभनास बचनाग अथवा अज्वान अथवा रुई यांबरोबर ७० दुर्गंधीस चांफ्याचे रसांत ७१ गर्भधारणास गोपीचंदन, नवकीर,

आणि सुंठ यांजबरोबर अथवा गोखरू बरोबर ७२ कृमिविकारास करंजाचे सालीचे रसांत ७३ शरीर बळकट होण्यास दुधीचे रसांत ७४ जरा दूर होण्यास नागरमोथ्याचे रसांत ७५ स्वर चांगला होण्यास विडयांत ७६ दंत रोगास निंबाचे रसांत ७७ खरजेस गोमूत्रांत लेप ७८ लूतीस माक्याच्या रसांत द्यावी. व लेपही करावा. ७९ पाळीचे विषास उदकांत द्यावी व लेपही करावा ८० आमशूळास मुरुड शेंगेबरोबर ८१ गजकर्णादि रोगांवर उदकांत लेप करावा. ८२ नेत्ररोगांस तिळांचे पानाचे रसांत अंजन करावें ८३ मूळव्याधीस जाईचे रसांत ८४ श्वानविषास तांदुळजाचे रसांत ८५ कुष्ठास गुळवेलांत अथवा गोमूत्रांत ८६ स्तंभनास नागरमोथ्याचे रसांत ८७ मूत्रकृच्छ्रास माक्याच्या रसांत ८८ प्रलापास पाण्यांत ८९ उन्माद वायूस नुक्याचे रसांत ९० वमनार्थ माक्याच्या रसांत. द्यावी.

जस्तभस्म. नेत्ररोगास जुनेगाईचे तुपांत अथवा गाईचे लोण्यांत अथवा पारोसे थुंकींत अंजन करावें १ प्रमेहास तांबूलाबरोबर २ अग्निमांद्यास ऐरणीचे रसांत ३ त्रिदोषास त्रिसुगंधाबरोबर ४ पित्तज्वरास खारीक आणि तांदळांचा हिंम यांजबरोबर ५ शीतज्वरास लवंग व ओंवा यांज बरोबर ६ रक्तातिसारावर खजूर तांदळांचा हिंम यांज बरोबर ७ अतिसारास जिरें आणि साखर यांत ८ ओकारीस जिरें आणि साखर यांत ९ नुसते अति सारास पाणीच पडतें त्याजवर जिरें आणि साखर यांत १० शूळास लवंग, ओंवा, जिरें आणि साखर यांत ११ मद्याचा सेव झाला असतां ओंव्यांत अथवा उष्णोदका बरोबर १२ सर्व प्रमेहांस म्हशीचे लोण्यांत मात्रा १ वाल द्यावी. पथ्य तूप व गहूं १३ आमवायूस लवंग आणि ओंवा यांत १४ खोकल्यास मध व पिंपळींत १५ अजीर्णावर लवंग आणि ओंवा वऊ-

घोदक याबरोबर द्यावी १६.

ताम्रभस्म. परिणामशूळ, उदरशूळ, पांडु, ज्वर, गुल्म, प्लीहा, यकृत्, क्षय, अग्निमांद्य, मेह, अर्श, संग्रहणी, या रोगांस अनुपान योजून विचार पूर्वक द्यावें.

प्रवाळभस्म. जीर्णज्वर श्वास, कास, उचकी कोष्ठगत वायु यांस मध व पिंपळींत द्यावें. १ज्वरास किराईत, कडुकी, हरीतकी, यांत द्यावें. २ पित्तास दूध आणि खडी साखर यांत ३ धातुक्षयावर पिकलेल्या केळ्यांत ४ कृश झाल्यास विड्यांत ५ तिडक परम्यास धुवण व साखर यांत अथवा त्रिफळा व मध यांत ६ धातु पुष्टीस तूप साखरेंत ७ प्रदर रोगास गाईचे धारोष्ण दुधांत ८ वायूस तुळशीचा रस, मध आणि साखर यांत. ९ पित्त कासास आल्याचा रस व खडी साखर यांत १० रातांधळ्यास उंद्राची लेंडी तुळशीचा रसांत उगाळून त्यांत भस्म घालून अंजन करावें. ११

पारद भस्म. १ गुंजेपासून ४ गुंजा पर्यंत मिरपूड व तूप यांत अथवा पिंपळी आणि मध अथवा तूप आणि मध यांत द्यावें. सर्व रोग दूर होतील १ पित्तास धुवासाखर व गाईचें दूध यांत २ वायूस पिंपळींत ३ श्लेष्मविकारास आल्याच्या रसांत ४ ज्वरास ईड निंबाचे रसांत ५ रक्तविकारास मधांत ६ रक्तातिसारावर तांदुळज्याचे रसांत ७ अतिसारावर दह्यांत ८ पथ्य गाईचे दुधांत निमें पाणी घालून कढवावें; तें पाणी जळालें ह्मणजे थंड करून त्यांत साखर अथवा खडेसाखर घालून नित्य प्यावें. पडसें व दुष्ट कफ यांस मिरपूड व तूप आणि गूळ यांत द्यावें. पथ्य, स्निग्ध, ऊष्ण असें अन्न व दहीं भक्षावें. ९ कामोत्पत्ति होण्यास व स्तंभनास उडदांचें पीठ व भुंयकोहळ्याचें चूर्ण व ज्येष्ठी मधाचें चूर्ण हीं तीन्हीं चूर्णें साखर आणि दूध अथवा तूप

आणि मध यांत द्यावी १० पित्तभ्रम, वत्र्यादिकज्वर यांस मुस्ता, गुळवेल, रक्तचंदन, धणे, वाळा, यांचा कषाय करून मध आणि साखर यांत मात्रा घेऊन वर काढाप्यावा. ११ श्वास, कास, कफ रक्तपित्त, यास अडूळसा, द्राक्ष, हरीतकी यांच्या काढ्यांत द्यावें १२ मेदोवृद्धीस शिळ्या पाण्यांत मधु घालून प्यावें. किंवा भाताचें पेजेंत द्यावें. १३ सर्व रोगांवर शुंठ्यादि वर्गाचा कषाय करून त्यांत १४ ऋतु प्राप्त होण्यास व शूळास व रक्त गुल्मास कारळेनिळांचा काढा करून त्यांत भारंगमूळ, त्रिकटु, हिंग, यांचें चूर्ण व गूळ घालून त्यांत द्यावें. १५ सर्व रोगांस रोगोक्त अनुपान योजून द्यावें. १६ पाऱ्याचे भस्मास पथ्य, सैंधव, अमृत, धणे, जिरें, आलें, तांदुळजा, वांगें, पडवळ, डाळ्या, गहूं व तांदुळ जुने, गाईचें तूप, व दूध व दहीं, हंसोदक, मुद्गरस, कूपोदक. अपथ्य रानवांगीं, बेलफळ, वेळूचे कोंब, कारलें, उडीद, मसूरा, वाल, कुळिथ शिरस, मीठ, नाळ, अनूपमांस, धान्याम्ल, केळीचें पानावर भोजन, कांस्य पात्र, गूळ, कटुक पदार्थ, तिखट, उष्ण, कांकडी, बोर, कलिंगड, करवंदें, नेवतीं, उद्वर्तन, स्नान, निषिद्ध पदार्थ.

रुप्याचें भस्म. दाह होत असल्यास साखरेंत द्यावें, १ वात पित्तास त्रिफळेंत २ प्रमेहास त्रिसुगंधीचे चूर्णांत द्यावें. ३

रसकापूर. १ गुंज किंवा २ गुंजा जुने गुळांत द्यावा. सर्व रोगांवर अनुपान योजून दिला असतां रोग दूर करितो; परंतु १ तोळ्यास शेरभर गाईचें तूप घालून पचन करावें. नंतर काढून खलून ठेवावा. एकतांदुळ मात्रा द्यावी. संधिरोगही बरा होईल. पथ्य दूध भात व तांदूळ.

रससिंदूर. १ गुंज किंवा २, ३, ४ गुंजा द्यावा. वात प्रमेहास पिंपळी व मध यांत द्यावा. १ पित्त प्रमेहास त्रिफळा व साखर यांत देणें २ श्वास, कास, शूळ, यांस त्रिकटु, व भारंगमूळ यांचे चूर्णांत मध घालून त्यांत देणें ३ रक्तविकारास हळद व साखर यांत ४ पांडुरोगास काबीळ व अ-

ग्निमांद्य, यास त्रिकटु, त्रिफळा यांत द्यावें. ५ अग्निमांद्य व बद्धकोष्ठ, हृद्रोग, यांस पिंपळी, चित्रकमूळ, हरीतकी, संचळ, यांत ६ मूत्रकृच्छ्रास शिलाजित, एलची दाणे, खडेसाखर यांत ७ धातुवृद्धीस लवंग, केशर, जायपत्री, अक्कलकारा, पिंपळी, विजया, ।।। कापूर ।।। अफू, रससिंदूर १ हें एकत्र करून घ्यावें ८ सर्वज्वरास लवंग, संचळ, किराईत, हरीतकी, यांत द्यावें. ९ रेच होण्यास संचळ व त्रिफळा यांत १० धातुवृद्धीस लवंग केशर, तांबूल यांत अथवा भुई कोहोळ्याचे चूर्णांत द्यावा. ११ ओकारीस विजया, अजमोदा, यांत देणें १२ उदरपीडेस संचळ, हळद, विजया, अजमोदा, यांत १३ कृमिरोगास पळस पापडी ३।४ वाल, गूळ, जुना, ४।८ वाल यांत देणें १४ सर्वातिसारावर अफू, लवंग, विजया, यांत १५ अग्निमांद्यास संचळ, अजमोदा यांत १६ पुष्टि होण्यास गुळवेलीचे सत्वांत १७ सर्वरोगांवर अनुपान योजून द्यावा. रोग दूर होतात. १८ पथ्यापथ्य पारद भस्माप्रमाणें करावें. वायूस मध व पिंपळी १९ कफास त्रिकटु व चित्रक २० पित्तास साखर २१ प्रमेहास गुग्गूळ २२ पुनःपुष्ट्यर्थ चातुर्जात, हरनयन फळ, शाल्मली पुष्प, दंत, कांतालसाद भरण यांत द्यावें.

लोहभस्म. १ गुंज अथवा २ गुंजा द्यावें. व लीपलित रोगास त्रिफळेंत द्यावें. १ धातूचे रोगास त्रिकटु, भारंगमूळ, मध यांत द्यावें. २ श्लेष्म रोगास कज्जली, मध यांत ३ रक्तपित्तास चातुर्जाताचें चूर्ण साखर यांत ४ बलवृद्धीस पुनर्नव्याचें चूर्ण गाईचें दूध यांत ५ पांडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यांत ६ वीस प्रकारचे प्रमेहांस हळद, मध अथवा पिंपळी, मध यांत ७ मूत्रकृच्छ्रास शिलाजिताबरोबर ८ पांच प्रकारचे कासास अडुळसा, पिंपळी, द्राक्ष, मध यांत गोळी करून द्यावें. ९ तांबूलाबरोबर घेतलें असतां अग्नि प्रदीप्त करील. व वृष्य आहे व कांती वाढवील १० औषधींचे रस पुष्कळ घालून त्यांत कज्जली युक्त करून चांगलें गजपुट देऊन निरुत्थ

भस्म करावें ह्मणजे शरीर लोहाप्रमाणें करील. अपथ्य कोंहोळा, तिळांचें तेल, उडीद, मोहोऱ्या, मद्य, आम्ल पदार्थ, डाळीचें वरण, अनूप मांस, ज्या पदार्थाचें प्रथमाक्षर क आहे तो पदार्थ, मत्स्य, जीवक, वांगें, निखद हे पदार्थ वर्ज्य करावे व फार व्यायाम करूं नये.

लोकनाथमात्रा. दोन अथवा तीन वाल मात्रा २० अथवा ३० मिऱ्यांचें चूर्ण करून त्यांत मिळवून देयावी. वायूचे रोगास तुपांत द्यावी १ पित्त रोगास लोण्यांत द्यावी. २ कफरोगास मधांत ३ अतिसार, क्षय, व अरुचि, संग्रहणी, कृशता, अग्निमांद्य, खोकला, श्वास, गुल्म हे रोग दूर होण्यास प्रशस्त आहे. ४ ही मात्रा घेऊन त्यावर तूप भाताचे तीन घांस घ्यावे. नंतर मात्र्यावर क्षणाभर उताणें निजावें. अवदणें ह्म० अरुचि यास धणे कुटून वरचा कोंडा काढून तुपांत भाजून त्यांत साखर घालून त्यांत मात्रा द्यावी ५. ज्वरास धणे व गुळवेल यांचे काढ्यांत मात्रा द्यावी ६ रक्तपित्त व कफ व श्वास व कास व स्वरभंग या रोगांस वाळा व अडुळसा यांचे काढ्यांत मध व साखर घालून मात्रा द्यावी ७ निद्रा येत नाहीं व अतिसार, संग्रहणी व अग्निमांद्य या रोगांस भांग थोडी भाजून चूर्ण करून त्यांत मात्रा व मध घालून द्यावी. ८ शूळ व अजीर्णास संचळ व बाळहिरडे व पिंपळी यांचे चूर्णांत मात्रा घालून ऊन पाण्याबरोबर द्यावी. ९ ज्वरास मध व पिंपळींत द्यावी १० कवल व वानरक्त व ओकारी व मुळव्याध व रक्तपित्त यांजवर दाडिंबाच्या फुलांच्या रसांत ११ नाकांतून रक्त पडतें त्यास दूर्वीचे रसांत मासाभर मात्रा घालून नस्य द्यावें. ओकारी व उचकीस बोरांचे आंठींतला मगज व पिंपळी व मोरांचे पिसांचें भस्म व मात्रा एकाजागीं करून त्यांत साखर व मध मिळवून द्यावी. १२ सर्व रोगांवर अनुपान योजून द्यावी. ह्मणजे रोग दूर होतात.

वंगभस्म. मुखगंधीस कापुराबरोबर द्यावें १ पुष्टीस जायफळाबरोबर अथवा दुधाबरोबर २ प्रमेहास तुळशीपत्राबरोबर ३ पांडुरोगास तुपांत ४ गुल्मरोगास टांकणखाराबरोबर ५ रक्तपित्तास व ऊर्ध्वश्वासास हळदींत ६ बलवृद्धीस मधांत ७ पित्तास साखरेंत ८ स्तंभनास नागवेलीचे पानांत अथवा कस्तूरींत ९ अग्निमांद्यास कस्तूरी व पिंपळी चूर्ण यांत अथवा कबाब चिनी बरोबर १० दुर्गंधीस चांपयाचे फुलाचे रसांत ११ दाह जाहल्यास निंबाचे रसांत १२ चर्म पक्ष्म (ह्मणजे डोळ्यांची पापणी) रोगास खैराचे सालीचे काढ्यांत १३ अजीर्णास आंवळ्याबरोबर अथवा पूगीफळाबरोबर १४ अस्थिगतज्वरास लोण्याबरोबर १५ वायुरोगास लसूणाबरोबर १६ कुष्टरोगास समुद्रफळांत अथवा निर्गुंडीचे रसांत १७ खंजत्वास आघाड्याचे रसांत १८ लिंगवृद्धीस लवंग व समुद्रफळ व नागवेलीचे रसांत उगाळून लेप करावा. १९ मोहनास गोरोचन व लवंग यांत तिलक करावा. २० अर्धशिशीस एरंडमूळ व लवंग यांजबरोबर उगाळून लेप करावा २१ प्लीहरोगास स्वागीबरोबर २२ वायूस ओंव्याबरोबर अथवा आसंधाबरोबर २३ जलोदरास बकरीचे दुधाबरोबर २४ मुलें होण्यास कानाबरोबर अथवा गाईचे दुधांत २५ कांकडीचे रसांत घेतलें असतां नामर्दाचा मर्द होतो. २६ मस्तकरोगास आघाड्याबरोबर २७ धातुविकृतीवर जायफळ, लवंग, पत्री, यांजबरोबर २८ कंबरेचे व्यथेस जायफळ, अष्टगंध यांजबरोबर २९ जहरबाज ह्मणजे नाडीव्रणास नागवेलीबरोबर ३० पोटांतील पीडेस हरीतकी बरोबर ३१ वातगुल्मास ताकाबरोबर ३२ मूळव्याधीस सीसूके पान याजबरोबर ३३ फेंपरें येतें त्यास लसुणाच्या तेलांत नस्य द्यावें ३४ श्वासास जायफळ, लवंग, मध यांजबरोबर ३५ शरीर बळकट होण्यास तुळशीचे रसांत ३६ त्रिवंगभस्म. चेतनाहो

ण्यास जायफळाबरोबर १ पित्तास तुपांत २ धातु पडते त्यास विड्याचे पा-
नांत ३ भूकलागण्यास पिंपळींत ४ शूळास ओंव्याबरोबर ५ श्लेष्मगत
वायूस व नळवायूस ओंव्याबरोबर ६ परम्यास कोरफडाचा रस व दाल-
चिनी यांत ७ स्वर पडते त्यास कोरफडाच्या रसांत देणें ८

शिलाजित. एलची दाणे व पिंपळी यांजबरोबर १ मासा भक्षिलें अस-
तां मूत्रकृच्छ्र, मूत्ररोध, प्रमेह, क्षय, या रोगांचा नाश करितो.

सुवर्णभस्म. दाह झाल्यास मत्स्य पित्त ह्मणजे कटुकी यांत द्यावें.
१ स्त्रीशीं संग करणें असल्यास गाक्याच्या रसांत २ शरीरांत सामर्थ्य ये-
ण्यास दुधांत ३ नेत्ररोगास पुनर्नव्यांत ४ जरा व व्याधी दूर होण्यास तु-
पांत ५ बुद्धीची वृद्धि होण्यास वेखंडाबरोबर ६ कांती वाढण्यास कें-
शराबरोबर ७ राजयक्ष्म रोगास धारोष्णांत ८ विषास निर्विषाबरोबर
९ त्रिदोष व उन्माद यांस सुंठ, लवंग, मिरीं यांजबरोबर १० शुद्ध सुवर्णाचीं
अनुपानें. मधांत अथवा उदकांत उगाळून घ्यावें. बहुत गुण करील ११
विषांस वरखें मधांत खलून घ्यावें. १२ सर्वव्याधींस सर्वौषधींबरोबर १३
अरिष्टग्रहांस मध, आंवळकाठी, सुवर्णभस्म, एकत्र करून १४ श्री प्राप्त
होण्यास पद्मकेसराबरोबर १५ वयोवृद्धीस शंखपुष्पींत १६ प्रजार्थ-
विदारी कंदांत १७

हरताळभस्म. वातरक्तरोग व कुष्ठादि रोग यांस गुळवेलीचे काढ्यांत
अथवा चूर्णांत द्यावें. १ सर्व रक्तविकारास हळदीबरोबर २ अपस्मार वा-
यूस बचनाग, जिरें यांत ३ जलोदरास समुद्रफळाबरोबर ४ भगंदर
रोग, फिरंगोपदंश, विसापमंडळ, कंडू, खरूज, विस्फोट, वातरक्त, या रोगां-
स देवडांगरीचे रसांत ५ मात्रा १ तांदूळ अथवा दोन तांदूळ द्यावी. ज्वर, क्ष-
य, पांडुरोग, यांस खडेसाखरींत द्यावी. लागलेंच पथ्य घ्यावें. ६ गाईचें
दूध भात धुवासाखर अल्पभोजन करावें पाणी फार पिऊं नये, कण्हे-

शींत दूध घालून घ्यावें. सायंकाळीं खिचडी अळणी खावी. खडीसाखर खावी. वायु, शूळ, बाळंतरोग यांस आल्याच्या रसांत द्यावी. पथ्य नूप आणि खिचडी अथवा गाईचें दूध मात्रा घेतल्या नंतर ४ घटिका पाणी पिऊं नये, अशक्तास तापवून निवालेलें पाणी द्यावें. ८ सन्निपात, अर्धांगवायु, वायु गोळ्यास त्याच अनुपानांत द्यावें ९ निर्बळमनुष्यास जायफळाशीं १० रक्तपित्तीस हळदीबरोबर ११ क्षयास विड्यांत १२ वीर्यवृद्धीस पिकलेले पानाबरोबर १३ ऊर्ध्वश्वासास हिरड्याबरोबर १४ सुस्तीस सुंठीबरोबर १५ दुर्गंधीस चांफ्याच्या फुलाशीं अथवा सुगंधपदार्था बरोबर १६ वायूस आल्याच्या रसांत १७ प्रमेहास तुळशीचे रसांत १८ जलोदरास गोमूत्रांत १९ शैत्यास केशर व जायपत्री यांज बरोबर २० अग्निमांद्यास मध व पिंपळी यांत २१ कास क्षयास साखरेबरोबर २२ स्तंभनास लवंग, दालचिनी कापूर यांजबरोबर उतार निंबू २३ दशकुष्ठांस निर्गुंडीबरोबर २४ कामवृद्धीस गाईचे दुधांत द्यावी. २५

हीरकभस्म. कुष्ठास खैराचे सालीचे काढ्यांत द्यावें १ वायूस आल्याचा रस व मध यांत २ कास, कफ, श्वास, यांस अडुळसा, मिरीं, पिंपळी यांत द्यावें. ३

हिंगूळ. बाळंत रोगास १ गुंज मात्रा गोमूत्रांत द्यावी १ पुष्टतेस मध व नूप यांत २ घाम फार येत असल्यास साखरेंत द्यावा. ३ क्षयावर केशर २ गुंजा, पत्री २ गुंजा, साखर ४ मासे आणि मात्रा २ गुंजा याप्रमाणें द्यावें. ४ सर्व रोगांस अनुपान योजून द्यावें.

हेमगर्भ. वायूस शेवग्याचे सालीचे रसांत १ कफास आल्याच्या रसांत २ सर्व रोगांस मध व पिंपळींत ३ ज्वरास व्याघ्रीचे रसांत. ४

गुळवेलसत्व. एक वाला पासून १ मासा पर्यंत द्यावें. वायूस तुपांत द्यावें १ बद्धकोष्ठास गुळांत २ पित्तास साखरेंत ३ कफास मधांत

४ वातरक्तास एरंडेलांत ५ आमवायूस सुंठी बरोबर ६ ज्वर, वातरक्त, पांडु रोग, जीर्णज्वर, ओकारी, अरुचि, अर्श रोग, कावीळ, पित्तप्रमेह, कास, श्वास, उचकी, क्षयरोग, दाह युक्त मूत्र कृच्छ्र, रक्त प्रदर, सोमरोग, यारोगांवर रोगोक्त अनुपान योजून द्यावें. ७ वळी पलित रोगास गुळवेलीचें चूर्ण नित्य २ टांक द्यावें ८ सर्व मर्मस्थानांचे रोगांस नाकांत द्यावें. ९ सर्व व्याधीस थंड पाण्यांत १० कुष्टावर रान तुळशीचे पाल्याचे रसांत ११ उदर रोग व गुल्मरोग्यास सुंठीबरोबर १२ नेत्र रोगांस म्हशीचे साजूक तुपांत १३ काळे केश होण्याविषयीं माक्याचे रसांत १४ अग्निमांद्यास सुंठीबरोबर १५ धातु स्तंभनास गुळवेलीचें पंचांग चूर्ण करून घ्यावें. १६

त्रिफळा. हरीतकी ३ भाग, बेहेडा ६ भाग, आंवळकाठी १२ भाग, यांचें चूर्ण करून त्यास वावडिंग, खैर, माका, यांच्या भावना ७ देऊन वाळवून ठेवावें वळी पलित या रोगांस १ महिना द्यावें १ दिव्य देह होण्यास सहा महिने द्यावें २ जरा प्राप्त न होण्यास १ वर्ष द्यावें ३ प्रमेह, विषमज्वर, व मंदाग्नि, श्लेष्मज्वर, पित्तरोग, कुष्टरोग, हे रोग जातील. ४ नेत्र रोगांस मध आणि तूप यांत ५ वातरोगास तेलांत ६ पित्तास तुपांत ७ कफास मधांत. ८ दुसरा प्रकार त्रिफळेचे चूर्णांत वावडिंग, खैर, माका, पळस, यांचे रसाच्या निरनिराळ्या ७ भावना द्याव्या, नंतर समभाग शर्करा घालून ठेवावें तें नित्य घेतलें असतां वळी पलित हे रोग व सर्व रोग जातील. ९

लसूण. सर्व वायु रोगांस शिरसेल तेल १ लसूण १ आलें १ सैंधव १ सर्वांचे अष्टमांश एकत्र करून पात्रांत घालून ७ दिवस उन्हांत ठेवावें. नंतर काढून दुसरे पात्रांत ठेवावें आणि प्रातः काळीं सामर्थ्य पाहून भक्षावयास द्यावें व मद्य मांस, आम्ल रस, स्निग्ध पदार्थ भक्षूं सांगावे. अपथ्य अजीर्ण होईल असें खाऊं नये, ऊन घेऊं नये, फार पाणी पिऊं नये. दूध व गूळ खाऊं नये, नळवायूस लसुणांचे कांडींतील गोरव काढून तु-

यंत नखून रात्रौ निजते वेळेस भक्षावा. वर पाणी पिऊं नये.

चित्रक. लांब पानाचा अथवा वाटोळे पानाचा कार्तिक मासीं किंवा मार्गशीर्ष मासीं अरण्यांत जाऊन उत्तम जाग्यावरचीं मुळें आणून त्याचें चूर्ण करून ठेवावें, त्याचें घेण्याचें प्रमाण ३ माशांपासून सहा सात मासे पर्यंत आहे. १ शरीरदृढ होण्यास ३ तीन महिने पर्यंत घ्यावें २ सर्व व्याधी दूर होऊन दिव्य शरीर होण्यास १ एक महिना ताकांत द्यावें ३ वळी पलित पांडुरोग, अपस्मार, जलोदर, भगंदर, मूळव्याध, प्रमेह, कुष्ठ, यांवर शिरसेल, घृत आणि मध यांजबरोबर ४ सर्व व्याधी दूर होऊन रूप चांगलें होण्यांस १ एक महिना गोमूत्रांत घ्यावें. ५ बुद्धी चांगली होण्यास १ एक महिना मधांत ६ सूक्ष्म चूर्ण करून त्यांत त्रिकटूचें चूर्ण समभाग घालून बिडालपद प्रमाण तूप व मध यांत ७ दिवस प्रातःकाळीं घ्यावें आणि नुसतें दूध पिऊन राहावें. वळी पलीत रोग दूर होऊन बहुत स्त्रिया भोगील असें सामर्थ्य प्राप्त होईल.

टांकळा. त्याचे मुळांचें चूर्ण अजामूत्रांत सात समकें घ्यावें काळे केश होतील. १ वीस समकें घ्यावें अग्निपासून भय होणार नाहीं. २ चार समकें घेतलें असतां तो पुरुष दमणार नाहीं ३ पंचवीस समकें घेतलीं असतां उदकापासून भय नाहीं. ४ सर्व रोगांस ताकाबरोबर द्यावें ५. यास पथ्य गाईचें दूध आणि भात वरकड वर्ज्य हीं अनुपानें गोवर्धनाचीं आहेत.

---

## कर्मविपाक.

कर्मविपाक ह्मणजे पूर्वजन्मीं केलेल्या पापकर्माचे परिणामभूत दुसरे जन्मीं रोग उत्पन्न होतात, त्यांचे देवपूजा, शांति, जप, दान, ब्राह्मण भोजन औषध इत्यादिक निरसनोपाय सांगितले आहेत. यास्तव कोणत्या पापानें कोणकोणते रोग उत्पन्न होतात व त्यांचें निरसन काय तें लिहितो.

१ ब्रह्महत्येनें राजयक्ष्मा म्हणजे क्षय तो उत्पन्न होतो त्यास मृत्युंजयाचें अनुष्ठान, शिवपूजा, तुळा, व नित्य सुवर्णदान हीं करावीं.

२ दुसऱ्याचें द्रव्य हरण केलें आणि कोणी भोजन करीत असतां त्यास उठविलें तर विषूचिका होते. त्यास दरिद्री लोकांस इच्छा भोजन करावें.

३ स्वकुळांतील कन्या भोगिली व सुवर्ण चोरिलें तर प्रमेह मूत्रकृच्छ्र हे रोग होतात त्यास सुवर्ण दान करावें.

४ शिवालय मोडिलें तर व धनधान्य हरण केलें व दुसऱ्याची मानहानि केली व अन्याय नसतां दंड केला तर पांडुरोग व कावीळ हे रोग होतात. त्यास भूमीदान करावें व साखर पाणी द्यावें.

५ दुसऱ्यास कठोर पीडा केली तर शोफरोग होतो त्यास जासवंदीचे फुलांची देवावर लाखोली वाहावी.

६ जादू करून किंवा औषध देऊन गर्भ पाडिला तर जलोदर होतें त्यास वाटेवर पाण्याची धर्मपोय घालावी.

७ हिंसा व निंदा केली तर नाडीव्रण होतो त्यास उभयतो मुखी गोप्रदान करावें.

८ बाळहत्या केली तर गर्भ पडतो व वृद्धि होत नाहीं त्यास देवब्राह्मणाची पूजा करावी.

९ विश्वासघात करणें वाईट शब्द बोलणें, दुसऱ्याचा जीव घेणें, अपराधाशिवाय बंदीस ठेवणें, द्वेष करणें, निरर्थक रागें भरणें, रसविक्रय करणें, शास्त्रार्थे देवद्विज यांजवर दोषारोपण करणें, या कारणांनीं तेराप्रकारचे सन्निपात रोग ही होतात.

दुसरें कारण होमांचीं कुंडें, याग, विवाह, कूप, जलाशय, अरण्य यांचा नाश केला असतां ही तेरा सन्निपात होतात त्यास सुवर्णाची तुळा करावी, अश्वदान करावें अथवा वापी, कूप, देवळें, इत्यादि बांधावीं व विं-

च व कंवठ व बेल व आंबे यांचीं झाडें मार्गावर लावावीं.

१० मूर्ति फोडिल्या व वृत्ति छेद केला व तूं चोर, जार असें दुसऱ्याला ह्मट लें तर मूळव्याध, अतिसार हे रोग होतात. त्यास भूमिदान करावें व र स्त्यावर बाग लावावे, देवळें, मठ, व तळीं बांधावीं. ह्मणजे मूळव्याध, अति सार, हे रोग दूर होऊन कास, श्वास, हीं जातात.

११ पंक्तीस जो भोजनास बसला त्याणें फार खाल्लें ह्मणून जो दुःख मानि तो त्याला अरुचि होते त्याणें अन्नोदक दान करावें.

१२ दुसऱ्यास शूळावर चढविणें, हात, पाय, कान, कापणें, डोळे फोडणें प्रा ण्यास उगेंच मारणें या कर्मांनीं सत्तावीस प्रकारचे शूळ उत्पन्न होतात, त्या स चोराचा मार्ग मोकळा करावा, ह्मणजे त्यांचें शासन करून मार्ग निर्भय करावा. बंदिखान सोडावें. नाना प्रकारचीं फळें व रस यांचें दान करावें, जल शय करावें होम व ब्राह्मण भोजन व जप करावा.

१३ दुसऱ्यास पीडा करितो व त्यास संकट कधीं प्राप्त होईल असी इच्छा करितो व विश्वास घात व मोठें पातक करितो त्यास उचकी, कास, श्वास हे उत्प न्न होतात, त्याणें अश्वत्थास प्रदक्षिणा, ग्रहशांति, प्रायश्चित, देव, गाय, यां ची पूजा करावी.

१४ गाय, कन्या, व षडरस जो विकितो त्यास नाना प्रकारचे वायु होतात त्याणें गोप्रदान व मधु धेनु हीं दानें द्यावीं.

१५ कथा श्रवण न केली तर कर्णमूळ रोग होतो त्यास पंचगव्य द्यावें.

१६ दुसऱ्याचा द्वेष करितो आणि पैशून्य पाहातो त्यास अपस्मार ह्म (फेंपरें) येतें त्याणें सवत्स कपिला गोदान करावें.

१७ जो दंभानें देव द्विज यांची भक्ति करितो; परंतु मनांत क्रोध युक्त असतो त्याचे पोटांत रोग उत्पन्न होतो त्याणें सुवर्णाची प्रतिमा करून तिचें दान करावें.

१८ सुनेशीं, कन्येशीं, वाईट कर्म केलें तर त्यास मुतखडा होतो. त्याणें तीर्थ यात्रा कराव्या.

१९ दुसऱ्याचें द्रव्य व स्त्री यांचें हरण केलें व निंदा केली तर त्यास नेत्ररोग होतो त्याणें चांद्रायण प्रायश्चित्त करावें.

२० विप्र, गाय, राजा, यानां मारिलें व घरें आणि जलाशय मोडिले. व परद्रव्य व धान्य व गुरु व स्वामी यांची स्त्री व कुटुंबांतील स्त्रियांचें हरण केलें तर त्यास पांडुरोग, कुष्ठ, राजयक्ष्मा, अतिसार, प्रमेह, मुतखडा, मूत्रकृच्छ्र, शूळ, कास, वर्ण, हे रोग अनुक्रमें करून होतात. त्यास दशदानें क्रमानें द्यावीं.

२१ देह अशुद्ध ठेविल्यामुळें संग्रहणी होते, दुसऱ्यास वाईट शब्द बोलल्यामुळें क्षय रोग होतो, या रोगांस व सर्व रोगांस गोदानें करावीं.

२२ अनेक प्रकारचे विलक्षण ज्वर झाले असतां दशदानें व गोदानें करावीं, पंडु व कुष्ठ या रोगास गो, भू, कांचन, हीं द्यावीं. प्रमेह, शूळ, श्वास, भगंदर यांस सुवर्णदान ज्वर, श्वास, कास, यांस सांबाची पूजा. शोफ, वर्ण, पिनस, दाहज्वर यांस शांति करावी. ओकारीस अन्नदान. भ्रंशास शस्त्रदान. मंदाग्नीस अग्नीची सेवा. गुल्मरोगास कन्यादान. प्रमेह व मुतखडा यांस लवण. शूळास ब्राह्मण भोजन. रक्तपित्तास तूप व मध. वर्णरोगास पिंपळ व उंबर यांस पाणी घालावें. संग्रहणी व अतिसार यांस चतुर्विध महा दानें. कुष्ठरोगास धातु. बहुमूत्रास गोदान. नेत्ररोगास घृत दान. नासिकरोगास सुगंधी पदार्थ. त्वचास व सर्वरोगांस तेल. जिव्हारोगास षड्रसदान. दंतरोगास स्तोत्र पाठ करावे.

---

समास.

# चिकित्सासार.





हा ग्रंथ विठ्ठल सखाराम अग्निहोत्री याणीं लोक हितार्थ,

श्रीमद्वेद शास्त्र संपन्न विनायक शास्त्री

पिटकर, यांच्या करवीं शोधवून,

व त्याजवर मराठी टीका करवून.

आपल्या

शिलायंत्र छापखान्यांत छा

पिला.

मुक्काम पुणें.

 आवृत्ती २ री.
किंमत २ रुपये.

# प्रस्तावना.

पूर्वी हिंदुस्थानांत, गोपाळदास यानामें करून वैद्य क्रियेमध्यें निपुण व जगप्रसिद्ध असा एक विद्वान पुरुष होता; त्यानीं सुश्रुत वाग्भटादि पुरातन वैद्यक ग्रंथ अवलोकन करून व त्यांतील जें सारभूत तें घेऊन वैद्यकावर चिकित्सासार या नामें करून ग्रंथ केला होता. तो ग्रंथ, पूर्वी हिंदुस्थानात छापण्याची कला माहीत नव्हती, या कारणामुळें प्रतीचा विस्तार न होतां तो मागें पडला; आणि त्यावर विद्वज्जनाचें अवलोकन नसल्या मुळें अशुद्धही होत चालला होता. परंतु दैववशांत तो ग्रंथ आमच्या हातीं कांहीं दिवसां मागें लागला; आणि ग्रंथ प्रसिद्ध नसून चांगला आहे, असें वाटल्या वरून आह्मांस अशी इच्छा उत्पन्न झाली कीं तो छापून त्याचा विस्तार करावा, परंतु ग्रंथ आजपर्यंत छापलेला नाहीं, तो छापून निरुपयोगी ग्रंथाचा विस्तार करून लोकांस निरर्थक खर्चांत घालावें हें योग्य न वाटल्या मुळें हा ग्रंथ निरुपयोगी आहे, किंवा उपयोगी आहे, याची आपण प्रथमत: आपल्या मनाची खात्री करावी ह्मणून, त्यांत ज्यां रोगांवर जीं औषधें योजिलीं आहेत, त्यांतून बहुतेकांचा अनुभव, आमच्या जवळ ज्या ज्या रोगांचे जे जे रोगी आज पर्यंत आले त्यांस त्या त्या रोगावर औषधें देऊन घेतला; आणि आपल्या मनाची पूर्ण खात्री करून घेऊन हा ग्रंथ अशुद्ध होता तो शुद्ध करून प्रसिद्ध केला आहे.

हा ग्रंथ, पूर्वींचा केवळ संस्कृत आहे, परंतु पूर्वींचा होता तसा संस्कृतांत छापल्यास, ज्यांस ती भाषा अवगत आहे, त्यांस मात्र समजेल; व इतरांस त्या पासून कांहीं फायदा होणार नाहीं; असें वाटल्या वरून व हा ग्रंथ संस्कृत येणारास, व संस्कृत न येणारासही समान उपयोग व्हावा ह्मणून त्याजवर प्राकृत टीका करून त्या टिके सुद्धां छापिला आहे; तर हा ग्रंथ सर्वांस मान्य होईल अशी आशा बाळगितों.

## अनुक्रमणिका.

श्री

# उपोद्घात

श्रीगणेशायनमः श्रीसरस्वत्यैनमः अथचिकित्सा
सारोलिख्यते परात्परोयःपुरुषःपुराणःसनातनो
योपिचविश्वकर्ता यस्यांतपारंनसुरादयोपिविदुर्हि
देवंतमहंस्मरामि १ षडंगवेदाःसकलोपवेदायतप्र-
जाताउतसृष्टिकाले येनात्रसर्वेप्रकटीकृतास्तेपरोप
कारायतमुद्भजेहं २ ऋग्वेदस्योपवेदोयमायुर्वेदंप्रच
क्षते तस्यसंख्याप्रमाणंहिलक्षैकंग्रंथतोविदुः ३ सं
हितान्वरसग्रंथदेशाभाषादिभेदतः विस्तृतोबहुमात्रो-
हितत्पारंकेऽपिनोययुः ४ परंपरोपकारार्थंयद्दृष्टंयच्छ्रु
तंमया लिख्यतेतच्चसंक्षिप्तंवैद्यानांयशदायकं ५
चिकित्सासारनामायंग्रंथःपरमदुर्लभः श्रीमद्गोपालदा
सेनक्रियतेपंडितप्रियः ६

अर्थ॥ ॥ ग्रंथारंभीं ग्रंथ निर्विघ्नपणें सिद्धीस जावा ह्मणून ग्रंथकार इष्टदेवता-
स्मरणरूप मंगल करितो तें मंगल अनुरूप असावें यास्तव कर्तव्य जो वैद्यग्रं
थ याला मूलभूत जो आयुर्वेद त्याची उत्पत्ती ज्यापासून त्या देवाचें भजनरूप
मंगल करून वैद्यक प्रकर्णी ग्रंथ कर्तव्य हें सूचविण्या करितां मंगलश्लोक आ
रंभीं लिहितो; परात्परेति जो अत्यंतश्रेष्ठ, अनादि नित्यजगत्कर्ता, ज्याचा देश
तः आणि कालतः अंत देवादिकही जाणतेनाहीं झाले त्यानें मी स्मरतों
॥ १ ॥ षडंगेति॥ साहा अंगें सहित वेद आणि उपवेद ज्या पासून उत्पन्न
झाले आणि सृष्टिसमयीं ज्याणे सर्व वेद प्रकट केले त्या देवानें मी मोठ्या
नें भजतों॥२॥ ऋग्वेदेति॥ ऋग्वेदाचा जो उपवेद, ज्याला आयुर्वेद असें
ह्मणतात तो ग्रंथ, संख्येनें एक लक्ष आहे॥३॥ संहितेति॥ तो संहिता र-
सग्रंथ देशभाषा इत्यादि भेदेंकरून पृथिवीवर बहुत विस्तृत झाला आ
हे त्याचा अंत कोणासही लागला नाहीं॥४॥ परंतु परंपरेनें लोकांवर उ
पकार व्हावे यासाठीं संहितादिग्रंथांतील जें पाहिलेलें आणि ऐकलेलें तें
संक्षेपें करून वैद्यांला यश देणारें असें लिहितो॥५॥ कर्तव्य ग्रंथाचा

नामाभिधानपूर्वक प्रशंसा करितो. ॥ चिकित्सेति ॥ हा चिकित्सासार नामक ग्रंथ अत्यंत दुर्भिल, पंडितांला प्रिय अशा ग्रंथापन श्रीमद्गोपालदास करितो. ॥ ६ ॥

---

## अथदूतपरीक्षा

व्यंगंभीतंद्रुतंदीनंरूक्षामंगल्यवादिनं ॥ अमंगलंचमलिनंशास्त्रिणंदंडपाणिनं ॥ व्याधितंक्रूरकर्माणंरक्तमाल्यानुलेपनं ॥ तैलपंकविलिप्तांगमशुचिंकृष्णचामरं ॥ २ ॥ अनेकंजटिलंशीर्णविवर्णैकवाससं ॥ स्त्रियंखरोष्ट्रमहिषारूढंकष्टस्वरंतथा ॥ ३ ॥ नानुगच्छेद्भिषग्दूतमाव्हयंतंचदूरतः ॥

टी० ॥ ॥ अंगविकल ह्मणजे आंधळा, पांगळा इत्यादि प्रकारचा, भ्यालेला, त्वरेने आलेला, दीन, कर्कश आणि अमंगल असें बोलणारा, अमंगळ, घामट, शस्त्रधारी, दंडयुक्त, रोगी, क्रूरकर्मा, रक्तपुष्पांच्या माळा आणि रक्तगंध इत्यादिकें करून युक्त, तेलळावलेला, चिखलाच्या लेपानें युक्त, अपवित्र, काळें चामर धारण करणारा, अनेक ह्मणजे दुसऱ्यास बरोबर घेऊन आलेला, जटा वाढिवलेला, जर्जर झालेला, विवर्ण वस्त्रा, ओलेता, एकवस्त्री, स्त्री, गाढव, उंट, टोणगा इतक्यांतून कोणाएकावर बसून आलेला, कष्टानें बोलणारा, दुरून हाक मारणारा असा दूत बोलावूं आला असतां त्याचेकडे वैद्यानें जाऊंनये. इतिदूतपरि०

## अथशकुनानि

दुर्गंधंसकषायंचदुर्वाक्यंलवणंक्षतं ॥ हाहाक्रंदितमुत्क्रुष्टंकृष्णधान्यंगुडोवमी ॥ १ ॥ इंधनादितृणंशकृत्पुरीषंपूतिदुर्मदं ॥ क्रूरपक्षिमृगाणांचरूक्षाःप्रतिदिशांगिरः ॥ २ ॥ समरंकलहोहानिःपंकंतैलंससर्पिषं ॥ भंगोवापूर्णपात्राणांप्रासादध्वजशोभिनां ॥ ३ ॥ चांडालःक्रूरपाशांश्चनिःसारंजालवागुरे ॥ शयनासनयानानामुत्तानां

नांचदर्शनं ॥ ४ ॥ मार्गच्छेदोहिमार्जारगोधासरठवानरैः ॥ रो
गिद्वाराभिनिर्गच्छेन्मंगलंतदमंगलम् ॥ ६ ॥ ॥ ५ ॥

टी० ॥ ॥ दुर्गंधिपदार्थ, तुरट पदार्थ, दुर्वाच्य बोलणारा, मीठ, शिंकणारा, हाहाकारें करून दीर्घस्वरानें रोदन, काळें धान्य, (ह्मणजे उडीद तिळ इत्यादि) गूळ, ओकारी, काष्ठें, गोवऱ्या, वाळलेलें तृण, विष्ठा, पूतिदुर्मद (ह्म० फार दुर्गंधियुक्त कुजलेला पदार्थ) क्रूरपक्षी व जनावरें यांचे दिशांचाठायीं रूक्ष शब्द, युद्ध, कज्जा, नाश, चिखल, तेल, तूप भरलेले भांड्यांचा नाश, वाडा, घर, पताकांनीं शोभणारें वस्त्र यांचा नाश, चांडाल, क्रूर, पाश, रिकामी जाळी, वागुरा, शयन (ह्म० पलंग इत्यादिक) आसन (ह्म० चवरंग इत्यादिक) यान (ह्म० घोडा इत्यादिक) हीं उताणीं पाहाणें मांजर, घोरपड सरठ, वानर हे मार्गांत आडवे जाणें, रोग्याचे घरांतून मंगळ बाहेर पडणें इतक्यांतून काहीं पदार्थ दृष्टीस पडणारे आणि कांहीं श्रुत होणारे असे शकुन वैद्याला, रोग्याकडे जातांना झाले असतां अशुभ असें जाणावें.

## आतां शुभशकुन सांगतो. मूळ

पुन्नामावामतः श्रेष्ठोगजखर्चरवर्जितः ॥ स्त्रीनाम्नीद
क्षिणेश्रेष्ठाशिवाश्यामाविवर्जिता ॥ १ ॥ ॥ ६ ॥ ॥

टी० ॥ ॥ पुरुषजाति डावे बाजूनें गेला असतां चांगला परंतु हत्ती आणि खेचर हे खेरीज करून, तशीच स्त्रीजाति उजवे बाजूनें गेली असतां चांगली परंतु कोल्ही व महीस त्या खेरीज करून.

मूळ ॥ छत्रंगोद्विजकन्यकाऽमिषसुरापण्यांगनारोच
नंमांगल्यंनृपवाजिवारणदधिस्तोत्रादिपाठः शुभः ॥
संगीतंकरुणाभयानकमहारौद्रैर्विहीनंस्मरक्रीडाभा
वमनोहरंकिमपिचबालानिसद्योगिजः ॥ २ ॥ ॥ ७ ॥

टी० ॥ ॥ छत्र, गाय, ब्राह्मण, कन्या, मांस, मद्य, वेश्यास्त्री, गोरोचन, मांगल्य पदार्थ, नृप, घोडा, हत्ती, दहीं, स्तोत्रादिकांचा पाठ, करुणा, भयानक आणि रौद्र या रसांनीं रहित व स्मरक्रीडांचे भावांनीं रम्य असें गायन, बालकें, उत्तम योगी इतके शकुन शुभदायक असें जाणावें, त्या शुभदाय

क. शकुनामध्यें हत्ती डावे बाजूस वाईट असें मागें सांगितलें, तो समोर श्रमदायकच आहे. इतिशकुनानि

# अथनाडीपरिक्षा.

मू०॥ वातेवक्रा तदनुचपलाश्लेष्मरोगेस्थिरास्यात्सर्पा कारामभवतितदावातपित्तप्रभावे॥ नाडीहंसीकफप वनयोर्दर्दुराश्लेष्मपित्तेछिन्नासूक्ष्मापिचविषमगदे सन्निपातेत्वलक्ष्या॥१॥ ॥७॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥वातरोग असतां नाडी वांकडी चालत्ये; पित्तरोग असतां चंचळ असत्ये; कफरोग असतां स्थिर चालत्ये; वात, पित्त उभयात्मक रोग असतां सर्पासारिखी चालत्ये; कफपित्तात्मक असतां हंसा सारखी; कफ पित्तात्मक असतां बेडका सारखी चालत्ये; खंडगति, व सूक्ष्मगति, अशी विषम रोगाचेठायीं असत्ये; सन्निपाताचे ठायीं अलक्ष्य म्हणजे जिची गति बराबर कळत नाहीं.

मू०॥ पाठांतरं॥ वातेवक्रगतानाडीचपलापित्तवाहिनी॥ स्थिराश्लेष्मवतोज्ञेयाद्वंद्वजासन्निपातजा॥१॥ ॥

टी०॥ ॥वायुरोगाची नाडी वक्र; पित्तरोगाची चपळ; कफरोगाची स्थिर; तशीच द्वंद्वज आणि सन्निपात यारोगांची स्थिर असत्ये.

मू०॥ काष्ठकुट्टोयथाकाष्ठंकुट्टतेचातिवेगतः॥ स्थित्वास्थित्वातथानाडीसन्निपातेभवेद्ध्रुवं॥२॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥काष्ठें फोडणारा जसा वेगानें काष्ठें फोडतो तशी राहून राहून चालणारीनाडी सन्निपातामध्यें होत्ये.

मू०॥ मंदंमंदंशिथिलशिथिलंव्याकुलंव्याकुलंवास्थित्वास्थित्वावहतिधमनीयातिनाशंचसूक्ष्मा॥ नित्यंस्कंधेवहतिपुनरप्यंगुलीःसंस्पृशेद्वाभावैरेवंबहुविधतरैःसन्निपातेत्वसाध्या॥३॥

टी०॥ ॥अत्यंत मंद, फार शिथिल, व्याकुळ, राहून राहून चालणारी, सूक्ष्म नाश पावणारी, खांद्याचे ठायीं स्फुरण पावणारी, पुनः अंगुलीचे ठायीं स्पर्श करणारी असी नाना तऱ्हेची नाडी सन्निपाताचे ठायीं असाध्य असत्ये.

मू० ॥ प्रातःश्लेष्मयुतानाडीमध्यान्हेचापिपैत्तिकी ॥ अ
पराण्हेवातकीचपुनःपित्तंनिशार्धके ॥ ४ ॥

टी० ॥ ॥ प्रातःकाळीं नाडी कफयुक्त असत्ये; मध्यान्हीं पित्तयुक्त; अपरा
ण्हीं वातयुक्त; पुनः मध्यरात्रीस पित्तयुक्त या प्रमाणें अहोरात्र जाणावें.

इतिनाडीपरीक्षा.

## अथमूत्रपरीक्षा.

मू० ॥ रक्तंपीतंतथाश्वेतंकृष्णंचैवयथाक्रमं ॥ वातेपित्ते
कफेप्रोक्तंसन्निपातेचमूत्रकं ॥ १ ॥

टी० ॥ ॥ वात, पित्त, कफ आणि सन्निपात ह्म० तिन्ही दोष मिश्र झालेले
या दोषानुक्रमेंकरून तांबडें, पिवळें, पांढरें, काळें असें मूत्र होतें.

मू० ॥ पाठांतरं ॥ वातेतुरक्तमूत्रंस्यात्पीतवर्णंतुपित्त-
जे ॥ पांडुवर्णंकफेप्रोक्तंकृष्णवर्णंत्रिदोषजे ॥ २ ॥ ॥

टी० ॥ ॥ पूर्वींचेंच.

मू० ॥ धूमलंवातपित्तेनफेनिलंकफमारुते ॥ श्लेष्मवात
समुद्भूतंमूत्रंकुंकुमपांडुरं ॥ ३ ॥

टी० ॥ ॥ द्विदोषानें मूत्र कसें होतें त्याचें लक्षण; वातपित्तानें धूम्रवर्ण; वात
कफानें फेंसट; पित्तकफानें ताबुस असून पांढरें.

मू० ॥ प्रातर्मध्यभवांधारांधृत्वामूत्रस्यरोगिणः ॥ तत्रतै
लबिंदुंक्षिप्त्वासाध्यासाध्यंविचिंतयेत्

टी० ॥ ॥ प्रातःकाळीं मोठ्या पाहाटेस कांचेचे किंवा कांशाचे पात्रांत पहिली
व शेवटची धारा सोडून, मधली धारा धरून, त्यांत तेलाचा बिंदू टाकून सा
ध्यासाध्य विचार करावा.

मू० ॥ वातेविस्तरतिछायापित्तेभवतिबुद्बुदः ॥ श्लेष्मणा
चोदयाकारमसाध्यंतलगंयदि ॥ ५ ॥ ॥ ७ ॥ ॥

टी० ॥ ॥ वातानें पातळ छायेसारखें पसरतें; पित्तानें बुडबुडे येतात; कफानें
स्वच्छप्रभा पडते तसें दिसतें असाध्य असेल तर तळास जातें.

मू० ॥ विस्तृतेबहुशःसाध्यऊर्ध्वगेकृच्छ्रसाध्यगः ॥ त-
लगेम्रियतेरोगीब्रह्मणापिचिकित्सितः ॥ ६ ॥ ॥

टी०॥ ॥ तेल टाकतांक्षणीं विकास पावलें ह्मणजे रोग साध्य असें बहुत करून जाणावें; जर उंचपणा असेल तर कष्टसाध्य, आणि जर तळास गेलें तर रोगी मरेल; जरीं ब्रम्हदेव औषध देईल तरींही वांचणार नाहीं.

## इतिमूत्रपरीक्षासं०

## अथकालज्ञानं

मू०॥ अरुंधतींध्रुवंचैवविष्णोस्त्रीणिपदानिच ॥
आयुर्हीनानपश्यंतिचतुर्थंमातृमंडलम् ॥१॥ ॥

टी०॥ ॥ अरुंधती, ध्रुव, विष्णूचीं तीन पदें, चवथें मातृमंडल हे चार पदार्थ ज्यानें आयुष्य संपलें असेल तो पाहात नाहीं; आतां अरुंधती इत्यादिक चार पदार्थांचा अर्थ सांगतो.

मू०॥ अरुंधतीभवेज्जिव्हाध्रुवोनासाग्रमेवच ॥ विष्णोः
स्त्रीभ्रूद्वयोर्मध्येभ्रूद्वयंमातृमंडलं ॥२॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥ अरुंधती ह्म० जिव्हा; ध्रुव ह्म० नासिकेचें अग्र, (नाकाचा शेंडा) विष्णु दोन भिवयांमध्यें असें सांगितलें तेव्हां अर्थात् दोन भिवयांचा मध्य हीच विष्णूचीं तीन पदें; आणि दोन भिवया हें मातृमंडल याप्रकारें जाणावें.

मू०॥ नासाग्रंभ्रूयुगंजिव्हांमुखंचैवनपश्यति॥ कर्णघोषं
नजानातिसगच्छेद्यममंदिरं॥३॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥ नाकाचा शेंडा, भिवया, जिव्हा, मुख इतकीं जो पाहात नाहीं आणखीं कान दाबून धरले असतां आंत जो शब्द होतो तो ज्याला ऐकूं येत नाहीं तो यमसंदिराप्रत जाईल.

मू०॥ नवभ्रूपंचचक्षुःष्यसप्तकर्णस्त्रिनासिका॥ जिव्हाच
दिनमेकंतुकालचिन्हंदिनेदिने॥४॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥ जिव्हा इत्यादिक सांगितलें त्याचे दिवसांना नेम सांगतो; भ्रुकुटी पाहात नाहीं तो नऊ दिवसानीं मरेल, याच रीतीनें भ्रुकुटी मध्य, कर्णघोष, नासिकाग्र, जिव्हा यांचा क्रमें करून पांच, सात, तीन, एक हा दिवस नेम जाणावा; हें कालचिन्ह दररोज पाहावें.

मू०॥ अकस्माद्भिवेत्स्थूलोह्यकस्माच्चकृशोभवेत्॥ अक

स्यादन्यथाभावेषण्मासैश्चविनश्यति॥५॥ ॥७॥

टी०॥ ॥जो अकस्मात शरीरानें जाडा, किंवा बारीक होतो, आणि ज्याची प्रकृ ती अकस्मात बदल होत्ये ह्मणजे रागीट असला तर शांत, किंवा शांत असला तर रागीट या प्रमाणें प्रकृतीनें बदल झालेला तो साहा महिन्या नीं मरेल.

मू०॥ रसनायाः कृष्णाभावोमुखंकुंकुमसन्निभं॥ जिव्हा स्पर्शनजानातिदुर्लभंतस्यजीवितं॥६॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥जिव्हा काळी, मुख तांबडें, जिव्हेला स्पर्श कळत नाहीं अशा म नुष्याचें वांचणें कठीण.

मू०॥ सूर्येकेंद्रेज्वरमतितरंशीतवातंचचंद्रेभौमेरक्तंज्ञ गुरुभृगवोरोगनिर्मुक्तकाःस्युः॥ मंदेमंदंशिथिलमर णंजीवनाशंचराहौलग्नंशस्तंग्रहबलयुतंयातुवैद्योवि लोक्य॥७॥

टी०॥ ॥वैद्य रोग्याकडे जातेवेळेस जें लग्न असेल त्या लग्नापासून पहिलें १ चवथें ४ सातवें ७ दाहावें १० जें स्थान त्यास केंद्र असें ह्मण तात; त्या स्थानीं सूर्य असेल तर अत्यंत ज्वरयुक्त रोगी होईल; याप्रमाणें केंद्रीं चंद्र, मंगळ असतील तर क्रमेंकरून कफ वात, रक्त हे दोष रोग्यास होतील असें जाणावें; बुध, गुरु, शुक्र हे केंद्रीं असले तर रोगी रोगापा सून निर्मुक्त होईल; शनि केंद्रीं असेल तर दुखणें लांबणी खालीं पडून मरण दूर होईल; राहु केंद्रीं असेल तर रोगी मरेल; हेंच फळ केतूचें पृथ क् सांगितलें नसेल तेथें राहु सारखें जाणावें असें ज्योतिःशास्त्रांत आहे, यासाठीं प्रशस्त लग्न व ग्रहबल हीं पाहून वैद्यानें रोग्याकडे जावें.

मू०॥ रात्रौदाहोभवतिचदिवाजायतेशीतलत्वंकंठेश्लेष्मा विरसवदनःकुंकुमाकारनेत्रे॥ जिव्हाकृष्णावहतिचस- दास्थूलसूक्ष्माचनाडीतद्भैषज्यंस्मरणमधुनाराभरामेति नाम॥८॥

टी०॥ ॥जा रोग्यास रात्रीस दाह होतो; दिवसास थंडी वाजत्ये; घशांत कफ; तोंडास अरुचि; डोळे लाल; जिव्हा काळी; कांहीं वेळ नाडी फुगलेली आणि कांहीं वेळ अति बारिक अशीं लक्षणें झालीं असतां त्याला राम राम हें औषध

मू०॥ सौम्यादृष्टिर्वदतिविमलंहस्तपादौसदोष्णौस्वल्पोदाहःस्फुरसवदनःकोमलायस्यजिव्हा॥ नासाश्वासोवहतिसरलंस्वेदहीनोज्वरोसौसाध्योरोगीभवतिनियतंवैद्यभैषज्ययोग्यः॥९॥

टी०॥ ॥पाहाणें सौम्य, भाषण यथास्थित, हात पाय गार नाहींत, दाह थोडा, तोंडास रुचि, जिव्हा मऊ, नाकांतला श्वास सरळ वाहातो, जांत घाम नाहीं असा ज्वर, इतकीं लक्षणें ज्या रोग्यास असतील तो रोगी साध्य व वैद्याचे चिकित्सा करण्यास योग्य होय.

मू०॥ औषधंमंगलंमंत्रात्यन्याश्चविविधाःक्रियाः॥ यस्यायुस्तस्यसिद्ध्यंतिनसिद्ध्यंतिगतायुषः॥१०॥ ॥छ॥ ॥

टी०॥ ॥औषध, मंगळ, मंत्र, अन्य नानाप्रकारचीं कृत्यें ज्याला आयुष्य आहे त्याचींच सफळ होतात, ज्याचें आयुष्य सरलें त्याचीं विफळ.

मू०॥ अग्निमूलंबलंपुंसांरेतोमूलंतुजीवितं॥ तस्मात्सर्वप्रयत्नेनवन्हिंशुक्रंचरक्षयेत्॥११॥

टी०॥ ॥अग्नि हा बळाला कारण आहे आणि वीर्य हें वांचण्याला कारण यासाठीं मनुष्याचा अग्नि, शुक्र (धातु) हीं सर्व प्रयत्नानें रक्षावीं.

अथऋतुप्रकोपः

मू०॥ मार्गपौषेतथामाघे आषाढेश्रावणेपिच॥ भाद्रमासिचिकित्सज्ञैर्वातोराजाप्रकीर्तितः॥१॥ आश्विनेकार्तिकेमासेवैशाखज्येष्ठयोर्ध्रुवं॥ सर्वशास्त्रविशारज्ञैःपित्तराजाप्रकीर्तितः॥२॥ फाल्गुनेचैत्रमासेचजंतुपीडाकरोमतः॥शीतलांबुसमुद्भूतःश्लेष्माराजाप्रकीर्तित॥३॥

टी०॥ ॥मार्गशीर्ष, पौष, माघ, आषाढ, श्रावण, भाद्रपद या साहा महिन्यांत वायु राजा असें सांगितलें ह्म० या महिन्यांत वायूचा प्रकोप असतो; तसा अश्विन, कार्तिक, वैशाख, ज्येष्ठ या चार महिन्यांत पित्त राजा असें सर्वशास्त्रामध्यें निपुण यांनीं सांगितलें; ह्म० या चार महिन्यांत पित्ताचा प्रकोप; तसाच फाल्गुन, चैत्र या दोन महिन्यांत सर्व जंतूंला पीडा करणारा कफराजा सांगितला ह्म० कफाचा प्रकोप.

मू०॥ संधारणाध्यशनजागरणोच्चभाषाव्यायामयानक
टुतिक्तकषायरूक्षैः॥ चिंताव्यवायभयलंघनशोकभीतै
र्वायुप्रकोपमुपयातिघनागमेच॥४॥ ॥७॥ ॥

टी०॥ ॥संधारण ह्म० मूत्रादिकांचा अवरोध करणें ह्म० मूत लागलें असतां नजाणें इत्यादिक; अध्यशन ह्म० एकदां जेऊन पुनः लागलें च जेवणें; जागरण ह्म० जागणें; उच्च भाषण ह्म० मोठ्यानें ओरडणें; किंवा बोलणें; व्यायाम ह्म० फार श्रम करणें; यान ह्म० अश्वादिकांवर बसून जाणें; तिखट, कडू, तुरट, रूक्ष यांचें भक्षण करणें; चिंता, व्यवाय ह्म० मैथुन हीं फार करणें; भय बाळगणें; लंघन ह्म० काहीं नखाणें; शोक करणें, अबुधाकानें इतक्या प्रकारानीं वायु कुपित होतो, आणि पर्जन्याचे आरंभ काळींही कुपित होतो.

मू०॥ कट्वम्लमद्यलवणोष्णविदाहितीक्ष्णैः क्रोधातपा
नलपरिश्रमशुष्कशाकैः॥ क्षारादजीर्णविषमाशन
भोजनैश्चपित्तप्रकोपमुपयातिघनात्ययेच॥५॥

टी०॥ ॥तिखट, आंबट, मद्य, खारट, उष्ण, विदाहि, तीक्ष्ण ह्म० मिरच्या हिंग इत्यादिकांचे भक्षणें करून, आणि क्रोध, आतप ह्म० ऊन घेणें, अनल ह्म० शेक घेणें, श्रम फार करणें, शुष्क पदार्थ भक्षण करणें, भाजी फार खाणें, किंवा वाळलेली भाजी खाणें, क्षार ह्म० टांकणखारादिक खाणें, अजीर्ण विषमाशन ह्म० अकाळीं फार खाणें अशा प्रकारानीं पित्त कुपित होतें, आणि पर्जन्यकाळसरल्यावरही कुपित होतें.

मू०॥ स्वप्नादिवामधुरशीतलमत्स्यमांसैर्गुर्वम्लपिच्छ
लतिलेक्षुपयोविकारैः॥ स्निग्धातितृप्तिलवणोदक
पानभक्ष्यैः श्लेष्मप्रकोपमुपयातितथावसंते॥६॥

टी०॥ ॥दिवसास झोंप घेणें, गोड, थंड, मत्स्य, मांस, जड, आंबट चिकट, बुळबुळीत, तिळ, ऊस, दुधापासून झालेला पदार्थ, ओशट इतक्यांचे भक्षणानें; पोट भरल्यावर जास्ती खाणें, मीठ, उदक, हीं फार सेवन करणें, विरुद्ध भक्षण ह्मणजे दुधावर पाणी पिणें इत्यादिक, इतक्या कारणानीं कफ कुपित होतो, आणि वसंत ऋतूमध्येंहीं होतो.

इतिवातादिप्रकोपः

मू०॥ तदेवमेतेक्रमशोविशोध्यादोषाःप्रदुष्टायुगपन्न योपि॥ कुर्वंतिरोगान्विविधान्शरीरेसंस्थानसंज्ञावि गतानेकान्॥१॥

टी०॥ ॥कुपित झालेले वातादिदोष क्रमानें शोधावे किंवा एकदांच ति नही शोधावे, नाहीं तर दुष्ट झालेले वात, पित्त, कफ हे शरीराचे ठायीं नानाप्रकारचे रोग उत्पन्न कर्तात, ज्यांना नाव नाहीं व लक्षणही नाहीं असे.

मू०॥ पारुष्यसंकोचनतोदशूलान्श्यामत्वमंगव्यथचे ष्टभावान्॥ स्तब्धत्वशीतत्वखरत्वशोफाः कर्माणिवा योःप्रवदंतितज्ज्ञाः॥२॥

टी०॥ ॥रूक्षपणा, आखडणें, पोटांत टोंचल्यासारखें होणें, तिडीक, का ळेपणा, अंग दुखणे, हात पाय हालणें, हाल चाल नहोणे, थंडपणा, ख रखरीतपणा, सूज इतकीं कर्मे वायूचीं असे दोष जाणणारे ह्मणतात.

मू०॥ परिभ्रमस्वेदविदाहरागौवैगंध्यसंक्लेदविषादको पान्॥ प्रलापमूर्छाभ्रमपीनभावान्पित्तस्यकर्माणिव- दंतितज्ज्ञाः॥३॥

टी०॥ ॥भोंवळ, घाम, दाह, लाली, दुर्गंध, चिकचिकीतपणा, खेद, कोप, ब डबड, भान नसणें, भ्रांति पिंवळेपणा, इतकीं पित्ताचीं कर्में असे दोष जा णणारे ह्मणतात.

मू०॥ श्वेतत्वशीतत्वगुरुत्वकंडूस्नेहप्रसेकस्तिमितावले पान्॥ उत्सेधसंधानचिरक्रियाश्चकफस्यकर्माणिवदंति तज्ज्ञाः॥४॥

टी०॥ ॥पांढरेपणा थंडपणा, जडपणा, कंड, जाडेपणा, सांधणें वेळानें कृ त्य करणें हीं कर्मे कफाचीं असे दोष जाणणारे ह्मणतात.

## इतिदोषत्रयचिन्हानि.

मू०॥ एतानिलिंगानिचतत्कृतानांसर्वामयानांचविभि न्ननाम्नां॥ कश्चिद्भवेत्मामिविशेषएवसंज्ञांतरंयेनतुसं प्रयाति॥१॥

टी०॥ ॥पूर्वी सांगितलीं जीं वायु, पित्त, कफ यांचीं चिन्हें तीच त्यांपासू

न झालेले जे ते ते सर्व रोग त्यांचीं जाणावीं; एकादा रोग विशेष कारणानीं होतो ह्मणून त्याला विशेष नाम प्राप्त होतें.

मू०॥ आलस्यतंद्राहृदयाविशुद्धिदोषप्रवृत्तिर्घनताचमूत्रे॥ अल्पक्रियात्वंचविसृप्रतानसामान्यतोव्याधिमुपादिशंति॥२॥

टी०॥ ॥ आळस, डोळ्यावर झापड, उर दाटलेला, जांभया, नाकास पाणी इत्यादिक, मूत दाट, कांहीं क्रियाकरण्याविषयीं अल्प सामर्थ्य, झोंप नसणें सामान्य रोगास जाणवितात.

## इतिसामान्यलक्षणानि.

मू०॥ स्निग्धोष्णास्थिरवृष्यभोज्यलवणस्वाद्वम्लतैलातपस्नानाभ्यंजनबस्तिमांसमदिरासंवाहनोन्मर्दनैः॥ स्नेहस्वेदनिरूहयोश्वशयनैस्तीव्रोपनाहादिभिः॥ पानाहारविहारभेषजमिदंवायुंप्रशांतिंनयेत्॥१॥

टी०॥ ॥ स्निग्ध, उष्ण, गरु, खारट, गोड, आंबट, तेल हे पदार्थ खाणें, ऊन घेणें स्नान करणें, डोळ्यांत अंजन, बस्तिकर्म, मांस खाणें, मद्य पिणें, रगडणें, मळणें, अंगास तेल तूप लावणें घाम काह्राडणें, निरूह बस्ति करणें निजणें, पेंड बांधणें, लेप लावणें, योग्य खाणें, पिणें, फिरणें हीं औषधें यानीं वायु शमवावा.

मू०॥ स्निग्धस्वादुकषायशीतपवनच्छायानिशाव्यंजनंज्योत्स्नाभूगृहवारियंत्रजलजस्त्रीगात्रसंस्पर्शनं॥ सर्पिःक्षीरविरेकसेकरुधिरस्रावप्रलेपादिकंपानाहारविहारभेषजमिदंपित्तंप्रशांतिंनयेत्॥२॥

टी०॥ ॥ स्निग्ध, गोड, तुरट, थंड हे पदार्थ खाणें, शीतळ वायु, छाया घेणें, रात्रीची हवा घेणें, मुरंबा, लेह इत्यादिक खाणें; चांदणें, तळघर, कारंजे कंबळ, तरुण स्त्रियांचा अंगाचा स्पर्श इतक्यांचें सेवन करणें; तूप, दूध, पिणें रेच घेणें, रक्त काढणें, अंगास चंदनादिकांचा लेप करणें, पंख्याचा वारा घेणे इत्यादिक, योग्य खाणें, पिणें, फिरणें, हीं औषधें याणीं पित्त शमवावें.

मू० ॥ रूक्षक्षारकषायतिक्तकटुकव्यायामनिष्ठीवनंस्त्री सेवाध्वनियुद्धजागरजलक्रीडापदाघातनं ॥ धूमस्ता पशिरोविरेकवमनंस्वेदोपवासादिकंपानाहारविहार भेषजमिदंश्लेष्माशमंगच्छति ॥ ३॥

टी० ॥ ॥ रूक्ष, खारट, तुरट, कडू, तिखट इतक्या पदार्थांचें भक्षण; श्रम करणें, वरचेवर खाकरेरा टाकणें, स्त्रीसंग करणें, मार्गी चालणें, खुस्ती करणें, जागरण करणें, पोहोणें, उठबशा करणें, धूर घेणें, शेकणें, मस्तक विरेचन करणें, ओकारी काढणें, घाम काढणें, उपास करणें, योग्य खाणें, पिणें, फिरणें, हें औषध याणें कफ शमतो.

इतिदोषत्रयशमनम्

मू० ॥ हेमंतवर्षाशिशिरेषुवायोः पित्तस्यतोयांतनिदाघ योश्च ॥ कफस्यकोपः कुसुमागमेषुकुर्वीतयत्नंविहितं यदेषां ॥ ४॥

टी० ॥ ॥ हेमंत, वर्षा, शिशिर या ऋतूमध्यें वायु कुपित असतो; शरत्, ग्रीष्म या ऋतूमध्ये पित्त कुपित असतें; वसंत ऋतूमध्यें कफ कुपित असतो; यांना विहित यत्न असेल तो करावा.

इतिदोषोत्पत्तिः

मू० ॥ आमंजयेल्लंघनकोष्णपेयाल्लघ्वल्पसूक्ष्मोदन तिक्तयूषैः ॥ निरूहणस्वेदनपाचनैश्चसंशोधनैरूर्ध्व मधस्तथाच ॥ १॥

टी० ॥ ॥ लंघन, किंचित् उष्ण अशी पेया म्हणून पेजेसारखी पातळ जांत थोडें अन्न असतें ती, फुटेला मऊ असा भात, कडू मंड, निरूह बस्ति, घाम काढणें, पाचन, रेच ओकारी इतक्यानीं आम जिंकावा.

मू० ॥ कफप्रकोपेवमनंसनस्यंविरेचनंपित्तभवेविका रे ॥ वातामयेबस्तिविशोधनंचसंसर्गजेव्यत्ययविमिश्रमे तत् ॥ २॥

टी० ॥ ॥ कफ कुपित झाला असतां ओकारी येण्याचें औषध आणि न-

स्य हें घ्यावें; पित्ताचा विकार झाला असतां रेचन घ्यावें; वातरोगाला बस्तिकर्म किंवा रेचन हा उपाय करावा; आणि जर दोन दोषांचा विकार असेल तर दोन्ही उपाय करावे, ह्मं० वातपित्त आहे तर बस्तिकर्म आणि रेचन जर कफपित्त आहे तर वमन आणि रेचन, कफवात आहे तर वमन आणि बस्तिकर्म.

मू० ॥ बुध्वातदन्यदपितत्तदनुक्रमेणाचेष्टांस्वयंसम
धिगम्ययथानुरूपं ॥ रोगेषुभेषजमनल्पमतिर्विदध्या
च्छास्त्रंहिकिंचिदुपदेशबलंकरोति ॥ ३ ॥

टी० ॥ ॥ शास्त्रांत सांगितल्यापेक्षां जेजे निराळे व्याधि होतील ते ते त्या त्या लक्षणांनीं जाणून त्यांवर अनुरूप औषध मोठा बुद्धिमान् असेल त्याणें करावें; कारण शास्त्र केवळ दिग्प्रदर्शन करतें.

## अथशाल्यादिगुणाः

श्वेतारक्तास्थूलसूक्ष्मायेचान्येशालयःशुभाः ॥ स्वा-
दुपाकरसाः स्निग्धावृष्याबद्धाल्पवर्चसः ॥ १ ॥

टी० ॥ ॥ पांढरे, तांबडे, जाडे, बारीक आणखीही कितीएक प्रकारचे शाळी आहेत ते चांगले आहेत; ज्यांचा पाक व रस मधुर आणि ते स्निग्ध व पुष्टि कारक, बळ देणारे, बांधलेला थोडा असा मळ करणारे.

मू० ॥ कषायानुरसाः पथ्यालघवोमूत्रलाहिमाः ॥ षष्टि
कास्तेहिषुश्रेष्ठागौरश्वासितगौरतः ॥ २ ॥

टी० ॥ ॥ बारीक साळी पथ्य आहेत; ज्यांचा रस पाठिमागून किंचित् तुरट लागतो, आणि मूत्र करणाऱ्या थंड आहेत; साठ दिवसांनीं पिकणाऱ्या साळी सर्वांत उत्तम; त्यामध्यें पांढऱ्या काळसर असून पांढऱ्या असतात त्यांपेक्षां श्रेष्ठ.

मू० ॥ सूक्ष्मशीतोगुरुःस्वादुःसरोविट्वातकृद्यवः ॥

टी० ॥ ॥ जातु थोडा थंड, हलका गोड, सारक मल करणारा, वात करणारा, असा आहे.

मू० ॥ संधानकारीमधुरोगोधूमःस्थैर्यकृत्सरः ॥

टी० ॥ ॥ गहूं सांधणारा, मधुर, स्वच्छता करणारा, सारक असा आहे.

मू० ॥ युगंधरस्त्रिदोषघ्नः स्वादुपथ्योरसायनः ॥

टी० ॥ ॥ जोंधळा त्रिदोष नाशक, गोड, पथ्य रसायन ह्म० जराव्याधि नाशक, वयाचें स्थैर्य करणारा, डोळ्यांस हितकारक; बळ, पुष्टि, हर्ष, यांतें करणारा; स्निग्ध, मधुर असा आहे.

मू० ॥ मुद्गादकीमसूरादिशिंबीधान्यंविबंधकृत् ॥ कषायंस्वादुसंग्राहिकटुपाकंहिमंलघु ॥ मेदश्लेष्मास्त्रपित्तेषुहितंलेपोपसेकयोः ॥

टी० ॥ ॥ मूग, तुरी, मसुरा, इत्यादिक शेंगेचें धान्य पोट फुगविणारें, तुरट, गोड, हगवण बंद करणारें, पाकफाळीं कडू, थंड, आणि लघु, मेद, कफ, रक्तपित्त, इतक्यांचे ठायीं हितकारक लेप आणि पोचुंडी नें शेकणें या विषयीं चांगलें असें आहे.

मू० ॥ वरीत्रमुद्गोल्पचलः कलायस्त्वतिवातलः ॥ चणकोवातलोरूक्षः कुलित्थः कफवातहृत् ॥ ॥

टी० ॥ ॥ पूर्वी सांगितलेल्या शेंगेचे धान्यामध्यें मूग किंचित् वातकर, आणि वाटाणा अति वातल, हरभरा वातल आणि रूक्ष, कुलित्थ ह्म० कुळगा कफ, वात यांतें हरण करणारा.

मू० ॥ वास्तुकंग्रहणीकुष्टत्रिदोषार्शोहरंपरं ॥ तद्वल्लघुदलाचिल्लीकाकमाचीचमेथिका ॥

टी० ॥ ॥ चाकवत संग्रहणी, कुष्ट, त्रिदोष, मुळव्याध यांचा नाशक आहे; तशीच बारीक पानाची घोळ, आणि कावळी आणि मेथी आहे.

मू० ॥ तंदुलीयोहिमोरूक्षोविषपित्तास्त्रकासजित् ॥

टी० ॥ ॥ तांदुळजा, थंड, रूक्ष, विष, पित्त, रक्त, खोकला, यांचानाशकआहे.

मू० ॥ चांगेरीकफवातास्त्रसंग्रहण्यतिसारजित् ॥

टी० ॥ ॥ चुका कफ, वात, रक्त, संग्रहणी, अतिसार यांचा नाशक आहे.

मू० ॥ हृद्यंपटोलंकृमिजित्स्वादुशीतंरुचिप्रदं ॥ पित्तलंदीपनंभेदीवातघ्नंबृहतीद्वयं ॥

टी० ॥ ॥ पटोल ह्म० पडवळ हृद्य, कृमिनाशक, स्वादु, रुचिप्रद, थंड आहे, रिंगणी, डोर्ली पित्तकारक, दीपन, भेदक, वातनाशक आहे.

मू० ॥ कारवेल्लंसतिक्तंस्याद्दीपनंकफजित्सरम् ॥ ॥

टी०॥ ॥ कार्लें कडू, दीपन, कफनाशक आहे.

मू०॥ कर्कोटकंज्वरश्वासदद्रुकुष्ठविषापहं ॥

टी०॥ ॥ करेलें ज्वर, श्वास, दद्रु, कुष्ट, विष यांचें नाशक आहे.

मू०॥ वार्ताकंकफवातघ्नंकिंचिद्दातप्रकोपनं॥ सरंच मूत्रलंप्रोक्तंबल्यंकूष्मांडमेवतत्॥

टी०॥ ॥ वांगें कफ, वात यांचें नाशक आहे, आणि कोंवळें वांगें किंचि द्दातप्रकोप करणारें, सारक, मूत्र करणारें, बळ करणारें असें आहे.

मू०॥ बिंबीफलंस्वादुशीतंस्तंभनंलेखनंगुरु॥ पित्तास्रदाहशोफघ्नंवाताध्मानविबंधकृत्॥ ॥

टी०॥ ॥ तोंडलें गोड, थंड, स्तंभन, लेखन, गुरु; पित्त, रक्त, शोफ यांचें नाशक; व वात, आध्मा, विबंध यांतें करणारें असें आहे.

मू०॥ वृष्यंवर्णकरंबल्यंपजननंपित्तापहंवातजिन्मूत्रोघातहरंप्रमेहशमनंकृच्छ्राश्मरीछेदनं॥ विण्मूत्रग्लपनंतृषार्तिशमनंक्षीणांगपुष्टिप्रदंकूष्मांडंप्रवरंवदंतिभिषजोवल्लीफलानांपुनः॥

टी०॥ ॥ कोहळा वीर्यवृद्धिकर; वर्ण, बल कारक, पित्त, वात, मूत्राघात, प्रमेह, मूत्रकृच्छ्र, मूत्राश्मरी इतक्यांचा नाशक, मल, मूत्र शोधन करणारा, तृषेची पीडा दूर करणारा, पुष्टिकारक, आणि वल्लीफलामध्यें श्रेष्ठ असें वैद्य ह्मणतात.

मू०॥ जलजंपद्मकंदादिग्राहिपित्तास्रहृद्गुरुः॥ ॥

टी०॥ ॥ कमळ, आणि कमलकंद वगैरे ग्राहि, पित्त, रक्त नाशक, गुरु असें आहेत

मू०॥ दीपनःसूरणोरुच्यःकफार्शोघ्नोस्रजिल्लघुः॥

टी०॥ ॥ सूरण अग्निदीपक; अरुचि, कफ, मुळव्याध, रक्त यांचा नाशक, आणि लघु आहे.

मू०॥ आर्द्रपाचनदीपनंरुचिकरंवृष्यंकटूष्णांवरंस्वर्यंमेहहरंकफामयहरंशोफापहंशूलजित्॥ जिव्हाकंठविशोधनंसलवणंपथ्यंसदाभोजनेनिंबूतोयविमिश्रितंरुचिकरंसंदीपनंसारणं॥

टी०॥ ॥ आलें पाचन, दीपन, रुचिकर; वृष्य, तिखट; उष्ण, स्व...

टकरणारें, मेह, कफ रोग, शोफ, शूल, यांचें नाशक आणि लवणासहित जिव्हा, कंठ यांचें शुद्धि करणारें, नित्य भोजना विषयीं हित करणारें, आणि लिंबाचे रसानें मिश्रित केलें असतां अत्यंत रुचिकर, दीपन, सारक आहे.

मू० ॥ भूकंदस्त्वतिवातलोबलकरः श्लेष्माणमत्यर्थकृद्विष्टंभीगुरुमेदसोपिविषमोवातामयंदीपयेत् ॥ मेहंकुष्टरुजंकरोतिसततंतद्वानरक्तंमहत्पिंडालुः कृमिकृच्छ्रकुष्टमलदृत्पित्तामयध्वंसकः ॥

टी० ॥ ॥ डुक्करकंद, अतिवातुळ, बलमद, अत्यंत कफकारक, अवष्टंभ करणारा, गुरु, मेदोरोग्यास विरुद्ध, वातरोग वाढविणारा, मेह, कुष्ट, वात रक्त यांतें करणारा असा आहे; रताळें, कृमि, कुष्ट, मूत्रकृच्छ्र, पित्त रोग याचें नाशक आहे.

मू० ॥ ऐर्वारुकंपित्तशीतंमूत्रघ्नंरुचिकारकं ॥

टी० ॥ ॥ चिबूड, पित्तकारक, थंड, मूत्रसाफ करणारें, रुचिमद असें आहे.

मू० ॥ पत्रेपुष्पेफलेनालेकंदेचगुरुताक्रमात् ॥ कंदास्तु वातलाःसर्वेकफाजीर्णकराजडाः ॥

टी० ॥ ॥ पान, फूल, फळ, देंट, कांदा इतक्यामध्यें क्रमेंकरून अधिक अधिक गुरुत्व आहे; ह्मं० पानापेक्षां फुल गुरु, फुला पेक्षां फळ गुरु या प्रमाणें.

मू० ॥ कंदास्तुवातलाःसर्वेकफाजीर्णकराजडाः ॥

टी० ॥ ॥ संपूर्ण कंद वातुळ, गुरु, कफ, अजीर्ण यांतें करणारे असे आहेत.

मू० ॥ दाडिमंग्राहिदोषघ्नंहृद्यंरोचनदीपनं ॥ तद्वदामलकंपथ्यंमधुराम्लरसंसरं ॥

टी० ॥ ॥ डाळिंब ग्राहि, त्रिदोषशामक, हृदयास प्रिय, रुचिमद, दीपन असें आहे. आंवळा पूर्वी सांगितले गूण असून, हितकारक, गोड, आंबट सारक असा आहे.

मू० ॥ दोषकृल्लकुचंस्वादुपित्तघ्नंमृगलेंडिकं ॥

टी० ॥ ॥ रानफणस दोषकारक, गोड असा आहे. मृगलेंडिक पित्त शामक आहे.

मू० ॥ गुल्मवातकफश्वासकासघ्नंबीजपूरकं ॥

टी० ॥ ॥ महाळुंग गुल्म, वात, कफ, श्वास, खोकला यांचें नाशक आहे.

मू० ॥ चाराक्षारुष्करांतस्थं वृष्यं पित्तानिलाग्निजित् ॥

टी० ॥ ॥ चारोळ्या, बेहडा, बिब्बा, यांचा मगज, पित्त, वायु, अग्नि यांचा शाम क आहे.

मू० ॥ द्राक्षापरूषकाम्राद्यमामं पित्तकफप्रदं ॥

टी० ॥ ॥ द्राक्ष, फालसा, आंबा इत्यादिक हिरवें फळ, पित्त आणि कफ यां चें जनक आहे.

मू० ॥ द्राक्षामधुकखर्जूरकाश्मर्यसपरूषकं ॥ वातपित्ता स्रजिद्वृष्यं केशघ्नं च शमीफलं ॥

टी० ॥ ॥ द्राक्ष, ज्येष्ठीमध, खजूर, शिवणीचें फळ, फालसा, हीं वृष्य आ णि वात, पित्त, रक्त यांचीं नाशक आहेत; आणि शमीचें फळ केश नाश- क आहे.

मू० ॥ अल्पसिक्था भवेत्पेया बहुसिक्था विलेपिका ॥ स्यान्निःसिक्थो भवेन्मंडः प्रभूतस्त्वोदनः स्मृतः ॥

टी० ॥ ॥ जांत बारीक बारीक शितें असतात ती पेया जाणावी, जिला कण्हेरी असें ह्मणतात; जांत पुष्कळ शितें असतात ती विलेपिका जाणावी जिला आटवल ह्मणतात; जांत मुळींच शित नाहीं तो मंड जाणावा, जाला कोळ असें ह्मणतात; केवळ शितेंच जांत असतात तो ओदन जाणावा जाला भात असें ह्मणतात.

मू० ॥ मंडश्चतुर्दशगुणे तोयेसिद्धोप्यसिक्थकः ॥ पेया सिक्थयुता सिद्धा चतुर्दशगुणेंभसि ॥ विलेपी घनसिक्था स्यात्सिद्धा तोये चतुर्गुणे ॥ मंडपेयाविलेपीनामोदन श्च लाघवम् ॥

टी० ॥ ॥ एकपट तांदूळ व चवदापट पाणी यांपासून सिद्ध होतो आणि जांत शितें नाहींत तो मंड; एकपट तांदूळ आणि चौदापट पाणी यांपा सून सिद्ध होणारी, जींत अल्प शितें असतात ती पेया; एकपट तां- दूळ आणि चौपट पाणी यांपासून सिद्ध होणारी, जींत पुष्कळ शितें असतात ती विलेपी; मंड, पेया, विलेपी यांमध्यें ओदन लघु ह्म० हलका.

मू० ॥ पथ्यः शिवस्तत्र मंडो वातपित्तानुलोमनः ॥ तृड्दाहग्लानिदोषघ्नः पाचनो धातुसाम्यकृत् ॥ सोनोमा

दंवक्रत्स्वेदीसंधुक्षयतिचालनम् ॥

टी० ॥ ॥ पेया, विलेपी, मंड, जसाशिव तसा मंड, वात, पित्तानुमलक, यामध्यें मंड, तृषा, दाह, ग्लानि दोष यांचा नाशक; पाचन, धातूचें साम्य करणारा, शिराला नरूपणा आणणारा, घामकाढणारा, अग्निदीपक असा आहे जसा शिव.

मू० ॥ क्षुत्तृष्णाग्लानिदौर्बल्यकुक्षिरोगज्वरापहा ॥ महानुलोमनीज्ञेयापेयापाचनदीपनी ॥

टी० ॥ ॥ क्षुधा, तृषा, ग्लानि, दुर्बलता, कुक्षिरोग, ज्वर, यांची नाशक; अनुलोमन, पाचन, दीपन यांतें करणारी असी पेया आहे.

मू० ॥ विलेपीग्राहिणीहृद्याज्ञेयापाचनदीपनी ॥

टी० ॥ ॥ विलेपी ग्राहक, हृदयास प्रिय, पाचन, दीपक अशी आहे.

मू० ॥ व्रणाक्षिरोगसंशुद्धदुर्बलस्नेहपायिनां ॥ सुधौतः प्रस्रुतः स्विन्नस्त्यक्तोष्मान्वोदनोलघुः ॥

टी० ॥ ॥ भात स्वछ धुतलेले तांदुळांचा, पेज काढलेला, मऊ, निवालेला, किंचित् उष्ण असा व्रण झालेला, अक्षिरोगी, रेच्यादिकें करून शुद्ध झालेला, दुर्बल, स्नेह प्यालेला इतक्यास लघु हितावह आहे.

मू० ॥ मुद्गस्तुपथ्यः संशुद्धव्रणकंठाक्षिरोगिणां ॥

टी० ॥ ॥ मूग रेच्यादिकें करून शुद्ध, व्रण झालेला, कंठ रोगी, अक्षिरोगी, इतक्यानां हितावह आहे.

मू० ॥ वातानुलोमीकौलित्थोगुल्मतूनिप्रतूनिचित् ॥

टी० ॥ ॥ हुलगा वायूला अनुलोम करणारा, गुल्म, तूनिवायु, आणि प्रतूनिवायु यांचा नाशक आहे.

इतिपथ्यवर्गः

मू० ॥ मूत्रंगव्यंतथाजंमनुजमवमपिस्वेदकंडूविनाशं तिक्तंतीक्ष्णंलघूष्णंसलवणसुरसंपित्तलंभेदिरूक्षं ॥ हृद्यंरुच्यंकृमिघ्नंहुतवहजननंकुष्टमेदोविनाशं गुल्माशोनाहशूलोदरकफविषजिच्छोफपांडुप्रणाशं ॥

टी० ॥ ॥ गाय, बैल, शेळी, बोकड, मनुष्य इतक्यांचें मूत्र घाम कंडू यांचें नाशक, कडू, तीक्ष्ण, लघु, उष्ण, खारट, रसकाळीं उत्तम, पित्तका

रक्त, भेदी, रूक्ष, हृद्य, रुचिकारक, कृमिनाशक, अग्नि जनक; कुष्ठ, मेद, गुल्म, अर्श, अनाह, शूल, उदर, कफ, विष, शोफ, पांडु इतक्यांचे नाशक आहे.

इतिमूत्रवर्गः

मू०॥ पित्तोत्तरेपित्तरोगेपित्तासृक्कफपित्तयोः ॥ मूर्छाछर्दिज्वरेदाहेतृष्णातीसारपीडिते ॥ धातुक्षीणेविषार्तौन्वसन्निपातेविशेषतः ॥ शस्तंविरोधिरोगेन्वशृतशीतंजलंसदा ॥

टी०॥ ॥ तापून थंड झालेलें जळ, उत्तरावस्था पित्ताची असा जो रोग, पित्तरोग, पित्तरक्त, कफ, पित्त, मूर्छा, ओकारी, ज्वर, दाह, तृषा, अतिसार, धातुक्षीण, विष, सन्निपात, विरोधिरोग इतक्यांचाठायीं मशस्त आहे.

इतिशृतशीतोदकगुणाः

मू०॥ पार्श्वशूलेप्रतिश्यायेवातरोगेगलग्रहे ॥ आध्मानेस्तिमितेकोष्ठेसद्यःशुद्धेनवज्वरे ॥ हिक्कायांस्नेहपित्तेचशीतांबुपरिवर्जयेत् ॥

टी०॥ ॥ कुक्षिशूल, पडसें, वातजन्यरोग, गळचोंडें, पोटफुगणें, स्तब्धकोष्ठ, रेचादिकेंकरून नुक्ताच शुद्ध झालेला, तरुणज्वर, उचकी, स्नेहपान, पित्त इतक्यांचेठायीं थंडपाणी देऊंनये.

इतिशीतोदकगुणाः

मू०॥ गुल्मार्शोग्रहणीक्षयेषुजठरेमंदानलाध्मानकेशोफेपांडुगलग्रहेव्रणगदेमेहेचनेत्रामये ॥ वातारुच्यतिसारकेकफयुतेकुष्ठेप्रतिश्यायकेउष्णंवारिसृशीतलंहितकरंस्वल्पंप्रदेयंबुधैः ॥

टी०॥ ॥ गुल्म, मुळव्याध, संग्रहणी, क्षय, उदर, मंदाग्नि, पोटफुगणें, शोफ, पांडु, गळचोंडें, व्रण, मेह, नेत्ररोग, वायु, अरुचि, अतिसार, कफ, कुष्ठ, पडसें, इतक्यांचे ठायीं तापवून निवालेलें पाणी स्वल्प घ्यालें असतां हित

कारक आहे. इतिउष्णशीतोदकगुणाः

मू०॥ अजीर्णेचौषधंवारिजीर्णेवारिबलप्रदम्॥ भोज
नेचामृतंवारिरात्रौवारिविषोपमं॥

टी०॥ ॥अन्न जिरलें नाहीं तोंपर्यंत पाणी प्यालें असतां औषध आहे; अन्न जिरल्यावर बळ देणारें आहे; भोजनांत अमृत आहे; रात्रीस विषतुल्य आहे.

मू०॥ पिबेद्घटसहस्रंतुयावन्नास्तमितेरवौ॥ अस्तंग
तेदिवानाथेबिंदुरेकोघटायते॥

टी०॥ ॥जों पर्यंत सूर्य अस्तास गेला नाहीं तों पर्यंत सहस्र घागरी पाणी प्यावें; सूर्यास्त झाल्यावर एक बिंदु घागरी प्रमाणें होतो.

मू०॥ तप्तायःपिंडसंसिक्तंलोष्टनिर्वापितंजलं॥ सर्व
दोषहरंपथ्यंसदानैरुज्यकारकं॥

टी०॥ ॥तापलेले लोखंडाचे गोळ्यावर ओतलेलें आणि मातीचें ढेकूळ तापवून विझविलेलें असें दोन प्रकारचें पाणी त्रिदोष शामक, पथ्य, निरोगी करणारें असें आहे.

मू०॥ उशीरमांस्योनकचूरमेलालवंगकंकोलसवारिको
ष्ठ॥ हरीतकीगंधमिदंसमंचजलाधिवासःपृथिवीश्वरा
णां॥

टी०॥ ॥ वीरणीमूळ, जटामांसी, कचोरा, वेलदोडे, लवंग, कंकोळ, वाळा, कोष्ठ, हरीतकी, चंदन, हीं समभाग घेऊन राजेलोकांचे पिण्याचे जळास वास लावावा.

इतिजलवर्गः

मू०॥ गोक्षीरमनभिष्यंदिस्निग्धंगुरुरसायनं॥ रक्तपि
त्तहरंशीतंमधुरंरसपाकयोः॥

टी०॥ ॥गाईचें दूध पातळ, स्निग्ध, गुरु, रसायन म्ह० जराव्याधिनाशक, वयस्थापक, डोळ्यांस हितकारक, पुष्टिप्रद, बलप्रद, मनाला हर्ष करणारें, रक्तपित्तनाशक, थंड, गोड, रसकाळीं, पाककाळीं मधुर असें आहे.

मू०॥ गव्यतुल्यगुणंत्वाज्यंविशेषाच्छोषिणांहितं॥ टी

पनंलघुसंमाहिविशेषाच्चापरंश्रृणु ॥ अजानामल्पका यत्वात्कटुतिक्तनिषेवणात् ॥ नात्यंबुपानाद्व्यायामात्स र्वव्याधिहरंपयः ॥

टी० ॥ ॥शेळीचें दूध गुणानें गाईच्या दुधासारखें असून विशेषें करून क्षयरोग्यास हितकारक, दीपन, लघु, हगवण, बंद करणारें असें आहे; विशेषें करून आणखीही गूण आहेत ते ऐका; शेळ्यांचें शरीर लाहा न; आणि तिखट, कडू या पदार्थांचें भक्षण, पाणी फार पीत नाहींत, व्यायाम करतात इतक्या कारणांनें त्यांचें दूध सर्व व्याधिनाशक आहे.

मू० ॥ महाभिष्यंदिमधुरंमाहिषंवन्हिनाशनं ॥ निद्रा करंशीतकरंगव्यात्स्निग्धतरंगुरु ॥

टी० ॥ ॥ म्हशीचें दूध फार दाट, गोड, अग्निमंद करणारें; निद्रा, शै त्य करणारें, गाईचे दुधापेक्षां अत्यंत स्निग्ध, गुरु असें आहे.

इतिक्षीरवर्गः

मू० ॥ गव्यंचदीपनंतक्रंमेध्यमर्शाक्त्रिदोषनुत् ॥

टी० ॥ ॥गाईचें ताक दीपन, बुद्धिप्रद; मूळव्याध, त्रिदोष यांचें नाशक असें आहे.

मू० ॥ माहिषंश्लेष्मकृत्तक्रंसांद्रंशोफकरंगुरु ॥

टी० ॥ ॥ म्हशीचें ताक कफकर, दाट, शोफकारक, गुरु असें आहे.

मू० ॥ सस्निग्धंछागलंतक्रंलघुदोषत्रयापहं ॥ गुल्मा र्शोग्रहणीशोफपांड्वामयविनाशनम् ॥

टी० ॥ ॥शेळीचें ताक अति स्निग्ध, लघु, त्रिदोषशामक; गुल्म, मूळव्या ध, संग्रहणी, शोफ, पांडु यांचें नाशक आहे.

मू० ॥ घोलंमारुतपित्तहारिमथितंवातापहंश्लेष्मत्दपि त्तश्लेष्मविनाशयुदश्विदधिकंतक्रंत्रिदोषापहं ॥ मंदा ग्नावरुचौतथैवनितरामन्येषुरोगेष्वपिश्रेष्ठंतक्रमिदं वदंतिसुमनस्तेनोत्तमंमादिनो ॥

टी० ॥ ॥घोल म्हणजे पाणी घातल्या खेरीज दहीं घुसळून लोणी नका ढलें जें करावें ते जाला मठ्ठा असें म्हणतात, हा वायु आणि पित्त यांचा हारक आहे; मथित म्ह० पाणी घातल्या खेरीज दहीं घुसळून लोणी का

दून घेऊन जो मठ्ठा करावा तो, हा वात, कफ यांचा हारक आहे; उद्श्वित् ह्म० दह्यांचे बरोबरीनें पाणी घालून घुसळून लोणी काढून जें ताक करावें तें, हें पित्त, कफ यांचें हारक आहे; तक्र ह्म० दह्याचे तृतीयांश पाणी घालून घुसळून लोणी काढून जें ताक करावें तें, हें सर्वांत श्रेष्ठ, त्रिदोष शामक, मंदाग्नि, अरुचि इत्यादि सर्व रोगांवर प्रशस्त असें मुनि ह्मणतात, ह्मणून प्राण्यांस उत्तम आहे.

मू०॥ वातेम्लंसैंधवोपेतंस्वादुपित्तेसशर्करं॥ पिबेत्त-
क्रंकफेचाग्निव्योषक्षारसमन्वितं॥

टी०॥ ॥वायुवर आंबट आणि सैंधवयुक्त असें तक्र घ्यावें; पित्तावर मधुर आणि शर्करायुक्त असें तक्र घ्यावें; कफावर चित्रक, सुंठ, मिरीं, पिंपळी, सैंधव इतक्यानीं युक्त तक्र घ्यावें.

मू०॥ तक्राल्लघुतरोमंथः कूर्चिकादधितक्रवत्॥ गोजा
महिषीणांतक्रेतद्वद्दधिगुणाः पृथक्॥

टी०॥ ॥मंथ ह्म० पूर्वीं सांगितलेलें मथित हें तक्रापेक्षां अत्यंत लघु आहे, कूर्चिका ह्म० दुधांत दहीं घालून तापवून करितात ती, गुणानें दहीं आणि ताक यांप्रमाणें आहे; गाईचे, शेळीचे, महिषीचे तक्राचे जे जे गुण सांगितले तेच त्यांचे त्यांचे दह्यांचे जाणावे.

इतिदधितक्रगुणाः

मू०॥ गव्यंवामाहिषंवापिनवनीतंनवोत्थितं॥ शस्यतेबा
लवृद्धस्यबलकृद्धातुवर्धनं॥ शीतंबलाढ्यंमधुराम्लरू-
क्षंश्लेष्मापहंपित्तमरुत्प्रणाशि॥ शोषक्षयक्षीणकृशा
तिरुद्धबालेषुपथ्यंनवनीतमुक्तं॥

टी०॥ ॥गाईचें किंवा ह्मशीचें ताजें लोणी बालाला किंवा वृद्धाला बल देणारें, धातुवर्धक असें आहे; आणि शीत, बलमद, गोड, आंबट, रूक्ष, कफ, पित्त, वायु, यांचें नाशक; आणि शोषी, क्षयानें क्षीण, कृश, अतिवृद्ध, बाल इतक्यांना हितकारक असें आहे.

इतिनवनीतगुणाः

मू०॥ सर्पिर्गवांचाप्यमृतंविषघ्नंचक्षुष्यमारोग्यकरंचवृष्यं॥
रसायनंमेदमतीबमेध्यंवन्हिहोत्तमंचेतिबुधाःस्तुवंति॥

टी० ॥ ॥गाईचें तूप अमृत तुल्य, विषनाशक, नेत्रांस हितकारक, आरोग्य करणारें, वृष्य, रसायन, सौम्य, अतिशुद्ध, स्नेहामध्यें श्रेष्ठ, असें आहे ह्म णून पंडित स्तुति करतात.

मू०॥सर्पिर्माहिषमुत्तमंधृतिकरंसौख्यप्रदंकांतिदंवात श्लेष्मनिबर्हणंबलकरंवर्णप्रसादक्षमं॥दुर्नामग्रहणी-विकारशमनंमंदानलोद्दीपनंचक्षुष्यंनवगोव्यतःपरमि दंत्हृद्यंमनोहारिच॥

टी०॥ ॥ह्मशीचें तूप उत्तम, धैर्यकर, सौख्यप्रद, कांतिकर, वायु कफ यांचें नाशक, बलप्रद, वर्ण स्वच्छ करण्याविषयीं समर्थ; मुळव्याध, संग्रहणी यांचें नाशक, अग्निदीपन नेत्रांला हित, गाईचे नव्ये तुपापेक्षां त्हृद्य, मनोहर असें आहे.

मू०॥दीपनीयमजासर्पिश्चक्षुष्यंबलवर्धनम्॥का सेश्वासेक्षयेवापिपथ्यंपानेषुतल्लघु॥

टी०॥ ॥शेळीचें तूप अग्निदीपक, चक्षुष्य, बलवर्धक, खोकला, श्वास, क्षयरोग इतक्यांचेंठाई पथ्य पिण्यास लघु.

इतिघृतवर्गः

मू०॥त्रिदोषघ्नंमधुप्रोक्तमन्यत्स्यात्सन्निपातहं॥ हिक्काश्वासकृमिछर्दिमोहतृष्णाविषापहं॥

टी०॥ ॥मध वात, पित्त, कफ यांचा नाशक आणखी सन्निपातनाशक; उचकी, श्वास, कृमि, ओकारी, मोह, तृषा, विष यांचा नाशक आहे.

इतिमधुगुणाः

मू०॥शर्करासमवीर्यस्तुदंतनिष्पीडितोरसः॥गुरु र्विदाहिविष्टंभीयांत्रिकस्तुप्रकीर्तितः॥

टी०॥ ॥दांतानी चावलेल्या उसाचा रस, वीर्यानें साखरे सारखा, थंड आहे आणि चरकांत पिळलेल्या उसाचा रस गुरु, विदाहि, विष्टंभी असा आहे.

मू०॥सक्षारोमधुरोऽतिमूत्रबहुलोरक्तस्यसंशोधनो मेदोहानिकरोतिपित्तशमनोवातघ्नविष्टंभनः॥श्लेष्मा पांजनयंश्चबृंहणकरोबल्यःसदास्वास्थ्यकृच्छोषघ्नो

विषहास्रपित्तशमनः सेव्यो विरेके सदा ॥

टी० ॥ ॥ खारट, मधुर, अतिमूत्रकर, रक्तशोधक, मेदोनाशक, अत्यंतपित्तशामक, वातहारक, अवष्टंभ करणारा, कफजनक, पुष्टिकारक, बलप्रद, सर्वदा स्वस्थता करणारा, शोष शमविणारा; विष, पित्त, रक्त यांचा नाशक, रेच घेतल्यावर सेवन करण्यास योग्य असा ऊस आहे.

इतिइक्षुगुणाः

मू० ॥ विण्मूत्रामयनाशनोग्निजननः कंडूप्रमेहांतकृत्स्निग्धःस्वादुतरोलघुश्रमहरः पथ्यःपुराणोगुडः ॥

टी० ॥ ॥ जुनागूळ हगवण, बहुमूत्र यांचा नाशक, अग्नि जनक; कंडू, प्रमेह यांचा नाशक, स्निग्ध, अत्यंत गोड, लघु, श्रमहारक, पथ्य असाआहे.

मू० ॥ दाहंनिवारयतिपित्तमपाकरोतितृष्णांछिनत्तिविनिहंतिचमोहमूर्छां ॥ शोषंविनाशयतिशोधयतींद्रियाणिशीतासदासमधुराखलुशर्करखंडा ॥

टी० ॥ ॥ खडीसाखर दाह, पित्त, तृषा, मोह, मूर्छा, शोष इतक्यांची नाशक आणि इंद्रियें शुद्ध करणारी, मधुर अशी आहे.

मू० ॥ मूर्छामोहतृषास्यशोषशमनीदाहज्वरध्वंसनीश्वासच्छर्दिमदात्ययक्लमहरीत्हृद्याचसंतर्पणी ॥ क्षीणेरेतसिपावकेचविषमेक्षीणेक्षतेदुर्बलेदुर्वारेपिचरक्तपित्तकगदेसेव्यासिताशर्करा ॥

टी० ॥ ॥ पांढरी पिठीसाखर मूर्छा, मोह, तृषा, तोंडाची कोरड, दाह, ज्वर, श्वास, ओकारी, मदात्यय, ग्लानि यांची नाशक, हृद्य, संतर्पकारक; क्षीणधातु, विषमाग्नि, अतिदुर्बलपणा, क्षत, अशक्तता, दुर्वार रक्तपित्त इतक्यांचे ठायीं योग्य अशी आहे.

इतिगुडखंडशर्करासिताशर्करागुणाः

मू० ॥ कंडूहरंकांतिविवर्धनंचत्वग्दोषविच्छुद्धितनुरोपणंच ॥ क्रिमिनिहंत्याहृतशुक्रकारितैलंकृतंश्लेष्ममरुत्प्रणाशं

टी० ॥ ॥ तिळांचें तेल कंडू हारक, कांतिवाढविणारें, मलशुद्धि करणारें, शरीरास साफ करणारें, क्रिमिनाशक; शुक्र, शुक्र यांतें करणारें, कफकर, वायुनाशक असें आहे.

मू० ॥ कटूष्णंसार्षपंतैलंकफशक्रानिलापहं ॥ लघु वीर्यांस्रकृत्स्पर्शाल्कुष्ठार्शोव्रणजंतुजित् ॥

टी० ॥ ॥ शिरसांचें तेल तिखट, उष्ण, कफ, शुक्र, वायु यांचें नाशक; लघु, कुष्ठ, मूळव्याध, व्रण, जंत यांचें उष्ण करून लावलें असतां नाशक असें आहे.

मू० ॥ एरंडतैलंकृमिनाशनंचसर्वंचशूलघ्नमरुत्प्रणाशं कुष्ठापहंचापिरसायनंचपित्तप्रकोपानिलशोधनंच ॥

टी० ॥ ॥ एरंडेल कृमि, शूल, वात, कुष्ठ, यांचें नाशक, रसायन; पित्तकोप, वायु यांचें शोधक असें आहे.

मू० ॥ वर्ध्मगुल्मानिलकफानुदरंविषमज्वरं ॥ वातशूल गजेंद्राणामेरंडस्नेहकेसरी ॥

टी० ॥ ॥ अंत्रवृद्धि, गुल्म, वात, कफ, उदर, विषम ज्वर यांचें नाशक, वातशूल, हेंच गजेंद्र म्हणजे हत्ती यांला एरंड तेल हा सिंह आहे.

मू० ॥ आमवातगजेंद्रस्यशरीरवनचारिणः ॥ एकएवाग्रणीर्हंताएरंडस्नेहकेसरी ॥

टी० ॥ ॥ आमवात हाच गजेंद्र म्ह० हत्ती तो कसा कीं, शरीर हेंच वन म्ह० अरण्य यांत वाईट संचार करणारा याला मुख्य हनन करणारा एरंडाचा स्नेह म्हणजे तेल हा केसरी म्ह० सिंह आहे.

मू० ॥ कटीतटनिकुंजेषुसंचरन्वातकुंजरः ॥ एरंडतैलसिंहस्यगंधमाघ्रायगच्छति ॥

टी० ॥ ॥ कंबरेचा प्रदेश हाच निकुंज म्ह० जाळी यांचेठाईं संचार करणारा वात हाच कुंजर म्ह० हत्ती, एरंडाचें तेल हाच सिंह याचा गंध घेऊन जातो.

इतिएरंडतैलं

मू० ॥ सर्वधान्यसमावर्तजातानिफलजानिच ॥ तैलवन्तिगुणैःस्नेहाःखर्जूकंडूविनाशनाः ॥

टी० ॥ ॥ सर्वधान्यें एकत्र करून त्यापासून काढलेला स्नेह आणि फलांपासून काढलेला स्नेह हे तेलासारिखे गुणकारी आहेत; त्यांचा लेप खरूज, कंडू यांचा नाशक आहे.

इतितैलवर्गः

मू०॥ व्रणशोधनसंधानंरोपणंवातलंमधु ॥ त्रिदोष-
घ्नमधुप्रोक्तंछर्दिश्वासविषापहं ॥

टी० ॥ ॥ मद्य व्रणशोधक, संधानकारक, ह्म० हाड वगैरे सांधणारें, जखम भरून आणणारें, वातुळ असें आहे; आणि मध त्रिदोष नाशक ओकारी, श्वास, विष यांचें नाशक आहे.

इतिमद्यगुणः

अथवमनम्

मू०॥ गुडेनतुत्थकंदद्यादुष्णंवारिपिबेन्मुहुः ॥ पीत्वारा
ठकषायंवासिंधुकृष्णासमन्वितं ॥ वमेत् ॥

टी० ॥ ॥ गुळाबरोबर शुद्ध केलेलें मोरचूत द्यावें आणि वर्ति वारंवार ऊन पाणी प्यावयास द्यावें ह्म० ओकारी होईल, अथवा गेळफळाचा काढा सैंधव आणि पिंपळी याणी युक्त करून द्यावा ह्मणजे ओकेल.

मू०॥ रंगंटंकणतुत्थानिमर्दयेद्घटिकात्रयं ॥ जीमूति
फलतोयेननीलकंठोभवेद्रसः ॥ सशर्करंवल्लयुग्मंछ
र्दनाज्ज्वरनाशनं ॥ पित्तादींश्चज्वरश्वासहिध्माका-
सादिदोषजित् ॥

टी० ॥ ॥ रसगंधकटंकण तुत्थदेवडांगरीफलरसेनमर्दनं. टी० ॥ ॥पारा, गंधक, मोरचूत हीं शुद्ध घेऊन देवडांगरीचा फळाचे रसांत तीन घटिका खलावीं ह्म० हा नीलकंठसंज्ञक रस होतो; नंतर दोन दोन वाल प्रमाणाचा गोळ्या करून साखरेबरोबर एक गोळी घ्यावी ह्मणजे वमन होऊन पित्त, कफ, ज्वर, श्वास, कास इत्यादि दोष दूर होतात; मूळामध्यें (रंगं) असें आहे त्याची टीका (रं) शब्देंकरून रस (गं) शब्देंकरून गंधक घेऊन रसगंधक असी केली आहे, तोच अर्थ प्राकृतांत पारागंधक असा केला.

इतिनीलकंठवमनम्

अथरेचनम्

मू०॥ त्रिवृत्सैंधवशुंठीनांचूर्णमुष्णांबुरेचनम् ॥ व्योषदं

तित्रिवृत्त्पथ्यानीलीनिर्गुंडिकाथवा ॥

टी० ॥ ॥ पाटरे तेड, सैंधव, सुंठ या तिहींचे चूर्ण उष्णपाण्याबरोबर घ्यावें, रेंच होईल; अथवा सुंठ, मिर्च्यें, पिंपळी, दंतिमूळ, तेड, हिरडा, नीळ, निर्गुंडी इतक्यांचें चूर्ण ऊन पाण्यांत घ्यावें.

मू० ॥ हरीतकीभिः क्वथितंकषायंदंत्यग्निकृष्णाविडचूर्ण मिश्रं ॥ विरेचनंतद्रुबुतैलमिश्रंनिरत्ययंयोज्यमधामयघ्नम् ॥

टी० ॥ ॥ बाळहिरड्यांचा काढा, दंतिमूळ, चित्रक, पिंपळी, बिडलोण, इतक्या चूर्णांनी मिश्रित करून त्यांत एरंडतेल घालून घ्यावा ह्मं० रेच होईल, हा रेच विकार न करितां रोग नाशक आहे.

मू० ॥ रसंगंधंचमरिचंटंकणंनागराभया ॥ जेपालबीजसंयुक्तंक्रमेणाद्विगुणंभवेत् ॥ मर्दयेद्दंतिनीरेणात्विच्छाभेदीरसः स्मृतः ॥ वल्लुद्वयप्रमाणेनपिबेच्चो-ष्णोदकंमुहुः ॥ रेचनंज्वरगुल्मस्यवातशूलनिवारणं ॥

टी० ॥ ॥ पारा, गंध, मिर्च्यें, टाकणखार, सुंठ, हिरडा, जेपाळ हीं औषधें क्रमानें द्विगुणित घ्यावीं ह्मं० पारा एकभाग, गंधक दोनभाग, मिर्च्यें चार भाग, या प्रमाणें घेऊन दंतिमूळाचे काढ्यानें खल करून हा इच्छाभेदी रस होतो, दोनवाल प्रमाणानें द्यावा; वर्ते वारंवार ऊनपाणी प्यावयास द्यावें ह्मणजे रेच होतील, आणि ज्वर, गुल्म, वात, शूळ, यांचें निवारण होईल.

इतिइच्छाभेदीरसः

मू० ॥ रसभागोभवेदेकोगंधंचद्विगुणंभवेत् ॥ टंकणस्य त्रयोभागाः शृंगवेरंचतुर्गुणं ॥ मरीचंपंचभागंचषड्भागाचहरीतकी ॥ जेपालंसप्तभागंस्यात्सूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ भृंगराजरसेनैवखल्वेनिक्षिप्यमर्दयेत् ॥ चणप्रमाणावटिकागुडेनसहभक्षयेत् ॥ उष्णांसेकादिकंकुर्यादुष्णंवारिपिबेन्मुहुः ॥ आमांतरेचनंकुर्यादजीर्णज्वरनाशनम् ॥ जलोदरंकामलांचशोफशूलविनाशनम् ॥ रसश्चिंतामणिःख्यातःशूलपांडूदरंहरेत् ॥

टी० ॥ ॥ एक भाग पारा, दोन भाग गंधक, तीनभाग टाकणखार, चार भाग

कंउ, पांच भाग मिऱ्यें, साहा भाग हरीतकी, सात भाग जेपाळ, हीं औषधें घेऊन बारीक चूर्ण करून माक्याचा रसांत खलाभध्यें खलून चण्या प्रमा णे गोळ्या कराव्या; फळाबरोबर एक गोळी भक्षण करावी, नंतर ऊन पा ण्याचे पोचंड्यानें वगैरे शेकावें, वारंवार ऊन पाणी प्यावें ह्मं० आंव प डे तोंपर्यंत रेच होईल आणि जलोदर, वायगोळा, सूज, लिडीक, पांडू, उदर, शूल, यांचा नाश होईल; ह्याला चिंतामणिरस असें ह्मणतात.

इतिचिंतामणिरसः

मू०॥ स्तंभनरेचनोलेचदध्योदनस्तक्रोदनं ॥ अहिफेनो थवानंदभैरवोवानियोजयेत्॥

टी०॥ ॥ रेच पुरेसे झाल्यावर दहींभात किंवा तूपभात खावा, अथवा अफु खावी, अथवा आनंदभैरव मात्रा खावी.

अथनस्यं

नस्यंविधेयंगुडनागरेणाजलेनवासैंधवपिप्पलीनां॥ घ्रा णास्यमन्याहनुबाहुपृष्ठशिरोक्षिकंठश्रवणामयेषु॥

टी०॥ ॥ आल्याचे रसांत गूळ घालून नाकांत घालावा, अथवा पिंपळी आणि सैंधव पाण्यांत उगाळून नाकांत घालावें, ह्याला नस्य असें ह्मं० णतात; हें नस्य नाक, मान, हनवटी, बाहु, पाठ, डोके, डोळे, गळा, कान इ तक्या ठिकाणीं रोग झाले असतां करावें.

नस्यनिषेधः

मू०॥ भक्तवत्यथवास्नातेनस्यंयोज्यंनकर्हिचित्॥ कृते नस्येशिरःस्नानंरोगादींश्चवियोजयेत्॥

टी०॥ ॥ नस्य जेवल्यावर किंवा स्नान केल्यावर लागलेंच घालूनये, आणि नस्य घातल्यावर डोक्यावरून स्नान करूनये, केलें असतां रोगा दिक उत्पन्न होतील.

अथरक्तस्रावः

मू०॥ रक्तप्रभावात्प्रभवंतिरोगास्तद्दुष्टतांदृष्टकुरुतेज्व रादीन्॥ तन्मोक्षणंतुविकयाच्चशृंग्याजलौकयावापि शिराविमोक्षात्॥

टी०॥ ॥ रक्ताचे सामर्थ्यानें रोग उत्पन्न होतात, तें दुष्ट झालें असतां

ज्वरादिकरोग उत्पन्न करते, ह्मणून भोंपळा, किंवा शिंग, किंवा जळवा, किंवा शिरावेध इतक्या प्रकारांतून जो जेथें योग्य असेल त्या प्रकारानें रक्त काढावें.

इतिरक्तस्रावः

इतिचिकित्सासारेवैद्यकौशल्यं

समाप्तम्

अथरसोपरसशोधनमारणागुणाधिकारः

मू०॥ कुमारीत्रिफलाव्योषचित्रकंनिंबुकंरसं ॥ दिनेकं मर्दितंकृत्वाशुद्धोभवतिपारदः॥

टी० ॥ ॥ कोरफडीचा रस, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी, चित्रक यांचा काढा; लिंबुरस, पारा यांचा एक दिवस खल करावा ह्मणजे पारा शुद्ध होतो.

मू०॥ कर्कोटीमुसलीकन्याद्रवंदत्वाविशोधयेत् ॥

टी० ॥ ॥ कर्टोलीचा रस, सफेद मुसळीचा काढा, कोरफडीचा रस इतक्यां बरोबर पारा खलावा ह्मणजे शुद्ध होतो.

मू०॥ कुमार्याचनिशाचूर्णेदिनमर्धेविशोधयेत् ॥

टी० ॥ ॥ कोरफडीचा रस, हळदीची भुकटी यांच्या बरोबर अर्धा दिवस पर्यंत पारा खलावा ह्म० शुद्ध होतो.

मू०॥ कुरंटकांबुसंयोगादातपेमर्दयेद्रसं ॥ शुद्धोभवेत्ततःसूतःसर्वकार्याणिसाधयेत् ॥

टी० ॥ ॥ कोरांटयाचे पाल्याचा रसा बरोबर ऊनामध्यें पारा खलावा ह्म० शुद्ध होईल आणि सर्व कार्यांत उपयोगी पडेल.

इतिपारदशुद्धिः

मू०॥ सदुग्धभांडेचविलंब्यवस्त्रस्थितंनिरुध्वाथबलिंपुटेत ॥ दुग्धंगतोसौरसजारणायरसेचयोग्यः सकलक्रियासु॥

टी० ॥ ॥ भाड्यांत दूध घालून त्यांत गंधकाची पोचंडी दुधांत बुडेल अशी

लोंबती ठेवावी, नंतर तोंड बंद करून पचवावा, दुधांत पडेल तो पाऱ्याचे जारणास मात्रा वगैरे करण्यास योग्य आहे.

इतिगंधकशुद्धिः

मू०॥ मेषीदुग्धेनदरदमम्लवर्गेणभावितं॥ सप्तवारंम यत्नेनशुद्धिमायातिनिश्चितं॥

टी०॥ ॥ मेंढीचे दुधांत एक वेळ खल करून, लिंबु, अम्लवेतस वगैरे अम्लवर्गाचा रसांत सात वेळ खलावा ह्म० हिंगुळ शुद्ध होतो.

इतिदरदशुद्धिः

मू०॥ तालकंपोटलींबध्वासमूत्रेकांजिकेपचेत्॥ दोलायंत्रेणयामैकंततः कूष्मांडजेरसे॥ तिलतैलेपचेद्यामं यामंचत्रिफलारसे॥ दोलायंत्रेचतुर्याममेवंशुध्यति तालकः॥

टी०॥ ॥ हरताळाची पोचंडी बाधून दोलायंत्रामध्यें गोमूत्र आणि कांजी एके जागीं मिळवून त्यांत प्रहरभर शिजवावा, नंतर कोहळ्याचे रसांत प्रहरभर, तिळाचे तेलांत प्रहरभर, त्रिफळ्याचे काढ्यांत प्रहरभर, या प्रमाणें दोलायंत्रांत चार प्रहर शिजवला असतां हरताळ शुद्ध होतो.

इतितालकशुद्धिः

मू०॥ जयंतिकाद्रवेदोलायंत्रेशुध्येन्मनः शिला॥ दिनमेकमजामूत्रेभृंगराजरसेपिवा॥

टी०॥ ॥ ऐरणीचे रसांत दोलायंत्रामध्यें मनशिळाची पोचंडी बांधून एक दिवस शिजवावा, अथवा शेळीचे मुतांत शिजवावा, अथवा माक्याचे रसांत शिजवावा, ह्मणजे शुद्ध होतो.

इतिमनःशिलाशु०

मू०॥ टंकणेनसमंपिष्ट्वाऽथवालघुपुटेपचेत्॥ तुत्थं शुद्धंभवेत्क्षौद्रेपुटितंवाविशेषतः॥

टी०॥ ॥ मोरचूत टांकणखाराचे बरोबर खलून लघु पुट द्यावें, अथवा मधांत खलून लघु पुट द्यावें ह्मणजे शुद्ध होतो.

इति तुत्थ शुद्धिः

नरमूत्रेचगोमूत्रेजंभाम्लेचरसेंधयं॥ सप्ताहंत्रिदिनं

वापिपक्वंशुध्यतिखर्परम् ॥

टी० ॥ ॥ मनुष्याचे मुतात, किंवा घोड्याचे मुतात, किंवा गाईचे मुतात, सात दिवस किंवा तीन दिवस कलखापरी भिजत घालावी, मूत रोज नवें असावें किंवा लघु ईडलिंबाचे रसांत सैंधव घालून, सात दिवस किंवा तीन दिवस भिजत पालावी ह्मणजे शुद्ध होतो.

इतिखर्परशुद्धिः

अगस्तिपत्रनिर्यासैः शिग्रुमूलंसुपेषितम् ॥ तन्मध्ये पुटितंशुद्धंनिंबुजाम्लेनपाचितम् ॥

टी० ॥ ॥ अगस्त्याचे पानांचा रस काढून त्यांत, शेवग्याचें मूळ उगाळून त्याचें पुट माक्षिकास द्यावें, ह्मणजे माक्षिक शुद्ध होतें; अथवा लिंबाच्या रसांत भिजवून पक्क करावें, ह्मणजे लालहोई तोंपर्यंत ताप वावें, ह्मणजे शुद्ध होतें.

इतिमाक्षिकशु०

गोदुग्धेत्रिफलाक्काथेभृंगद्रावेश्चमर्दयेत ॥ आतपेदिनमेकेकंशुध्यंशुद्धंशिलाजतु ॥

टी० ॥ ॥ गाईचे दुधांत, त्रिफळ्याचे काढ्यांत, माक्याचा रसांत उनामध्यें एक एक दिवस शिलाजिताचा खल करावा, शुष्क झाला ह्मं० शुद्ध होतो.

इतिशिलाजतुशु०

स्वेदयेद्दोलिकायंत्रेजयंत्यास्वरसेनतु ॥ मणिमुक्ताप्रवालानितथारत्नान्यशेषतः ॥ क्षणाद्विविधवर्णानिम्रियंतेनात्रसंशयः ॥

टी० ॥ ॥ दोलायंत्रामध्यें ऐरणीचा रस घालून हिरा, मोतीं, प्रवाल, संपूर्ण रत्नें यानां स्वेदन करावें, ह्मणजे त्या रसाची वाफ त्यानां द्यावी, ह्मणजे शुद्ध होऊन मारण होतें.

अन्यच्च ॥ उक्तमाक्षिकवन्मुक्ताप्रवालानिचमारयेत् ॥ वज्रवत्सर्वरत्नानिशोधयेन्मारयेत्तथा ॥

टी० ॥ ॥ माक्षिकाप्रमाणें मोतिं, प्रवाल, यांचें मारण करावें; आणि हिऱ्याप्रमाणें सर्व रत्नांची शुद्धि, मारण करावें.

इतिमणिमुक्ताप्रवालरत्नशुद्धिः

म्लेच्छंस्याद्विमलाम्लसैंधवजलेपक्वंविशुद्धंभवेत् ॥ तुत्थंटंकणसंयुतंसमुदितंक्षौद्रेणवासंयुतम् ॥ निर्वि षंविषतिंदुकंतुषजलेक्षिप्त्वाभिषस्त्रंविषंतेनैवाथबि- भीतकस्यनिहितंकंकुष्ठकंटंकणात् ॥

टी० ॥ ॥ तांबें लिंबादिकांच्या रसांत सैंधव घालून त्यांत भिजत टाकावें ह्मणजे शुद्ध होतें. मोरचूत टांकणखारा बरोबर खलावें, अथवा मधाबरोबर खलावें ह्मणजे शुद्ध होतें. कुचला भाताचा कोंडा पाण्यांत घालून त्यांत तीन दिवस भिजत टाकावा ह्मणजे शुद्ध होतो. विष ह्मणजे बचनाग अफु इत्यादीक कुचल्याप्रमाणें शुद्ध होतें, अथवा बेहेड्याचे काढ्यांत भिजत घालावें ह्मणजे शुद्ध होतें; कंकुष्ठ ह्मणजे नाळेंत टांकणखारानें शुद्ध होतें.

मू०॥ कासीसंटंकणंशंखवराटंगैरिकंतथा ॥ नीरो जनंघनंघर्मेशुद्धंस्याज्जंभनीरगम् ॥

टी० ॥ ॥ हिराकस, टांकणखार, शंख, कवडी, गेरू, करगा हीं लिंबाच्या रसांत घालून उन्हांत ठेवावीं, घट्ट झालीं ह्मणजे शुद्ध होतात.

मू०॥ विद्रुमंमौक्तिकंशुक्तिसौराष्ट्रीत्याजंगमः ॥ इत्या द्यम्लेनशुद्धंस्याच्छुद्धंचोपरसादिकम् ॥

टी० ॥ ॥ पोंवळें, मोतिं, शिंप, तुरटी, सिसें इत्यादिक अंबट रसानें धुतलीं असतां शुद्ध होतात, आणि उपरसादिक ह्मणजे गेरू, शिलाजीत इत्यादिकहीं, आम्ल रसानें धुतलीं असतां शुद्ध होतात.

मू०॥ जेपालंनिस्तुषंकृत्वादुग्धेदोलायुतंपचेत् ॥ अं- तर्जिह्वांपरित्यज्यशुध्यात्स्वेरसकर्मणि ॥

टी० ॥ ॥ जेपाळाचें बी यांचा मगज काढून दोलायंत्रांत दुधामध्यें शिजवावा, आणि आंतल्या जिव्हा काढून टाकाव्या, ह्मणजे शुद्ध होतो.

इतिउपरसादिशुद्धिः

अथस्वर्णादिधातुशोधनमारणम्

स्वर्णतारोताम्रनागौवंगंकांतंचतीक्ष्णकम् ॥ मुंडांतमष्ट धालोहंकांस्यारपंचकंद्विधा ॥ तैलंतक्रगवांमूत्रेकांजिके कुलित्थके ॥ सप्तधातसनिर्वापात्सर्वलोहविशुध्यति ॥

टी० ॥ ॥ सोनें, रुपें, तांबें, सिसें, कथिल, कांतलोह, तिरवें, लोखंड हीं आठ प्रकारचीं लोहें; कांसें पांच प्रकारचें; पितळ तीन प्रकारचें; या सर्व धातूंला लोह असें ह्मणतात, हें सर्व लोह, ताक, गोमूत्र, कांजि, कुलित्थाचा काढा, या प्रत्येकांत तापवून सातवेळा विझवावें ह्मणजे शुद्ध होतें.

इतिस्वर्णादिधातुशोधनम्

स्वर्णपत्रसमंनागभस्मनिंबुजलेपितम् ॥ त्रिवारंग-जपुटेनस्यात्स्वर्णभस्मतांव्रजेत् ॥

टी० ॥ ॥ सोन्याचे पत्रे करून त्याचे बरोबर शिशाचें भस्म घेऊन लिंबा चे रसांत कालवून त्या पत्र्यांला लेप करावा, नंतर तीन वेळ पुट द्यावें ह्मण-जे भस्म होतें.

इतिस्वर्णमारणम्

माक्षिकंदरदंनिंबुजप्लुतंलेप्यरौप्यदलसंचयंपुटेत् ॥ द्वित्रिवारमथभस्मतांव्रजेत्पानकोघइवशंकरस्मृतेः

टी० ॥ ॥ माक्षिक, भस्म, हिंगुळ हीं लिंबाच्या रसांत कालवून रुप्याचे प-त्र्यांला लेप करावा आणि दोन तीन पुटें द्यावीं ह्मणजे भस्म होतें, जसें शंकराचे स्मरणानें पातकाचें भस्म होतें.

इतिरौप्यमारणम्.

मू० ॥ ताम्रपादांशतःसूतंताम्रतुल्यंचगंधकम् ॥ कन्यारसेनसंपिष्टाताम्रपत्राणिलेपयेत् ॥ निक्षिप्यहंडिकामध्येशरावेणनिरोधयेत् ॥ हंडिकापटुनापूर्यपचेद्यामत्रयंभिषक् ॥ स्वांगशीतंविचूर्ण्याथवांतिदोषविवर्जितम् ॥ अन्यच्च ॥ गंधकत्रिगुणेनाथगजपुटेनमारणम् ॥ अन्यच्च ॥ ताम्राद्विगुणभागेनबलिनागजपुटेपचेत् ॥

टी० ॥ ॥ तांब्याचे चतुर्थांश पारा, आणि तांब्याचे बरोबर गंधक घेऊन, दो घांची कज्जली करून, कोरफडीचे रसांत कालवून तांब्याचे पत्र्यांस लेप करावा नंतर ते पत्रे शरावांत घालून मृत कपडा करून एका हंडीमध्यें खालीं वर मीठ घालून तो शराव ठेवावा नंतर ती हंडी चुलीवर ठेऊन तीन प्रहर अग्नि द्यावा, शरीरा प्रमाणें थंड झालें ह्मणजे खलून ठेवावें, वांतिरहीत होतें. दुसरा प्रकार, तांब्याचे पत्र्य॥ दं ... पत्र्यांला लेप करावा आणि गजपुट द्यावें; तिसरा प्रमूत्रणाभाव्यंपुनः ॥ ... घेऊन, पूर्वी प्रमा

यों कृति करून गज पुट द्यावें, स्वांगशीत झाल्यावर खलून ठेवावें. इ. तां. मा.

घोषालवर्तुलेस्ताम्रंसत्वंहन्याच्चयत्क्रितः ॥ ७ ॥ ॥

टी० ॥ ॥ कांसें, हरताळ, टाकणखार आणि तांबें हीं चार एकत्र करून मुशींत घालून फुकावें ह्मणजे सत्व निघतें.

मू० ॥ सत्वंचरसकादीनांनिहन्यात्ताम्रवत्सदा ॥ ॥

टी० ॥ ॥ कलखापरी इत्यादिकांचें सत्व तांम्याचे सत्वा प्रमाणें काढावें. इ. स. पा.

ताम्रवद्घोषमारंचशोधयेन्मारयेद्भिषक् ॥

टी० ॥ ॥ तांब्या प्रमाणें कांसें आणि पितळ यांचें शोधन आणि मारण करावें.

इतिकांस्यपित्तळमारणं.

मनःशिलागंधयुताटरूषतोयप्लुतंनागदलंविमृष्टं ॥ त्रिभिःपुटैःकुंभमितैःप्रयातिभस्मत्वमेतत्प्रवदंतितज्ज्ञाः ॥

टी० ॥ ॥ मनशीळ गंधक हे आडूळशाचे रसांत खलून शिशाचे पत्रे शुद्ध करून त्याना लेप करावा, आणि तीन गज पुटें द्यावीं ह्मणजे भस्म होतें.

वंगंसार्कपयस्तालालिप्तंशुष्कंपुटैस्त्रिभिः ॥ म्रियतेभ्राष्ट्रकेब्रह्मकाष्ठघर्षणयोगतः ॥

टी० ॥ ॥ रुईचे चिकांत हरताळ खलून कथिलाचे पत्र्यांना लेप करून शुष्क झालें ह्मणजे खापरांत घालून चुलीवर ठेऊन खालीं अग्नी द्यावा, आणि पळसाचे लांकडानें ढवळावें अशीं तीन पुटें द्यावीं ह्म० वंग भस्म होतें.

पलाशद्रवयुक्तेनवंगपत्राणिलेपयेत् ॥ तालेनपुटितंभस्मत्रिवारंजायतेध्रुवम् ॥

टी० ॥ ॥ पळसाचे रसांत हरताळ खलून कथिलाचे पत्र्यांला लेप करून तीन पुटें द्यावीं ह्मणजे भस्म होतें.

इतिवंगमारणम्

कांतंतीक्ष्णंचमुंडंचपत्रीकृत्यप्रयत्नतः ॥ त्रिफलाकल्कतोयांतस्तप्तंनिर्वापितंपुनः ॥ यावच्छीर्यंतिपत्राणिकुर्यात्तावद्दतंद्रितः ॥ त्रिफलाकल्कसंमिश्रंशरावेत्रिश्चवापुटेत् ॥ लोहंवारितरंतेनजायतेसर्वरोगजित् ॥ ॥

टी० ॥ ॥ लोह कांत, तीक्ष्ण व मुंड असें त्रिविध आहे, यांतून ज्याचें भस्म कर्तव्य असेल त्याचे पत्रे करून त्रिफळाचे काढ्यांत तापवून विझवावें जों प

र्यंत पत्रे शीर्ण होतील ह्मणजे तुकडे पडतील तों पर्यंत, नंतर तें चूर त्रिफ-ळ्याचे कल्कांत मिश्र करून शरावांत घालून तीन पुटें द्यावीं ह्मणजे पाण्या वर तरेल असें भस्म होईल. आणि तें सर्व रोगांला जिंकील.

इतिलोहमारणं.

मू० ॥ सूक्ष्मचूर्णमयःकिट्टंतापितंखर्परस्थितं ॥ निर्वापितंतुगोमूत्रेशुद्धस्यात्त्रिफलापुटैः ॥ सप्तभिर्योजयेद्वैद्योमंडूरोरोगनाशनः ॥

टी० ॥ ॥ लोखंडाचे किटाचें चूर्ण बारीक करून खापरांत तापवून गोमूत्रांत विझवावें ह्मणजे शुद्ध होतें, नंतर त्रिफळ्याचा काढ्यांत भिजवून सात पुटें द्यावीं, ह्मणजे रोगनाशक मंडूर होतो तो वैद्यानी योजावा. इ. किट्टमारणं.

मू० ॥ क्षिप्त्वाक्षिप्त्वारनालेतत्तप्तंकुर्याच्चखर्परे ॥ त्रिःसप्तधापुटंचाथकृत्वाशुद्ध्यतिचाभ्रकः ॥

टी० ॥ ॥ अभ्रकाचे पत्रे खापरांत तापवून कांजींत विझवावे या प्रमाणें एकवीस वेळा केलें असतां अभ्रक शुद्ध होतो.

मू० ॥ भागद्वयंहिशालीनामेकेकंकांजिकाभ्रयोः ॥ गृहीत्वाकर्पटेबध्वाकाराभ्यांमर्दयेत्ततः ॥ शुद्धंसजलपात्रेनलिपततिचूर्णकम् ॥ तस्माद्गृहीतयत्नेनशुद्धंधान्याभ्रमुच्यते ॥

टी० ॥ ॥ दोन भाग साळी, एक भाग अभ्रक, एक भाग कांजी असें घेऊन फडक्या मध्यें पुरचुंडी बांधून ती पुरचुंडी पातेल्यांत पाणी घेऊन त्यांत हातानीं रगडून चोळावी, ह्मणजे पातेल्याचे तळास अभ्रकाचें चूर्ण पडतें तें त्यांतून युक्तीनें घेऊन वाळवावें, त्याला धान्याभ्रक असें ह्मणतात.

मू० ॥ धान्याभ्रकंरविक्षीरैरविमूलद्रवेणवा ॥ पिष्ट्वापिक्षापुटेत्याकालसप्तधाम्रियतेभ्रकः ॥

टी० ॥ ॥ धान्याभ्रक रुईचे चिकांत किंवा रुईचे मुळाचे रसांत खलून पुट द्यावें, अशीं सात पुटें दिलीं असतां अभ्रक मरतो. १ दुसरा प्रकार

मू० ॥ कृष्णाभ्रंदहनेविशुद्ध्यतिक्षिप्तंशतंकांजिकेतापितं ॥ शुद्धंतद्द्विवारिणाघनतरंपिष्ट्वादिनानेपुटेत् ॥ कासघ्नंस्वरसेनवाथवरयामूत्रेणभाव्यंपुनः ॥ निश्चंद्रोपिमृ

तोभवेल्लघुतरक्षीरास्पुटैः पंचभिः ॥

टी० ॥ ॥ कृष्णाभ्रक अग्नीमध्यें फार तापवून कांजीमध्यें विझवावा, ह्मणजे शुद्ध होतो; नंतर श्लक्ष्ण झाल्यावर रुईचे चिकांत पुष्कळ खलून पुट द्यावें, अथवा कासविंद्याचे रसांत खलून पुट द्यावें, नंतर त्रिफळ्याचे काढ्यांत खलून पुट द्यावें; नंतर गोमूत्रांत खलून पुट द्यावें; निश्चंद्र जरि झाला तरी रुईचे चिकांत खलून पांच पुटें द्यावीं, ह्मणजे फार सूक्ष्म होतो.

इति अभ्रक मारणम्

मू० ॥ पलमानं रसं शुद्धं तावन्मात्रं च गंधकम् ॥ विधिवत्कज्जलीं कृत्वा न्यग्रोधांकुर वारिणा ॥ भावनात्रितयं दत्वा काचकुप्यां निधापयेत् ॥ निधाय कूपीं यंत्रे वालुकाभिः प्रपूरयेत् ॥ दद्यात्तदनु मंदाग्निं भिषग्यामचतुष्टयम् ॥ जायते रससिंदूरं तरुणारुणसन्निभम् ॥

टी० ॥ ॥ चार तोळे पारा शुद्ध घेऊन, तितकाच गंधक घेऊन दोघांची कज्जली करून वडाचे पल्लवांचा रस काढून त्याचा तीन भावना द्याव्या, नंतर कुपींत भरून ती कुपी वालुका यंत्रांत ठेऊन वाळूनें पुरून चार प्रहर मंदाग्नी द्यावा, ह्मणजे सकाळीं जसा सूर्य लाल दिसतो या प्रमाणें लाल रस सिंदूर होतो. ॥ दुसरा प्रकार ॥

रसगंधकयोः कृत्वा कज्जलीं समभागयोः ॥ नवसागरकं दत्वा किंचिज्जबीर वारिणा ॥ विमर्द्य त्रिदिनं यत्नात्कांजिकेन पुनः पुनः ॥ मृत्कर्पटावृतायां तु काचकुप्यां विनिक्षिपेत् ॥ संरोध्य वालुकायंत्रे सच्छिद्रे त्रिदिनं पचेत् ॥ समुद्धरेन्नालकस्थं भस्मेंद्रगोपसन्निभम् ॥

टी० ॥ ॥ पारा आणि गंधक समभाग घेऊन त्याची कज्जली करून, त्यांत किंचित नवसागर टाकून लिंबाचा रस आणि कांजी यांचा तीन दिवसपर्यंत खल करून, मत्कपडा केलेले कुपींत भरून ती कुपी वालुका यंत्रांत पुरून तीन दिवस अग्नि द्यावा, नंतर कुपीचे गळ्याका लागलेला इंद्रगोप ह्मणून मृगाचे किडे असतात, त्यांचे सारखा लाल असतो तो काढून द्यावा.

इतिरससिंदूरः

इतिशोधनमारणाधिकारः समाप्तः

अथोपयोगिनांगुणा अगुणाश्च

सूतोशुद्धतयागुणंनकुरुतेकुष्ठाग्निमांद्यकृमिच्छर्द्यारोचकजाड्यदाहमरणंधत्तेनृणांसेवनात॥ शुद्धःस्यात्सकलामयैकशमनोदृक्पुष्टिकांतिप्रदोवृष्योमृत्युविनाशनोबलकरःकांताजनानंदनः॥

टी० ॥ ॥अशुद्ध पारा सेवन केला असतां गुण तर करीत नाहीं; परंतु कुष्ठ, अग्निमांद्य, कृमी, ओकारी, अरुची, जाड्य, दाह, मरण इतके दोष करितो. शुद्ध पारा सेवन केला असतां सर्व रोग नाशक, दृष्टी स्वच्छ करणारा, कांतिप्रद, वृष्य, मृत्यु नाशक, बलप्रद, स्त्रियांस आनंद करणारा असा होतो.

तापस्फोटांगसंकोचकफमारुतमेहकृत॥ अशुद्धस्तालकःशुद्धोमृतःसर्वरोगहामृतम्॥

टी० ॥ ॥ अशुद्ध हरताळ सेवन केला असतां, ताप, फोड, आंग आखडणें, कफ, वायु, मेह, यांतें करतो. आणि शुद्ध सेवन केला असतां हेच रोग दूर करितो; केवळ अमृत तुल्य आहे.

इतितालकगुणाः

यान्रोगान्प्रतिलोहानिसंसिद्धानिमृतानिच॥ तानेवकुर्वत्यशुद्धान्यमृतानिगुरूणिच॥

टी० ॥ ॥शुद्ध मारलेली लोहें ह्मणजे सर्व धातु हीं ज्या रोगाचा नाश करितात त्याच रोगांप्रत अशुद्ध, कच्चीं, गरू, अशीं लोहें उत्पन्न करितात.

मू०॥ आयुर्लक्ष्मीप्रभाधीस्मृतिकरमखिलव्याधिविध्वंसिपुण्यंभूतावेशप्रशांतिस्मरद्रवसुखदंसौख्यपुष्टिप्रकाशि गांगेयंचाथरौप्यंगदहरमजराकारिमेहप्रहारिक्षीणानांपुष्टिकारिस्फुटमतिकरणंकारणंवीर्यवृद्धेः॥

टी० ॥ ॥सोनें आणि रुपें आयुष्य, लक्ष्मी, प्रभा, धी, स्मृति यांतें करणारें; संपूर्ण रोग नाशक, पुण्यकारक, भूत संचार दूर करणारें, कामा प्रमाणें सुख देणारें, सौख्याची पुष्टी करणारें, जरा नाशक, मेह नाशक, क्षीणाला पुष्ट करणारें, बुद्धी स्वच्छ करणारें, वीर्य वृद्धीला कारण असें आहे.

इतिसुवर्णरौप्यगुणाः

मू०॥ गुल्मपांडुपरिणामशूलजिद्धृदयनंजयमिदृग्विकारो-

घ्नं ॥ प्लीहकुष्ठजठरव्रणापहं श्लेष्मवातज्वरहं शकृचिता
घ्नम् ॥

टी० ॥ ॥ शुद्ध केलेले तांब्याचें भस्म गुल्म, पांडु, परिणामशूल, यांचें नाशक;
लेखन, कृमिनाशक, शुद्धिकारक, प्लीहा, कुष्ठ, उदर, व्रण, कफ, वायु, ज्वर, यांचें
नाशक आहे. ॥ इतिताम्रगुणाः

मू० ॥ वंगं दाहहरं पांडुजंतुमेहविनाशकं ॥ तद्वन्नागं
चदुर्नामवातहृत्किंचिदुष्णकृत् ॥

टी० ॥ ॥ वंगभस्म दाह, पांडु, जंत, मेह यांचें नाशक आहे; या प्रमाणेंच ना
ग भस्म असून मूळव्याध वायू यांचें नाशक; आणि किंचित उष्ण आहे.

मू० ॥ लोहं जंतुविकारपांडुपवनक्षीणत्वपित्तामयस्थौ
ल्यार्शोग्रहणीज्वरार्तिकफजिच्छोफः प्रमेहः प्रणुत्
॥ गुल्मप्लीहविषापहं बलकरं कुष्ठाग्निमांद्यप्रणुत् ॥
सौख्यालंबि रसायनं मृतिहरं कांतादि किट्टं तथा ॥ ॥

टी० ॥ ॥ लोहकांत, पोलाद, लोखंड, कीट यांचें भस्म जंतविकार, पांडु, वायु,
क्षीणता, पित्तरोग, स्थूलपणा, मुळव्याध, संग्रहणी, ज्वर, कफ, शोफ, मेह, गुल्म,
पांथरी, विष यांचें नाशक; बलप्रद, कुष्ट, अग्निमांद्य, यांचें नाशक; सौख्य-
कारक रसायन मृत्यु दूरकरणारें असें आहे. ॥ इतिलोहगुणाः ॥

अशुद्धमायुर्गगनं निहन्यात्कफानिलोत्थानकरं तथै
व ॥ सचंद्रिकं जंतुकरं तदन्नछेदाय मंदानलदं नृणां स्यात्

टी० ॥ ॥ अशुद्ध अभ्रक भस्म आयुष्याचें नाशक; कफ, वायु, यांतें करणा
रें असें आहे. चंद्रिका ह्मणजे चमक जामध्यें आहे ते जंत, मंदाग्नी यांतें
करणारें, मनुष्यास मारणारें असें आहे.

इत्यभ्रकगुणाः

मू० ॥ अशुद्धगंधोभ्रमजाड्यकुष्ठदाहार्तिशोषं कुरुतेथ
शुद्धः ॥ विशेषतो मृत्युहरोग्निकर्ता रसायनः कुष्ठहरो रुजापह्नुत्

टी० ॥ ॥ अशुद्ध गंधक भ्रम, जाड्य, कुष्ठ, दाह, शोष यांतें करणारा असा
आहे. आणि शुद्ध गंधक विशेषें करून मृत्यु नाशक, अग्निदीपक, रसायन,
कुष्ठ, शूल, यांचा नाशक आहे.

अन्यच्च ॥ गौरीतेजः परममपृतं वातपित्तक्षयघ्नं मज्ञा

बोधिप्रशमितजरंवृष्यमायुष्यमग्र्यम्॥बल्यंस्निग्धंरु
चिदमकफंदीपनंशीतवीर्यंतत्तद्योगैःसकलगदहृद्धोम
सूतेद्रबंधि॥

टी० ॥ ॥गंधक अमृत तुल्य,वातपित्त,क्षय यांचा नाशक,बुद्धिप्रद,जरा ना
शक,वृष्य,केवळ आयुष्यरूप,बलप्रद,स्निग्ध,रुचिकारक,कफ न करणारा.
अग्निदीपक,शीतवीर्य,त्या त्या अनुपानें करून सर्वरोग नाशक,अभ्रक आ
णि पारा यांचा प्रतिबंध करणारा. ॥इतिगंधकगुणाः॥

इतिचिकित्सासारेरसोपरसशोधनमारणगुणाधिकारःसमाप्तः॥

## अथज्वरादीनांनिदानचिकित्सामाह॥

मू०॥दक्षापमानसंक्रुद्धरुद्रनिश्वाससंभवः॥ज्वरो-
ष्टधापृथग्द्वंद्वसंघातागंतुजस्मृतः॥

टी० ॥ ॥दक्षानें अपमान केला ह्मणून क्रुद्ध झालेला जो शिव त्याचे श्वा-
सापासून आहे उत्पत्ति ज्याची असा आठ प्रकारचाज्वर,वातज्वर,पित्तज्वर,
कफज्वर,वातपित्तज्वर,वातकफज्वर,पित्तकफज्वर,सन्निपातज्वर,आगंतुक
ज्वर,याप्रकारेंकरून आहे.

मू०॥मिथ्याहारविहाराभ्यांदोषाल्यामाशयाश्रयाः॥ब
हिर्बहिर्निरस्यकोष्ठाग्निंज्वरदास्यूरसानुगाः॥

टी० ॥ ॥मिथ्या आहार,विहार ह्मणजे अकाळीं खाणें,किंवा शक्तिपेक्षां
अधीक खाणें हा मिथ्या आहार,आणि शक्तिपेक्षां अतिव्यायाम करणें,
किंवा अति फिरणें हा मिथ्या विहार;या मिथ्या आहार विहारें करून
आमांशा यांचा आश्रय करून असणारे जे दोष ते जठराग्नीला बाहेर का
ढून रस धातुगत होणारे ज्वर उत्पन्न करतात.

मू०॥सर्वेषामेवरोगाणांनिदानंकुपितामलाः॥

टी० ॥ ॥संपूर्ण रोगाला मल कुपित होणें हें कारण आहे.

मू०॥अत्यंबुपानाद्विषमाशनाच्चदिवाशयाज्जागरणा
च्चरात्रौ॥संधारणान्मूत्रपुरीषयोश्चषड्भिःप्रकारैःप्र-
भवंतिरोगाः॥

टी० ॥ ॥अति पाणी पिणें,अकाळीं अति खाणें दिवसास निजणें,रात्रीस

जागणें, मूत्र मळ, यांचा अवरोध करणें, या साहा प्रकारानीं रोग उत्पन्न हो॰

## अथवातज्वरलक्षणोपचारः

मू॰॥ देहःकंटकितःसवारिनयनंछत्कंडराकर्षणंकंडुष्णश्वसनंचशोषवमनंमूत्रंस्रवर्णभ्रमम्॥शैथिल्यंकटिशोधनंस्थिरतनुःकुक्षौचवातभ्रदः॥स्याद्वोल्यमुखमम्लमिच्छतिगुणैरेभिश्चवातज्वरः॥

टी॰ ॥ ॥ शरीरावर कांटा, डोळे पाण्यानें भरलेले, हृदयास ओढ कंड, उष्णश्वास, शोष, ओकारी, मूत्र पिवळें, शिथिलपणा, कंबर हलकी पडणें, शरीर स्तब्ध, कुशीत वारा मारणें, मुख गोडीळ, आंबट पदार्थावर इछा, इतक्या लक्षणांनि वातज्वर जाणावा.

मू॰॥ नवज्वरेदिवास्वप्नेस्नानाभ्यंगान्नमैथुनम्॥क्रोधप्रवातव्यायामकषायांश्वविवर्जयेत्॥

टी॰ ॥ ॥ नूतन ज्वरामध्यें दिवसास निजणें, स्नान, अभ्यंग, अन्न, मैथुन, क्रोध, वारा घेणें, व्यायाम, काढा, इतकें वर्ज करावें.

मू॰॥ शठीपुष्करमूलंचभार्ङ्गीशृंगीदुरालभा॥गडूचीनागरंपाठाकिरातंकटुरोहिणी॥एषशठ्यादिकःक्वाथःसर्ववातज्वरापहः॥कासादिषुचसर्वेषुदद्यात्सोपद्रवेषुच

टी॰ ॥ ॥ कचोरा, पोखरमूळ, भारंगमूळ, कांकडशिंगी, धमासा, गुळवेल, संठ, पाहाडमूळ, किराईत, कुटकी, इतक्यांचा काढा सर्व वात ज्वर, खोकला इत्यादीक उपद्रव सहीत जरीं असले तरीं त्यांवर द्यावा, याला शठ्यादि काढा असें ह्मणतात. ॥इतिशठ्यादिः॥

मू॰॥ किरातब्दामृतोदीच्यबृहतीद्वयगोक्षुरैः॥सस्थिराकलशीविश्वैः क्वाथोवातज्वरापहः॥

टी॰ ॥ ॥ किराईत, नागरमोथे, गुळवेल, वाळा, रिंगणी, मोतरिंगणी, गोखरू, सालवण, पिठवण, संठ, इतक्यांचा काढा वात ज्वराचा नाशक आहे.

मू॰॥ पिप्पलीसारिवाद्राक्षाशतपुष्पाहरेणुभिः॥कृतःकषायःसगुडोहन्यात्पवनजंज्वरम्॥

टी॰॥ ॥ पिंपळी श्वेतउपळसरी मनुका बडिशेप, रेणुकाबीज, इतक्यांचा काढा करून गूळ घालून द्यावा, ह्मणजे वातज्वराचा नाश करील. ॥ पिप्पल्यादिः

मू० ॥ त्रिफलाव्योषसगुडाशर्करात्रिवृतार्धकम् ॥ मोदकंभक्षयित्वातुपिबेच्चोष्णंजलंपुनः ॥ पार्श्वशूलेरुचौकासेज्वरेचानिलसंभवे ॥

टी० ॥ ॥ हिरडा, वेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, गूळ, साखर, नेड हीं सर्व एकएक भाग आणि नेड अर्धाभाग घेऊन यांचा लाडू करून खावा नंतर ऊन पाणी प्यावें ह्मणजे कुक्षिशूल अरुची, खोकला, वातज्वर हे दूर होतात. ॥ इतित्रिफलाद्योमोदकः ॥

## पित्तज्वरलक्षणोपचारः

मू० ॥ पित्तेसंभ्रमलामुखेचकटुकताश्वासोष्णतारक्तता मूत्रेतीव्रशिरोर्तिरंगदहनंपार्श्वेचबाधारतिः ॥ शोषःपश्यतिनीलपीततिमिरंरक्तेचनेत्रभ्रमिः कंपोरोचकविस्मयोविलपनैःपित्तज्वरंलक्षयेत् ॥

टी० ॥ ॥ पित्तज्वराचेठाईं भ्रांति, तोंड कडू, श्वास, उष्ण, मूत्र लाल, डोकें फार दुखणें अंगाचा दाह कुक्षिशूल, अरती, शोष, डोळ्यापुढें काळें पिवळें काजवे, डोळे लाल, भोंवळ कफ अरुची, विस्मय बडबड, इतकीं लक्षणें होतात; त्या लक्षणानीं पित्तज्वर जाणावा.

मू० ॥ द्राक्षाभयापर्पटकाब्दतिक्ताक्वाथःसशम्याकफलोविदध्यात् ॥ प्रलापमूर्छाभ्रमदाहशोषतृष्णान्विते पित्तभवेज्वरेच ॥

टी० ॥ ॥ मनुका हिरडा, पित्तपापडा, नागरमोथा, कुटकी, बाहाव्याचामगज, इतक्यांचा काढा, बडबड, मूर्छा, भोंवळ, दाह, शोष, तृषा, इतक्यानीं युक्त जो पित्तज्वर त्याचा ठाईं द्यावा. ॥ इतिद्राक्षादिः ॥

मू० ॥ दुरालभापर्पटकप्रियंगुभूनिंबवासाकटुरोहिणीनां क्वाथंपिबेच्छर्करयावगाढंतृष्णास्रपित्तज्वरदाहयुक्तः ॥

टी० ॥ ॥ धमासा पित्तपापडा, गहुला, किराईत, अडूळसा, कुटकी इतक्यांचा काढा करून त्यांत साखर घालून, तृषा, रक्त, पित्तज्वर, दाह, इतक्यानीं युक्त असेल त्यानें घ्यावा. ॥ दुरालभादिः ॥

एकःपर्पटकःश्रेष्ठःपित्तज्वरविनाशनः ॥ किंपुनर्यदितद्युक्तश्चंदनोदकसंयुतः ॥ (?)

टी० ॥ ॥ नुसतान्च पित्तपापड्याचा काढा पित्तज्वराचा नाश करील, म ग चंदन, वाळा, सुंठ, पाणि युक्त केला असतां नाश करील यांत काय सं शय आहे. १ ॥ पर्पटादिः ॥

विदारिदाडिमंलोध्रंदाधित्थंबीजपूरकम् ॥ एभिःप्रदि
ह्यान्मूर्धानंतृड्दाहार्तस्यदेहिनः ॥

टी० ॥ ॥ भुई कोंहळा, डाळिंब, लोध्र, कवट, माहाळुंग इतकीं वाटून, तृषेनें, दाहानें, पीडित झाला असेल त्याचे मस्तकास लेप करावा.

केसरंमातुलिंगस्यमधुसैंधवसंयुतं ॥ जिव्हाताल्लुगल
क्लोमशोषंमूर्ध्निदापयेत् ॥

टी० ॥ ॥ माहाळुंगाचें केशर, मध सैंधव घालून कालवून जिव्हा, तालु, गळा क्लोम इतक्यांचे ठाई शोध पडला असतां मस्तकावर ठेवावें.

उदुंबरशिफाछिन्नातज्जलंसितयान्वितम् ॥ पीतंपित्त
ज्वरंहंतिपटोल्यावाशिफाजलम् ॥

टी० ॥ ॥ उंबराचा मुळ्या, गुळवेल, यांचा काढा साखर घालून घ्यावा; अथ वा कडू पडवळाचा काढा, अथवा बडिशोपेचा काढा घ्यावा ह्मणजे पित्तज्वरा चा नाश होईल

## अथश्लेष्मज्वरलक्षणोपचारः

नेत्रेवारियुतेगलग्रहयुतःश्वासोमुखेक्षारतापादोदाह
युतौकरौचबहुलंमूत्रंशिरोरोधनम् ॥ शोषःसर्वशरीर
संधिषुमहात्रासावबाधारतिः ॥ स्वल्पस्वेदमिदंकलेव
रमहोसोयंकफाख्योज्वरः ॥

टी० ॥ ॥ डोळ्यांस पाणी, गळा दाटलेला, श्वास, तोंड खारट, हात पायांना दा ह, बहुमूत्र, मस्तक जड, शोष, शरीराचा संधीला त्रास, आंग जड, अरती, घा म फार थोडा, इतक्या लक्षणानी कफज्वर जाणावा.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यंचित्रंचनागरम् ॥ मरीचैला
जमोदेंद्रपाठारेणुकजीरकम् ॥ भार्गीमहानिंबफलंहिं
गुरोहिणीसर्षपम् विडंगातिविषामूर्वागणोयंकफनाशनः

टी० ॥ ॥ पिंपळी, पिंपळमूळ चवक चित्रक सुंठ मिरें एलची ओंवा इंद्रज व पहाड मूळ, रेणका बीज जिरें भारंगमूळ, कडुलिंबफळ, हिंग कुटकीशि

रस, वावडिंग, अतिवीष मोरवेल, त्या औषधांचा गण कफ नाशक आहे, म्ह णून कफज्वरावर त्याचा काढा द्यावा.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यचित्रकनागरम् ॥ पंचकोल मिदंप्रोक्तंशोधनंकफनाशनम् ॥

टी० ॥ ॥ पिंपळी पिंपळमूळ चवक चित्रक, सूंठ, हें पंचकोल असे सांगि तलें आहे; हें शोधन कफ नाशक आहे, हेंही कफज्वरावर योग्य आहे.

कटुकापिप्पलीमूलंमुस्तानैवहरीतकी ॥ गिरमालसमः क्वाथःसर्वज्वरविनाशनः ॥

टी० ॥ ॥ कुटकी, पिंपळमूळ, नागरमोथे, हिरडा, बाहावा, इतक्यांचा काढा सर्व ज्वरांचा नाशक आहे. ॥ इतिआरग्वध पंचकम् ॥

पटोलत्रिफलातिक्ताशठीवासामृताभयः ॥ क्वाथोमधु युतःपीतोहन्यात्कफकृतंज्वरम् ॥

टी० ॥ ॥ कडूपडवळ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, कुटकी, कचोरा, अडुळसा, गळवेल, इतक्यांचा काढा मध घालून घेतला असता कफज्वराचा नाश क रील, ॥ इतिपटोलादिः ॥

निदिग्धिकाच्छिन्नरुहोपकुल्यानिश्वौषधैःसाधितमंबु पीतम् ॥ हंतिज्वरंश्वासबलासकासशूलाग्निमांद्यंजठरानिलंच

टी० ॥ ॥ रिंगणी, गळवेल, पिंपळी, सूंठ, इतक्यांचा काढा करून प्यालें अ सतां ज्वर श्वास कफ खोकला, शूल, अग्निमांद्य, पोटातला वायु यांचा नाश करील ॥ इतिनिदिग्धिकादिः ॥

भूनिंबनिंबपिप्पल्यःशठीशुंठीशतावरी ॥ गुडूचीबृह तीचेतिक्वाथोहन्यात्कफज्वरम्

टी० ॥ ॥ किराईत, कडूनिंब, पिंपळी, कचोरा, सूंठ, शतावरी, गळवेल, रिंग णी इतक्यांचा काढा कफज्वराचा नाश करील. ॥ इति भूनिंबादिः ॥

अथवातपित्तज्वरलक्षणोपचारः

तृष्णामूर्छाभ्रमोदाहःस्वप्ननाशःशिरोरुजा ॥ कंठास्यशोषोवमथूरोमहर्षोरुचिस्तथा ॥ पर्वभेदश्चजृंभाचवातपित्तज्वराकृतिः ॥

ह्रत्कंटेदहनंनिरोतिवमनंकुक्षौचवातग्रहः ॥ श्वासोदा हविमोचनंतंद्रारुचिर्दाहःसदानेत्रयोः ॥ कंद्रस्वेदमती वविस्मयकरंकटुम्लमास्यंसदाधूम्रधूम्रलश्यामवर्णम ध्यवातेसपित्तज्वरे ॥

टी० ॥ ॥ उरांत आणि घशांत जळजळ, डोकें दुखणें, ओकारी, कुशींत वारा मारणें, श्वास, दाह, जीव गुंडाळणें, तृषा, अरुची, डोळ्यांची आग, कंड, घाम, कडू अंबट असें चमत्कारीक तोंड, मूत्र धूम्रवर्ण, अथवा काळें इतकीं वात पित्त ज्वरामध्यें लक्षणें होतात.

गुडूचीपर्पटमुस्ताकिरातंविश्वभेषजम् ॥ वातपित्तज्व रेदेयंपंचभद्रमिदंशुभम् ॥

टी० ॥ ॥ गुळवेल, पित्तपापडा, नागरमोथे, किराईत, सुंठ इतक्यांला पं चभद्र असें ह्मणतात. याचा काढा वातपित्तज्वरावर द्यावा ॥ इतिपंचभद्रः ॥

द्राक्षाकिरातामृतवासकासठीक्काथंपिबेत्पित्तमरुज्ज्वरंहरेत्

टी० ॥ ॥ मनुका, किराईत, गुळवेल, अडुळसा, कचोरा, इतक्यांचा काढा प्या वा ह्मणजे वात पित्तज्वर नाश करेल.

छिन्नाकिरातब्दसविश्वपर्पटाःसवातपित्तज्वरहन्निपीताः

टी० ॥ ॥ गुळवेल, किराईत, नागरमोथे, सुंठ, पित्तपापडा, इतक्यांचा काढा वा त पित्तज्वराचा नाशक आहे.

अथवातश्लेष्मज्वरलक्षणोपचारः

स्निग्धंक्षारमुखंशिरोव्यथयतेसर्वांगपीडाभवेन्नेत्रे वारियुतेकरोतिवमनंरोमांचताश्लेष्मणी ॥ दीर्घंनि श्वसतेतथातिदहनंचानिद्रदोषाकुलंमूत्रंफेनिलप ल्वलंनिगदितंवातज्वरेश्लेष्मणि ॥

टी० ॥ ॥ बुळबुळीत, खारट असें मुख, मस्तकास पीडा सर्वांग दुखणें, डोळ्यांस पाणी, ओकारी, अंगावर रोमांच, नाकास शेंबूड, दीर्घश्वास, अतिदाह निद्रानाश, मूत्र फेंसट गधूळ, इतकीं लक्षणें वातश्लेष्म ज्वरा ची जाणावी.

मुस्तापर्पटकेशुंठीगुडूचीसदुरालभा ॥ कफवातारुचि च्छर्दिदाहशोषनिवारणः ॥

टी० ॥ ॥ नागरमोथे, पित्तपापडा, सुंठ, गुळवेल, धमासा, इतक्यांचा काढा कफ, वायु, अरुची, ओकारी, दाह शोष यांचा नाशक आहे.

आरग्वधग्रंथिकमुस्ततिक्ताहरीतकीभिःक्वथितःकषायः सामेसशूलेकफवातयुक्तेज्वरेहितोदीपनपाचनश्च ॥

टी० ॥ ॥ दाहाचा, पिंपळमूळ नागरमोथे, कुटकी हिरडा इतक्यांचा काढा आमांश, शूळ, कफ, वात, याणी युक्त जो ज्वर त्याचे ठाई हितकारक आणि दीपन पाचनही आहे. ॥ आरग्वधादिः ॥

क्षुद्रामृतानागरपुष्कराह्वैः कृतः कषायः कफमारुतोत्तरे सश्वासकासारुचिपार्श्वशूलेज्वरेत्रिदोषप्रभवेपिशस्यते

टी० ॥ ॥ रिंगणी गळवेल सुंठ पोखर मूळ इतक्यांचा काढा श्लेष्मा वात ज्वर श्वास, कास, अरुची, कुक्षिशूळ, त्रिदोष ज्वर यांचा नाशक आहे.

अथपित्तश्लेष्मज्वरलक्षणोपचारः

नेत्रेःपश्यतिनीलपीततिमिरेरोम्णांतथोद्धर्षणं॥ कंपोरोचकविस्मयोनन्वरतिर्वक्त्रेकटुक्षारता॥ पा दौदाहयुतौलदागलग्रहश्चोन्निद्रवां तीसदामूत्र- कुंकुमपांडुरंभिषगिदंपित्तेकफास्व्येज्वरे॥

टी० ॥ ॥ डोळ्यांनी, निळें, पिवळें, काजवे पाहणें, रोमांच उभे राहणें, कंप अरुची, विस्मय, अरति तोंड कडू खारट, पायांचा दहा, घसा धरलेला, निद्रा नाश ओकारी, मूत्र तांबूस पांढरें इतक्या लक्षणानी पित्तश्लेष्म ज्वर जाणावा

कंटकार्यमृताभार्गीनागरेंद्रयवासकम्॥ भूनिंबचंदनंमुस्तापटोलकटुरोहिणी॥ कषायंपाययेदेतंपित्तश्ले ष्मज्वरापहम्॥ दाहतृष्णारुचिर्हिक्काकासहृत्पार्श्वशूलहृत्

टी० ॥ ॥ रिंगणी गुळवेल, भारंग, सुंठ, इंद्रजव, धमासा, किराईत, चंदन, नागरमोथा, कडूपडवळ, कुटकी, इतक्यांचा काढा पित्त श्लेष्म ज्वराचा नाशक आहे; आणि दहा, तृषा, अरुची, उचकी, खोकला, हृदयशूळ, कुक्षिशूळ, यांचा नाशक आहे.

पटोलचंदनमूर्वातिक्तापाठामृतागणाः॥ पित्तश्लेष्मारुचिच्छर्दिज्वरकंडूविषापहः॥

टी० ॥ ॥ कडूपडवळ, चंदन, मोरवेल, कुटकी, पहाडमूळ, गुळवेल, पिंपळी, इतक्यांचा काढा पित्त, कफ, अरुची, ओकारी, ज्वर, कंडू, विष यांचा नाशक आहे. ॥ पटोलादिः ॥

अमृतारिष्टकटुकामुस्तेंद्रयवनागरैः॥ पटोलचंदना

भ्यांचपिप्पलीचूर्णयुक्तस्मृतः॥ अमृताष्टकमेतच्च पित्तश्लेष्मज्वरापहम्॥ छर्धरोचकहृल्लासदाहतृष्णानिवारणम्

टी० ॥ ॥ गुळवेल, कडुलिंब, कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, कडूपडवळ, चंदन इतक्यांचा काढा पिंपळीचे चूर्णासहित घ्यावा याला अमृताष्टक असें ह्मणतात, हें अमृताष्टक पित्तश्लेष्म ज्वराचें नाशक आहे; आणि ओकारी अरुची ऊर दाटणें दाहा तृषा यांचें नाशकआहे

तिक्तोशीरबलाधान्यपर्पटांभोधरैः कृतः॥ क्वाथः पुनः समायातंज्वरंशीघ्रंनिवारयेत्॥

टी० ॥ कुटकी, वाळा, धणे, चिकणा, पित्तपापडा, नागरमोथा, इतक्यांचा काढा उलटलेल्या ज्वरावर द्यावा ह्मणजे ज्वराचें निवारण लौकर होईल.

जीरकंकारवल्यंबुशीतपूर्वज्वरेहितम्

टी० ॥ ॥ जिरें आणि कारलीचा रस थंडी वाजून ज्वर येतो त्यावर द्यावा ह्मणजे ज्वर दूर होईल.

## अथसन्निपातज्वरलक्षणोपचारः

कासश्वासभ्रमोहारुचिभ्रमकृशताःकर्णयुग्मेसनादं निद्रानाशोतितृष्णागुरुतरमुदरंशीर्षसंध्यस्थिपीडा दाहःशीतंक्षणेनसततगलविकूकुलोचनेस्रावयुक्ते। निर्भुग्नेचातिरक्तेप्रलपनमुदितंलक्षणंसन्निपाते॥

टी० ॥ ॥ खोकला, श्वास, मोह, अरुची, भोंवळ, कृशता, कानांत, शब्द होणें निद्रानाश, अतितृषा, पोट अत्यंत जड, डोकें, संधी, हाडें यांचेठाईं पीडा, क्षणानें दाहा क्षणानें थंडी, नेहमी गळ्यांत शब्द, डोळेस्रावयुक्त, ओढलेले, अतीलाल बडबड ह्या लक्षणानी सन्निपात ज्वर जाणावा.

## लक्षणांतरम्

क्षणेदाहःक्षणेशीतमस्थिसंधीशिरोरुजा॥ सास्रावे कलुषेरक्तेनिर्भुग्नेचापिलोचने॥ सस्वनौसरुजौकर्णौ कंठःशूकैरिवावृतः॥ तंद्रामोहःप्रलापश्चकासश्वासोरुचिर्भ्रमः॥ परिदग्धाखरस्पर्शाजिव्हास्रस्तांगतापरं॥ ष्ठीवनंरक्तपित्तस्यकफेनोन्मिश्रितस्यच॥ शिरसोलोट

नंतृष्णानिद्रानाशोत्हृद्व्यथा ॥ स्वेदमूत्रपुरीषाणांचि रादर्शनमल्पशः ॥ कृशत्वंचातिगात्राणांसततंकंठकूजनं ॥ कोठानांश्यावरक्तानांमंडलानांचदर्शनम् ॥ मूकत्वं स्रोतसांपाकोगरुत्वमुदरस्यच ॥ चिरात्पाकश्चदोषाणां सन्निपातज्वराकृतिः ॥

टी० ॥ ॥ क्षणांत दहा, क्षणांत शैत्य, हाडें, संधि, डोकें, इतक्या ठिकाणीं व्यथा, डोळे स्रावयुक्त लाल गधूळ ओटलेले, कानांत शब्द आणि लिडीक, गळ्यांत कांटे टोंचल्या प्रमाणें खरे डोळ्यांवर झांपड, मोह, बडबड, खोकला, श्वास, अरुची, भोंवळ, जिव्हा भाजल्या प्रमाणें, आणि खरख रीत, अंगांत शिथिलपणा, खारखेरारक्तपित्त कफयुक्त, डोकें फिरणें, तृ ष्णा, निद्रानाश, उरांत दुखणें, घाम, मूत्र, मल, हें एखादे वेळेस थोडेंसें असणें, शरीराला अति कृशता, एक सारखा घसा वाजणें, अंगावर भग वर तांबड्या अशा गांधी चट्टे दिसणें, मुकेपणा, स्रोतांचा पाक, पोट जड, चिरकालेंकरून दोषांचा पाक इतकीं सन्निपातज्वराची लक्षणें.

दोषेविवृद्धेनष्टेग्नौसर्वसंपूर्णलक्षणः ॥ सन्निपात ज्व रोसाध्यः कृच्छ्रसाध्यस्ततोन्यथा ॥

टी० ॥ ॥ दोष वाढलेले आणि अग्नी अतिमंद असें असतां संपूर्ण लक्ष णानीं युक्त असा सन्निपात ज्वर असाध्य जाणावा. आणि याहून भिन्न प्रकारचा असेल तो कष्ट साध्य जाणावा.

सन्निपातज्वरस्यांतेकर्णमूलेसुदारुणः ॥ शोफः सं- जायतेतेनकश्चिदेवविमुच्यते ॥

टी० ॥ ॥ सन्निपातज्वराचे अंतीं कर्ण मूलाचे ठायीं मोठा भयंकर शो थ उत्पन्न होतो त्यापासून एखादा मुक्त होतो.

पित्तकफानिलवृद्ध्यादशदिवसद्वादशाहसप्ताहात् ॥ हंतिविमुंचत्याशुत्रिदोषजोधातुमलपाकात् ॥

टी० ॥ ॥ पित्त अधीक आहे तर, दाहा दिवसांनीं कफ अधीक असेल तर, बारा दिवसानी वायु अधीक असेल तर, सात दिवसानी सन्निपात ज्वर धातुपाक झाला असतां मारील, आणी मलपाक झाला असतां सोडील.

सप्तमेदिवसेप्राप्तेदशमेद्वादशेपिवा ॥ पुनर्घोरत

रोभूत्वाप्रशमंयातिहंतिवा ॥

टी० ॥ ॥सात दिवसानीं, किंवा दाहा दिवसानी, किंवा बारा दिवसानी स न्निपात ज्वर अतिघोर होऊन शांत होतो किंवा मारतो.

सप्तमीद्विगुणायावन्नवम्येकादशीतथा ॥ एषात्रिदो षमर्यादामोक्षायचवधायच ॥

टी० ॥ ॥मतांतरीं सात दिवस, चवदा दिवस, नऊ दिवस, अक्रा दिवस, ही मर्यादा सन्निपातज्वरास सोडण्यास किंवा मारण्यास सांगितली आहे.

दाहःस्वेदोभ्रमस्तृष्णाकंपोविड्भेदसंज्ञता ॥ कूजनंचा तिवैदग्ध्यमाकृतिर्ज्वरमोक्षणे ॥

टी० ॥ ॥दाह, घाम, भ्रम, तृष्णा, कंप, विट्भेद, भानवसणें, कण्हणें, अंगा स घाम फार हीं लक्षणें सन्निपातज्वर निघण्याचीं आहेत.

सन्निपातज्वरेपूर्वंकुर्यादामकफापहम् ॥ पश्चात्श्लेष्म णिसंक्षीणेशमयेत्पित्तमारुतौ ॥

टी० ॥ ॥सन्निपात ज्वरा मध्यें पूर्वी आम, कफ, यांचे नाशक औषध द्यावें. नंतर कफक्षीण झाल्यावर पित्त वायु हे शमवावे.

लंघनंवालुकास्वेदोनस्यनिष्ठीवनंतथा ॥ अवलेहां जनंचैवप्राक्प्रयोज्यंत्रिदोषजे ॥

टी० ॥ ॥लंघन, वाळूची वाफ, नस्य, ओकारी येण्यास औषध, अवलेह, अंजन इतके उपाय सन्निपात ज्वरामध्यें पूर्वी करावे.

त्रिरात्रंपंचरात्रंवादशरात्रमथापिवा ॥ लंघनंसन्नि पातेतुकुर्यादारोग्यदर्शनात् ॥

टी० ॥ ॥तीन दिवस किंवा पांच दिवस किंवा दाहा दिवस आरोग्य द र्शन होई तों पर्यंत सन्निपात ज्वरामध्यें लंघन करावें.

दोषाणामेवसाशक्तिर्लंघनेयासहिष्णुता ॥ कश्चिद्दो षविमुक्तोपिलंघनंसहतेनरः ॥

टी० ॥ ॥लंघना विषयीं जी सहिष्णुता ती दोषांचीच शक्ती आहे; को णी एखादा दोषापासून मुक्त झाला तथापि लंघन सहन करितो.

आदौचामविनाशायद्वितीयेपित्तनाशनम् ॥ तृतीयेक फनाशश्चचतुर्थेवातनाशनम् ॥ पंचसेचक्षुधोत्पत्तिः

षष्ठेचलघुगात्रता॥ सप्तमेज्वरपाकःस्यादष्टमेज्वर
नाशनं नवमेसर्वदोषघ्नंलंघनंकथ्यतेबुधैः॥

टी० ॥ ॥ पहिले लंघनानें आमनाश, दुसरे लंघनानें पित्तनाश, तिसऱ्यानें कफ नाश, चवथ्यानें वात नाश, पांचव्यानें क्षुधा उत्पन्न होते, साहाव्यानें शरीर हलकें होतें, सातव्यानें ज्वराचा पाक होतो, आठव्यानें ज्वर नाश, नव्यानें सर्व दोषांचा नाश, या प्रमाणें लंघनाचे गुण पंडितानी सांगितले आ०

ज्वरेलंघनमेवादावुपदिष्टेमृतेज्वरात्॥ क्षयानिलभ
यात्क्रोधकामशोकश्रमोद्भवात्॥

टी० ॥ ॥ ज्वराचे ठायीं पूर्वीं लंघनच सांगितलें आहे; परंतु क्षय, वायु, भय, क्रोध, काम, शोक श्रम इतक्यां पासून ज्वर उत्पन्न झाला असतां लंघन करूं नये. ॥ इतिलंघननिषेधः॥

आमाशयस्थोल्हत्वाग्निंसामोमार्गान्पिधायच॥ विदधा
तिज्वरंदोषस्तस्मात्कुर्वीतलंघनम्॥

टी० ॥ ॥ आमाशयाश्रित दोष अग्नीला स्वस्थाना पासून भ्रष्ट करून आम सहित रसादिकांचे मार्ग आच्छादित करून ज्वर उत्पन्न करतो या साठीं लंघन करावें. ह्मणजे आमादिकांचा नाश होऊन ज्वर निघतो. इतिलंघनहेतुः॥

प्राणाविरोधिनाचैनंलंघयेनोपवासयेत्॥ बलाधिष्ठा
नमारोग्यंयदर्थेसतत्क्रियाक्रमः॥

टी० ॥ ॥ प्राण व्याकूळनहोतां लंघन होत असल्यास करवावें; केवळ लंघन ह्मणजे उपास करावा असें तात्पर्य नाहीं कारणकीं, बल आरोग्य सत्क्रिया हीं ज्या साठीं तो प्राण रक्षण केला पाहिजे.

नच्छमारुतक्षुत्तृष्णामुखशोषभ्रमान्विते॥ कार्यंबाले
नवृद्धेवागर्भिण्यांनचदुर्बले॥

टी० ॥ ॥ क्षयादी ज्वरां खेरीज लंघन निषेध, वायु झालेला, क्षुधा, तृषा, मुख शोष, भ्रम इतक्यानी युक्त बाळ, वृद्ध, गर्भिणी दुर्बल. याणी लंघन करूं नये. द्वितीयलंघननिषेधः॥

मृदुज्वरोलघुर्देहश्चलिताश्चयदामलाः॥ पक्वंदोषंवि
जानीयाज्ज्वरेदेयंतदौषधम्॥

टी० ॥ ॥ ज्वर कमी, देह हलका, मलप्रवृत्ती, दोष पक्व, इतकें जेव्हां होईल तेव्हां

ज्वरास औषध द्यावें.

ऊष्मापित्तादृतेनास्तिज्वरोनास्त्यूष्मणाविना ॥ तस्मा-
त्पित्तविरुद्धानिपिबेत्पित्तेधिकेधिकम् ॥

टी० ॥ ॥ ऊष्मा पित्तावांचून नाहीं, आणि ज्वर उष्म्या वांचून नाहीं, यास्तव पित्त विरुद्ध औषध प्यावें, पित्त अधीक असल्यास अधीक औषध प्यावें.

मातुलिंगार्द्रकरसंकोष्णंतिलवणान्वितम् ॥ नस्याद्वासि
द्धविहितंनस्यंतीक्ष्णंप्रयोजयेत् ॥

टी० ॥ ॥ माहाळुंग आणि आलें यांचा रस कोष्ठकोलिंजन, मीठ, सेंधेलोण, पादेलोण, यांचें नस्य करावें, याणें कार्य नहोईलतर दुसरें तीक्ष्ण नस्य योजावें.

मधूकसारसिंधूत्थवचोषणकणाःसमाः ॥ श्लक्ष्णंपि-
ष्टांभसानस्यंकुर्यात्संज्ञाप्रबोधनम् ॥

टी० ॥ ॥ मोहाच्या डीक, सैंधव, वेखंड, मिरें, पिंपळी, हीं समभाग घेऊन बारीक वांटून पाण्या बरोबर नस्य करावें, म्हणजे बेशुद्ध झालें असतां, मनुष्य शुद्धीवर येतें.

शिरीषबीजगोमूत्रकृष्णामरिचसैंधवैः ॥ अंजनंस्या-
त्प्रबाधायसरसोनशिलावचैः ॥

टी० ॥ ॥ शिरस गोमूत्र, पिंपळी, मिरें, सैंधव, लसूण, मनशीळ, वेखंड, इतक्यांनें अंजन करावें म्हणजे शुद्ध गेली असतां येते.

कट्फलंपुष्करंशृंगीकृष्णाचमधुनासह ॥ श्वासकास-
ज्वरहरःश्रेष्ठोलेहःकफांतकः ॥

टी० ॥ ॥ कायफळ, पोखरमूळ, कांकडशिंगी, पिंपळी, मध, इतक्यांचा लेह श्वास, खोकला, ज्वर, कफ, यांचे नाशा विषयीं श्रेष्ठ आहे.

भूनिंबदारुदशमूलमहोषधाब्दतिक्तेंद्रबीजधनिकेभक
णाकषायः ॥ तंद्राप्रलापकसनारुचिदाहमोहश्वासादियु
क्तमखिलज्वरमाशुहंति ॥

टी० ॥ ॥ किराईत, देवदार, दशमूळ म्हणजे शालिपर्णी, पृश्नीपर्णी, रिंगणी, डोरली, सरांटे, बेल, ऐरण, टेंटू, पहाडमूळ, शिवण, हीं दशमूलें संठ, नागरमोथे, कुटकी, इंद्रजव, धणें, गजपिंपळी, इतक्यांचा काढा तंद्रा प्रलाप खोकला अरूची दाह मोह श्वास इत्यादिकें करून युक्त सर्व प्रकारचा ज्वर याचा नाशक आहे.

भार्गीभूनिंबनिंबैर्घनकटुकवचाव्योषवासाविशाला॥ रास्नानंतापटोलीसुरतरुरजनीपाठलानिंदुकैश्च॥ ब्राह्मीदार्वीगुडूचीत्रिवृतमतिविषापुष्करत्रायमाणेर्व्याघ्री सिंहीकलिंगैस्त्रिफलसहितैःकल्पितस्तुल्यभागैः॥ क्वाथोद्वात्रिंशनामात्रिभिरधिकदशान्सन्निपातान्निहंति॥ शूलंकासादिहिक्काश्वसनगुदरुजाध्मानविध्वंसकारी॥ ऊरुस्तंभांत्रवृद्धीगलगदमरुचिंसर्वसंधिग्रहा तिमातंगौघंनिहन्यामृगरिपुरिहचेद्रोगजालंतथैव॥

टी० ॥ ॥भारंग, किराईत, कडुनिंब, नागरमोथे, कुटकी, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, अडूळसा, कवंडल, रास्ना, धमासा, कडु पडवळ, देवदार, हळद, पांढरी पाडळ, टेंबुरणी ब्राह्मी दारुहळद गुळवेल तेड अतिविष पोखर मूळ मेंदी बाघंटी डोरली इंद्रजव हिरडा बेहेडा आंवळकाठी कचोरा इनकीं समभाग घेऊन काढा करावा त्याला द्वात्रिंशनामा असें ह्मणतात. हा काढा तेरा सन्निपात शूलखोकला उचकी श्वास गुदरोग आध्मान उरुस्तंभ अंत्रवृद्धी गलरोग अरुची सर्व संधिग्रह यांचा नाशक आहे. " जसा सिंह हत्तीचे समुदाया प्रत नाशितो,, त्या प्रमाणें हा काढा रोगाचे समुदायाप्रत नाशितो.

स्वेदोद्गमेभ्रष्टकुलित्थचूर्णनिपातनंशस्तमितिब्रुवंति॥ मृत्युश्चतस्मिन्बहुपिच्छलत्वाच्छीतस्यजंतोःपुरतःसरत्वात्॥

टी० ॥ घाम आला असतां कुलित्थ भाजून त्याचें पीठ अंगास लावावें; त्याला निपातन असें ह्मणतात हें निपातन अवश्य करावें कारण सन्निपात ज्वरामध्यें शैत्य झालें असतां, मृत्यू पुढें उभा आहे, घाम आला ह्मणजे आंग चिकट होउन शैत्य होतें यास्तव करावें.

दार्व्यंबुदस्तिक्तफलत्रिकंचक्षुद्रापटोलीरजनीसनिंबा॥ क्वाथोविदध्याज्वरसन्निपातेनिश्चेतनेबुद्धिविबोधनार्थं॥

टी० ॥ ॥दारुहळद नागरमोथा कुटकी हिरडा बेहेडा आंवळकाठी रिंगणी कडूपडवळ हळद कडूलिंब इतक्यांचा काढा द्यावा ह्मणजे सन्निपात ज्वरामध्यें निश्चेतन जरी झाला तरी शुद्धी येऊन बरा होतो.

लशुनंतिक्तकंकांडंभार्गीचातिविषातथा॥ नरमूत्रेणनस्य

क्वाथः सन्निपातेस्क्दारुणः ॥

टी० ॥ ॥ लसूण किराईत कांडवेल भारंग अतिवीष इतक्यांचा काढा मनु ष्याचे मूत्रांत करावा हा तीक्ष्ण होतो, सन्निपात ज्वरांत द्यावा. ॥ लशुनादिः

विषभागोभवेदेकोमरीचानांत्रयोमताः॥ आरण्योपल जोभस्मषोडशांशसमन्वितम्॥ एकत्रमिलितंचूर्णंधू र्तस्वरसभावितम्॥ आतपेशोषितंतच्चशीतस्वेदहरं परम्॥

टी० ॥ ॥ बचनाग एकभाग, मिरें तीन भाग, रानशेणीचें भस्म सोळा भा- ग, तिह्रींचें चूर्ण एकत्र करून धोत्र्याचे रसांत भिजवून वाळवावें आणि आंगास लावावें ह्मणजे शैत्य घाम यातें दूर करतें.

अथवाचणकाभ्रष्टायवानीचूर्णमिश्रिताः॥ वचोषण रजोयुक्ताःस्वेदसंशोषणामताः॥

टी० ॥ ॥ भाजलेले हरभरे, ओंवा, वेखंड मिरें इतक्यांचें चूर्ण अंगास चो ळावें, ह्मणजे घाम बंद होतो.

उच्छुकांस्फुटितांजिव्हांद्राक्षयामधुपिष्टया॥ प्रलेपये त्सघृतयात्सन्निपातात्मिकेज्वरे॥

टी० ॥ ॥ सन्निपात ज्वरा मध्यें जिव्हेला कांटा आला, किंवा फुटलीतर म नुका मधांत खलून तूप घालून जिव्हेला चोळावें ह्मणजे बरी होईल.

सनागरंदेवदारुरास्नाचित्रकपेषितं॥ प्रलेपनमिदंश्रे ष्ठंगलशोफविनाशनम्॥

टी० ॥ ॥ गळ्याला सूज आली असतां संठ, देवदार, चित्रक, रास्ना यांचा लेप करावा. इतक्यानें नाशप्रत होईल.

कुलित्थंकटफलंशुंठीकारवीचसमांशकैः॥ स्रुखोष्णा लेपनंकार्यंकर्णमूलेमुहुर्मुहुः॥

टी० ॥ ॥ कुळगे, कायफळ, संठ, कडू जिरें हीं समांश इतक्यांचा लेप कर्ण मू लावर सहन होईल असा उष्ण वारंवार करावा. ॥ इतिकुलित्थादिलेपः॥

इंगुदिनिशाविशालासैंधवसुरदारुरविदुग्धैः॥ दत्तः क्रमेणलेपोहरतिमहाकर्णकग्रंथिम्॥

टी० ॥ ॥ हिंगणबेट, हळद, कोंडळ, सैंधव, देवदार, रुईचा चीक यांचा लेप क

र्ण मूलावर एकावर एक असा वारंवार करावा ह्मः कर्ण मूल बरें होतें.

किराततिक्तकापथ्याकणाकायफलंवचा ॥ उद्धूलनं त्रिदोषेचसंदाशीतेप्रशस्यते ॥

टी० ॥ ॥ किराईत, कुटकी, हिरडा, पिंपळी, कायफळ, वेखंड, इतक्यांचें बारीक चूर्ण सन्निपातामध्यें अंगास लावावें, याला उद्धूलन असें ह्मणतात. हें नेहमीचे शैत्यांत ही प्रशस्त आहे. ॥ इति उद्धूलनम् ॥

कस्तूरीमरिचंवाजिलालाचमधुनांजनम् ॥ तंद्रांनिवारयेत्या शुंठ्योषध्मधमनंतथा ॥

टी० ॥ ॥ कस्तूरी, मिरें, घोड्याची लाळ आणि मध, यांचें अंजन करावें ह्मणजे तंद्रा दूर होते. आणि सुंठ, मिरें, पिंपळी हीं फार बारीक चूर्ण करून नाकांत ओढावें ह्मणजे तंद्रा दूर होते.

तुरंगलालासहितामनःशिलानिहंतितंद्रांसकृदंजनेन

टी० ॥ ॥ घोड्याची लाळ आणि मनशीळ यांनें अंजन एक वेळ केलें असतां तंद्रा दूर होते.

बब्बूलपत्राभिहरीतकीचसंस्वेदितास्वेदविकारहंत्री ॥

टी० ॥ ॥ बाभळीचीं पानें आणि हिरडा यांचें चूर्ण घाम आल्यावर अंगास चोळावें ह्मणजे घाम आल्यावर जो विकार होतो तो होत नाहीं. इतिअंजनो०

बिल्वोग्निमंथःश्योनाकःकाश्मरीपाटलातथा ॥ शालिपर्णीपृश्निपर्णीबृहतीद्वयगोक्षुरैः ॥ उभयंदशमूलंस्यात्सन्निपातहरोगणः ॥

टी० ॥ ॥ बेल, ऐरण, टेंटू, शिवण, पाडळ, साल्वण, पिठवण, रिंगणी डोरली गोरवरू इतक्यांची जीं मूळें, त्यांस दश मूळ असें ह्मणतात. यांचा काढा सन्निपात नाशक आहे. ॥ इति दशमूलं ॥

आर्द्रकस्वरसोपेतंसैंधवंसकटुत्रयम् ॥ आकंठंधारयेत्थास्येनिष्ठीवेच्चपुनःपुनः ॥ तेनास्यहृदयश्लेष्मामन्यापार्श्वशिरोगलात् ॥ लीनोप्याकृष्यतेशुष्कोलाघवंचास्यजायते ॥

टी० ॥ ॥ आल्याचा रस, सैंधव, सुंठ, मिरें, पिंपळी, यांची गोळी करून तोंडांत धरावी, आणि वरचेवर थुंका टाकावा; ह्मणजे कुशींत, उरांत, घशांत, मा

नेंत, मस्तकांत जमून अडकलेला कफ बाहेर निघून शरीर हलकें होतें.

सद्यस्त्रिपंचसप्ताहाद्दशाहाद्वादशादपि ॥ एकत्रिंश
द्दिनैः शुद्धः सन्निपाती सजीवति ॥

टी० ॥ ॥ तात्काळ किंवा तीन दिवसानी किंवा पांच दिवसानी किंवा सात दहा बारा एकवीस दिवसानीं दोष निर्मुक्त झालेला सन्निपाती मनुष्य वांचतो.

अम्लस्निग्धोष्णतीक्ष्णैः कटुमधुरसुरातापसेवाकषा
यैः स्वादुक्रोधातिरूक्षैर्गुरुतरपिशिताहारसोहित्य
शीतैः ॥ शोकव्यायामचिंताग्रहगणवनितात्यंतरागप्र
संगैः ॥ प्रायः कुप्यंति पुंसां मधुसमयशरद्वर्षणे सन्निपाताः

टी० ॥ ॥ आंबट, स्निग्ध, उष्ण, तीक्ष्ण, तिखट, मधुर, मद्य, ऊन घेणें, तुरट, रुचिकर, अतिरूक्ष, अति गुरू, मांस, तृप्तिकारक, थंड, असे पदार्थ सेवन करणें, क्रोध, शोक, व्यायाम, चिंता, अनिष्ट ग्रह, बहुत स्त्रियांशीं संग, अतिमैथुन, इतक्या कारणानीं बहूत करून वसंत, शरत्, वर्षा, या तीन ऋतू मध्यें मनुष्याचे सन्निपात कुपीत होतात.

अथागंतुज्वरलक्षणोपचारः

अभिचाराभिघाताभ्यामभिषंगाभिशापतः ॥ आ
गंतुर्जायते दोषैर्यथास्वंतंविभावयेत् ॥

टी० ॥ ॥ अभिचार ह्मणजे मांत्रीक प्रयोग, अभिघात ह्मणजे काष्ठ, पाषाणा दिकांचा प्रहार, अभिषंग ह्मणजे पिशाचाची बाधा, अभिशाप ह्मणजे श्राप, ह्या कारणानी आगंतुक ज्वर उत्पन्न होतो त्या त्या लक्षणानीं जाणावा.

अभिचाराभिशापाभ्यां मोहस्तृष्णाचजायते ॥ भूता
भिषंगात्कुप्यंति भूतसामान्यलक्षणाः ॥

टी० ॥ ॥ अभिचार आणि अभिशाप यां पासून जो ज्वर होतो त्यांत मोह, तृषा, असते. भूताभिषंगा पासून ज्वर होतो त्यांत भूता सारखीं ज्यांचीं लक्षणें असे दोष कुपित होतात.

वमनमरुचिः शोषः सर्वदोद्गारतृष्णात्दृदयजठरबा
धादाहसंतापमूर्छाः ॥ वदनविरसतास्याद्गात्रभंगोथ
कर्के वदतिपरवशात्वंदोषसंभूततापम् ॥

टी० ॥ ॥ ओकारी अरुची शोष ढेंकरा तृषा पोटांत उरांत दुखणें दाह क्रोध मूर्छा तंड विरस आंग मोडून येणें बोलणें कर्कश बडबड इतके लक्षणानी भूताभिषंगाचा ज्वर जाणावा.

अभिचाराभिशापोत्थौज्वरौहोमादिनाजयेत्॥दाहःस्वस्त्ययनात्तीर्थेरुत्पातग्रहपीडनैः॥

टी० ॥ ॥ अभिचार आणि अभिशाप यांचे ज्वर होम देवपूजा इत्यादिकें करून जिंकावे आणि पुण्याहवाचन तीर्थयात्रा उत्पात ह्मणजे तारे पडणें इत्यादीक ग्रहण यांचे ठाई स्नान यांणीं शांत करावा.

भूतविद्यासमुद्दिष्टैर्बंधावेशनताडनैः॥जयेद्भूताभिषंगोत्थमनुशांत्यान्दमानवः॥

टी० ॥ ॥ पंचाक्षरी देवऋषी वगैरे आणून त्यांकडून ताईतगंडा उतारे इत्यादीक करून भूताभिषंगापासून आलेला ज्वर घालवावा.

मधूकसारंमरिचंसैंधवंपिप्पलीवचा॥संज्ञाप्रबोधनंनस्यदेयंभूतज्वरेसदा॥

टी० ॥ ॥ मोहाचा डीक, मिरें सैंधव पिंपळी वेखंड यांचें नस्य भूत ज्वरामध्यें शुद्धी येण्याकरितां द्यावें.

निदिग्धिकानागरिकामृतानांक्वाथंपिबेन्मिश्रितपिप्पलीकं॥जीर्णज्वरारोचककासशूलश्वासाग्निमांद्यार्दितपीनसेषु॥

टी० ॥ ॥ रिंगणी, सुंठ, गुळवेल, यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा, ह्मणजे जीर्ण ज्वर, अरुची, श्वास, खोकला, शूल, अग्निमांद्य, अर्दित वायु, पीनस हे जातात.

## अथविषमज्वरलक्षणोपचारः

दोषोल्पोहितसंभूतोज्वरोत्सृष्टस्यवापुनः॥धातुमन्यतमंप्राप्यकरोतिविषमज्वरम्॥

टी० ॥ ॥ ज्वरनिघालेल्या मनुष्यास कुपथ्याशा... ...ल्प दो... तो, तो सात धातू पैकीं कोणत्या एका धातूप्रत प्राप्त हो... ...वे...

शीतपूर्वःसविज्ञेयोदाहपूर्वोथकंजम॥ ... ...च तुर्थःस्यातविषमोन्यस्तुजीप्यलीकृतंचूर्ण ...ःपी

डांकुर्वंतिबहुवासरम्॥ ॥२

टी० ॥ ॥ थंडी वाजून येतो, किंवा दहा होऊन येतो, आणि [illegible] नेहमी असतो हा एक, आणि एक दिवसानी, दोन दिवसानीं, तीन दिव[illegible]नीं, चार दिवसानीं येणारे असे चार त्यांला जीर्ण असें ह्मणतात; मिळून पा[illegible] प्रकारचे विषम ज्वर बहुत दिवस पीडा करतात.

यःस्यादनियतात्कालाच्छीतोष्णाभ्यांतथैवच॥ वेगतश्चापिविषमोज्वरःसविषमोमतः॥

टी० ॥ ॥ जा ज्वराला वेळेचा नेम नाहीं, आणि शीतानें किंवा उष्णानें अधीक होतो हा नेम नाहीं, कधीं अधीक येतो कधीं कमी येतो अशा ज्वराला विषम ह्मणतात.

मुस्तामलकगुडूचीविश्वान्नकंटकारिकाक्काथः॥ पीतःसकणाचूर्णमधुभ्यांविषमज्वरंहंति॥

टी० ॥ ॥ नागरमोथे, आंवळकाठी, गळवेल, संठ, रिंगणी यांचा काढा मध पिंपळीचें चूर्ण घालून घ्यावा ह्मणजे विषम ज्वराचा नाश होतो.

महौषधामृतामुस्ताचंदनोशीरधान्यकैः॥ क्काथस्तृतीयकंहंतिशर्करामधुयोजितः॥

टी० ॥ ॥ संठ गळवेल नागरमोथा चंदन वाळा धणें यांचा काढा साखर मध घालून घेतला असतां तृतीयक ज्वराचा नाश होतो.

वासाधात्रीस्थिरादारुधान्यनागरसाधितं॥ सितामधुयुतंकुर्याच्चातुर्थकनिवारणम्॥

टी० ॥ ॥ अडूळसा आंवळकाठी सालवण देवदारु धणें संठ यांचा काढा मध साखर घालून घ्यावा ह्मणजे चातुर्थिक ज्वराचा नाशक आहे.

कन्याकर्तितसूत्रेणत्वपामार्गस्यमूलिका॥ रवौबद्धा ज्वरंहंतितृतीयकंचतुर्थकम्॥

टी० ॥ ॥ कुमारीचे हातातून तोडलेलें सूत घेऊन त्या सुतानें आघाड्याची मुळी हातास बांधावी, ह्मणजे तृतीयक चातुर्थिक ज्वर हे जातात.

काकजंघाबलाश्यामाभृंगराजोपमार्गकाः॥ एकैकंपुष्ययोगेनबध्वामूर्ध्नि॥ [illegible]र्कंहरेत्॥

टी० ॥ ॥ [illegible] रवशत्संदोष पिंपळी, माका, आघाडा, त्यांतून एकेक पु

ष्य नक्षत्राचे टाकीं हातास बांधलें असतां चातुर्थिक ज्वराचा नाश करीतो.

कृष्णांबरेदृढोबद्धोगग्गुलुलूकपुच्छजः॥ धूपश्चा
तुर्थिकंहन्यात्तमःसूर्यइवोदितः॥

टी० ॥ ॥गग्गूळ काळे फडक्यांत बांधून त्याचा धूप द्यावा, किंवा घुबडा चे शेंपटीचा धूप द्यावा म्हणजे चातुर्थिकाचा नाश करील; जसासूर्य उदयास आला म्हणजे अंधकाराचा नाश करितो.

शोकात्क्रोधात्तथाजीर्णात्संतापाद्बलहानितः॥ अंत
कालेचमर्त्यानांजायंतेदारुणाज्वराः॥

टी० ॥ ॥शोक, क्रोध, अजीर्ण, संताप, बळहानी यां पासून अंतकाळीं मनुष्यांस भयंकर ज्वर उत्पन्न होतात.

सर्वज्वरापहंनीलीमूलंरात्रिर्ज्वरापहम्॥ दुग्धिकामू
लिकाकर्णेहंतिवेलाज्वरंतथा॥

टी० ॥ ॥निळीचे झाडाचें मूळ, आणि हळद हें सर्व ज्वराचें नाशक आहे, ह्मणून ती मुळी आणि हळद कानांत ठेवावी, तशीच दुधीची मुळी कानांत ठेविली असतां, नेमलेले वेळानीं येणारा जो ज्वर त्याची नाशक आहे.

आतंकमुक्तेकृशताश्रयाणांविमुक्तपथ्यानुचितक्रिया
णां॥ अल्पोपिदोषोविषमंविदध्याज्ज्वरंविरुद्धःप्रतिपक्षरुद्धः

टी० ॥ ॥ज्वरापासून मुक्त झालेले, आणि कृशतेचे आश्रय करणारे, आणि पथ्य सुटलेलें अशा मनुष्यांस अल्पदोष देखील विषम ज्वराप्रत उत्पन्न करतो; कारण तो प्रतिपक्षानीं ह्मणजे औषधादिकानीं रुद्ध ह्मणजे प्रतिबद्ध झालेला असतो, त्याला थोडासा आधार मिळाला ह्मणजे फार वाढतो.

पटोलयष्टीमधुतिक्तरोहिणीघनाभयाभिर्विषमज्वर
घ्नः॥ कृतःकषायस्त्रिफलामृताद्यैःपृथक्पृथग्वावि
षमज्वरघ्नः॥

टी० ॥ ॥कडूपडवळ, जेष्टीमध, कुटकी, नागरमोथा, हिरडा यांचा काढा विषम ज्वराचा नाशक आहे; तसाच हिरडा, बेहडा, आंवळकाठी, गुळवेल, हूळसा यांचाही काढा विषम ज्वराचा नाशक आहे.॥ इतिपटोलपंचकं.

आमलचित्रकपथ्यासैंधवपिप्पलीकृतंचूर्णम्॥ भेदं

गणोत्थिषः सर्वज्वरविनाशनः ॥ भेदी रुचिकरः श्लेष्म जेता दीपनः पाचनश्च ॥

टी० ॥ ॥ आंवळकाठी, चित्रक, हिरडा, सैंधव, पिंपळी, यांचें चूर्ण करून पा ण्या बरोबर खावें. हें सर्व ज्वरांचें नाशक आहे; आणि भेदी, रुचिकर, दी पन, पाचन, कफ नाशक असें आहे.

पथ्याशिवानागरदेवदारुधात्रीवृषैरुत्क्वथितः कषायः सीतोपलामाक्षिकसंप्रयुक्तश्चातुर्थिकं हंत्यचिरेणपीतः

टी० ॥ ॥ हिरडा, आल्वण, सुंठ, देवदार, आंवळकाठी, अडुळसा यांचा का ढा खडीसाखर मध घालून घ्यावा ह्मणजे चातुर्थिकाचा ज्वर नाश करील. ॥ इति पथ्यादिः ॥

त्रिभिरथपरिवृद्धं पंचभिः सप्तभिर्वा दशभिरथविवृद्धं पिप्पलीवर्धमानं ॥ इतिपिबतिपयोयः तस्यनश्वासका स ज्वरजठरगुदार्शोवातरक्तक्षयास्यः ॥

टी० ॥ ॥ प्रथम दिवशीं तीन, दुसरे दिवशीं पांच, तिसरे दिवशीं सात, चवथे दिवशीं १० या प्रमाणें पिंपळ्या टाकून दूध आणि दुधाचे सम भाग पाणी घालून पाणी आटवून जो पितो त्याला श्वास, खोकला, ज्वर, उदर, मुळव्याध, वात, रक्त, क्षय हे होत नाहींत; आणि असतील तर जातील.

क्षीरेणपिप्पलीपंचक्षीरान्नंभुज्यनेतुयः ॥ दशाहं पंचवृद्धिः स्यादपकर्षस्तथैवच ॥

टी० ॥ ॥ प्रकारांतरें करून सांगतो. दूध पाणी समभाग घेऊन, त्यांत पिं पळ्या टाकून, पाणी आटवून बाकी दूध प्यावें. पिंपळ्या टाकण्याचा प्रका र. पहिले दिवशीं ५ दुसरे दिवशीं ६ तिसरे दिव. ७ चव. दिव. ८ पांचवे दि. ९ साहावे दि० १० सातवे दि० ९ आठवे दि० ८ नववे दि० ७ दहावे दि० ६ पुनः ५ या प्रमाणें करावें, यास पथ्य दूध भात, खावा. गुण पूर्वी प्रमाणें जाणावे.

ज्वरेंजनंनिशातैलकृष्णामरिचसैंधवैः ॥ वचाह- रीतकीसर्पिर्धूपः स्याद्विषमज्वरे ॥

टी० ॥ ॥ हळद, निळीचें तेल, पिंपळी, मिरें, सैंधव यांचें अंजन विषमज्व रांत करावें; आणि वेखंड, हिरडा, तूप यांचा धूप द्यावा. इति अंजनधूप ॥

अजाया श्चर्मरोमाणि वचाकुष्टं पलंकषा ॥ निंबपत्रा
णि मधूच्च धूपनं ज्वरनाशनम् ॥

टी० ॥ ॥ शेळीचें कातडें, आणि केश, वेखंड, कोष्टकोलिंजन, गुग्गूळ, कडू
लिंबाचीं पानें, मध यांचा धूप ज्वर नाशक आहे. इतिधूपनं ॥

पलंकषा निंबपत्रवचाकुष्टं हरीतकी ॥ सर्षपाः सयवाः
सर्पिर्धूपनं ज्वरनाशनम् ॥

टी० ॥ ॥ गुग्गूळ, कडूलिंबाचीं पानें, वेखंड, कोष्टकोलिंजन, हिरडा, शिरीस,
सातु, तूप यांचा धूप, ज्वर नाशक आहे. ॥ इति त्यष्टांगधूपः ॥

सर्पत्वचासर्षपहिंगुनिंबपत्राण्यमीषां समचूर्णधूपः ॥ वि
निग्रहं राक्षसडाकिनीनां करोति रक्षां विषमज्वरस्य ॥

टी० ॥ ॥ सर्पाची मेंग, शिरीस, हिंग, कडुलिंबाचीं पानें, यांचे समभाग चूर्णा
चा धूप, राक्षस डाकिनी यांचा निग्रह ह्मणजे प्रतिबंध करितो, आणि वि
षम ज्वराची रक्षा करतो ह्मणजे विषमज्वर येऊं देत नाहीं. ॥ इति धूपनं ॥

कुमारीमूलकर्षैकं पीत्वा कोलजलैर्वमेत् ॥ विषमं तु ज्वरं
हंति वातश्लेष्मगदानपि ॥

टी० ॥ ॥ कोरफडीचें मूळ, तोळाभर पिंपळीचे काढ्यांत प्यावें, ह्मणजे ओ
कारी होऊन, विषम ज्वर, वातरोग, कफरोग यांचा नाश होईल.

त्रिफला रजनीयुग्मं कंटकारीयुगं सटी ॥ त्रिकटु ग्रंथिकं
मूर्वा गडूची धन्वयासकः ॥ कटुका पर्पटो मुस्ता त्रायमा-
णा च वालकम् ॥ निंब पुष्करमूलं च मधुयष्टी च वत्सकः ॥
यवानींद्रयवा भार्गी शिग्रुबीजं सुराष्ट्रजा ॥ वचा त्वक्पद्म
कोशीर चंदनाति विषाबला ॥ शालिपर्णी पृश्निपर्णी विडं
गं तगरं तथा ॥ चित्रकं देवकाष्टं च चव्यं द्राक्षा पटोलजम्
॥ जीवकर्षभकौ चैव लवंगं वंशरोचना ॥ पुंडरीकं च का-
कोली पत्रजं जातिपत्रकं ॥ तालीसपत्रं च तथा समभा
गानि चूर्णयेत् ॥ सर्वचूर्णस्य चार्धांशं किरातं प्रक्षिपेत्सु
धीः ॥ एतत्सुदर्शनं नाम चूर्णं दोषत्रयापहं ॥ ज्वरांश्च नि
खिलान्हंति नात्र कार्या विचारणा ॥ पृथक्द्वंद्वागंतुकांश्च
धातुस्थान् विषमज्वरान् ॥ सन्निपातभवांश्चापि पीनसा

नपिनाशयेत् ॥ शीनज्वरैकाहिकादीन् मोहंतंद्रांभ्रमं त्रृषाम् ॥ श्वासकासौच पांडुंच हृद्रोगं हंतिकामलाम् ॥ त्रिकपृष्ठकटीजानुपार्श्वशूलनिवारणम् ॥ सीतांबुना पिबधीमान्सर्वज्वरनिवृत्तये ॥ सुदर्शनंयथाचक्रं दानवानांविनाशनम् ॥ तद्वज्ज्वराणांसर्वेषामिदंचूर्णं प्रणाशनम् ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी, हळद, दारुहळद, रिंगणी, डोरली, कचोरा, सुंठ, मिरें, पिंपळी, पिंपळमूळ, मोरवेल, गुळवेल, धमासा, कुटकी, पित्तपापडा, नागरमोथा, मेंदीचें बीज, वाळा, कडुलिंब, पोखर मूळ, जेष्ठीमध पांढरा कुडा, ओंवा, इंद्रजव, भारंगमूळ, शेवग्याचे बीज, तुरटी, बेरबंड, दालचिनी, पद्मकाष्ठ, काळा वाळा, चंदन, अतिवीष, चिकणामूळ, साल्वण, पिठवण, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, कडूपडवळाची पानें, जीवक, ऋषभक, यांच्या अभावीं भुय कोहळा, लवंग, वंशलोचन, पांढरें कमळ, काकोळी तिचा अभावीं जेष्टीमध, तमालपत्र, जायपत्री, तालीसपत्र हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करावें, आणि सर्व चूर्णाचे निमें काडेकिराइताचें चूर्ण त्यांत मिसळावें. याला सुदर्शन चूर्ण असें ह्मणतात. हें सुदर्शन चूर्ण वात पित्त कफ ज्वर संपूर्ण यांचें नाशक आहे, या विषयीं विचार करूं नये तेच संपूर्ण ज्वर पुढील गणपाठांत सांगतों. वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, वातकफज्वर, पित्तकफज्वर, आगंतुकज्वर, धातुंगन ज्वर, विषम ज्वर, सन्निपात ज्वर, पीनस शीतज्वर, ऐकाहिकादि ज्वर, मोह, तंद्रा, भ्रम, तृषा, श्वासकास, पांडु, हृद्रोग, कावीळ, माकडहाड, पाठ, कंबर, गुडघे, कुशी, इतक्यांचे ठिकाणचा शूळ या सर्वांचा नाशक आहे; हें चूर्ण थंड पाण्याबरोबर प्यावें, ह्मणजे सर्व ज्वरांचा नाश होतो. जसें सुदर्शन चक्र दानवाचें नाशक तसें हें चूर्ण सर्व ज्वरांचें नाशक आहे. इ. सु.

जीर्णज्वरेकफेक्षीणेक्षीरंस्यादमृतोपमं ॥ तदेवतरुणेपीतंविषवद्धंतिमानवम् ॥

टी० ॥ ॥ ज्वर जीर्ण आणि कफ क्षीण असतां दूध अमृत तुल्य आहे, तेंच दूध तरुण ज्वरा मध्यें प्यालें असतां विषा प्रमाणें मनुष्यास मारतें.

अन्नकांक्षाशिरःकंडूक्षवथुर्गात्रलाघवम् ॥ प्रस्वेदो

मुखंपाकश्चज्वरमुक्तस्यलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ अन्नावर इच्छा होण्याला कंड, शिंक, आंग हलके, घाम, तोंड ये णें इतकीं ज्वर निघाल्याचीं लक्षणें आहेत.

व्यायामंचव्यवायंचस्नानंचक्रमणंतथा ॥ ज्वरमु क्तोनसेवेतयावन्नबलवान्भवेत् ॥

टी० ॥ ॥ व्यायाम ह्मणजे कांहीं काम करणें, मैथुन, स्नान, फिरणें इतकीं ज्व रा पासून मुक्त झालेल्या मनुष्यानें जों पर्यंत चांगली शक्ती आली नाहीं, तों पर्यंत करूं नयेत.

अथरसोपचारः

रसंगंधंहिंगूलजेपालदंत्याद्रवैर्भृशंमर्दयेत् ॥ दिनार्द्धेनज्वरं हंतितमःसूर्योदयोयथा ॥

टी० ॥ ॥ १ पारा २ गंधक ३ हिंगूळ ४ जेपाळ, हीं चार औषधें दांतीमुळाचे काढ्यांत खलून दोन गंजाभार वजनाचा गोळ्या बांधाव्या. एक गोळी भक्ष ण केली ह्मणजें अर्धे दिवसांत ज्वर जातो. जसा सूर्योदय झाला असतां अंधःकार जातो, तसा अर्धे दिवसांत ज्वर जातो. ॥ इति बालार्करसः ॥

शुद्धसूतंविषंगंधंधूर्तबीजंत्रिभिःसमं ॥ चतुर्णांद्विगु णंव्योषंचूर्णंगुंजाद्वयंहितं ॥ पक्वजंबीरकद्रावैर्युक्ता र्द्रस्यद्रवैर्युतं ॥ महाज्वरांकुशोनामज्वराणामंतकोभवे त् ॥ एकाहिकंद्व्याहिकंवात्र्याहिकंवाचतुर्थकं ॥ विषमं वात्रिदोषोत्थंनाशयेद्यामभात्रतः ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, बचनाग, हीं तीन समभाग घेऊन या तिहींचे बरोब र धोत्र्याचें बीज मिळवावें व या चहूंचे दुपट सूंठ, मिरें, पिंपळी यांचें चू र्ण घ्यावें, आणि सर्व एकत्र करून लिंबाचे आणि आल्याचे रसांत ख लावें, आणि दोन गुंजा प्रमाणें भक्षण करावें; ह्मणजे एका महरानें, एका हीक, द्व्याहीक, त्र्याहीक, चतुर्थक, विषम सन्निपात ज्वर यांचा नाश करील. यास महाज्वरांकुश असें ह्मणतात. हा सर्व ज्वरांचा नाश करणारा आहे.

सूतशुल्बत्रिवृत्ताबलितिक्तादंतिबीजचपलाविषतिं दुःपथ्ययासहविचूर्ण्यसमांशंद्रोणवारीसहितंदिनमेक म् ॥ वह्नियुग्मघुटिकार्द्रकवारलाभयंचदशिननवज्वरमारि

॥ विश्वतापहरणोऽत्रपथ्यंमुद्गयूषसहितंदिनमेकम् ॥

टी० ॥ ॥ पारा, ताम्र भस्म तेंड गंधक कुटकी जेपाळ पिंपळी कुचला हिरडा हीं सर्व समांश घेऊन चूर्ण करावें, आणि धोत्र्याचे रसांत दिवस भर ख ळावें, नंतर दोनवाल वजनाची गोळी करावी, ती गोळी आल्याचे रसा ब राबर मध घालून खाल्ली असतां नवीन ज्वराचा नाश करील. याला वि श्वताप हरणरस असें ह्मणतात याला मुगांचें कारण आणि भात एक दिवस खावा हें पथ्य आहे. ॥ इति विश्वहरण ॥

सूतंगंधंलोहकीटंविमर्द्यसर्वैस्तुल्यंवत्सनाभंवियुंज्या त् ॥ आर्द्रभृंगंबीजपूरंजयंतीनिर्गुंडीकाभृंगराजद्र वैश्च ॥ युक्त्यावैयोभावयित्वाविधेयाशाणार्धसन्नि पातस्यनूनं ॥ शीतंवारंनिर्मलंस्नानपानंपथ्यंदुग्धंश र्कराभिर्युतंच ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, मंडूरभस्म, तिहींचे बरोबर बचनागहीं सर्व, आलें, माका, माहाळुंग, भांग, निर्गुडी इतक्यांचे रसांत एकेक वेळ खलून भावना द्याव्या; आणि एक मासा प्रमाणें गोळी भक्षण करावी ह्मणजे सन्निपाताचा नाश करील. गार पाण्याचें स्नान करावें, वारा घ्यावा, थंडपाणी प्यावें, मास पथ्य दूध भात आणि साखर. ॥ इतिसन्निपातभैरवः ॥

हिंगूळंचविषंव्योषंटंकणंमागधीशिफा ॥ संचूर्ण्य भावयेत्त्रेधास्फुरसार्द्रकहेमभिः ॥ रसस्त्रिभुवनकीर्तिः गुंजेकार्द्रद्रवेणवै ॥ सर्वज्वरविनाशंचसन्निपातांस्त्रयोदश

टी० ॥ ॥ हिंगूळ, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, टांकणखार, पिंपळमूळ हीं सर्व औषधें बारीक करून तुळस, आलें, धोत्रा यांचा रसांत तिरनिराळीं खलावीं, याला त्रिभुवन कीर्ती रस ह्मणतात, हा एक गुंज भार आल्याचे रसा ब रोबर खावा, ह्मणजे सर्व ज्वर तेरा प्रकारचे सन्निपात यांचा नाश करील.

रसंगंधंटंकणंवत्सनाभंसमंमर्दयेद्धूर्तबीजेनयाम म् ॥ ततोवत्सनागेनहेमेश्चबीजेरसेभावयेच्चत्रि वारंत्रिवारम् ॥ कटुत्र्यादिपंचवारंततस्यादयंसूत- राजोमृतप्राणदायी ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, टांकणखार, बचनाग हीं सर्व समभाग घेऊन धोत्र्याचे

बियांचा काढा करून प्रहरभर खलावें, नंतर बचनागाच्या काढ्यानें तीन भावना द्याव्या, नंतर सुंठ, मिरें, पिंपळी ह्यांचे काढ्याच्या भावना पांचवार द्याव्या ह्मणजे हा सकलराज मृतप्राणदायी रस होतो.

ज्वरेसन्निपातेज्वरेनूतनेवामहाश्लेष्मरोगेनचगुंजाप्रमाणं ॥ पयःपायसंदाधिकंतक्रभक्तंसितावानवर्ज्यरेच्चार्दनीरैः ॥ ज्वरेचातिसारेघनद्रावयुक्तेग्रहण्यर्शसांक्षौद्रसंसीतयावा ॥ ज्वरेवायुनाग्निस्त्रिकटुत्वग्निपीतंप्रकंपेचबाहुकयेकांगवाते ॥ अपस्मारमुन्मादवातंनिहंति ॥ प्रयुक्तोसिताभिःपंचभिर्धूर्तबीजैः ॥

टी० ॥ ॥ सन्निपातज्वर, नूतन ज्वर, मोठा कफरोग यांचे ठाईं गुंज प्रमाण आल्याचे रसांत द्यावा, पथ्य दूधभात, क्षीर दहिंभात, ताकभात आहे. आणि हा रस ज्वरातिसार आमातिसार, संग्रहणी, मुळव्याध यांचे ठायीं मध अथवा साखर यांचे बरोबर द्यावा वातज्वर प्रकंप वायू, बाहुक वायू, एकांग, वायू यांचे ठायीं सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक, यांचे चूर्णाबरोबर द्यावा, आणि, अपस्मार वायू, उन्माद वायू, यांचे ठायीं साखर, आणि पांच धोत्र्याच्या बिया यांचे बरोबर द्यावा. ॥ इति मृतप्राण दा.

## अथविषमेरसः

तालकखर्परमूषकयुग्मंकांचनपल्लवजरसेनघृष्टंमर्दयमर्दयपुनरपिमर्दयशीतभयादिनिवारणगुटिका ॥

टी० ॥ ॥ हरताळ, कळखापरी, मूषकयुग्म ह्मणजे लाहान उंदीर कानी, थोर उंदीर कानीं हि कांचनाचा पल्लवांचा रसांत खलून तारतम्य पाहून मात्रा द्यावी. ह्मणजे हिंवज्वर निवारण होईल. ॥ इति शीतादिः ॥

पिष्ट्वातालकमेकभागममलंशंबूकचूर्णंक्षिपेत् ॥ दत्वाचाथनवांशतोपिचशिखिग्रीवंपुनःपेषयेत् ॥ कौमारीरसमर्दितोगजपुटेपाकेचशीतंततोगृण्हीयादथगुंजयाज्वरहरःखंडेनसंयोजयेत् ॥ एकाहद्वित्रिभवंचतुर्थकमयंवेलाज्वरंनाशयेत् ॥ शीतारीश्चपलायतेज्वरइगंभानुंयथाशर्वरी ॥

टी० ॥ ॥ हरताळ एकभाग, शंखभस्म एकभाग, मोरचूद हे नवमांश लिंबीचे चू

र्ण कोरफडीचे रसांत खलून गजपूट द्यावें. स्वांग शीत झाल्यावर दोन गुं जा खडी साखरे बरोबर खावा ह्मणजे ऐकाहीक, द्याहीक, त्र्याहीक, चतुर्थक वेलाज्वर यांचा नाश करतो. याला शीतारी असें ह्मणतात. यातें पाहून ज्वर पळतो. जशी सूर्यास पाहून रात्र पळते. ॥ इति शीतारिः ॥

तुत्थं टंकणतालकं बलिविषं स्यात्खर्परं पारदः॥ सर्वं खल्वतले विमर्द्य मतिमांस्तत्कारवल्लीरसैः॥ गुंजैकमिताच शार्करयुता साजीरके णाथवात्येकद्वित्रिचतुर्थशीतहरणः शीतांकुशो नामतः॥

टी० ॥ ॥ मोरचूत, टांकणखार, हरताळ, गंधक, बचनाग, कळखापरी, पारा हीं सर्व बारीक करून कारलीचे रसांत खलून एक गुंज गोळी साखरे बरोबर किंवा जिऱ्या बरोबर खावी, ह्मणजे एकाहीक, द्याहीक, त्र्याहीक, चतुर्थक असा जो शीतज्वर यांचा नाशक आहे; याला शीतांकुश असें ह्मणतात. इति शीतांकुशारिः॥

चलदलतरुसेवा होममंत्रो त्रिनेत्रद्विजगुरुजनपूजा विष्णुनाम्नां सहस्रं मणिधृतिरपि दानान्याशिषस्तापसानां सकलमिदमरिष्टं प्रोक्तमष्टज्वराणाम्॥

टी० ॥ ॥ पिंपळाची सेवा, होम, मंत्रजप, सांब, ब्राह्मण, गुरुजन यांची पूजा, विष्णुसहस्रनामपाठ, मणि धारण, दान, तपस्वी यांचे आशिर्वाद इतकीं अष्ट प्रकारचे ज्वरांना अरिष्टें आहेत ह्मणजे त्यांची नाशक आहेत.

समुद्रस्योत्तरे तीरे द्विरदो नाम वानरः॥ तस्य स्मरणमात्रेण ज्वरो याति दिगंतरम्॥

टी० ॥ ॥ या मंत्राचा जप करावा ह्मणजे ज्वर जातो.

इति चिकित्सासारे ज्वरलक्षणोपचारः समाप्तः॥ ॥७॥ ॥

## अथातीसारलक्षणोपचारः

अरुणं फेनिलं रूक्षमल्पमल्पं मुहुर्मुहुः॥ शकृदामं सरुक्शब्दं मारुतेनातिसार्यते॥ पित्तातीसारे हारिद्रं लोहितं वा तृष्णामूर्छा दाहपाकज्वरार्तः॥ शुक्लं सांद्रं श्लेष्मणा श्लेष्मयुक्तं विस्रं शीतं हृष्टरोमा मनुष्यः॥ वाराहस्नेहमांसा-

बुद्भ्रांसर्वरूपिणम् ॥ कृच्छ्रसाध्यमतीसारंविद्यादोष त्रयोद्भवम् ॥ ज्वरातिसारयोरुक्तंनिदानंचपृथक्पृथक् ॥ तस्माज्ज्वरातिसारस्यतेननाभोदितंपुनः ॥

टी० ॥ ॥ गांबूस, फेंसट, रूक्ष, थोडेंथोडें, वारंवार, आममिश्रित, कुंथून, वारा सरून जें शौचास होतें, त्याला अतिसार असें ह्मणतात. पित्तापासून असला ह्मणजे पिंवळें, हिरवें, तांबडें यांतून एक प्रकारचें असतें आणि तृषा, मूर्छा दाहा, फदपाक, ज्वर, इतक्यांनीं पीडीत मनुष्य असतो. कफापासून असला ह्मणजे, पांढरें दाट, कफ मिश्रित, आंबसाण घाण, आणि थंडी, अंगावर रो मांच असें मनुष्यास होतें. त्रिदोषापासून असला ह्मणजे डुकराचे मेला प्र माणें, किंवा मांस रसाप्रमाणें, आणि सर्व रंगाचें असतें, तो अतिसार कष्ट- साध्य जाणावा. ज्वर आणि अतिसार यांचें निरनिराळें निदान सांगितलें ह्मणून ज्वराति साराचें पुनः निदान सांगीतलें नाहीं.

आमपक्वक्रियांहित्वानातिसारेक्रियाहिता ॥ अतः सर्वातिसारेषुज्ञेयंपक्वामलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ आमपक्व करण्याची क्रिया सोडून दुसरी अतिसारावर क्रिया हिता वह नाहीं, या साठीं, सर्वाति साराचे ठायीं आम पक्व आहे किंवा नाहीं, हें पाहावें.

आमेविलंघनंशस्तमादौपाचनमेवच ॥ कार्यंवानशन स्यानेसद्रवंलघुभोजनम् ॥

टी० ॥ ॥ आमाति साराचे ठायीं पूर्वी लंघन आणि पाचन प्रशस्त आहे, अथवा लंघना नंतर पातळ लघू असें भोजन करावें.

नागरातिविषामुस्ताभूनिंबामृतवत्सकैः ॥ सर्वज्वरह रःक्वाथःसर्वातीसारनाशनः ॥

टी० ॥ ॥ सुंठ, अतिवीष, नागरमोथा, किराईत, गुळवेल, कुडा यांचा काढा स र्व ज्वर आणि सर्व अतीसार यांचा नाशक आहे.

धान्याब्दवालकंबिल्वंनागरैःसाधितंजलं ॥ दद्यात्पा चनकंपूर्वमामातीसारनाशनम् ॥

टी० ॥ ॥ धणे, नागरमोथा, वाळा, बेलफळ सुंठ इतक्यांचा काढा आमाति सारावर पाचन द्यावा हा आमातिसार नाशक आहे. ॥ नागरादिज्वरातिसार ॥

नागरंदेवकाष्ठंचधान्यकंबृहतीद्वयम् ॥ दद्यात्पाचनकं

पूर्वज्वरिनाथज्वरापहम् ॥

टी० ॥ ॥ सुंठ, देवदार, धणे, रिंगणी, डोरली यांचा काढा पाचनज्वर नाशक आहे. ॥ इति धान्यपच० ॥

सवत्सकः सातिविषः सबिल्वः सोदीच्यमुस्तश्चकृतः कषायः ॥ सामेसशूलेचसशोणितेचचिरप्रवृत्तेपि हितोतिसारे ॥

टी० ॥ ॥ कुडा, अतिविष, बेलफळ, वाळा, नागरमोथे, यांचा काढा आम शूल रक्त याणी युक्त पुष्कळ दिवसांचा जरी अतिसार असला तरी त्यावर हितकारक आहे.

स्नानाभ्यंगावगाहंचगुरुस्निग्धादिभोजनम् ॥ व्यायाममग्निसंतापमतिसारीविवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ स्नान अभ्यंग बुडीमारणें, गुरु, स्निग्ध, इत्यादीक भोजन, व्यायाम शेक घेणें, इतकीं अतिसारी याणें वर्ज करावीं.

सदेवदारुः सविषः सपाठः सजंतुशत्रुः सघनः सतीक्ष्णः ॥ सवत्सकः क्वाथउदाहृतोसौशोफातिसाराबुधिकुंभजन्मा ॥

टी० ॥ ॥ देवदार, अतिवीष, पाहाडमूळ, वावडिंग, नागरमोथा, मिरें कुडा, यांचा काढा शोफातिसार हाच समुद्र याला अगस्ती ऋषी सारखा आहे.

विडंगातिविषामुस्तादारुपाठाकलिंगकम् ॥ मरीचेनसमायुक्तंशोथातीसारनाशनम् ॥

टी० ॥ ॥ वावडिंग, अतिवीष, नागरमोथा, देवदारु, पहाडमूळ, कुडा, मिरें यांचा काढा शोथातीसार नाशक आहे. ॥ विडंगादिः ॥

नतुसंग्रहणंदद्यात्पूर्वमामातिसारिणाम् ॥ दोषोत्यादोवर्धमानोजनयत्यामयान्बहून् ॥

टी० ॥ ॥ आमाति सारावर पूर्वी बंदाचें औषध देऊं नये, कारण प्रथमतः बंदाचे औषधानें आम बंद झाला ह्मणजे दोष वाढून बहूत रोग उत्पन्न करतो.

डिंभजः स्थाविरोवापिवातपित्तात्मकश्चयः ॥ क्षीणधातुबलार्तस्यबहुदोषोतिविश्रुतः ॥ आमोपिस्तंभनीयस्यात्पाचनान्मरणंभवेत् ॥

टी० ॥ ॥ लहान किंवा मोठे मनुष्यास झालेल्या वायू पासून, किंवा पित्तापासू

न झालेल्या आणि जामध्यें धातु बलही क्षीण आणि अनेक दोषानी युक्त फार वाढलेला असा आम जरी आहे तथापि बंद करावा, पाचन देऊ नये पाचन दिलें असतां मरण होईल.

किरातांब्दामृताविश्वचंदनोशीरवत्सकैः॥ शोथातिसारशमनं विशेषाज्ज्वरनाशनम्॥

टी० ॥ ॥ किराईत, नागरमोथा, गुळवेल, सुंठ, चंदन, वाळा, कुडा यांचा काढा शोथातीसार आणि विशेषें करून ज्वर यांचा नाशक आहे. किरातादिः॥

सल्लकीबदरीजंबूप्रियालाम्रार्जुनत्वचः॥ पीताः क्षीरेणमध्वाढ्याः पृथक्शोणितनाशनः॥

टी० ॥ ॥ हरपररेवडी, बोर, जांबूळ, चारोळी, आंबा, अर्जून इतके झाडांतून कोणा एकाची साल दूधांत वाटून मध घालून प्यालें असतां रक्तातीसार नाशक आहे.

जंबाम्रामलकीनांचपल्लवेभ्यरसोजयेत्॥ मध्वाज्यक्षीरसंयुक्तोरक्तातीसारनाशनः॥

टी० ॥ ॥ जांबूळ, आंबा, आंवळी यांचे पल्लवांचा रस मध, तूप, दूध इतक्यानी युक्त करून प्यावा ह्मणजे रक्तातीसार नाशक आहे.

पुटपाकेनविपचेत्सुपक्वंदाडिमीफलं॥ तद्रसोमधुसंयुक्तः सर्वातीसारनाशनः॥

टी० ॥ ॥ चांगलें पिकलेलें डाळिंब पानें गुंडाळून शेणमाती लाऊन फोपट्यांत भाजावें आणि त्याचा रस मध घालून प्यावा ह्मणजे सर्व प्रकारचा अतिसारांचा नाशक आहे.

चूर्णंकिंचित्घृताभ्यक्तंशुंठ्याएरंडजैर्दलैः॥ वेष्टितंपुटपाकेनविपचेन्मंदवन्हिना॥ ततउद्धृत्यतच्चूर्णंग्राह्यंप्रातः सितासमम्॥ तेनयांतीशमंपीडाआमातीसारसंभवाः॥

टी० ॥ ॥ सुंठीचें चूर्ण, तुपाचें मोहन लाऊन एरंडाचे पानांत गुंडाळून शेणमाती लाऊन फोपाट्यांत भाजावें, आणि साखरे बरोबर प्रातःकाळीं खावें ह्मणजे आमातिसार दूर होतो.

गुडेनखादयेद्बिल्वंरक्तातीसारनाशनं॥ आमशूल

बिबंधघ्नंकुक्षिरोगविनाशनम् ॥

टी० ॥ ॥गूळाबरोबर बेलफळ खावें. ह्मणजे रक्तातीसार आम, [illegible], अष्टंभ, कुक्षिरोग यांचा नाश होतो.

पीत्वाशतावरीकल्कंपयसाक्षीरभुग्जयेत् ॥ रक्तातिसारंपीत्वावातथासिद्धंघृतंनरः ॥

टी० ॥ ॥शतावरीच्या मुळ्या वाटून दुधा बरोबर प्याव्या आणि दूधभात खावा ह्मणजे रक्तातीसार दूर होईल. अथवा शतावरीचे रसांत तूप घालून रस आटवून, तसें सिद्ध झालेलें तूप प्यावें.

गुदद्राहेप्रपाकेवापटोलमधुकांबुना ॥ सेकादिकंप्रशंसंतिछागेनपयसाथवा ॥

टी० ॥ ॥गुदपाक किंवा गुद दाह झाला असतां कडूपडवळ, जेष्टी मध यांचे काढ्यानें किंवा शेळीचे दुधानें किंचित् किंचित् शेकावें, किंवा धुवावें.

कल्कस्तिलानांकृष्णानांशर्करांशयुक्तभागिकः ॥ आजेनपयसापीतःसद्योरक्तंनियच्छति ॥

टी० ॥ ॥काळे तीळ वाटलेले एक भाग, साखर दोन भाग, शेळीचें दूध चार भाग या प्रमाणें एकत्र करून प्यावें. ह्मणजे रक्त बंद होतें.

मध्यंलीढ्वाकपित्थस्यसव्योषक्षौद्रशर्करम् ॥ कटुफलंमधुयुक्तंवामुच्यतेजठरामयात् ॥

टी० ॥ ॥कवठाचा गीर, संठ, मिरें, पिंपळी, मध साखर हीं एकत्र करून खावीं, अथवा कायफळ मधा बरोबर खावें ह्मणजे पोटाच्या रोगा जातो.

कर्षोन्मिताततुगाक्षीरीचातुर्जातंत्रिकार्षिकम् ॥ यवानीधान्यकाजाजीग्रंथिव्योषपलांशकम् ॥ पलानिदाडिमान्यष्टौसिताचाष्टैकतःकृतम् ॥ गुणैःकपित्थाष्टकवच्चूर्णंचूर्णंदाडिमाष्टकम् ॥

टी० ॥ ॥वंशलोचन एक तोळा, दालचिनी, तमालपत्र, वेलचीचे दाणे, नागकेशर, मिळून तीन तोळे; ओंवा, धणे, जिरें, पिंपळमूळ, संठ, मिरें, पिंपळी, मिळून चार तोळे; डाळिंब बत्तीस तोळे, साखर बत्तीस तोळे, सर्व एकत्र करून चूर्ण करावें याला दाडिमाष्टक चूर्ण असें ह्मणतात गुणानी कपि

त्याष्टका सारखें आहे. ॥ इति दाडिमाष्टकम् ॥

## अथरसोपचारः

हिंगूळंवत्सनागंचटंकणंमरिचंकणा ॥
मर्दयेदहिफेनेनरसोव्यानंदभैरवः ॥

टी० ॥ ॥ हिंगूळ, बचनाग, टांकणखार, मिरें, पिंपळी, अफू हीं सर्व एकत्र खलावीं त्याला आनंदभैरव असें ह्मणतात.

गंजेकंवाद्विगंजंवा बलंज्ञात्वाप्रयोजयेत् ॥ मधुनाले ह्येच्चानुकुटजस्यत्वचाफलं ॥ चूर्णितंकर्ष मात्रंतुत्रि दोषोत्थातिसारजित् ॥

टी० ॥ ॥ एकगंज किंवा दोन गुंजा बल पाहून द्यावा आणि एक कर्ष ह्मणजे १० मासे कुड्याची साल किंवा इंद्रजव मधाबरोबर चाटवावें ह्मणजे त्रिदोषा पासून झालल्या अतिसाराचा नाश होतो. इत्यानंदभैरवः ॥

जातीफलंसैंधवं हिंगूलंचवराटश्रृंठीविषहेमबीजम् ॥ सपिप्पलीकंवटिकांचकुर्याद्गुंजाप्रमाणांजठरामय घ्नी ॥ निहंतिवातंकफश्रूलमाम मामातिसारंग्रहणीविका रम् ॥ निहंतिशर्करांसितयासमेतंरसोयमानंदइतिप्रदिष्टः

टी० ॥ ॥ जायफळ, सैंधव, हिंगूळ, कवडीचें भस्म, सुंठ, बचनाग, धोत्र्याचें बी, पिंपळी हीं सर्व एकत्र खलून गुंजभर गोळी, साखरे बरोबर खावी ह्मणजे पोटांतील रोग; वात, कफ, शूळ, आमातीसार, संग्रहणी, योनिरोग यांना नाश करील; याला आनंद रस असें ह्मणतात. ॥ इत्यानंदरसः ॥

जातीफलंसर्पफेनंटंकंगंधकजीरके ॥ चैतानिसम भागानिबालदाडिमजीरके: ॥ पेषयेत्तेनकल्केनपू रयेद्दाडिमीफलम् ॥ अंगारेलत्वगोधूमचूर्णेनालेपि तंपचेत् ॥ अतिसारस्तंभनंस्याद्दीपनंपाचनम्

टी० ॥ ॥ जायफळ, अफू, टांकणखार, गंधक, जिरें हीं समभाग, आणि यां च्या बरोबर कोंवळ्या डाळिंबाच्या बिया, घेऊन एकत्र खलून तो कल्क ह्म णजे खद्दलेला गोळा डाळिंबांत भरून, वाहेरून कणीक लावून निखाऱ्यांत भा जावें ह्मणजे अतिसाराचें स्तंभन करणारें दीपन पाचन असें होतें. शक्ति पाहून वाल दोन वाल, द्यावें.

अतिसारेज्वरेचैवरक्तपित्तेदृगामये ॥ आदौनप्रतिकु
र्वीतव्याधिवेगोहिदुस्तरः

टी० ॥ ॥ अतिसार, ज्वर, रक्तपित्त, नेत्ररोग, इतक्यांचे गर्ई प्रथम प्रतिकार करून एका गणव्याधीचा वेग कठीण आहे तो कमी झाला म्ह० करावा.

अथसंग्रहणीलक्षणोपचारः

अतीसारेनिवृत्तेपिमंदाग्नेरहिताशिनः ॥ भूयःसंदूषि
तोवन्हिर्ग्रहणीमभिदूषयेत् ॥ पक्वंवासरुजंपूतिमुहुर्ब
द्धंमुहुर्द्रवम् ॥ ग्रहणीरोगमाहुस्तमायुर्वेदविदोजनाः ॥

टी० ॥ ॥ अतिसार निवृत्त जरीं झाला, तरीं त्याचा अग्नी मंद आहे, आणि कुपथ्य करणारा त्याचा अग्नी पुनः दूषित होऊन ग्रहणी म्हणून साहावी पि त्तधरा कला आहे. तिला दूषित करितो आणि पक्व अथवा अपक्व पीडा युक्त, दुर्गंधि युक्त, बांधलेला पुनः पातळ पुनः बांधलेला असा मळ जेणें करून होतो त्याला ग्रहणी रोग असें आयुर्वेद जाणणार लोक म्हणतात.

एकैकशःसर्वशश्चदोषैरत्यर्थमुछ्रितैः
सादुष्टाबहुशोभुक्तमाममेवविमुंचति

टी० ॥ ॥ एका एका दोषानें किंवा सर्व दोषानीं दूषित होते, ते दोष अत्यंत वा ढून ती दुष्ट झाली म्हणजे बहुत करून खाल्लेलें अन्न अपक्वच सोडतें.

ग्रहणीमाश्रितंदोषमजीर्णवदुपाचरेत् ॥
अतिसारोक्तविधिनातस्यामामंविपाचयेत्

टी० ॥ ॥ ग्रहणीचा आश्रय करून जो दोष रहातो त्यावर अजीर्णवत् उप चार करावा, आणि संग्रहणी मध्यें जो आम असतो त्याचें पाचन अतिसा र प्रमाणें करावें.

शुंठींसमुस्तातिविषांगडूचींपिबेज्जलेनक्वथितांसमां
शां ॥ मंदानलेसततामवातेसामानुबंधेग्रहिणीगदेच

टी० ॥ ॥ सुंठ, नागरमोथा, अतिवीष, गुळवेल यांचा काढा मंदाग्नी, आम वात, आमसहीत संग्रहणी यांचा नाशक आहे.

चूर्णंचव्यकचित्रकाग्निविश्वभेषजनिर्मितम् ॥ तक्रेणग्र
हिणीहंतिग्रहणींदुःखकारिणीम् ॥

टी० ॥ ॥ चवक, चित्रक, बेलफळ, सुंठ यांचें चूर्ण तांकाबरोबर खावें म्हणजे

फार दुष्ट संग्रहणीचा नाश करील.

रुचकाग्निमरीचानांचूर्णंतक्रेणसेवितम् ॥ ग्रहण्युदरगुल्मार्शःक्षन्माद्यप्लीहनाशनम् ॥

टी० ॥ ॥ पादेलोण, चित्रक, मिरें यांचें चूर्ण ताकाबरोबर सेवन करावें, म्हणजे संग्रहणी, उदर, गुल्म, मुळव्याध, अग्निमांद्य, पांथरी यांचें नाशक आहे.

आम्रमाम्रातकंजंबूत्वक्कषायेपचेद्भिषक् ॥ यवागूंशालिभिर्युक्तांक्षत्कातांग्रहणींजयेत् ॥

टी० ॥ ॥ आंबा, आंबाडा, जांभूळ यांचे झाडाचे सालीचा काढा त्यांत साळीचे तांदूळांची आंबील शिजवून खावी म्हणजे संग्रहणी दूर होईल.

भल्लातकंत्रिकटुकंत्रिफलालवणत्रयम् ॥ अंतर्धूमंद्विपलिकंगोपुरीषाग्निनादहेत् ॥सक्षारःसर्पिषापीतोभोज्योवाप्यवचूर्णितः ॥हृद्रोगपांडुग्रहणीगुल्मोदावर्तशूलनुत्

टी० ॥ ॥ बिब्बा, संठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, शेंदेलोण, पादेलोण, मीठ हीं सर्व एकेक तोळा आणि घरोसा ४ पके म्हणजे ८० मासे हें एकत्र करून रान शेणीचें पुट द्यावें, नंतर तो क्षार तुपाबरोबर शक्तिप्रमाणें घ्यावा. अथवा नुसताच खावा म्हणजे, हृद्रोग, पांडु ग्रहणी, गुल्म, उदावर्त शूल यांचा नाश होईल. ॥ इति भल्लातकक्षारः ॥

चित्रकंपिप्पलीमूलंद्वौक्षारौलवणानिच ॥ व्योषंहिंग्वजमोदंचचव्यमेकत्रचूर्णयेत् ॥गुटिकामातुलिंगस्यदाडिमस्यरसेनवा ॥ कृताविपाचयत्यामंदीपयत्याशुचानलम्

टी० ॥ ॥ चित्रक, पिंपळमूळ, सज्जीक्षार, जवक्षार, मीठ, सैंधेलोण, पादेलोण, संठ, मिरें, पिंपळी, हिंग, ओंवा, चवक, हीं एकत्र कुटून माहाळुंगाचे किंवा डाळिंबाचे रसांत गोळ्या करून शक्त्यनुसारें करून खाव्या म्हणजे आमाचें पाचन आणि मंदाग्नीचें दीपन होईल.

ग्रहणीदोषिणांतक्रंदीपनंग्राहिलाघवात्
पथ्यंमधुरपाकित्वान्नचपित्तप्रकोपनम् ॥

टी० ॥ ॥ ज्याला संग्रहणी आहे, त्याला ताक दीपन, ग्राही आणि लघु आहे म्हणून पथ्यकारक मधुर पाक आहे, म्हणून पित्त प्रकोप न करणारें. असें आहे.

बिडंयवानीविश्वंभोपिबेदुष्णांबवारिणा

टी० ॥ ॥ पोट फुगलें असल्यास, बिडलोण, ओंवा, ऊनपाण्या बरोबर खावा.

हिंगूलंमरिचंगंधंपिप्पलीटंकणंविषम्॥ कनकस्यचबीजानिसमांशंविजयाद्रवैः॥ मर्दयेद्याममात्रंतुचणमात्रावटीकृता॥ भक्षणाद्ग्रहणींहंतिरसःकनकसुंदरः अग्निमांद्यंज्वरंतीव्रमतिसारंचनाशयेत्॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंतथातक्रौदनंचरेत्॥

टी० ॥ ॥ हिंगूळ, मिरें, गंधक, पिंपळी, टांकणखार, वचनाग, धोत्र्याचें बी, सर्व समांश घेऊन भांगेच्या काढ्यांत प्रहरभर खल करावा आणि हरभऱ्याएवढी गोळी खावी ह्मणजे संग्रहणी, अग्निमांद्य, ज्वर, अतिसार यांचा नाश होतो. याला दहींभात किंवा ताकभात हें पथ्य आहे. याला कनक सुंदर रस असें ह्मणतात. इति कनकसुंदरः

शङ्खैःकर्कवराटकैर्गणनयाभल्लातकांस्तत्समान्॥ प्रोत्तान्बब्बुलकंटकैर्लघुपुटेपक्त्वाग्निभागंरसंलेलीनेनसमंविचूर्ण्यविजयासप्तानुभाव्यंशिवप्रोक्तोयंग्रहणीकपाटकरसस्त्रिवल्लकस्त्वौषधः॥

टी० ॥ ॥ पांढऱ्या कवड्या आणि संख्येन त्यांचे बराबर बिब्बे घेऊन, बिब्यांस बाभळीचे कांटे टोंचून कवड्या आणि बिब्बे एका मडक्यांत किंवा परळांत टेऊन लघु पुट द्यावें. नंतर त्या भस्माचे चतुर्थांश पारा आणि गंधक घेऊन त्यांची कज्जली त्यांत घालून भांगेचे काढ्याच्या सात भावना द्याव्या ह्मणजे ग्रहणी कपाट रस होतो; हा शिवानें सांगीतला आहे. तीन वाल प्रमाणें खावा ह्मणजे अग्निमांद्य ज्वर, अतिसार यांचा नाशक आहे. पथ्य दहींभात किंवा ताकभात खावा. ॥ इतिग्रहणीकपाटः॥ इतिसंग्रहणीरोगप्रतीकारः

## अथार्शोलक्षणोपचारः

पृथक्दोषैःसमस्तैश्चशोणितात्सहजानिच॥ अर्शांसिषट्प्रकाराणिविद्याद्गुदवलित्रये॥ प्रसारिणीसर्जनीच ग्राहिकानिवलित्रयम्॥

टी० ॥ ॥ पृथक् दोषांनीं ह्मणजे वातानें, पित्तानें, कफानें आणि समस्त ह्मणजे वात, पित्त, कफ, या तिन्हीं दोषांनीं आणि रक्तापासून; सहज ह्मणजे जन्म होण्या बरोबर झालेली अशी साहा प्रकारची अर्श ह्मणजे मुळव्याध आहे.

ती गुदाचे ठिकाणी तीन वळ्या आहेत यांचे ठायीं होते त्या तीन वळ्यांची नांवें प्रसारिणी, सर्जनी, ग्राहिका अशीं आहेत.

गुदावंकुरास्तस्यः सहजाः शोणितोद्भवाः

टी० ॥ ॥ सहा प्रकारची मुळव्याध सांगितली त्यांतून रक्तापासून आणि सहज जी मुळव्याध ह्मणजे मोड असतात ते बहुत करून गुदाचे आंत ले वळीला असतात.

एकदोषाद्वाह्यबलौसाध्या अन्यास्त्वसाध्यकाः

टी० ॥ ॥ एक दोषानें जे मोड येतात ते बाहेरचे वळीला, ते साध्य आणि द्वि दोषा पासून अथवा त्रिदोषा पासून जे मोड येतात ते असाध्य जाणावे.

अर्शोतिसारग्रहणीविकाराः प्रायेणचान्योन्यनिदान भूताः शांतेनलेसंतिनसंतिदीप्तेरक्षेदतस्तेषुविशेषतोग्निं

टी० ॥ ॥ मुळव्याध, अतिसार, संग्रहणी हे रोग परस्पर कारण भूत आहेत ह्मणजे मुळव्याधीपासून संग्रहणी होते, किंवा संग्रहणी पासून मुळव्याध होते, या प्रमाणें जाणावें. ते पुनः अग्निमंद असल्या मुळें होतात. आणि अग्निदीप्त असतां होत नाहीत. या साठीं विशेषें करून अग्नी प्रदीप्त ठेवावा.

दुर्नाम्नांसाधनोपायश्चतुर्धापरिकीर्तिताः भेषजक्षारशस्त्राग्निसाध्यत्वंयाप्यमुच्यते

टी० ॥ ॥ मुळव्याध बरी होण्यास उपाय चार प्रकारचा सांगीतला आहे; एक औषध, दुसरा क्षार लावणें, तिसरें शस्त्रानें कापणें, चवथा अग्नि प्रदीप्त राखणें हा उपाय याप्य आहे, ह्मणजे जोंपर्यंत अग्नी चांगला प्रदीप्त आहे तों पर्यंत मुळव्याध बरी असते.

तिलभल्लातकंपथ्यागुडश्चेतिसमांशकम् दुर्नामश्वासकासघ्नंप्लीहपांडुज्वरापहम् ॥

टी० ॥ ॥ तीळ, बिब्बा, हिरडा, गूळ हिं समांश घेऊन गोळी करून शक्ति प्रमाणें खावें ह्मणजे मुळव्याध, श्वास, खोकला, पांथरी पांडुज्वर यांचा नाश होईल.

कृष्णाशिरीषबीजार्कक्षीरैः सामरसैंधवैः हरिद्राक्षविट् गुंजागोमूत्रैः पिप्पलीयुतैः एतद्वेपनयंयोज्यशीघ्रमर्शो विनाशनम् ॥

टी० ॥ ॥ जटामांसी, शिरीस, रुईचा चीक, सांमराचें शिंग, सैंधव, हळद, आ
वळीची विष्ठा, गंज, गोमूत्र, पिंपळी हीं सर्व एके जागीं घाटून तीन वेळा ले
प करावा. ह्मणजे मुळव्याधीचा लौकर नाश होईल.

गुडेनशुंठीमथवोपकुल्यांपथ्यांतृतीयामथदाडिमंवा॥
आमेषजीर्णेषुगुदामयेषुवर्चोविबंधेषुचनित्यमिष्टम्॥

टी० ॥ ॥ गुळाबरोबर सुंठ, पिंपळी, हिरडा, डाळिंब यांतून कोणतें एक खा
वें ह्मणजे आम अजीर्ण मुळव्याध मलावष्टंभ दूर होतील.

ज्योतिष्कबीजकल्केनलेपोरक्तार्शसांहितः

टी० ॥ ॥ मालकांगोणीचें बीं वाटून लेप करावा ह्मणजे रक्तापासून झालेली मु
ळव्याध दूर होते.

स्नुत्यग्निलांगलीदंतीमूलैर्लेपोर्शसांहितः

टी० ॥ ॥ निवडुंगाचा चीक, चित्रक, कळलावी, अथवा कुदली, दांती मूळ, यां
चा लेप मुळव्याधीवर हित कारक आहे.

सौरणंकंदमादायपुटपाकेनपाचयेत्
सतैलगुडसंयुक्तोरसश्चार्शोविकारनुत्

टी० ॥ ॥ सुरणाचा कांदा पुट पाकें करून पक्क करावा आणि शिरसाचें तेल
गूळ यांचे बरोबर खावा ह्मणजे मुळव्याधीचा विकार दूर करील.

अपामार्गस्यबीजानांकल्कस्तंदुलवारिणा
पीतोरक्तार्शसांनाशंकुरुतेनास्तिसंशयः॥

टी० ॥ ॥ आघाड्याचें बीं तांदळाचे धुणांत वाटून प्यावें ह्मणजे रक्ताचे मुळव्या
धीचा नाश करील.

विदारीमूलकल्केनतिलकल्कस्तुयोजयेत्
मधुक्षीरयुतःकुर्यात्रक्तातीसारनाशनम्

टी० ॥ ॥ भुयकोंहळा, तीळ हे वाटून मध आणि दूध यांचे बरोबर प्यावें ह्म
णजे रक्ताती साराचा नाश करील.

नवनीततिलैःकल्कोजेतारक्तार्शसामतः
नवनीतंसितानागकेसरैश्चापितद्विधः॥

टी० ॥ ॥ लोणी, तीळ, एके जागीं वाटून खावे ह्मणजे रक्ताची मुळव्याध बरी
होईल; तसेंच लोणी साखर, नागकेशर, हें एके जागीं वाटून प्यावें ह्मणजे र

न्ह मुळव्याध जाईल.

आर्कं पयःस्नुधाकांडंकटुकालाबुपल्लवाः
करंजोबस्तमूत्रेणलेपनंश्रेष्ठमर्शसाम्

टी० ॥ ॥ रुईचा चीक, निवडुंगाचें कांडें, कुटकी, कडू भोपळ्याचे पल्लव, करंजीचें बीं, बोकडाचें मूत यांचा लेप मुळव्याधीवर श्रेष्ठ आहे.

कटुतुंब्यास्तथादंत्याःशकृच्चकुक्कुटस्यच॥मुसल्या श्चांश्वगंधायाश्चित्रकस्यचयत्नतः॥मूलैःस्तुल्यैः कृ तंचूर्णं अर्कक्षीरेणभावयेत्॥स्नुहिक्षीरेणमतिमान् वारिणापरिपेषयेत्॥वस्त्रवर्त्यागुदंतेनसमालिप्यसमं ततः॥गुदेविनिक्षिपेद्यत्नात्प्रातःसायंचबुद्धिमान्॥वे दनाचभवेत्तीव्रावन्हिनास्वेदयेद्गुदम्॥नोपशाम्येत्तदा तेनत्तदाचैवोष्णवारिणी॥विनिवेश्यगुदंनिर्वेदनाश मकारणात्॥अथाहृष्यमथान्नचशिशिरंजलमापिबे त्॥गुदजानांविनाशार्थंसप्ताहंतुसमाहितः॥विधिमे नंप्रकुर्वीतगतशंकस्तुमानवः॥

टी० ॥ ॥ कडू भोपळ्याचे पल्लव, दांती मूळ, कोंबड्याची विष्ठा, सफेद मुसळी आस्कंद, चित्रक हीं सम भाग घेऊन चूर्ण करून रुइचे चिकाची आणि निवडुंगाचे चिकाची भावना द्यावी; नंतर पाण्यांत वाटून वस्त्राचे वातीने गुदास लेप करावा, आणि तीगात गुदामध्यें प्रातःकाळीं, सायंकाळीं घालावी वेदना फार होईल या साठीं गुदास शेक घ्यावा, शेक घेऊन निशांत झाली तर ऊन पाण्यांत बसावें, आणि हृष्यान्ना चें भक्षण करावें ह्मणजे मधुर स्निग्ध म नास हर्ष देणारें पुष्टिप्रद असें अन्न खावें, थंड पाणी प्यावें या प्रमाणें सा त दिवस करावें. ह्मणजे मुळव्याधीचा नाश होईल.

गुंजासूरणकूष्मांडबीजैर्वर्तिस्तथागुणा

टी० ॥ ॥ गुंज, सुरण, कोहळ्याचें बी हीं पाण्यांत वाटून वस्त्राचे वातीनें ले प करावा; वात गुदांत ठेवावी ह्मणजे मुळव्याधीचा नाश करील.

नृकेशाःसर्पनिर्मोकंवृषदंशस्यचर्मच
अर्कमूलंशमीपत्रमर्शोभ्योधूपनंहितम्

टी० ॥ ॥ मनुष्याचे केश, सर्पाची मेंग, आणि मांजराचें कातडें, रुइचें मूळ, शमी

मीची पानें, यांची धुरी मुळव्याधीस हितावह आहे.

स्नुहिक्षीरनिशालेपस्तथागोमूत्रकल्कितः
योजितोगोभवक्षीरंवन्हिमूलावचूर्णितम्
पिबंस्तदेवतेनैवभक्तजानोगदजांकुरान्

टी० ॥ ॥ निवडुंगाचा चीक, हळद, गोमूत्र यांचा लेप करावा आणि गाईचे दुधा बरोबर चित्रकाचें चूर्ण खावें याला पथ्य दूध भात जेवावा ह्मणजे मुळव्याध बरी होईल.

पिबेदहरहस्तक्रंनिरन्नोवातनाशतः॥सप्ताहंवादशाहंवामासा र्धंमासमेववा॥बलकालविकारज्ञोभिषक्तक्रंप्रयोजयेत्॥

टी० ॥ ॥ जाला वायूचा रोग असेल त्याणें अन्न न खातां तक्र पिवून राह्यावें तें सात दिवस, किंवा दहा दिवस, किंवा पधरा दिवस, किंवा महिनाभर जसें आपलें बल विकार असेल त्या प्रमाणें तक्र प्यावें, ह्मणजे वायूचा विकार मोडेल.

गोरीपाषाणकर्षैकंस्नुहिकांडेविनिक्षिपेत्॥पाचयेत्पुट पाकेनततउद्धृत्ययत्नतः॥रेवाचिनीचकुष्ठंचकल्कीकृत्यत्र यंसमं॥लेपयेत्तेन अर्शांसिनिवार्यंतेनसंशयः॥ ॥

टी० ॥ ॥ सोमल निवडुंगाचे कांड्यामध्यें भरावा आणि पुटपाकानें पक्क करावा, नंतर रेवाचिनी कोष्टकोलिंजन तिन्हीं समभाग घेऊन वाटून मुळव्याधीस लेप करावा ह्मणजे मुळव्याध जाईल.

दग्ध्वान्यग्रोधपत्राणितैलेनसहलेपयेत्

टी० ॥ ॥ वडाचीं पानें जाळून त्याची राख तेलांत खलून मुळव्याधीस लेप करावा ह्मणजे मुळव्याध जाईल.

त्वचंचित्रकमूलस्यपिष्ट्वाकुंभप्रलेपयेत्
तक्रंवादधिवातत्रजातमर्शोहरंपिबेत्॥

टी० ॥ ॥ चित्रकाचे मुळांची साल कुटून त्याचा लेप मडक्याला आंतून करावा आणि त्यांत दहीं किंवा तक्र ठेऊन, मुळव्याध झाली असेल त्याणें प्यावें, ह्मणजे मुळव्याध जाईल.

गुडव्योषवराबेल्लतिलारुष्करचित्रकैः॥
अर्शांसिहंतिगुटिकात्वग्विकारंचशीलिता

टी० ॥ ॥ गूळ संठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, वावडिंग, तीळ

बिब्बा, चित्रक यांची गुटिका ह्मणजे गोळी खाल्ली असतां मुळव्याध, त्वचे चा विकार यांचा नाशक आहे.

अरुष्करवन्हिसरेंद्रयवान्चिरबिल्वससैंधवशंठि युतान् ॥ मथितेनपिबेद्यदिससदिनमर्शांसिपतंतिसमूलभरम्

टी० ॥ ॥ टेंटू, दाळचिनी, चित्रक, इंद्रजव, करजाचें बी, सैंधव, सुंठ यांचें चूर्ण मठ्याबरोबर सात दिवस घ्यावें ह्मणजे मूळासहीत मुळव्याध गळून पडेल.

कांचनीविषपाषाणंयवक्षारंचहिंगुळम् ॥ जलेपिष्ट्वान्यसेद्गुह्ये एवंकुर्याद्दिनत्रयम् ॥ क्षीरस्वेदंतथाकुर्यात्क्षीराहारीघृतोदनम् ॥ अर्शरोगान्निहंत्याशु सिद्धयोगउदाहृतः

टी० ॥ ॥ हळद, सोमल, जवखार, हिंगूळ यांची पाण्यांत वाटून गोळी करून गुदांत ठेवावी, आणि दुधाची वाफ गुदास घ्यावी; दूध घ्यावें. तूप भात खावा या प्रमाणें तीन दिवस केलें असतां मुळव्याधीचा नाश होतो; हा सिद्ध योग सांगितला आहे.

अथमंत्रः

कंकरकुरंकरंतरकंताझिलमिलतिरीयेराजकुरंतरआरक्षासारक्षाजोजाणेइहमंत्रातांकेबसनहोयअरिसाजाणबुझप्रकटनकरितांकेसमकपिलामरकिहत्या ॥ अस्यमंत्रस्य प्रत्यहं जपंकुर्यात् ॥ या मंत्राचा जप रोज करावा.

समूलपत्रकोकंबंपलद्वयमितंशुभं ॥ भल्लातफलमज्जायामरीचस्यपलंपलं ॥ एतच्चूर्णीकृतंसूक्ष्मंभक्षयेत्कर्षसंमितं ॥ अर्शांकुरान्निहंत्याशु सबाह्याभ्यंतरानपि ॥

टी० ॥ ॥ कोकंबाचें पंचांग, ह्मणजे मूळ, पानें, फळेंसहित झाड दोन पळें ८० मासे, बिब्याचा मगज ह्मणजे गोडंब्या एक पळ ४० मासे मिरें पळ ४० मासे यांचें चूर्ण कर्ष प्रमाण ह्मणजे १० मासे खावें ह्म० आंतले बाहेरले मोड नाश पावतील.

अथरसोपचारः

संमर्द्यप्रतिसारितावहुरसौताभ्यांचगंधंसमम् ॥ लांगल्यासितसूरणेनचपृथक्कृत्वाचतावस्यचेत् ॥ गोलंज्वालमुपेतिभांडनिहितंचूल्यामथस्त्रौषधैः ॥ सस्यादर्शकुठारकोत्रपवनार्शःपूर्वकव्याधिषु ॥

मतिसारिता आणि बहुरस ह्मणजे जेपाक आणि पारा या दोषांचे बराबर गंधक घेऊन मर्दन करावें, नंतर कुहिली आणि पारा करण त्यांत मिळवून खलावें नंतर गोळ्या करून भांड्यात घालून पेट घेई तों पर्यंत पक्व करावें. याला अर्श कुठार असें ह्मणतात. हा रक्तवात मुळव्याध इत्यादिकांचे ठायीं प्रशस्त आहे. ॥ इत्यर्शकुठारः ॥

वेगावरोधस्त्रीपृष्ठयानान्युत्कटुकाशनम्
यथास्वंदोषलंचान्नमर्शसांपरिवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ वेगाचा अवरोध, स्त्रीसंग, अश्वादिकांवर बसणें, फार तिखट खाणें जे दोषांची मुळव्याध असेल तो दोष करणारें अन्न हें मुळव्याधिला वर्ज करावें.

अथ अजीर्णलक्षणोपचारः

अत्यंबुपानाद्विषमाशनाद्वासंधारणात्स्वप्नविपर्ययाच्च
कालेपिसात्म्यंलघुचापिभक्तमन्नस्यसम्यक्परिणाममेति

टी० ॥ ॥ अति पाणी पिणें, अकाळीं खाणें शौचादीक होत असतां न जाणें, वेळ सोडून भलते वेळेस झोप घेणें, शक्ती पेक्षां अती खाणें इतक्या कारणानीं अन्नाचा परिपाक चांगला होत नाहीं.

यच्चावलंबतेभक्तंस्थिरंचापिनजीर्यते
आमंविदग्धंविष्टब्धंरसशेषमजीर्णकं

टी० ॥ ॥ अन्न खाल्लें असतां पडतें, आणि पडलें नाहीं तरी राहिलेलें जिरत नाहीं; त्याला अजीर्ण असें ह्मणतात. तें अजीर्ण चार प्रकारचें, आमाजीर्ण, विदग्धाजीर्ण, विष्टब्धाजीर्ण, रसशेषाजीर्ण ज्यांत अपक्व मल पडतो आणि ओकारी होऊन अन्न पडतें तें आमाजीर्ण, ज्यांत कर्पट ढेंकर येतात तें विदग्धाजीर्ण, ज्यांत पोट फुगलेलें असतें तें विष्टब्धाजीर्ण, ज्यांत केवळ अन्नावरील इच्छा जात्ये तें रस शेष.

सूचीभिरिवगात्राणितुदन्संतिष्ठतेनिलः
यस्याजीर्णेनसावैद्यैर्विषूचीतिनिगद्यते ॥

टी० ॥ ॥ ज्याला अजीर्ण झालें असतां सुया टोंचल्या प्रमाणें वायु वेदना करितो ती विषूची असें वैद्य ह्मणतात.

क्षारसद्रसौवर्चलसैंधवानां सारोयवानांचतथाजमोदा ॥
हरीतकीपिप्पलिशृंगबेराहिंग्वविडंगंचसमानिकुर्यात् ॥

एतानिचूर्णानिघृतप्लुतानिभुंजीतग्रासान्प्रथमंचपंच॥ अजीर्णवातंगुदगुल्मवातंवातप्रमेहंविषमंचवातम्॥वि षूचिकाकामलपांडुरोगंश्वासंचकासंचहरेत्प्रयुक्तम्॥

टी०॥ ॥मीठ, पादेलोण, सैंधव, जवखार, आंवा, हिरडा, पिंपळी, सुंठ, हिंग, वावडिंग हीं समभाग घेऊन चूर्ण करून त्याला तूप लावावें, आणि भोजन समयीं प्रथम पांच घास त्या चूर्णाबरोबर खावे म्हणजे अजीर्ण वात, गुद वात, गुल्मवात, वातप्रमेह, विषमवात, विषूचिका, कावीळ, पांडुरोग, श्वास, खोकला यांचा नाश करील. ॥इति सामुद्राद्यंचूर्णं॥

त्रिकटुकमजमोदासैंधवंजीरकेद्वेसमचरणधृतानाम ष्टमोहिंगुभागः॥प्रथमकवलभोजीसर्पिषाचूर्णमेतज्ज नयतिजठराग्निंवातगुल्मंनिहंति॥

टी०॥ ॥सुंठ, मिरें, पिंपळी, ओंवा, सैंधव, जिरें, शहाजिरें, हिंग हीं समभाग घेऊन यांचें चूर्ण तूप लाऊन भोजन समईं पहिले घांसा बरोबर खावें म्हणजे अग्नी प्रदीप्त होतो. आणि वात गुल्माचा नाश होतो. इ०हिंग्वाष्टकं॥

विषूच्यामतिवृद्धायांपार्ष्ण्योर्दाहःप्रशस्यते॥गंधकंकुं कुमंवापिदद्यानिंबुजलेनवा॥

टी०॥ ॥विषूची फार वाढली असतां पायांला टांचाचे वर्नी डाग द्यावा, अथवा गंधक, किंवा केशर लिंबाचे रसांत पाजावें.

व्योषंकरंजस्यफलंहरिद्रानिंबुकद्रवैः॥ नस्यांजनेप्रयोक्तव्येकुर्याच्चजलसेचनम्

टी०॥ ॥सुंठ, मिरें, पिंपळी, करंजाचें बी, हळद हीं लिंबाचे रसांत उगाळू न नस्य आणि अंजन करावें. आणि अंगावर पाणी शिंपावें म्हणजे विषू चिका उतरते.

लशुनजीरकसैंधवसंचलंत्रिकटुरामठचूर्णमिदंसमं सपदिनिंबुरसेनविषूचिकांहरतिभोरतिभोगविचक्षणे

टी०॥ ॥लसूण, जिरें, सैंधव, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग यांचें चू र्ण लिंबाचे रसांत कालवून खावें. म्हणजे, हे रतिभोग विचक्षणे विषूचिके ना नाश करतें.

विडंगभल्लातकचित्रकाभयाःसनागरास्तत्स्यगुडेनसर्पि

षा॥ निर्हंतितेमंदहुताशनान्नराभवंतितेवाडवतुल्यवन्हयः

टी० ॥ ॥ वावडिंग, बिब्बी, चित्रक, हिरडा, सूंठ यांचें चूर्ण आणि त्याचे बरा बर गूळ आणि तूप घालून खावें ह्मणजे मंदाग्नीचा नाश होऊन वडवाग्नी साररवा ज्यांचा अग्नी असे मनुष्य होतात. ॥ इति विडंगाद्यवलेहिका॥

कुष्ठसैंधवयोःकल्कंचुक्रतैलसमन्वितम्
विषूच्यांमर्दनंकोष्णंखल्लीशूलनिवारणं

टी० ॥ ॥ कोष्ठकोलिंजन, सैंधव यांचें चूर्ण आंमसुलाचे तेलांत कालवून मंदोष्ण करून अंगास चोळावें ह्मणजे विषूचिका आणि खल्लीशूळ यांचें निवारण होतें.

निंबूरसंचिंचिणिकासमेतंविषूचिकाशोषहरंकफंच॥ दुग्धेनपीतोयदिटंकणोसौप्रशाम्यतेयंवमनंनिरुध्यात्

टी० ॥ ॥ निंबाचे रसांत जुनी चिंच कुवकून पाजावी ह्मणजे विषूचिका, शोष, कफ यांचा नाश होतो. आणि दुधांत टांकणखार घालून पाजावें ह्मणजे विषूचिका ओकारी बंद होईल.

अथरसोपचारः

शुद्धसूतंविषंगंधंप्रत्येकंचसमंसमं॥ मरीचंसर्वतुल्यांशंकंटकारीफलद्रवैः॥ मर्दयेद्भावयेद्यत्नाद्येकविंशतिवारकं॥ गुंजात्रयमिदंखादेत्सर्वाजीर्णप्रशांतये॥ सर्वोपद्रवसंयुक्तांविषूचिमपिनाशयेत्॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, बचनाग हीं समभाग यां तिघांचे बरोबर मिरें हीं एकाजागीं खलून रिंगणीचे फळाचे रसाचा एकवीस भावना द्याव्या, नंतर तीन गुंजा प्रमाणें खावें ह्मणजे सर्व अजीर्ण आणि सर्व उपद्रवानी युक्त अशी विषूचिका यांचा नाश होईल. याला अजीर्ण कंटक रस असें ह्मणतात.

रसेनगंधंसहटंकणेनसमंविषंयोज्यमतस्त्रिभागम्॥ कपर्दशंखावपिनेत्रभागौमरीचकंचाष्टगुणंविमर्द्य॥ सकपक्कजंबीररसेनखल्वेशुद्धोभवत्यग्निकुमारकोयम्॥ अजीर्णबालग्रहदगुल्मवातंविषूचिकाद्यंविनिहंतिसद्यः॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, टांकणखार हे तीन समभाग आणि यांचे बरोबर बचनाग ३ कवडीभस्म २ शंखभस्म २ मिरें ८ भाग या प्रमाणें घेऊन चांगले

पिकलेले लिंबाचे रसांत खल करावा ह्मणजे हा अग्निकुमार रस होतो हा अजीर्ण वात, कफवात, गुल्मवात, विशूचिका इत्यादिकांचा नाश करितो.

व्यायामप्रमदाध्ववाहनरतान्खिन्नानतीसारिणः॥ शूलश्वासवतस्तृषापरिगतान्हिक्कामरुत्पीडितान्॥ क्षीणान् क्षीणकफान् शिशून्मदहतान्वृद्धांस्तथाजीर्णिनोरात्रौ जागरितान्निरशनान्कामंदिवास्वापयेत्॥

टी० ॥ ॥ व्यायाम, स्त्री मार्ग, वाहन इतक्यांचे ठिकाणी रत, खिन्न अतिसारी, शूल, श्वास, तृषा इतक्यानी युक्त, उचकी, वायू, याणी पीडित, क्षीण, क्षीणकफ, बाल, मदोन्मत्त, वृद्ध, अजीर्णी रात्री जागलेला उपोषीत, इतक्या मनुष्यानीं दिवसास निद्रा घ्यावी. ॥ इति अजीर्णचिकित्सा॥

## अथ कृमिलक्षणोपचार:

ज्वरोविवर्णताशूलंहृद्रोगश्छर्दनंभ्रमः भक्तद्वेषोतिसारश्चसंजातकृमिलक्षणम्

टी० ॥ ॥ ज्वर, तोंड उतरणें, डोळे खोल जाणें, शूल, हृदयांत पीडा, ओकारी, भोंवळ, अन्नाचा द्वेष अतिसार हीं लक्षणें कृमि झाल्याचीं आहेत.

मुस्ताखुपर्णीफलदारुशिग्रुक्वाथःसकृष्णाकृमिशत्रुकल्कः मार्गद्वयेनापिचिरप्रवृत्तान्कृमिंनिहन्यात्कृमिजांश्चरोगान्

टी० ॥ ॥ नागरमोथा, उंदीर कानी, इंद्रजव, देवदारू, शेवगा यांचा काढा पिंपळी, आणि वावडिंग यांचें चूर्ण घालून घ्यावा. ह्मणजे दोन्ही द्वारानीं फार दिवस पडणारे जरी जंत असले तरी त्याचा आणि त्यां पासून झालेले रोग यांचा नाश करितो.

विडंगंपारिभद्रामंब्रह्मबीजंपृथक्पृथक् मधुनाकृमिनाशायनिंबवाहिंगुसंयुतम्

टी० ॥ ॥ वावडिंग, अथवा कडु लिंबाची पानें, किंवा पळस पापडी, मधा बरोबर खावी ह्मणजे कृमिनाश होतो. अथवा लिंबाची पानें हिंगा बरोबर खावीं.

भल्लातकंवादध्ना वा निंबाम्लेनहरेत्कृमीन्

टी० ॥ ॥ बिब्बा दह्याबरोबर किंवा लिंबे बरोबर खावा ह्म० कृमि नाश करील

पलाशबीजंवस्त्रैस्तुहिक्षीरेणजंतुजित्॥

टी० ॥ ॥ पळस पापडी निवडुंगाचे रसा बराबर खावी ह्मणजे जंत मरतील.

सौवीरं पत्रशाकांश्च वर्जयेत्क्रमिवान्नरः

टी० ॥ ॥ जंत झालेल्या मनुष्यानें बोर आणि पाले भाज्या खाऊं नये.

खदिरः कुटजः पिचुमंदवचात्रिकटुत्रिफलात्रिवृतासहितं पशुमूत्रयुतं पिबसप्तदिनं क्रमिकोटिशतान्यपि हंत्यचिरात्

टी० ॥ ॥ खैर, कुडा, कडुलिंब, वेखंड, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, तेड यांचें चूर्ण किंवा काढा गोमूत्रांत घालून सात दिवस प्यावा. ह्मणजे कोट्यावधी कृमि असले तरी लोकर नाश पावतील.

निंबुवत्सकविडंगसंयुतं रामठेनसहजंतुनाशनम् ॥ निंबपत्रमजमोदकान्वितं चूर्णमेवमधुनाप्रशस्यते ॥

टी० ॥ ॥ लिंब, कुडा, वावडिंग, हिंग यांचें चूर्ण जंत नाशक आहे; लिंबाचीं पानें, ओंवा यांचें चूर्ण मधा बरोबर खावें ह्मणजे जंत नाशक आहे.

आखुपर्णीदलैः पिष्टैः पिष्टकेनचपूपकान् भक्त्वासौवीरकंचानुपिबेत्क्रमिहरंपरम् ॥

टी० ॥ ॥ उंदीर कानीची पानें कुटून चूर्ण करून त्यांत पीठ मिश्र करून-त्याचे घारगे करून खावे आणि वर्ती सांतूची कांजी प्यावी, ह्मणजे कृमि-नाश होतो.

क्रवर्चिखारामठपत्रिकाह्वाविडंगवाल्हीककणाग्निविश्वायवानिकाग्रंथिकभद्रमुस्तातक्रेणचूर्णक्रमिकोटिहारि ॥

टी० ॥ ॥ सज्जीखार, हिंग, जायपत्री, वावडिंग, केशर, पिंपळी, चित्रक, सुंठ, ओंवा, पिंपळमूळ, नागरमोथा यांचें चूर्ण ताका बरोबर घ्यावें ह्मणजे कोट्यावधी कृमिन्चा नाश होईल.

सारनालाखुपर्णीवातक्रं पालाशबीजयुक् ॥ हिंग्वाजमोदातक्रंवाक्रमिरोगंविनश्यति ॥

टी० ॥ ॥ कांजी, सहित उंदीर कानी, पळस पापडी ताका सहित; हिंग ओंवा हीं कृमि रोग नाशक आ हेत.

क्षीराणिमांसानिघृतानिचैवदधीनिशाकानिचपत्रवंति ॥ समासतोम्लंमधुरान्रसांश्चक्रमिजिघांसुः परिवर्जयेच्च

टी० ॥ ॥ दूध, मांस, तूप, दहीं, पालेभाजी, गोड, आंबट, रस इतके पदार्थ कृमि झाले असतील त्याणें वर्ज करावे. ॥ इति क्रमिचिकित्सा ॥

अथ पांडुरोगलक्षणोपचारः

भ्रूनेत्रगुदपन्नाभिगुल्ह्यशोफोविवर्णता ॥ बलाग्निना
शनकार्श्यंपांडोसास्रग्विरेचनम् ॥

टी० ॥ ॥ भिवया, नेत्र, गूद, पाय, बेंबी, गल्ह्य, इतक्या ठिकाणी सूज, विवर्ण
ता ह्मणजे निस्तेजपणा बल अग्नी यांचा नाश कृशता गुदावाटे रक्त पडणें
हीं पांडुरोगाचीं लक्षणें जाणावीं.

ज्वरारोचकहृल्लासच्छर्दिस्तृष्णाक्लमान्वितम् ॥ क्षीणं
हतेंद्रियंहन्त्यसाध्यजत्पांडुरोगिणाम् ॥

टी० ॥ ॥ ज्वर, अरुची, हृदयव्यथा, ओकारी, तृषा, ग्लानी, क्षीणता, विकलें
द्रिय, हतता, इतक्यानी युक्त जो पांडुरोगी तो असाध्य जाणावा

पांडुदंतनखोयश्चपांडुनेत्रश्चयोभवेत् ॥ पांडुसंघात
दर्शीचपांडुरोगीविनश्यति ॥

टी० ॥ ॥ दांत, नेत्रें, नखें, ज्यांची पांढरी आणि सर्व पांढरें पाहातो, असा पांडु
रोगी विनाश पावेल.

पीतनेत्राननखारुचिर्दौर्बल्यदाहकृत् ॥ कामलाबहुपि
त्तैषाचिरास्यात्कुंभकामला ॥

टी० ॥ ॥ जांत नेत्र, मुख, नखें पिंवळी, अरुची, दुर्बलता, दाह इतकीं लक्षणें
होतात, तीं कामला जिला कावीळ असें ह्मणतात, ती अति पित्तापासून होते;
आणि फार दिवस असली ह्मणजे तिला कुंभ कामला असें ह्मणतात.

कृष्णापीतशकृन्मूत्रश्शूलतृट्दाहमोहवान् ॥ रक्तनेत्रा
ननस्त्याज्यः कामलार्धरोचकी ॥

टी० ॥ ॥ काळें किंवा पिंवळें, मळ, आणि मूत्र, शूल, तृषा, दाह, मोह, नेत्र आणि
मुख रक्तवर्ण, इतक्यानी युक्त जो कामला, अरुची, ओकारी, या रोगांचा जो म
नुष्य आहे तो असाध्य जाणावा.

हरितश्यावपीतत्वक्क्षयतंद्राग्निनाशनैः
हलीमकंविजानीयादंगमर्दतृषाभ्रमैः ॥

टी० ॥ ॥ हिरवी किंवा पिंगट वर्ण किंवा पिंवळी अशी त्वचा रक्तमांस इत्या
दिकांचा क्षय, झांपड, अग्निनाश, आंग मोडून येणें, तृषा, भ्रम, ग्लानी, ल
क्षणें ज्यांस असतात त्याला हलीमक असें ह्मणतात.

अथोपचारः

फलत्रिकामृतावासातिक्तामूनिंबनिंबजः
क्वाथः क्षौद्रयुतोहन्यात्पांडुरोगंसकामलम्

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी, गळवेल, अडुळसा, कुटकी, किराईत, कडूलिंब यांचा काढा मध घालून घ्यावा ह्मणजे पांडुरोग कामला यांचा नाश करील.

रसमामलकानांतुसंशुद्धंयंत्रपीडितम्॥ द्रोणंपचेच्चमृद्वग्नोतत्रेमानिप्रदापयेत्॥ चूर्णितंपिप्पलीप्रस्थंमधुकंद्विपलंतथा॥ प्रस्थंगोस्तनिकायाश्चद्राक्षायाः कल्कपेषिनम्॥ शृंगबेरपलेद्वेतुतुगाक्षिर्याः पलद्वयम्॥ तुलार्धंशर्करायाश्चघनीभूतंसमुद्धरेत्॥ मधप्रस्थसमायुक्तंलेहयेत्पलसंमितम्॥ हलीमकंकामलांचपांडुत्वंचापकर्षति

टी० ॥ ॥ आंवळ्याचारस, स्वच्छ १०२४ तोळे शिजत ठेवावा त्यांत, पिंपळीचें चूर्ण ६४ तोळे, जेष्टीमध ८ तोळे, काळींद्राक्षें बियाकाढून कुसकुरून ६४ तोळे सुंठ ८ तो. वंशलोचन ८ तो. साखर २०० तो. इतके पदार्थ टाकून घट्ट झाल्यावर उतरावा नंतर त्यांत ६४ तोळे मध घालून ठेवावा ४ तोळे प्रमाणें खावा. ह्मणजे हलीमककामला पांडुरोग हे जातील.

पुनर्नवानिंबपटोलशुंठीतिक्तामृतादार्व्यभयाकषायः
सर्वांगशोफोदरपांडुरोगस्थौल्यप्रसेकोर्ध्वकफामयेषु॥

टी० ॥ ॥ घेटोळी, कडूलिंब, कडूपडवळ, सुंठ, कुटकी, गळवेल, दारूहळद, हिरडा यांचा काढा सर्वांग सूज उदर, पांडु, स्थूलता, तोंडांत नेहमी खाकेरा येणें कफरोग यांचा नाशक आहे.

अयस्तिलत्र्यूषणकोलभागैः सर्वैः समंमाक्षिकधातुचूर्णं तैर्मोदकः क्षौद्रयुतोहिभक्तः पांडवामयेदूरगतेपिशस्तः

टी० ॥ ॥ लोहभस्म, तीळ, सुंठ, मिरें, पिंपळी, बोरीचे फळाची साल, हीं समभाग घेऊन या सर्वांचे बरोबरीनें माक्षिक भस्म घालून याची गोळी करून मधाबरोबर खावी ह्मणजे असाध्य देखील पांडुरोगी बरा होतो.

यवगोधूमशाल्यन्नंरसैर्जांगलजैःशुभैः मुद्गाढकीमसूराद्यैस्तयोर्भोजनमिष्यते॥ ॥

टी० ॥ ॥ सातु, गहूं, शाली यांचें अन्न अरण्य संबधी जें मांस त्याच्या रसानी युक्त, किंवा मूग, तुरी, मसूरा, इत्यादिकानी युक्त जें भोजन तें कामलावान्, पांडु रोगी यांना असावें

त्रिफलावागुडूच्यावादार्व्यानिंबस्यवारसं
प्रातर्मधुयुतं वैद्यः कामलार्तायय़ोजयेत्

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी, यांचा काढा, किंवा गुळवेलीचा; किंवा दारुहळदीचा, किंवा कडुलिंबाचा, काढा मध घालून प्रातःकाळीं वैद्यानें कामलेनें पीडित असेल त्यास द्यावा.

धात्रीलोहरजोव्योषनिशाक्षौद्राज्यशर्कराः
लेहोनिवारयत्याशुकामलांशुद्धतामपि

टी० ॥ ॥ आंवळकाठी, लोहभस्म, सुंठ, मिरें, पिंपळी, दारुहळद, मध, तूप, साखर, यांचा लेह कामला पांडुरोग यांचे निवारण करितो.

अंजनंकामलार्तानांद्रोणपुष्पीरसंशुभम्
निशागैरिकधात्रीणांचूर्णवासंप्रकल्पयेत्

टी० ॥ ॥ पांढरे गोकर्णीचा रस, किंवा दारुहळद, तुरटी, आंवळकाठी, यांचें अंजन कामला नाशक आहे.

गुडूचीस्वरसेसर्पिःसक्षीरंमाहिषंघृतम्
चतुर्गुणेनपयसापाययेत्तद्धलीमके॥

टी० ॥ ॥ गुळवेलीचा रस तूप आणि दूध घालून पाजावा, अथवा म्हैशीचे तूपांत चौपट दूध घालून पाजावें, म्हणजे हलीमकाचें निवारण होतें.

व्योषाग्निवेल्लत्रिफलामुस्तैस्तुल्यमयोरजः
चूर्णितंतक्रमध्वाज्यकोष्णतोयोपयोजितं
कामलापांडुहृद्रोगकुष्ठार्शोमेहनाशनम्

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक, वावडिंग, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, नागरमोथा, यांचे चूर्णा बरोबर लोह भस्म घेऊन एकत्र करून ताक, मध, तूप ऊन पाणी यांतून एका बरोबर खावें कामला, पांडुरोग, हृद्रोग, कुष्ट, अर्श, मेह, यांचा नाश होईल.

अयेमनोज्ञकुंडलेस्फुरन्मुखेंदुमंडले
गवांपयःसनागरंनिहंतिकामलाभरं

टी० ॥ ॥ अशा सुंदर कुंडलें; देदीप्यमान मुख चंद्रे गाईचें दूध खडीशी युक्त प्यालें असतां कामलाज्वर नाशितें.

अर्कमूलं हरेन्नस्यात्कामलां तंदुलोदकैः

टी० ॥ ॥ रुईचें मूळ तांदुळाचे धुणांत उगाळून नाकांत घालावें ह्मणजे कामलेचा नाश करील.

व्योषबिल्वाद्विरजनीत्रिफलाद्विपुनर्नवा ॥ मुस्तान्यायोरजः पाठाविडंगं देवदारु च ॥ वृश्चिकाली च भार्गी च सक्षीरैस्तै र्घृतं शृतं ॥ सर्वान्प्रशमयत्याशु विकारान्मृत्तिकाकृतान्

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी, बेल, हळद, दारुहळद, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, पांढरी विषखापरा, तांबडी विषखापरा, नागरमोथा, लोहभस्म, पाहाडमूळ, वावडिंग, देवदार, भारंगी, मेढशिंगी, दूध इतक्यांनीं सिद्ध केलेलें तूप मृत्तिकेपासून झालेले सर्व विकारांचा नाश करितें.

तद्वत्केसरयष्ट्याह्वपिप्पलीक्षुरसाह्वयैः ॥ मृद्दूषणाय तच्छील्यैर्नितरां भाविता मृदम् ॥

टी० ॥ ॥ नागकेशर, जेष्टीमध, पिंपळी, निशोत्तर यांचा काढा करून त्याच्या भावना मृत्तिकेला द्याव्या नंतर ती माती खाणारास द्यावी ह्मणजे खाल्लेली माती पडून विकार दूर होतो.

तिलपिष्टनिभं यस्तु कामलावान्सृजेन्मलम् ॥ कफरुद्धपथं तस्य पित्तं कफहरैर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ तिळांचे पिठासारखा ज्याला मळ होतो अशा कामलावान् मनुष्यानें कफानें रोधलेला मार्ग ज्याचा असें पित्त कफ हारक पित्त शामक असें औषधानीं शमवावें.

गोमूत्रेण पिबेत्कुंभकामलायां शिलाजतु ॥

टी० ॥ ॥ गोमूत्रांत शिलाजीत प्यावा ह्म० कुंभकामला नष्ट होते.

देवदालीफलं स्यात्सलिले यस्य तत्पर्युषितं च तत् ॥ हंति नस्यविधानेन कामलां शाकुलामपि ॥

टी० ॥ ॥ देवडांगरीचें फळ, रात्रभर पाण्यांत ठेऊन त्याचे रसानें नस्य काढलें ह्मणजे कामला पंडु यांचा नाश करतें.

द्रोणपुष्पीरसोपेतांजनात्तां हिंगुसंयुता ॥ धात्रीनिशागो

रिकावांकामलापहमंजलम्॥

टी० ॥ ॥पांढरे गोकर्णीचे रसांत गोरोचन, हिंग घालून अथवा आंवळकाठी दारुहळद, तुरटी, घालून अंजन करावें हें कामलेचें नाशक आहे.

लोहचूर्णंनिशायुग्मंत्रिफलाकटुरोहिणी॥ प्रलिह्यम धुसर्पिर्भ्यांकामलार्तः सुखीभवेत्॥

टी० ॥ ॥लोहभस्म, हळद, दारुहळद, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, कुटकी यांचें चूर्ण मध तूप यांचे बरोबर खावें ह्मणजे कामलेनें पीडित असेल तर सुखी होईल.

मंडूरचूर्णंपिच्चश्लक्ष्णंगोमूत्रेऽष्टगुणेपचेत्॥ पंचकोलंदेवदा रुमुस्ताव्योषफलत्रयं॥ विडंगंस्यात्पलिपलंपाकांतेचू- र्णितंक्षिपेत्॥भक्षयेत्कर्षमात्रंचतक्रेणानक्रभोजन्॥ पांडुशोफहलीमंचऊरुस्तंभंचकामलां॥ अर्शांसिहंति नोचित्रंहंसमंडूरकोह्ययम्॥

टी० ॥ ॥मंडूरभस्म चौरतोळे, त्याचे आठपट गोमूत्रांत शिजत ठेवावें, त्यां त पिंपळी, पिंपळमूळ चवक चित्रक, सुंठ, देवदार, नागरमोथा, मिरें, सुंठ, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, वावडिंग हीं चार चार तोळे चूर्ण करून टाकावीं; शिजल्यावर एक तोळा ताकाबरोबर खावें पथ्य ताकभात खावा. ह्मणजे पांडु, शोफ, हलीमक, उरुस्तंभ, कामला, अर्श यांचा नाश करि ते; याला हंस मंडूर ह्मणतात. ॥इतिहंसमंडूरः॥

रसगंधाभ्रलोहैक्यंपांड्वरिःपुटितंत्रिधा॥ कुमार्यातुचतु र्वल्लंपांडुकामलपूर्वत्दत्॥

टी० ॥ ॥पारा, गंधक, अभ्रकभस्म, लोहभस्म, हीं एकत्र करून कोरफडी- चे रसांच्या तीन भावना द्याव्या. ह्मणजे हा पांड्वरि रस होतो, चार वाल प्रमाणें सेवन केला असतां कामला, पांडु यांचा नाश करतो.॥इतिपांड्वरिः ॥ ॥ इति पांडुरोगचिकित्सा॥

अथरक्तपित्तलक्षणोपचारः

रक्तपित्तादृशंरक्तमूर्ध्वंचाधः प्रवर्तते॥ रोमकूपेभ्यसुग पच्छेत्यकांक्षारुचिर्वमिः॥ ऊर्ध्वंकर्णाक्षिनासास्येर्भेढ्ढयो निगुदैरधः॥साध्यमूर्ध्वमधोयाप्यमसाध्यंकफापहृतम्

टी० ॥ ॥ ऊर्ध्व द्वारानें अधोद्वारानें अति रक्त पडतें, नरोल शेळ रंभा वाटे पडतें आणि शीताकांक्षा अरुची ओकारी असें जांल लक्षण होतें त्या ला रक्तपित्त असें ह्मणतात. जें ऊर्ध्व द्वारानी जातें तें कान, नेत्र, नाक, तोंड यां पासून जातें तें साध्य आणि जें अधो द्वारानी जातें तें लिंग, यो नी गुद यांपासून जातें, तें कष्ट साध्य. आणि एकदांच खालचें वरचे द्वारा नी जातें तें असाध्य.

लोहितंछर्दयेद्यस्तुसततंलोहितेक्षणः॥
लोहितांगारस्वमेक्षीरक्तपितीविनश्यति

टी० ॥ ॥ तांमडें ओकतो, तांमडे नेत्र, स्वप्नांत लाल निरकोर पाहातो असा रक्तपिती विनाश पावेल.

अक्षीणबलमासाग्नेःकर्तव्यमपतर्पणम्

टी० ॥ ॥ ज्यांचें बल मांस आणि अग्नी क्षीण झाला नाहीं त्यालाउपायकरावा.

ऊर्ध्वगेरेचनंशस्तमधोगेवमनंहितम्

टी० ॥ ॥ ऊर्ध्व रक्त जाणारें असेल तर रेचन द्यावें, आणि अधोगत असेल तर वमन द्यावें.

आरग्वधेनधात्र्यावात्रिवृताधथ्ययाथवा
विरेचनंप्रयोक्तव्यंशर्करामाक्षिकोत्तरम्

टी० ॥ ॥ बाहावा, आंवळकाठी, अथवा तेड हिरडा यांचा काढा करून त्यां त मध साखर घालून द्यावें ह्मणजे रेच होऊन रक्त पित्त बंद होतें.

नस्यंदाडिमपुष्पोत्थंरसोदूर्वाभवोथवा
आम्रास्थितःपलांडोर्वानासिकास्त्युतरक्तजित्

टी० ॥ ॥ डाळिंबाचे फुलाचे रसानें, किंवा दूर्वाचे रसानें, किंवा आंब्याचे को ईचे रसानें, किंवा उळीचे कांद्याचे रसानें नस्य करावें ह्मणजे नाकांतून रक्त पडणें बंद होईल.

भृंगीगृहंतुक्षीरेणानारीणांनावनाज्जये
त् लोहंखदिरसारेणनासिकारक्तनाशनम्

टी० ॥ ॥ कुंभार माशीचे घर, स्त्रियांचे दुधांत उगाळून नस्य करावें ह्मण जे रक्त बंद होतें. आणि लोह भस्म आणि खदिर सार दोनी एकत्र क रून नाकांत ओढावें ह्मणजे रक्त बंद होतें.

वृषपत्राणिनिष्पीड्यरसंसमधुशर्करम्
अनेनप्रशमंयातिरक्तपित्तंसुदारुणम्

टी० ॥ ॥ अडूळशाचा रस, मध साखर एकत्र करून प्यावें ह्मणजे भयंकर रक्त पित्त शांत होतें.

ह्रीबेरधान्यकशठीचंदनंमधुयष्टिका
वृषोशीरयुतःक्वाथःशर्करामधुयोजितः

टी० ॥ ॥ वाळा, धणे, स्कंद, चंदन, जेष्टीमध, अडूळसा, काळावाळा यांचा काढा साखर मध घालून प्याचा ह्मणजे रक्त पित्त, तृषा, दहा, ज्वर हे दूर होतात.

आटरूषकमृद्वीकापथ्याक्वाथःसशर्करः
क्षौद्राढ्यःसकणःश्वासरक्तनिबर्हणः॥

टी० ॥ ॥ अडूळसा, मनुका, हिरडा यांचा काढा साखर मध पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा ह्मणजे श्वास रक्त पित्त यांचा नाशक आहे.

मुद्गाःसलाजाःसयवाःसकृष्णाःसोशीरमुस्ताःसहचंदनेन
बलाजलेःपर्युषितःकषायःसरक्तपित्तंशमयत्युदीर्णं॥

टी० ॥ ॥ मूग, लाह्या, सातु, पिंपळी, वाळा, नागरमोथा, चंदन चिकणा हीं पूर्व दिवशीं भिजत घालून दुसरे दिवशीं काढा करून प्यावा ह्मणजे रक्त पित्त शांत होतें.

पक्वोदुंबरकाश्मर्यपथ्याखर्जूरगोस्तनीः
मधुनाघ्नंतिसंलीढारक्तपित्तंपृथक्पृथक्

टी० ॥ ॥ पिकलेलें उंबराचें फळ, शिवणीचें फळ, हिरडा, खजूर, मनुका यांतून कोणतें एक फळ मधाबरोबर खाल्लें असतां रक्त पित्त नाशक आहे.

शृंगगैरिकयोःकल्कंधातक्यामधुकस्यच
घ्राणस्रुतेसृज्निभोक्तंयोषितृक्षीरेणनावनं

टी० ॥ ॥ आलें, तुरटी, धायटीचें फूल जेष्टीमध इतक्यांचें चूर्ण स्त्रियांचे दुधांत घालून नस्य करावें ह्मणजे नाकांतून पडणारें रक्त बंद होतें.

मूलानिपुष्पाणिचमातुलिंग्याःसमंपिबेत्तंदुलधावनेन
॥ घ्राणप्रवृत्तेजलमाशुदेयंसशर्करंनासिकयोःपयोवा

टी० ॥ ॥ महाळुंगीचीं मुळें किंवा फुलें तांदुळांचे धुणांत वाटून प्यावीं किंवा त्यांचा रस काढून त्यांत साखर घालून किंवा दूध घालून नाकांत घालावें ह्मणजे नाकांतील रक्त बंद होतें.

उदुंबराणिपक्वानिगुडेनमधुनापिबा॥
उपभुक्तानिनिघ्नंतिनासारक्तंनृणांध्रुवं
टी० ॥ ॥ उंबराचीं पिकलेलीं फळें गुळाबरोबर किंवा मधाबरोबर खाल्लीं अस
ता नाकांतून पडणारें रक्त बंद करतात.

हरीतकीदाडिमपुष्पदूर्वालाक्षारसोनस्यविधानयोगात्॥
निवारयत्येवचिरप्रवृत्तमप्याशुनासांतरशोणितौघम्॥
टी० ॥ ॥ हिरडा, डाळिंबाचें फूल, दूर्वांचा रस नाकांत घातला म्हणजे फार दि
वस पडणारें जें नाकांतील रक्त तें बंद होईल.

शृतेनाजेनपयसासंपिष्टंकुंकुमंपिबेत्
ऊर्ध्वरक्तविनाशायतेनैवाजेनभोजनम्
टी० ॥ ॥ शेळीचे दुधांत केशर शिजवून प्यावें; आणि शेळीचे दुधाबरोबर भा
त खावा म्हणजे ऊर्ध्व रक्त बंद होतें.

यष्टीमधुसमायुक्तंक्षीरंसंक्वाथ्यशीतलं॥
शर्करामधुसंमिश्रंरक्तपित्तापहंपिबेत्॥
टी० ॥ ॥ जेष्टमध दूध यांचा काढा करून थंड झाला म्हणजे त्यांत साख
र मध घालून प्यावा म्हणजे रक्त पित्ताचा नाश करील.

पलाशकल्कःक्वाथोवासुशीतःशर्करान्वितः
पिबेद्वामधुसर्पिभ्यांगवाश्वशकृतोरसम्॥
टी० ॥ ॥ पळसाचीं फुलें वाटून त्यांत साखर घालून प्यावीं; अथवा त्यांचा
काढा करून त्यांत साखर घालून प्यावा; अथवा गाईचे शेणाचा रस, अथवा
घोड्याचे लेंड्यांचा रस घालून त्यांत मध तूप घालून प्यावा; म्हणजे रक्त बंद
होतें.

सक्षौद्रंग्रंथितेरक्तेलीढ्वापारावतंशकृत्
टी० ॥ ॥ शरीरांत रक्ताच्या गांठी वळल्या असतां मधाबरोबर पारव्याची विष्टा
खावी.

अतिनिस्रुतरक्तोवाक्षौद्रेणरुधिरंपिबेत्
टी० ॥ ॥ ज्याच्या अंगांतून फार रक्त गेलें असेल त्याणें मधाबरोबर केशर खा
वें.

खदिरस्यप्रियंगूनांकोविदारस्यशाल्मलेः
पुष्पचूर्णानिमधुनालीढ्वाहृद्रक्तपित्तनुत्
टी० ॥ ॥ खैर, राळे, कोरळ, सांवरी यांचे फुलांचें चूर्ण मधाबरोबर चाटावें म्ह
णजे रक्त पित्त दूर होतें.

अश्वत्थपत्राग्ररसात् षडंशो बोलोथ नस्यात् द्विगुणं मधु स्यात् ॥ रक्तप्रवाहं हृदयास्थितं वा वातो यथाभ्रं हरते तथैव ॥

टी० ॥ ॥ पिंपळाचे पानाच्या अग्राचा रस एक भाग आणि साहा भाग रक्त्या बोळ, त्याचे दुप्पट मध असें एकत्र करून प्यावें ह्मणजे रक्ताचा प्रवाह किंवा हृदयांत सांचलेलें रक्त, वारा जसा मेघास दूर करितो या प्रमाणें दूर करील.

जयेन्मासाश्रितं रक्तं लीढं वा क्षौद्रपावकम्

टी० ॥ ॥ मधा बरोबर चित्रक चूर्ण चाटावें ह्मणजे नाकांतील रक्त नाहींसें होतें.

गंधं सूतं माक्षिकं लोहचूर्णं सर्वं घृष्टं त्रैफलेनोदकेन ॥ लोहे पात्रे गोपयं सानुवस्त्वा रात्रौ दद्याद्रक्तपित्तप्रशांत्यै ॥

टी० ॥ ॥ गंधक, पारा, माक्षिक भस्म, लोह भस्म, सर्व एकत्र करून लोखंडाचे पात्रांत त्रिफळाचे काढ्यानें खलावें आणि गाईचे दुधाबरोबर रात्रीं प्यावें ह्मणजे रक्त पित्त शांत होतें. ॥ इति रक्त पित्त कथा० ॥

शालिषष्टिकनीवारचणमुद्गामसूरकाः
श्यामाकाश्च प्रियंगश्च भोजनं रक्तपित्तिनां

टी० ॥ ॥ तांदूळ साठेसाळीचे, नाचणी, वरी, हरभरे, मूग, मसूर, सांवे, राळे इतकीं धान्यें रक्त पित्ती मनुष्यास भोजनास योग्य आहेत. ॥ इति रक्त पित्तचिकित्सा ॥

अथ राजयक्ष्मलक्षणोपचारः

दैन्यं कासमदांगभेदवमथुश्लेष्माप्यतिश्वासताशोषस्तालुतलेग्निमांद्यमसकृन्निष्ठीवनं गात्ररुक् ॥ दाहः पादकरांबुजे स्वरहतिर्जाड्यं च हिक्काज्वरो विड्भेदक्लमपीनसारुचियुतः स्याद्राजयक्ष्मागदः ॥

टी० ॥ ॥ दैन्य, खोकला, मद, आंग दुखणें, ओकारी, कफ, अतिश्वास, तालुस्थानीं शोष, अग्नी मंद, वारंवार खांकेरे टाकणें अंगास ठणका लागणें, हातां पायांचा दाह, स्वर बदलनें, जडपणा, उचकी, ज्वर, मळाच्या गुठळ्या वळणें, ग्लानी, पीनस, अरुची या लक्षणांनीं युक्त राज यक्ष्मा असतो.

किंचिल्लिंगयुतं दीप्तपावकं त्वकृशान्नरम्
उपचरेदात्मवंतं यक्ष्मिणं साध्यलक्षणम्

टी० ॥ ॥ थोडे लक्षणांनी युक्त, अग्नि प्रदीप्त, कृश नाहीं, विचारवान् असा जो क्षय रोगी तो साध्य उपचार करण्यास योग्य आहे.

अर्धलिंगैः कृच्छ्रसाध्यं सर्वलिंगैः परित्यजेत्

टी० ॥ ॥ अर्धी चिन्हें झाल्यावर कृच्छ्र साध्य ह्मणजे कष्ट साध्य आणि सर्व चिन्हें झाल्यावर असाध्य याला उपचार करूं नये.

अन्नस्यद्वेषिणंकृच्छ्रमेहिनंशुक्रलक्षणम्
स्त्रीसक्तंपथ्यक्षीणंवाक्षीणाशुक्रंपरित्यजेत्

टी० ॥ ॥ अन्नद्वेषी कृच्छ्रमेही ह्मणजे कष्टानें मूत्र वगैरे होतात तो. पांढरा झालेला, स्त्रीसक्त, पथ्य न करणारा, क्षीण धातु असा जो क्षयी त्यास उपचार करूं नये.

क्षीयंतेधातवःसर्वेततःशुष्यतिमानवः परंदिनसहस्रंतुयदि
जीवतिमानवः॥ सुभिषक्भिरुपक्रांतस्तरुणःशोषपीडितः

टी० ॥ ॥ पूर्वी या रोगांत सर्व धातू क्षीण होतात, नंतर मनुष्य क्षीण होतो, ह्मणून याला क्षय ह्मणतात, आणी क्षय जाला होतो तो क्षयी, हा तरुण आणी चांगले वैद्यानीं उपचार केलेला फार वांचला तर सहस्र दिवस वांचेल.

मलायत्तंबलंपुंसांशुक्रायत्तंतुजीवितम्
तस्माद्यत्नेनसंरक्षेद्यक्ष्मिणोबलरेतसी

टी० ॥ ॥ मनुष्याचें बळ, शरीरांत मळ आहे तों पर्यंत आहे. आणी शुक्र ह्मणजे वीर्य आहे तों पर्यंत जीवित आहे; या साटीं मनुष्यानें रेत, मळ हें रक्षण करावें.

पुरीषंयत्नतोरक्षेच्छुष्यतोराजयक्ष्मणः॥
सर्वधातुक्षयार्तस्यबलंतस्यहिविट्बलम्

टी० ॥ ॥ क्षयानें शुष्क जो मनुष्य त्यानें पुरीष यत्नानें रक्षण करावें; ह्मणजे येनानें थोडें शौचास होईल, असा उपाय करावा. कारण सर्व धातूंचे क्षयानें पीडित जो मनुष्य त्याला पुरीष बल हेंच बल आहे.

क्षयादौशोधनंदद्याद्वमनंरेचनंतथा॥
वातश्लेष्महरंक्वाथंदद्याद्दोषापहंपुरा॥

टी० ॥ ॥ क्षयाचे आरंभीं वमन किंवा रेचन असें शोधन द्यावें; आणि वात कफ हरण करणारा असा दोष शामक काढा द्यावा.

कृष्णाद्राक्षासितालेहः क्षयहाक्षौद्रतैलवान्॥ मधुसर्पि
र्युतोवाश्वगंधाकृष्णासितोद्भवः॥

टी० ॥ ॥ पिंपळी मनुका, साखर, मध, शिरसाचें तेल यांचा लेह क्षय नाशक

आहे. आणि मध तूप, आस्कंद पिंपळी सारवर यांचा लेह क्षय नाशक आहे.

फलत्रिककाथविशुद्धमादौसिद्धगुडूच्यादशमूलसिद्धम्
स्थिरादिकाकोलिकगादिसिद्धशिलाजतुस्यात्क्षयिषुप्रशस्तं

टी० ॥ ॥हिरडा, बेहडा, आंवळकाठी, यांचे काढ्यांत शिलाजीत बारीक करून पुरचुंडी बांधून शिजवून शुद्ध करून नंतर गुळवेलीचा काढा दशमूळांचा काढा स्थिरादी काढा काकोल्यादि काढा यांचा भावना देऊन सिद्ध केलेला शिलाजीत क्षयावर प्रसिद्ध आहे.

वृंताकंकारवल्लंचतैलंबिल्वंचराजिका ॥
मैथुनंचदिवानिद्रांक्षयीकोपिविवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥वांगें, कारलें, तेल, बेलफळ, मोहऱ्या, मैथुन दिवसास झोप इतकीं क्षयी मनुष्यानें वर्ज करावीं.

दशमूलबलारास्नापुष्करामरदारुनागरैः क्वथितम्॥
पेयंपार्श्वांसशिरोरुक्क्षतकासादिशांतयेसलिलम्॥

टी० ॥ ॥दशमुळें, चिकणा, रास्ना, पोखर मूळ, देवदार, नागरमोथा यांचा काढा प्यावा ह्मणजे कुशी, खांदे, डोकें या ठिकाणचा शूल, उरःक्षत खोकला श्वास हे शांत होतील. ॥ दशमूलादीः ॥

शर्करामधुसंयुक्तंनवनीतंलिहन्क्षयी
क्षीराशीलभतेपुष्टिमतुल्यंचाज्यमाक्षिके

टी० ॥ ॥खडीसाखर मध, लोणी एकत्र करून खावें अथवा तूप आणि मध एकत्र करून खावें; मध आणि तूप हीं समभाग नसावीं वर्ती दूध प्यावें ह्मणजे पुष्ट होतो.

कूष्मांडकगिरोत्थेनरसेनपरिपेषितम्
लाक्षाकर्षद्वयंपीत्वाजयेद्रक्तक्षयंतथा

टी० ॥ ॥कोंहोळ्याचे गिराचा रस काढून त्यांत लाखेचें चूर्ण दोन तोळे सुमार टाकून प्यावें ह्मणजे रक्त क्षय होणार नाहीं.

शतपुष्पासमधुकंकुष्ठंतगरचंदनै आ
लेपनंस्यात्सघृतंशिरःपार्श्वांसशूलनुत्

टी० ॥ ॥बडिशेप, जेष्टीमध, कोष्टकोलिंजन, तगर, चंदन हीं वाटून तूप घालून लेप करावा ह्मणजे डोकें, कुशी, खांदे यांचे ठिकाणी शूल होत नाहीं.

एलापत्रंनागपुष्पंलवंगाभागस्त्वेषांद्वौचरवर्जूरकस्य
द्राक्षायष्टीशर्करापिप्पलीनांचत्वार्येतत्क्षौद्रयुक्तंक्षयेस्यात्

टी० ॥ ॥वेलदोडे, तमालपत्र, नाग केशर, लवंगा यांचा एक भाग; खजूर दोन भाग; मनुका, जेष्टी मध, सारवर, पिंपळी यांचे भाग चार सर्व एकत्र करून चूर्ण करावें आणि मधा बरोबर खावें. क्षयावर प्रशस्त आहे.

बलाविदारीश्रीपर्णीबहुपत्रीपुनर्नवा ॥
पयसानित्यमभ्यस्ताःशमयंतिक्षतक्षयं

टी० ॥ ॥चिकणा, भुई कोंहळा, शिवण, कांटेशेचती, घेटोळी, ही वाटून दुधा बरोबर घ्यावी, उरक्षत क्षय यांचा नाश करील.

सधान्ययवगोधूमामुद्गाश्चापिसदाहिताः
स्त्रियश्चतुःपदेश्रेष्ठाःपुमांसोविहगामताः

टी० ॥ ॥ धणे, सातु, गहू, मूग चार पायांचे जनावरा मध्यें स्त्री जाती, आणि पक्षांत पुरुष जाती हे क्षय रोग्यास हितकारक आहे.

छागंमांसंपयश्छागंसर्पिश्छागंसशर्करं
छागोपसेवासततंछागमध्येतुयक्ष्मनुत् ॥

टी० ॥ ॥ शेळीचें मांस, दूध, तूप सारवर सहित सेवा, शेळ्यामध्यें बसणें, हें सर्व क्षयरोग नाशक आहे.

गीतवादित्रशब्दैश्चप्रियस्तुतिभिरेवच ॥ हर्षणाश्वासने
नित्यंगुरूणांसमुपासनैः ॥ ब्रह्मचर्येणदानेनतपसादेवता
र्चनैः ॥ सत्येनाचारयोगेनरविमंडलसेवया ॥ वैद्यविप्रार्च
नाच्चैवरोगराजोनिवर्तते ॥

टी० ॥ ॥ गीत, वाद्य, घोष, प्रियस्तुति, हर्ष आश्वासन, गुरूसेवा, ब्रह्मचर्य दान, तप, देवतार्चन, सत्य, आचार, सूर्याची सेवा, वैद्य, ब्राह्मण यांची सेवा पूजा केली म्हणजे राज यक्ष्मा निवृत्त होतो.

रसभस्मत्रिभागंस्याद्भागैकंहेमभस्मकम् ॥ मृतताम्रस्य
भागैकंशिलागंधकतालकं ॥ प्रतिभागद्वयंशुद्धमेकीकृत्वा
विचूर्णयेत् ॥ वराटान्पूरयेत्तेनचाजाक्षीरेणटंकणाम् ॥ पि
ष्ट्वातेनमुखंरुध्वामृद्भांडेसंनिधापयेत् ॥ शुष्कंगजपुटेपा
च्यंचूर्णयेत्स्वांगशीतलं ॥ रसोराजमृगांकोयंचतुर्गुंजः क्ष

यापहः॥ एकोनत्रिंशन्मरिचैर्घृतेनसहभक्षयेत्॥ दशानांपिप्पलीनांवाचूर्णंदत्वाप्रदापयेत्॥ क्षयेकासज्वरेपांडौग्रहण्यांचातिसारके॥

टी० ॥ ॥ पाऱ्याचें भस्म, ३ भाग; सुवर्ण भस्म १ भाग; ताम्र भस्म १ भाग; मनशीळ, गंधक, हरताळ प्रत्येक २ भाग हें एकत्र खलून कवड्यांत भरून नंतर शेळीचे दुधांत टांकणखार खलून त्या कवड्यांचीं तोंडें टांकणखारानें बंद करावीं, शुष्क झाल्यावर मडक्यांत भरून तोंड बंद करून गजपूट द्यावें स्वांगशीत झाल्यावर खलावें याला राज मृगांक ह्मणतात. एकुणतिस मिऱ्यांचें चूर्ण, अथवा दहा पिंपळ्यांचें चूर्ण; आणि तूप यांचे बरोबर ४ गुंजा खावा ह्मo क्षय खोकला, ज्वर, पांडु, ग्रहणी, अतिसार यांचा नाश होईल. इ० राजमृगांकः

## अथकासलक्षणोपचारः

प्राणोत्धुदानानुगतःप्रदुष्टःसंभिन्नकांस्यस्वनतुल्यघोषः निरेतिवक्त्रात्सहसासघोषोमनीषिभिःकासइतिप्रदिष्टः

टी० ॥ ॥ प्राण वायु दुष्ट होऊन उदान वायूशी संघर्ष करितो, आणि फुटकें कांशाचें भांडें वाजतें त्या प्रमाणें मुखांतून अकस्मात जो शब्द निघतो त्याला मुनि कास असें ह्मणतात.

पंचकासाःस्मृतावातपित्तश्लेष्मक्षतक्षयैः क्षयायोपेक्षिताःसर्वेबलिनश्चयथोत्तरम्

टी० ॥ ॥ वात, पित्त, कफ, उरक्षत, क्षय या पासून क्रमें करून वातकास, पित्तकास, कफकास, उरःक्षतकास, क्षयकास असे पांच प्रकारचे कास उत्पन्न होतात. ते उत्तरोत्तर एकापेक्षा एक अधीक त्यांची उपेक्षा केली असतां नाशक होतात.

शुष्कंविनिष्ठीवतिदुर्बलस्तुप्रक्षीणमांसंरुधिरंसपूयम्॥ तंसर्वलिंगंभृशदुश्चिकित्स्यंचिकित्सितज्ञाःक्षयजंवदंति ॥

टी० ॥ ॥ दुर्बल मनुष्य कोरडें खोकून नंतर कुजलेलें मांस, रक्त, पू, यांसहीत जो खाकेरा टाकतो तो कास ह्मणजे खोकला क्षयापासून झालेला असें वैद्य ह्मणतात हा असाध्य जाणावा.

अमृतानागरफंजीव्याघ्रपर्णीचसाधितःक्वाथः पीतःसकणाचूर्णःश्वासकासौजयत्याशु॥

टी० ॥ ॥ गुळवेल, नागरमोथा, भारंग, रक्त एरंड सालवण यांचा काढा पिंपळीचे चूर्णासहीत प्यालें असतां श्वास कास यांचा नाशक आहे.

तालीसपत्रंमरिचंनागरंपिप्पलीतुगा॥ यथोत्तरंभागवृद्ध्यात्वगेलाचार्धभागिकी॥ पिप्पल्यष्टगुणाचात्रप्रदेयाशीतशर्करा॥ श्वासकासारुचिहरंतच्चूर्णंदीपनंपरं॥ हृत्पांडुग्रहणीशोषप्लीहशोफज्वरापहं॥ छर्द्यतीसारशूलघ्नं मलवातानुलोमनं॥

टी० ॥ ॥ तालीसपत्र १ मिरें २ [मम्मरमोथा] ३ पिंपळी ४ वंशलोचन ५ दालचिनी॥ वेलदोडे॥ साखर खडी ३२ यांचें चूर्ण श्वास, कास, अरुची, हृद्रोग, पांडु, संग्रहणी, क्षय, प्लीहा, शोफ, ज्वर, ओकारी, अतीसार, शूल यांचें नाशक आहे. आणि मल, वायू, यांचे अनुलोमक दीपन आहे. ॥ इति ता० चू०

अपामार्गस्य पंचांगंसंपिष्टंनीलिकारसे॥ शिलातालकसंयुक्तंवस्त्रेपर्पटिकाकृता॥ साग्नौक्षिप्त्वाभवेद्धूमस्तंनिपीयमुखेनतु॥ वारयेदुस्तरंकासंश्वासंघोरंभयावहम्॥

टी० ॥ ॥ आघाड्यानें पंचांग ह्मणजे मुळासकट्या बियांसकट्यां सर्व झाड काळे निर्गुंडीचे रसांत वाटून त्यांत मनशीळ हरताळ घालून त्याची वडी वस्त्रानें गुंडाळून अग्नीत टाकावी. त्याचा धूर निघेल तो तोंडानें प्यावा, ह्मणजे घोर भयंकर असे श्वास कास निवारण करील.

संयुतंमधुसर्पिभ्यांचूर्णंत्रिकटुसंभवम्॥ निहंतितरसाकासान्त्रासांनिवसतांहरिः॥

टी० ॥ ॥ मिरें, संठ, पिंपळी यांचें चूर्ण मध तूप याचे बराबर खावें ह्मणजे शीघ्र कासाचा नाश करितें. जसा साधूंचे त्रासाचा नाश हरी करीतो.

सेवितंमधुखंडाभ्यांचूर्णंमरिचजंयदि
किमर्थंक्रीयतेचिंताश्वासकासपराजितैः

टी० ॥ ॥ मध खडीसाखर यांचे बराबर जर मिऱ्यांचें चूर्ण सेवन केलें तर श्वास कास जातो, तर श्वासकासानीं पराजित अशानीं चिंता कां करावी.

पिप्पलीपिप्पलीमूलंविश्वौषधबिभीतकैः
मधुनासेवितंकासःप्रशाम्यतिकुतूहलात्

टी०॥ पिंपळी, पिंपळमूळ, वेखंड, बेहेडा, संठ, यांचें चूर्ण मधाबरोबर चाटावें ह्मणजे कास सहज शांत होईल.

पचेत्स्फ्रुटासपंचांगापुटपाकेनतद्रसः॥

पिप्पलीचूर्णसंयुक्तः कासश्वासज्वरापहः

टी० ॥ ॥ रिंगणीचें झाड मुळां फुलां सुद्धां कुटून पुटपाक करून पक्व करावें, आणि त्याचा रस पिंपळीचे चूर्णा सहित प्यावा; ह्मणजे श्वास, कास, ज्वर यांचा नाश करील.

भार्गीद्राक्षासठीशृंगीपिप्पलीविश्वभेषजैः
गुडतैलयुतोलेहो हितोमारुतकासिनाम्

टी० ॥ ॥ भारंग, मनुका, कचोरा, काकडसिंगी, पिंपळी, सुंठ, गूळ, शिरसाचें तेल यांचा लेह वायूचे खोकल्यास हितकारक आहे.

श्रीखंडयष्टीमधुशालिपर्णीपाठापटोलेंद्रयवाबृहत्यौ॥
मूर्वागुडूचीकटुकाकषायःक्षयोत्थकासेचसपिप्पलीकः॥

टी० ॥ ॥ चंदन, जेष्टीमध, साल्वण, पाहाडमूळ, कडु पडवळ, इंद्रजव, रिंगणी, डोरली, मोरवेल, गुळवेल, कुटकी यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून प्यावा, ह्मणजे क्षयापासून झालेला खोकला दूर होतो. ॥ इतिश्रीखंडादिक्काथः॥

तुल्यालवंगमरिचाक्षफलत्वचस्युःसर्वैःसमोनिगदितः
खदिरस्यसारः॥ बब्बूलवल्कलकषायजुषांचतुर्णांका
सान्निहंतिवटिकाघटिकात्रयेण॥

टी० ॥ ॥ लवंगा, मिरें, बेहेडेदळ हीं समभाग यांचे बरोबर खदिरसार घेऊन सर्व कुटून एकत्र करून बाभळीचे सालीचे काढ्यांत टाकून वडी करावी, ती वडी सेवन केली असतां तीन घटिकांत खोकला जातो.

सौभाग्यहिंगुलकणागरलंमरीचंसंमर्द्यनिंबुजरसेन
दिनत्रयंच॥ आनंदभैरववटीतुवरीप्रमाणानानानुपान
सहितासकलामयघ्नी॥

टी० ॥ ॥ टांकणखार, हिंगूळ, पिंपळी, बचनाग, मिरें हीं लिंबाचे रसांत तीन दिवस खलून तुरी येवढ्या गोळ्या करून एकेक गोळी त्या त्या अनुपाना बरोबर खावी ह्मणजे सर्व रोग नाशक आहे.

अर्कमूलशिलेतुल्येततोर्धेनकटुत्रिकम्॥ चूर्णितंवन्हि
निक्षिप्तंपिबेद्धूमंतुयोगवित्॥ भक्षयेदथतांबूलंपिबेद्दु
ग्धमथांबुवा॥ कासाःपंचविधायांतिशांतिमात्रनसंशयः.

टी० ॥ ॥ रुईचें मूळ १ मनशीळ १ सुंठ, मिरें, पिंपळी मिळून निमे भाग घेऊन

त्या सर्वांचें चूर्ण करून अग्नीत टाकून त्याचा धूर युक्तीनें प्यावा, नंतर विडा खावा, किंवा दूध अथवा पाणी प्यावें, ह्मणजे पांच प्रकारचे कास लोकर शांत होतील यांत संशय नाहीं.

मनःशिलालंमरिचंमांसीमुस्तातथेंगुदी
एषांधूमंपिबेच्चानुरवोष्णंसगुडंपयः

टी० ॥ ॥ मनशीळ, कंकोळ, मिरें, जटामांसी, नागरमोथा, हिंगणबेट यांचा धूर प्यावा, आणि वर मंदोष्ण पाणी गूळ घालून प्यावें.

एषकासान्पृथक्द्वंद्वसन्निपातसमुद्भवान्
शनैरपिप्रयोगेणसाधयेदप्रसाधितान्॥

हा धूमप्रयोग सर्व प्रकारचे कास यांचा नाशक आहे. ॥ इतिमनःशिलादिधूमः

मनःशिलालिप्तदलंबदर्याःशुष्कमातपे॥
सक्षारंधूमपानंच्चमहाकासनिबर्हणम् ॥

टी० ॥ ॥ मनशीळ जवखार पाण्यांत उगाळून बोरीचे पानाला लेप करून उन्हांत वाळवून विडी ओढावी धूर प्यावा ह्मणजे मोठा खोकला असला तरी नाश होईल.

श्वासकासहरौबर्हिपादौवाक्षौद्रसर्पिषा॥
लिह्यान्मरिचचूर्णंवासघृतंक्षौद्रशर्करं॥

टी० ॥ ॥ मोराचे पाय, मध, तूप यांचे बरोबर खावे. हे श्वास कास हारक आहेत. अथवा मिऱ्यांचें चूर्ण, तूप, साखर, मध यांचे बराबर खावें ह्मणजे श्वासकास दूर होतात.

बदरीपत्रकल्कंवाघृतभृष्टंससैंधवम् ॥
स्वरोपघातेकासेचलेहमेनंप्रयोजयेत्

टी० ॥ ॥ बोरीचीं पानें वाटून तुपांत तळून सैंधव घालून लेह करून चाटावा ह्मणजे स्वर बदलनें किंवा कास यावर प्रशस्त आहे.

जातिजटाकिसलयैर्बदरीदलैश्चजातीमसूरकफलैः
समनःशिलैश्च॥ स्याद्धूमवर्तिरिहगुग्गुलुनासमेतैः
कासेस्थितेबदरिकाग्निविदह्यमानैः॥

टी० ॥ ॥ जाईचीं मुळें, आणि पल्लव, बोरीचीं पानें, जायफळ, मसूरा, मनशीळ, गुग्गुळ हीं एकत्र कुटून चूर्ण करून बोरीचे लांकडाचा अग्नी करून

त्यावर टाकून धूर घ्यावा, ह्मणजे कास बरा होतो. ॥ इ० जातीधूमः ॥

गुडक्षारोषणाकणादाडिमंश्वासकासाजित्
क्रमात्सलूयाधाक्षकर्षाधाक्षपलोन्मितम् ॥

टी० ॥ ॥ गूळ ८ तोळे, जवखार ॥ तोळा, मिरें अर्ध तोळा, पिंपळी १ तोळा, डाळिंब ४ तोळे या प्रमाणे घेऊन खलून गोळ्या करून शक्ति प्रमाणें खाव्या ह्मणजे श्वास कास दूर होईल.

त्रिजातमर्धकर्षांशंपिप्पल्यर्धपलंसिता ॥ द्राक्षामधुक
खर्जूरंपलांशंश्लक्ष्णकल्कितम् ॥ मधुनागुटिकांघ्नंतिता
वृष्यापित्तशोणितम् ॥ कासश्वासारुचिच्छर्दिमूर्छाहि
ध्ममधभ्रमान् ॥ क्षतक्षयस्वरभ्रंशप्लीहशोषाढ्यमारु
तान् ॥ रक्तनिष्ठीवहृत्पार्श्वरुक्पिपासाज्वरानपि ॥

टी० ॥ ॥ दालचिनी ॥ तोळा, तमालपत्र ॥ तोळा, वेलदोडे ॥ तोळा, पिंपळी २ तोळे, खडीसाखर ४ तोळे, मनुका ४ तोळे, जेष्ठीमध ४ तोळे, खजूर ४ तोळे या प्रमाणें घेऊन बारीक खलून गोळ्या करून यथा शक्ती भक्षण कराव्या. त्या वीर्य वर्धक आणि रक्त पित्त श्वास कास अरुची ओकारी मूर्छा उचकी मद भ्रम उरक्षत क्षय स्वरनाश पांथरी शोष वायू घशांतून रक्त पडणें, हृदय कुशी यांला शूल महान ज्वर यांचा नाशक आहेत. ॥ इति त्रिजात गुटिका ॥

अभ्रकंहरबीजंचतीक्ष्णंशुल्बसमन्वितम् ॥ कासमर्दव
रागस्तिवलसाम्लैर्विभावयेत् ॥ चतुर्गुंजावटीहंतिका
संपंचविधंतथा ॥

टी० ॥ ॥ अभ्रक भस्म, पारा, गंधक, पोलादभस्म, ताम्रभस्म, हीं एकत्र करून कास विंदा, हिरडा, बेहेडा आंवळकाठी, अगस्ता, आम्ल वेतस यांचे रसाच्या भावना द्याव्या. ह्मणजे हा कासारी रस होतो, त्याची चार गुंजा प्रमाण गोळी खावी, पांच प्रकारचे कास दूर करिते. ॥ इति कासारिः ॥

इतिकासचिकित्सासमाप्तः ॥ ॥ अथहिक्काश्वासलक्षणोपचारः

मुहुर्मुहुर्वायुरुदेतिसस्वनोयकृत्प्लीहांत्राणिमुखादि
वाक्षिपन् ॥ सघोषवानाशुहिनस्तियस्मात्तलस्तहि
क्केत्यभिधीयतेबुधैः ॥

टी० ॥ ॥ वारंवार जो वायू शब्द करणारा आणि मुखानें यकृत्प्लीहा आंतडी

फेंकतोच काय असा ऊर्ध्व येतो त्याला हिक्का असें ह्मणतात, हिक्का असें ह्मणण्याचें कारण? तो येऊ सारखा शब्द करून प्राणासत हिनस्ति ह्मणजे नाशितो ह्मणून हिक्का असें ह्मणतात.

येरेवकारणैर्हिक्काबहुभिःसंप्रजायते ॥
तैरेवकारणैःश्वासोघोरोभवतिदेहिनां

टी० ॥ ॥ ज्या कारणानीं हिक्का होतो त्याच कारणानीं मनुष्यास श्वासहोतो, तो घोर आहे.

ऊर्ध्वःश्वासेप्रकुपितेत्यधःश्वासोनिरुध्यते
मुह्यतेताम्यतेचोर्ध्वंश्वासस्तस्यैवहंत्यसून्

टी० ॥ ॥ ऊर्ध्व श्वास कुपित झाला असतां अधःश्वास कोंडतो; आणि वर्ती शुद्धमरुन येतो त्याचे प्राण श्वास नाशितो.

ग्रीवाशिरसिसंगृह्यश्लेष्माणंसमुदीर्यच
करोतिपीनसंतेनरुध्वोघुर्घरकंतथा ॥ ७

टी० ॥ ॥ गळ्यांत डोक्यांत येतो, आणि कफ वर्ती आणितो, पडसें उत्पन्न करितो, मग कोंडतो आणि घुर्घुर शब्द करितो.

श्लेष्मणादह्यमानेनभृशंभवतिदुःखितः
तस्यैवचविमोक्षांतेमुहूर्तंलभतेसुखम्

टी० ॥ ॥ श्वासाचे योगानें कफ दग्ध होऊन घट्ट होतो आणि अडकतो तेणें करून अति दुःख होतें तो पडल्यावर दोनघटिका सुख होतें.

हिक्काश्वासीपिबेद्भार्गींसविश्वामुष्णवारिणा
नागरंवासिताभार्गीसौवर्चलसमन्वितम् ॥

टी० ॥ ॥ हिक्का, श्वास ज्याला असेल त्याणें सुंठ भारंगमूळ यांचे चूर्ण ऊन पाण्या बरोबर घ्यावें अथवा सुंठ साखर भारंग मूळ, पादेलोण यांचे चूर्ण खावें.

शृंगीकटुत्रिकफलत्रयकंटकारीभार्गीसपुष्करजटा
लवणानिपंच ॥ चूर्णंपिबेदशिशिरेणजलेनहिक्का
श्वासोर्ध्ववातकसनारुचिषुमशस्तम् ॥

टी० ॥ ॥ कांकडशिंगी, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, रिंगणी, भारंगमूळ, पोखरमूळ, जटामांसी, सैंधव, पादेलोण, बिडलोण, काचलोण, मीठ यांचे चूर्ण ऊन पाण्या बरोबर घ्यावें ह्मणजे हिक्का श्वास ऊर्ध्व वात, खोकला, अरुची, यांचा नाश करील. ॥ इतिशृंगादिचूर्णं ॥

शुंठीकणामरिचनागदलत्वगेलाचूर्णकृतंक्रमविवर्धितमू
र्ध्वमंत्यात्॥खादेदिदंसमसितंगुडजाग्निमांद्यकासा
रुचिश्वसनकंठहृदामयेषु॥

टी० ॥ ॥ सुंठ ६ पिंपळी ५ मिरें ४ विड्याची पानें ३ दालचिनी २ वेलदोडा १ या प्रमाणें घेऊन चूर्ण करून बरोबरीनें साखर घालून खाल्लें असतां मुळव्याध, अग्नीमांद्य, खोकला, अरुची, श्वास, कंठरोग, हृद्रोग यांवर प्रशस्त आहे. मधुकंमधुसंयुक्तंपिप्पलीशर्करान्विता

नागरंगुडसंयुक्तंहिक्काघ्नंनावनत्रयम्

टी० ॥ ॥ जेष्ठीमध, मध ॥ पिंपळी साखर ॥ आलें गूळ ॥ हीं तीन नस्यें हिक्का नाशक आहेत.

कटुतैलेनसंयुक्तोगुडोयावन्नसेवितः॥
तावन्नश्यतिकिंश्वासःपीयूषमधुराधरे

टी० ॥ ॥ शिरसाचें तेल, आणि गूळ जों पर्यंत सेवन केला नाहीं तों पर्यंत हे अमृत तुल्य मधुर ओष्ठेश्वास नष्ट होईल कीं काय?

कपित्थस्वरसोवापिरसआमलकस्यच ॥
पिप्पलीक्षौद्रसंयुक्तोहिक्काश्वासनिवारणः

टी० ॥ ॥ कंवठाचा आंगरस, किंवा आंवळ्याचा आंगरस, मध, पिंपळी सहीत हिक्का श्वास यांचा निवारक आहे.

खर्जूरंपिप्पलीद्राक्षाशर्कराचेतितत्समं ॥
मधुसर्पिर्युतोलेहोहिक्काश्वासनिवारणः॥

टी० ॥ ॥ खजूर, पिंपळी, मनुका, साखर हीं समभाग घेऊन त्यांत मध तूप घालून लेह करावा, तो हिक्का श्वास निवारक आहे.

मर्कटीनांतुबीजानांचूर्णंमाक्षिकसर्पिषा
मलिह्यात्प्रातरुत्थायश्वासार्तःस्वास्थ्यमाप्नुयात्

टी० ॥ ॥ कुईलीचे बीयांचें चूर्ण प्रातःकालीं मध तूप यां बरोबर चाटावें ह्मणजे, श्वासानें पीडित असेल तो स्वस्थ होईल.

हिंगुसौवर्चलाजाजीबिडपुष्करचित्रकैः
सिद्धाकर्कटशृंग्याचयवागूःश्वासहिक्किनां

टी० ॥ ॥ हिंग, पादेलोण, जिरें, बिडलोण, पोखरमूळ, चित्रक, काकडशिंगी

इतक्यानीं सिद्ध झालेली कांजी श्वास हिक्का हीं जांना आहेत त्यांस प्रशस्त आहे. गुडोषणनिशारास्नाद्राक्षामागधिकाःसमाः

तैलेनचूर्णितालीढास्तीव्रश्वासनुदस्मृताः

टी० ॥ ॥ गव्ह, मिरें, हळद, रास्ना, मनुका, पिंपळी हीं सर्व समभाग घेऊन यांचें चूर्ण शिरसाचे तेला बरोबर खावें ह्मणजे तीव्र श्वास दूर होतो.

कासमर्दकपत्राणांयूषः सौभांजनस्यच

शुष्कमूलकमंडस्ताहिक्काश्वासनिवारणः

टी० ॥ ॥ कासिंयाचे पानाचा अथवा शेवग्याचे मुळीचा किंवा वाळले मुळ्यांचा मंडहिक्का श्वास निवारक आहे.

हरिद्रापत्रमेरंडमूलंलाक्षांमनःशिलाम् ॥ सदेवदार्वलंमांसीपिस्त्वावर्तिंप्रकल्पयेत् ॥ तांघृताक्तांपिबेद्धूमंयवान्वाघृतसं

टी० ॥ हळदीचीं पानें, एरंडमूळ, लाख, मनशीळ, देवदार, हरताळ, जटामांसी, यांचें चूर्ण करून फडक्यास लाऊन वात करावी, ती तुपांत भिजवून अग्नीत टाकून त्याचा धूर प्यावा, अथवा सातूंस तूप लाऊन अग्नीत टाकून त्याचा धूर प्यावा ह्म० श्वास दूर होतो.

पिप्पलीमूलमधुकगुडगोश्वशकृद्रसान् ॥ हि

काभिष्यंदकासघ्नान्लीह्यान्मधुघृतान्वितान्

टी० ॥ ॥ पिंप्रकमूळ, जेष्टीमध, गूळ, गाय, घोडा, यांचे शकृत् इतक्यांचा निरनिराळा काढा मध तूप यां सहीत हिक्का श्वास अभिष्यंद यांचा नाशक आहे.

कुलित्थनागरव्याघ्रीवासाभिःक्वथितजलं, पीतंपोष्करसंयुक्तंकासश्वासनि

कुळगे, सुंठ, रिंगणी, अडूळसा, पोखरमूळ यांचा काढा कासश्वास निवारक आहे.

द्राक्षांहरीतकींमुस्तांकर्कटाख्यांदुरालभाम् ॥

सर्पिर्मधुभ्यांविलिहन्श्वासान्हंतिसुदारुणान्

टी० ॥ ॥ मनुका. हिरडा, नागरमोथे, कांकडशिंगी, धमासा यांचा लेह मध, तूप घालून करावा, तो खाल्ला असतां मोठा भयंकर श्वास दूर होईल.

रसाभ्रहेमभस्मानिवैक्रांतंसर्वतुल्यकम् ॥ सर्वैः पंचगुणांशं

स्वचूर्णंशंखविमर्दयेत् ॥ लेहयेन्मधुनामाषचतुष्कंसा

नुपानकम् ॥ हिक्कांपंचविधांहंतिसुसुखोरपितत्क्षणात्

टी० ॥ ॥ पाऱ्याचें भस्म १ अभ्रक भस्म १ सुवर्ण भस्म १ वैक्रांत भस्म १, २ शंख भस्म ३० हीं एकत्र खलून चार मासे प्रमाणें अनुपाना सहीत खा

वें ह्मणजे पांच प्रकारची हिक्का मुमूर्षु असला तरी त्याची नाश करील.

कासप्रकरणोक्तंचभिषगत्रनियोजयेत्
क्षयोक्तंवात्रकासेचहिक्काश्वासेनियोजयेत्

टी० ॥ ॥ कासप्रकरणांत सांगितलेलें औषध हिक्का श्वासाचे ठायीं वैद्यानीं योजावें; आणि क्षयावर सांगितलेलें औषध कास हिक्का श्वास यांचे ठा यीं योजावें.

अथस्वरभेदलक्षणोपचारः

अत्युच्चभाषणविषाध्ययनाभिघातसंदूषणैःप्रकुपि
ताःपवनादयश्च॥स्रोतःसुतेस्वरवहेषुगताःप्रदुष्टाह
न्युःस्वरंभवतिचापिहिषड्विधःसः॥

टी० ॥ ॥ फार मोठ्यानें बोलणें, विष, घोकणें, आंकूड, दगड वगैरे यांच्या धक्का इतक्या दोषानीं कुपित जे वायू पित्त, कफ ते स्वर वाहिनी शिरांचे ठाई गेलेले दुष्ट असे स्वर भेद करतात तो स्वरभेद साहा प्रकारचा.

वातेनकृष्णनयनाननमूत्रवर्चाभिन्नस्वरैर्वदतिगर्धभ
रूक्षस्वरंच॥पित्तेनपीतनयनाननमूत्रवर्चाब्रूयाद्गलेनच
सदाहसमन्वितेन॥ब्रूयात्कफेनसततंकफपूर्णकंठःस्वल्पं
शनैर्वदतिचापिदिवाविशेषात्॥सर्वात्मकेभवतिसर्ववि
कारलिंगंतंचाप्यसाध्यमृषयःस्वरभेदमाहुः॥

टी० ॥ ॥ वातानें स्वर भेद झाला असतां मुख, नेत्र, मूत्र, मल हे काळे; आ णि गाढवाचे स्वराप्रमाणें फुटक्या स्वरानें बोलतो; पित्तापासून असेल तर नेत्र, मूख, मूत्र, मल हे पिवळे आणि दाहयुक्त कंठानें बोलतो; कफानें असे ल तर नेहमीं घशांत कफ आणि फार हळू बोलतो. त्यांत दिवसास तर फारच हळू बोलतो. त्रिदोषापासून असेल तर सर्व विकार आणि सर्व चिन्हें असतात आणि तो सर्व असाध्य असें ऋषी ह्मणतात.

बिभीतकफलैर्युक्तापिप्पलीसैंधवंतथा
कांजिकेनभवेत्साध्यंस्वरभेदाद्विमुच्यते

टी०॥ बेहडा, पिंपळी, सैंधव यांचें चूर्ण कांजींत घालून प्यावें ह्मणजे स्वर भे दा पासून मुक्त होईल.

पिप्पलीपिप्पलीमूलंमरिचंविश्वभेषजम्
पिबेन्मूत्रेणमतिमान्कफजेस्वरसंक्षये

टी० ॥ ॥ पिंपळी, पिंपळमूळ, मिरें, सुंठ, यांचें चूर्ण गोमूत्रांत घालून घ्या वें, ह्मणजे कफापासून बिघडलेला स्वर नीट होतो.

चव्याम्लवेतसकटुत्रयतिंतिडीकंतालीसजीरकतुगा
दहनैः समांशैः ॥ चूर्णंगुडप्रमुदितंत्रिसुगंधियुक्तं
वैस्वर्यपीनसकफारुचिषुप्रशस्तम् ॥

टी० ॥ ॥ चवक, आम्लवेतस, सुंठ, मिरें, पिंपळी, आंबसल, तालीसपत्र, जिरें, वंशलोचन, चित्रक, दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे यांचें चूर्ण गू-ळा बरोबर खावें ह्मणजे स्वर भेद, पीनस, कफ, अरुची यांवर प्रशस्त आहे.

कासमर्दकवार्ताकिमार्कवैः स्वरसैर्युतं
क्षीरानुपानंपैत्तेषु पिबेत्सर्पिरतंद्रितः

टी० ॥ ॥ कासविंदा, वांगें, माका यांचा आंगरस तूप घालून घ्यावा; वर दूध घ्यावें ह्मणजे पित्ता पासून झालेला स्वर भेद नीट होतो.

आद्येकोष्णजलंपेयंजग्ध्वाघृतगुडोदनं
पीतंघृतंहंत्यनिलंसिद्धंमार्कवजेरसे ॥

टी० ॥ ॥ तूप भातांत गूळ घालून खावा, वर ऊन्ह पाणी घ्यावें ह्मणजे वाता पासून झालेला स्वर भेद नीट होतो. तसेंच माक्याचा रस तूप एकत्र करून आटवून तें तूप घ्यावें ह्मणजे वातानें बिघडलेला स्वर नीट होतो.

अश्नीयाच्चससर्पिष्कंयष्टीमधुकपायसं

टी० ॥ ॥ तूप, जेष्टीमधाचें चूर्ण खिरींत घालून ती खाल्ली असतां स्वर नीट होतो.

शर्करामधुमिश्राणिशृतानिमधुरैः सह
पिबेत्पयांसियस्योच्चैर्वदतोभिहतः स्वरः

टी० ॥ ॥ ज्याचा मोठ्यानें बोलून स्वरभेद झाला त्याणें साखर जेष्टीमध बदाम घालून तापलेलें दूध घ्यावें.

व्याघ्रीस्वरसविपक्कंरास्नावाट्यालगोक्षु
रव्योषैः सर्पिः स्वरोपघातंहन्यात्कासंचपंचविधं

टी० ॥ ॥ रिंगणीच्या आंगरस काढून त्यांत पक्क केलेलें अथवा रास्ना, लघु चिकणा, गोखरू, सुंठ, मिरें, पिंपळी, यांचे काढ्यांत पक्क केलेलें तूप; स्वरभेद, पांच प्रकारचा खोकला यांचा नाश करितें.

विहितमरुपाच्चूर्णान्यारनालेनसार्धम् ॥

कलितरुफलकृष्णासेंधवानिप्रलिह्यात

टी० ॥ ॥बहेडा,पिंपळी,सेंधव यांचें चूर्ण बारीक करून कांजींत घालून ध्यावें ह्मणजे स्वर भेदाचा नाश होतो.

अभिलषतिविजेतुंयःस्वरस्यप्रणाशं
सपिवतिसहदुग्धेनामलक्याःपलवा

टी० ॥ ॥स्वरभेद जिंकण्याची जो इच्छा करील त्याणें दुधांत आंवळकाठीची पूड टाकून प्यावें.

कासश्वासोपयुक्तारसाःप्रयोक्तव्याः

टी० ॥ ॥कासश्वासाचे ठाई उपयुक्त जे रस ते स्वरभेदाचे ठाई योजावे.

स्वरभेदस्यक्षयरोगांतःपातित्वात्क्षयरोगोक्तमेवकार्यम्

टी० ॥ ॥स्वरभेदही क्षयाचे पोटांत आहे,यासाठीं क्षयांत जें उक्त असेल तें औषध करावें. ॥ ॥ अथारोचकलक्षणोपचारः॥

वातादिभिःशोकभयातिलोभक्रोधैर्मनोघ्नाशनरूपगंधैः
आरोचकास्युःपरिहृष्टदंतकषायवक्त्रस्यसतोनिलेन॥

टी०॥ वातपित्त,कफ,शोक, भय, अतिक्रोध मनोभंग,वाईट रूप वाईटगंध इतक्यानी अरोचक ह्मणजे अरुची होते. वायूपासून जाला अरुची होते. त्याचे दांत शिवशिवतात आणी तोंड तुरट असतें.

अम्लिकागुडतोयंचत्वगेलामरिचान्वितम्
अभक्तछंदरोगेषुशस्तंकवलधारणम् ॥

टी० ॥ ॥ अन्नावर अरुची जास होते त्याणें चिंचेचें सरबत, गूळ, पाणी, दालचिनी, वेलदोडे, मिरें घालून करावें, आणि त्याचे बरोबर जेवावें.

कुष्ठसौवर्चलाजाजीशर्करामरिचंबिडम् ॥ धान्येलाप
द्मकोशीरपिप्पल्यश्चंदनोत्पलम् ॥ लोध्रंतेजोवतीपथ्या
त्र्यूषणंसयवाग्रजम् ॥ आर्द्रदाडिमनिर्यासःशाजाजीश
र्करायुतः॥ सतैलमाक्षिकास्त्वेतेचत्वारःकवलग्रहाः॥ च
तुरोरोचकान्घ्नंतिवातादेकजसर्वजान् ॥

टी० ॥ ॥कोष्टकोळिंजन, पादेलोण, जिरें, साखर, मिरें, बिडलोण, यांचें चूर्ण धणे, वेलदोडे, पद्मकाष्ट, वाळा, पिंपळी, चंदन कमळ यांचें चूर्ण लोध्र, मालकांगुणी, हिरडा, सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार यांचें चूर्ण आलें डाळिंब यांचा रस जिरें सा

खर युक्त हे चार योग शिरसाचें तेल मध याचे बराबर योजिले असतां कव
ळ ह्मणजे घांस याचे ग्राहक होतात, आणि वात, पित्त, कफ, सन्निपात
यांपासून झालेली चार प्रकारची अरुची तिचा नाश करितात.

शमयतिकेसरमरुचिंसलवणघृतमाश्रमातुलिंगस्य॥ दाडिमचर्वणमथवाचरकोरुचिकारिसूचयामास

टी० ॥ ॥ म्हाहाळुंगाचें केशर, सैंधव, तूप सहीत अरुची नाशक आहे, अथ
वा डाळिंबाचें चर्वण, ह्मणजे खाणें रुची कारक आहे असें चरकानें सुच
विलें आहे. पिप्पलाजाजीसधान्याकंघृतपस्थेविपाचयेत् कफपित्तारुचिहरंमंदानलवमिंजयेत्॥

टी०॥ जिरें धणे कुटून ६४ तोळे तुपांत पक्व करून शक्तिप्रमाणें खावें ह्मणजे कफ पित्त
यां पासून झालेली अरुची मंदागनी यांचा नाश करील.

अजाजीमरिचंकुष्टंबीडंसौवर्चलंतथा, मधुकंशर्करातैलंवातिकेमुखधावनं

टी०॥ जिरें, मिरें, कोष्टकोळिंजन, बिडलोण, पादेलोण, जेष्टीमध, साखर, शिरसाचें तेल ही एकत्र
करून याणें तोंड धुवावें ह्म० वाताची अरुची जाते. श्लो. कारंजंदंतकाष्टंचविधेयमरुचौसदा॥ किंचिल्लवणसंयुक्तंमारनालंषिपाचयेत्, तेनगंडूषकंकुर्यादास्यवैरस्यशांतये ॥टी० तोंडाची रुची असतां करंजाचे काष्ठानें दांत घांसावे आणि थोडें मीठ घालू

शर्करादाडिमंचाथद्राक्षाखर्जूरमेवच॥ केसरंमातुलिंगस्यसिंधुनामधुनापिवा॥ आस्यवैरस्यशमनंभक्षये त्कर्षसंमितम् ‹कांजीकरून चुळा›

टी० ॥ ॥ साखर, डाळिंब, मनुका, खजूर;॥ महाळुंगाचें केशर, सैंधवाशी किंवा
मधाशीं युक्त, यांतून कोणतें एक स्मारें तोळाभर भक्षिलें असता तोंडास रूची
येते. विडंगचूर्णकर्षंकंक्षौद्रैश्चतुर्गुणैर्धुतम्॥ असाध्यमपिसंहन्यादरुचिंवक्त्रधारणात् ॥

टी० ॥ ॥ वावडिंगाचें चूर्ण १ तोळा, मध ४ तोळे, यांची गोळी तोंडात धरावी; ह्मण
जे असाध्य जरी अरुची असली तरी तिचा नाश करील.

त्रिभूषणानित्रिफलारजनीद्वयंचचूर्णीकृतानियवशूकविमिश्रितानि॥ क्षौद्रान्वितानिवितरेन्मुखधावनार्थमन्यानितिक्तकटुकानिचभेषजानि॥

टी० ॥ ॥ दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आव

ळकाठी, हळद, दारुहळद, साळूचीं कुसें यांचें चूर्ण मधाशीं मिश्रकरून तोंड धुण्यास घ्यावें, आणखीही कडू निरवट औषधें घ्यावीं ह्मणजे अरुचीचा नाश होतो.

सिताव्योषकपित्थानांचूर्णंक्षौद्रेणलहुटी
सर्वारोचकशांत्यर्थंधारयेद्वदनांबुजे ॥

टी० ॥ ॥साखर, सुंठ, मिरें, पिंपळी, कंवठ यांचें चूर्णाची मधांत गोळी करून तोंडांत धरावी ह्मणजे अरुची शांत होते. ॥ इति अरोचकचिकित्सा ॥

## अथछर्दिलक्षणोपचारः

श्वासकासौज्वरोहिक्कातृष्णावैस्वर्यमेवच ॥ हृद्रोगस्तमकश्चैवज्ञेयाश्छर्देरुपद्रवाः ॥

टी० ॥ ॥कास, श्वास, ज्वर, हिक्का, तृष्णा, स्वर भेद, हृद्रोग, तमकश्वास इतके छर्दीचे ह्मणजे ओकारीचे उपद्रव आहेत.

ईषदुष्णासफेनायासशूलाचपुनःपुनः
छर्दिर्भवतिलक्ष्मेतद्वातच्छर्देःप्रकीर्तितं

टी० ॥ ॥किंचित उष्ण फेंसासहीत शूल युक्त वारंवार होणारी अशी वातछर्दी जाणावी.

सदाहालोहितापीताहरितोष्णाथवाभवेत्
छर्दिरिद्रवेल्लक्ष्मपित्तच्छर्देरसंशयम् ॥ ॥

टी० ॥ ॥दाहयुक्त, तांबडी, पिंवळी, अथवा हिरवी, उष्ण अशी पित्तच्छर्दी जाणा.

कफमिश्रासन्दाहामुहुर्मुहुःसघुर्घुरा,सदालाजंबालयुताश्लेष्मछर्दिःप्रकीर्तिता

टी०॥कफ मिश्र त्वरय दहानें युक्त वारंवार घुर्घुर शब्द सहीत जींत लाळ जळभेंट अशी कफछर्दी जा.

छर्दनंवमनंत्रेधंकुर्यात्तच्छांतिभेषजम्

टी०॥ छर्दनं ह्मणजे वमन जाणावें तीन ओकारी तिचे शांततेचें औषध करावें

एलालवंगगाजकेसरकोलमज्जालाजप्रियंगुधनचंदनपिप्पलीनां॥
चूर्णानिमाक्षिकसितासहितानिलिढ्वाच्छर्दिंनिहंतिकफमारुतपित्तजातां

टी०॥वेलदोडे लवंग नागकेशर बोराचे आंठीच मगज लाह्या राळे नागरमोथा चंदन पिंपळी यांचें चूर्ण मध साखर यांबराबर खावें ह्मणजे वात पित्त कफ यांची छर्दी नष्ट होईल.

चंदनंचमृणालंचवालकंनागरंवृषम् ॥ स तंदुलोदकक्षौद्रैःपीतःकल्कोवमींजयेत् ॥

टी० ॥ ॥चंदन, कमलाचा देंट, वाळा, नागरमोथा, अडूळसा हीं तांदुळाचे धुणांत वाटून मध घालून तें प्यावें ह्मणजे ओकारीला जिंकील.

सोदीच्यंगैरिकंदेयंसेव्यंवातंदुलांबुना ॥ जातीपत्ररसंकृष्णामरिचंशर्करान्वितं ॥ एतानिमधुयुक्तानिघ्नंतिछर्दिचिरोद्भवाम्

टी० ॥ ॥ वाळा, गेरू, तांदुळाचे धुणांत वाटून मध घालून प्यावें, अथवा जाईचे पानाचेरसांत पिंपळी, मिरें, यांचें चूर्ण मध सारवर घालून प्यावें ह्मणजे फार दिवसांची ओकारी बंद होईल.

चंदनंत्यक्षमात्रेनसंयोज्यामलकीरसम्
पिबेन्माक्षिकसंयुक्तंछर्दिस्तेननिवार्यते ॥

टी० ॥ ॥ तोळाभर चंदन घेऊन चूर्ण करून त्यांत आंवळ्याचा रस मध मिश्र करून प्यावा; तेणेंकरून ओकारीचें निवारण होतें.

कषायोभ्रष्टमुद्गानांसलाजमधुशर्करः
छर्द्यतीसारदाहघ्नोज्वरघ्नःसंप्रकाशितः

टी० ॥ ॥ भाजलेल्या मुगांचा काढा लाह्या मध सारवर याणीं युक्त ॥ ओकारी, अतिसार, दाह, ज्वर यांचा नाशक आहे.

कोलमज्जाकणाबर्हिपक्षभस्मसशर्करं
मधुनालेहयेच्छर्दिहिक्काकोपस्यशांतये

टी० ॥ ॥ बोराचे आंठीचा मगज, पिंपळी मोराचे पंखाची राख, सारवर मध हें एकत्र करून चाटलें असतां ओकारी उचकी यांचा कोप शांत होतो.

बीजपूराम्रजंबूनांपल्लवानिजटापृथक्
हिपचेत्पुटपाकेनक्षौद्रयुक्तश्चतद्रसः ॥
छर्दिंनिवारयेत्सद्यःसर्वदोषसमुद्भवाम्

टी० ॥ ॥ महाळुंग, आंबा, जांभूळ याचे पल्लव अथवा मुळें पुटपाकानें पक्क करून त्याचा रस मधु युक्त सर्व दोषांपासून जरी ओकारी असली तरी तिचें शीघ्र निवारण करतो.

पित्तछर्दिंव्रजेद्दूर्वातंदुलोदकपानतः ॥
धात्रीरसेनवापीतासितालाजाश्चहंतितां

टी० ॥ ॥ दूर्वाचारस तांदुळाचे धुणाबरोबर प्यावा, अथवा आंवळ्याचा रस सारवर लाह्या एकत्र करून खाव्या ह्मणजे पित्त छर्दि निवारण होते.

सैंधवंसर्पिषापानेवातच्छर्दिनिवारणम्

टी० ॥ ॥सैंधव, तूप एकत्र करून प्यावें ह्मणजे वातच्छर्दि निवारण होते.

हरीतकीनांचूर्णंतुलिह्यान्माक्षिकसंयुतं
अधोभागीकृतेदोषेछर्दिस्तेननिवार्यते

टी० ॥ ॥हिरड्यांचें चूर्ण मधाबरोबर खावें तेणेंकरून दोष अधोभागीं गेले ह्मणजे छर्दिचें निवारण होतें.

आरक्तशालिभक्तंगोदधिशर्करादिमिश्रंच
कुर्याद्भोजनमेतत्कफच्छर्दिच्छिदंजंतोः॥

टी० ॥ ॥तांबडे साळींचा भात, गाईचें दहीं, साखर यांचें भोजन करावें ह्मण जे कफ छर्दीचा नाश होतो.

मृद्भृष्टलोष्टप्रभवंसुशीतंसलिलंपिबेत्

टी० ॥ ॥मातीचें ढेंकूळ तापवून पाण्यांत विझवावें तें पाणी थंड झाल्यावर प्यावें ह्मणजे छर्दी निवारण होते.

जम्बाम्रपल्लवोशीरवटशृंगावरोहजः॥क्वाथःक्षौद्रयुतःशीतःपीतोवाविनियच्छति॥छर्दिर्ज्वरमतीसारंमूर्छां
तृष्णांचदुर्जयाम्

टी० ॥ ॥जांबूळ, आंबा यांचे पल्लव वाळा, वडाच्या पारंब्या अथवा पल्लव यांचा काढा थंड करून मधासहीत प्याला ह्मणजे ओकारी ज्वर अतिसार मूर्छा, तृष्णा हीं दुर्जय असलीं तरी त्यांचा नाश होतो.

हिंगूनासारिवामूलंसर्ववांतिहरंपरम्
जातीफलंवमौशोषेजागरेविप्रयोजयेत्

टी० ॥ ॥हिंगासहीत लघु उपळसरीचें मूळ सर्व प्रकारचे ओकारीचें नाशक आहे. जायफळ ओकारी, शोष, जागरण, यांचावर प्रशस्त आहे.

उग्रगंधारनालेनपीताच्छर्दिंनिवारयेत्

टी० ॥ ॥वेखंड कांजी बराबर प्यालें असतां छर्दि निवारण होईल.

अथतृष्णालक्षणोपचारः

सततंयःपिबेत्तोयंनतृप्तिमधिगच्छति॥
पुनःकांक्षतितोयंचतंतृष्णार्दितमादिशेत्

टी० ॥ ॥एकसारखें जो पाणी पितो, आणि तृप्त होत नाहीं, पुन्हा पाण्याची इच्छा करितो त्याला तृष्णार्दित ह्मणजे तृषेनें पीडित असें ह्मणतात.

काश्मर्यशर्करायुक्तंचंदनोशीरपद्मकं ॥ द्राक्षामधुक संयुक्तंपित्ततृष्णाजलंपिबेत् ॥

टी० ॥ ॥ लघुशिवणीचें फळ, साखर, चंदन, वाळा, पद्मकाष्ठ, मनुका, जेष्ठी मध यांचा काढा पित्तापासून तृषा लागते त्यावर प्रशस्त आहे.

सजीरधान्यार्द्रकशृंगबेरसौवर्चलान्यर्धपरिप्लुतानि ॥ मद्यानिहृद्यानिचगंधवंतिपीतानिसद्यःशमयंतितृष्णां ॥

टी० ॥ ॥ जिरें, धणे वेळू आलें पादेलोण यांचें चूर्ण अर्ध पडें भिजेल इतकें मद्य चांगलें सुगंधि युक्त प्यालें असतां तृष्णाशमेल.

आम्रजंबूकषायंवापिबेन्माक्षिकसंयुतम् छर्दिसर्वांप्रणुदतितृष्णांचैवापकर्षति ॥

टी० ॥ ॥ आंबा जांबूळ यांचे सालीचा काढा मध घालून प्यालें असतां ओकारी तृषा यांचा नाशक आहे.

गोस्तनीक्षुरसक्षीरयष्टिमधुमधूत्पलैः ॥ नियतंनस्यतोपीतैस्तृष्णाशाम्यतितत्क्षणात्

टी० ॥ ॥ काळीं द्राक्षें, ऊस, दूध, जेष्ठीमध, मध, कमळ यांचें नस्य केलें असतां नेमानें त्याच क्षणी तृष्णा शांत होते.

जीरकुस्तुंबरीद्राक्षाचंदनोत्पलशीतलं शीतलेनसमंदद्यात्तृष्णांहंत्यतिशीतलं

टी० ॥ ॥ जिरें, धणे, मनुका, चंदन, कमळ, कापूर हीं सर्व वाटून थंड पाण्याबरो बर प्याचीं म्हणजे तृष्णा नाश होईल.

कुष्ठलाजाब्दवटप्ररोहमधुकैर्मध्वन्वितैःकल्पिताप्यु प्यामाशुतृषांप्रशमयेदास्यान्तरस्थागुटी

टी० ॥ ॥ कोष्ठकोलिंजन लाह्या नागरमोथा, वडाचे अंकूर जेष्ठीमध मध हीं ए कत्र वाटून गोळी करून तोंडांत धरावी म्हणजे अति तृष्णा जरी असली तरी लो कर शांत होईल. ॥ निर्वापितंतप्तलोष्टकपालसिकतादिभिः तृष्णायांवमनोत्थायांसगुडंदधिशस्यते

टी० ॥ ॥ ढेंगूळ खापरी, वाळू यांतून कांहीं एक तापवून दुधांत विझवून तें दहीं गूळ घालून प्यावें म्हणजे वांतीपासून झालेली तृषा बंद होईल.

पित्तजायांसितायुक्तः पक्वोदुंबरजोरसः

टी० ॥ ॥ उन्हापासून तृषा असली तर मद्यांत साखर आणि सातु, यांचें पी ठ घालून प्यावा आणी सर्वांगास निंबाची पेंड, कांजी यांचा लेप करावा.

रोगोपसर्गजातायांधान्यांबुसासितामधु वटप्ररोहयष्ट्याह्वकणामधुकृतावटी॥ मुख स्थाचिरकालोत्थांतृष्णांहन्यात्सुदुस्तराम्

टी० ॥ ॥ रोगाचे संबंधानें तृषा असली तर धण्याचें पाणी मध, साखर घालून प्यावें; आणि फारवेळ तृषा लागून दुःसाध्य असली तर वडाचे पल्लव अथवा कोंवळ्या पारंब्या, जेष्टीमध, पिंपळी, मध यांची गोळी मुखांत धरावी.

अथमूर्छालक्षणोपचारः

संज्ञावहासुनाडीषुपिहितास्वनिलादिभिः॥ तमोभ्युपै तिसहसासुखदुःखव्यपोहकृत्॥ सुखदुःखव्यपोहा च्चनरःपततिकाष्ठवत्॥

टी० ॥ ॥ ज्ञानवाही शिरावातादि दोषानी आच्छादीत झाल्या असता सुखदुःखाचें निवारक असें तम अकस्मात उत्पन्न होतें; आणि सुखदुःखाचा नाश झाला ह्मणजे मनुष्य काष्टा प्रमाणें पडतो.

हृत्पीडाजृंभणंग्लानिः संज्ञादौर्बल्यमेवच॥ सर्वासांपू र्वरूपाणियथास्वंचविभावयेत्॥ मोहमूर्छेतितामाहुः षड्विधासाप्रकीर्तिताम्॥

टी० ॥ ॥ हृदयांत पीडा, जांभया, ग्लानी बुद्धीचा कमीपणा हीं सर्व मूर्छेचीं पूर्व रूपें आहेत, त्या त्या लक्षणानी जाणावीं तिला मोह मूर्छा असें ह्मणतात. ती साहा प्रकारची आहे.

यथादोषकषायांश्चज्वरघ्नांश्चप्रयोजयेत्

टी० ॥ ॥ जो दोष असेल त्याचा नाशक ज्वरघ्न असा काढा द्यावा.

रक्तजायांचमूर्छायांहितःशीतक्रियाविधिः॥ मद्यजा यांवमेन्मद्यंनिद्रांसेवेद्यथासुखम्॥ विषजायांविष- घ्नानिभेषजानिप्रदापयेत्॥

टी० ॥ ॥ रक्तापासून मूर्छा असली तर थंड औषध हितकारक आहे; मद्यापासून मूर्छा असली तर मद्य ओकून टाकावें आणि निद्रा करावी; विषापासून मूर्छा असली तर विष नाशक औषधें द्यावीं.

कोलमज्जाकणोशीरकेसरंशीतवारिणा
पीतंमूर्छांजयेल्लिद्यात्कृष्णांवामधुसंयुतां

टी० ॥ ॥बोराचे आंतील मगज, पिंपळी, वाळा, नागकेशर हीं पाण्यांत वाटून प्यावीं. अथवा मधाबरोबर पिंपळी खावी, ह्मणजे मूर्छा जाईल.

मधुनाहंत्युपयुक्तात्रिफलारात्रौगुडोदकंप्रातः॥स
प्ताहात्पथ्यभुजोमदमूर्छाकासकामलामोहान्॥

टी० ॥ ॥रात्रीस मधाबरोबर हिरडा, बेहडा, आवळकाठी यांची पूड खावी; आणि गूळ आणि एकत्र करून प्रातःकाळीं खावें, पथ्य करावें, या प्रमाणें सात दिवस केलें असतां मद, मूर्छा, कामला, मोह यांचा नाश होईल.

महौषधामृताद्राक्षापौष्करग्रंथिकोद्भवम्
पिबेत्कणायुतंक्काथंमूर्छायांचमदेषुच॥

टी० ॥ ॥सुंठ, गुळवेल, मनुका, पोखरमूळ, पिंपळमूळ, यांचा काढा पिंपळीचे चूर्ण सहीत मूर्छा मद यांचे ठाईं प्रशस्त आहे.

पिबेद्दुरालभाक्काथंसघृतंभ्रमशांतये॥
अंजनान्यपिपीडाश्चधूमाःप्रधमनानिच

टी० ॥ ॥धमासाचा काढा तूप घालून प्यावा, अथवा अंजन घालावें, व्यथा करावी, कांहीं ओढायला द्यावें, ह्मणजे मूर्छा शांत होते.

सूचीभिस्तोदनंशस्तंदाहपीडानखांतरे
लुंचनंनखलोम्नांचदंतैर्दंशनमेवच॥

टी० ॥ ॥सुया टोंचाव्या, पाय वगैरे ओरपावे, नखें दाबावीं, ओढावीं; केश ओढावे, तोडावे, उपटावे, दांतानीं डसावें.

आत्मागुप्ताबघर्षश्चहितस्तस्यावबोधने॥

टी० ॥ ॥कुहिली अंगास चोळावी ह्मणजे शुद्धी येते. ॥इतिमूर्छाचिकित्सा

अथमदात्ययलक्षणोपचारः

येविषस्यगुणाःप्रोक्तास्तेपिमद्येप्रकीर्तिताः
तेनमिथ्योपयुक्तेनभवत्युग्रोमदात्ययः॥

टी० ॥ ॥जे विषाचे गुण तेच मद्याचे सांगितले यास्तव तें मद्य भलते वेळेस आणि प्रमाणापेक्षां अधीक प्यालें असतां मोठा मदात्यय होतो.

अल्पांबुभक्ष्यावततोदरेयासाजीर्णभक्तेनतथाबलेन॥

उष्णाभितप्तेनचसेव्यमानंकरोतिमद्यंविविधान्विकारान्

टी० ॥ ॥ अन्य अन्नोदक सेवन केलेला अजीर्णी, उष्णानें तापलेला इतक्या नीं सेवन केलेलें आणि इच्छा नसतां बळानें पाजलेलें मद्य नाना प्रकारचे विकार करतें.

हृद्गात्रतोदकफसंस्रुतिकंठधूममूर्छावमीज्वरशिरोवदनः प्रदाहः॥ आध्मानमग्रमथवाङ्घ्रिरणविदाहःपानेजरासमुपगच्छतिलक्षणानि॥

टी० ॥ ॥ हृदयाचे ठायीं आणि शरीराचे ठायीं टोंचल्या प्रमाणें व्यथा, कफ पडणें, घशांतून धूर, मूर्छा, ओकारी, ज्वर, डोकें, तोंड यांचे ठायीं अत्यंत दाह, आणि पोट फुगणें, ढेंकर, दाह, दुर्बल पणा इतकीं लक्षणें पानमदात्ययाचे ठाईं होतात.

सौवर्चलमजाजीचवृक्षाम्लंसाम्लवेतसम्॥त्वगेलामरिचार्द्धांशंशर्कराभागयोजितम्॥एतल्लवणमष्टांगमग्निसंदीपनंपरं॥ मदात्ययेकफप्रायेदद्यात्स्रोतोविशोधनम्

टी० ॥ ॥ पादेलोण, जिरें, आंबसोल, आम्लवेतस, दालचिनी, वेलदोडे, मिरें यांचें चूर्ण अर्धा भाग आणि साखर एक भाग असें एकत्र करून खावें, याला अष्टांग लवण चूर्ण असें ह्मणतात; हें चूर्ण अग्नीदीपक आणि कफ युक्त मदात्ययाचे ठाईं स्रोतः शुद्धी करणारें आहे.

चव्यंसौवर्चलंहिंगुपूरकंविश्वभेषजम्
चूर्णमद्येनपातव्यंपानात्ययरुजापहम्॥

टी० ॥ ॥ चवक, पादेलोण, हिंग, महाळुंग, सुंठ यांचें चूर्ण मद्या बरोबर प्यावें, ह्मणजे पानात्ययाची पीडा हरण करितें.

त्रिफलायारसोवापित्र्योषचूर्णसमाहितः
शुष्कमूलकजोयूषःकौलित्थोवामधूलकः
सर्वजेःसर्वमेतद्धिप्रयोक्तव्यंचिकित्सितम्

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी, यांचा काढा, सुंठ, मिरें, पिंपळी, यांची पूड घालून प्यावा अथवा वाळलेलें मुळें यांचा मंड अथवा हुलग्यांचा मंड मध घालून प्यावा ह्मणजे मदात्यय दूर होतो. आणि सर्व दोषां पासून मदात्यय असला तर हीं तिन्ही औषधें करावीं.

त्वक्पिप्पलीभुजगपुष्पबिडंरुपतंसेवेतहिंगुमरिचेचकयु

तंफलाम्लम्॥ उष्णांबुसैंधवयुतांस्तथवाबिडत्वकूचव्येलमूलमगधाफलहिंगशुंठी॥

टी० ॥ ॥ दालचिनी, पिंपळी, नागकेशर, बिडलोण, हिंग, मिरें, वेलदोडे, अम्लवेतस यांचें चूर्ण अथवा सैंधव, बिडलोण, दालचिनी, चवक, वेलदोडे, पिंपळमूळ, पिंपळी, हिंग, सुंठ यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर खावें.॥ इतिमदात्ययचि०

## अथदाहलक्षणोपचार:

त्वचंप्राप्तःसमानोष्मापित्तरक्ताभिमूर्छितः॥ दाहंप्रकुरुतेघोरंपित्तवत्तत्रभेषजम्॥

टी० ॥ ॥ समान वायूचा ऊष्मा त्वचेप्रत प्राप्त झालेला रक्त आणि पित्त याणीं वाढलेला असा अति दाह उत्पन्न करतो त्यावर पित्ताप्रमाणें उपचार करावा.

शीतांबुशीतलतरैश्चशयानमेनंहारैर्मृणालवलयैरबलास्पृशेयुः॥ भिन्नोत्पलोज्वलहिमेशयनेशयीतयंत्रेषुवासजलबिंदुषुपद्मिनीनाम्॥

टी० ॥ ॥ कमळाचे पाकळ्यांचें स्वच्छ, थंड, गार, अशा शयनावर अथवा जलबिंदु युक्त कमळिनीचा यंत्राचे ठाईं शयन करावें आणी शयन केल्यावर थंड पाणी शीतळ हार, कमळांचे देंठ्यांचीं वलयें यानीं युक्त अशा स्त्रियानीं त्याला स्पर्श करावा. बदरीपल्लवोत्थेनफेनेनारिष्टकस्यवा॥ फरामंडांबुदध्याम्लंमातुलिंगरसोमधु

टी० ॥ ॥ बोरीचे पाल्याचा फेंस, लिंबाचे पाल्याचा फेंस, मद्यावरलें पाणि, दह्यांची निवळ, महाळुंगाचा रस इतके दाह शामक आहेत.

संपूर्णमवगाहेतद्रोणींदाहार्दितोनरः

टी० ॥ ॥ दाहपीडित मनुष्यानें दोणींत बुडी मारावी.

वाप्यःकमलहासिन्योजलयंत्रगृहाःशुभाः नार्यश्चंदनदिग्धांग्योदाहदैन्यहरामताः॥

टी० ॥ ॥ कमळानीं शोभणाऱ्या मोठ्या विहिरी जळमंदिरें, चंदनाचा लेप केलेल्या स्त्रिया दाहा पासून दैन्य झालेलें दूर करतात.

प्रातःपर्युषितंधान्यंसलिलंसितयाफलं अंतर्दाहंहरत्याशुतंदुःखंमृत्स्नजयोयथा॥

टी० ॥ ॥रात्रौ धणे पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळीं कुसकरून तें पाणी साखर

र घालून प्यावें ह्मणजे अंतर्दाह शांत करील. जसें दुःख शयन साव करितो.

सहस्रधौतेनघृतेनदिग्धदेहस्यदाहःकृशतांबिभर्ति॥ अ
न्यांगनासंगमसादरस्यस्वीयेपुदारेषुयथाभिलाषः॥

टी० ॥ ॥ सहस्र वेळां धुतलेलें तूप अंगास चोळलें असतां दाह कमी होतो. जसा परस्त्रीशी संसक्त पुरुषाचा मनोरथ स्वस्त्रीचे ठायीं कमी होतो.

तृड्दाहमोहाःप्रशमंप्रयांतिनिंबप्रवालोत्थितफेनलेपात्॥
यथानराणांधनिनांधनानिसमागमाद्वारविलासिनीनाम्

टी० ॥ ॥ कडूलिंबाची पानें, आणि पोंवळें यांचा फेंस अंगास चोळावा ह्मणजे तृषा दाह, मोह हे शांत होतात. जसें धनिक लोकांचें धन वेश्या समागमाच्या योगानें नष्ट होतें. ॥ दाहेतिशिशिरंतोयंक्रियाकार्यासुसीतला

टी० ॥ ॥ अति थंड पाणी प्यावें, आणी शीत उपचार करावे ह्मणजे दाह शांत होतो.

सर्वांगेचंदनालेपश्चंद्रकस्तूरिकायुतः
सितनीरजलेपोवाधारागारनिवेशनम्

टी० ॥ ॥ कापूर कस्तूरीयुक्त चंदनाचा सर्वांगास लेप करावा अथवा पांढरे कमळाचा लेप करावा आणि तळ घरांत बसावें.

सहजस्नेहसोत्साहमुग्धमंजुलल्लापिनाम्
बालकानांसमाश्लेषस्तापंनिर्वापयेज्जवात्

टी० ॥ ॥ स्वाभावीक स्नेह युक्त आणि उत्साहानें लाडकें मंजूळ असें बोलणारे मुलांचे आलिंगनानें ताप शांत होतो.

उशीरागारशयनंतालवृंतानुवर्तनम् ॥
साहित्यसरसावाणिकवीनांतापहृत्त्रयं

टी० ॥ ॥ वाळ्याचे गृहांत शयन पंख्याचा वारा. कवीचें साहित्य शास्त्र युक्त सरस भाषण हीं तीन ताप शामक आहेत.

पानीयामलकीद्राक्षानारिकेलंसशर्करम्
गायनंसुकुमारीणांदाहमूर्छाहरेद्द्रुतम्॥

टी० ॥ ॥ आंवळा द्राक्षें यांचा रस प्यावा. नारळाचें पाणी साखरे सहीत प्यावें. सुकुमारी स्त्रियांचें गायन ऐकावें ह्मणजे ताप आणि मूर्छा हरण होईल.

सेवनायहितंतापेकोमलंमूत्रकृत्फलम्

टी० ॥ ॥ दाह झाला असतां मूत्र करणारें कोंवळें फळ सेवन करावें. इति दाहचि०

अथोन्मादलक्षणोपचारः

धीविभ्रमः सत्वपरिप्लवश्च पर्याकुलादृष्टिरधीरताच ॥ अबद्धवाक्यंहृदयंचशून्यं सामान्यमुन्मादगदस्यलिंगम् ॥

टी० ॥ ॥ बुद्धीवर भ्रांती, सत्वगुणाचा नाश, व्याकुळदृष्टी, अधीरपणा, बोलणें, असंगत, हृदय शून्य, ह्मणजे अंतःकरणांत कांहीं एक नयेणें हें सामान्य चिन्ह उन्माद रोगाचें जाणावें.

यः सन्निपातप्रभवोतिघोरः सर्वैः समस्तैः सनुहेतुभिः स्यात् ॥ अत्यर्थवाग्विक्रमवीर्यचेष्टोज्ञानादिविज्ञानबलादिवीर्यः ॥ उन्मादकालनियतश्चतस्य भूतोत्थउन्मादमुदाहरंति ॥

टी० ॥ ॥ जोउन्माद सन्निपाता पासून असतो तो अतिघोर आणि सर्व कारणें एकत्र मिळूनहोतो. आणि जा उन्मादांत नियमें करून अती भाषण, अती पराक्रम, अती चेष्टा, सामान्य विशेष ज्ञान बळ हें असतें तो भूता पासून उन्माद झाला असें जाणावें.

त्र्यूषणंहिंगुलवणंवचाकटुकरोहिणी ॥ शिरीषनक्तमालानांबीजंश्वेताश्चसर्षपाः ॥ गोमूत्रपिष्टैरेतैस्तुवर्तिर्नेत्रांजने हिता ॥ चातुर्थिकमपस्मारउन्मादंचनियच्छति ॥

टी० ॥ ॥ संठ, मिरें, पिंपळी, हिंग, संधेलोण, वेखंड, कुटकी, शिरीस, करंजाचें बीं, पांढरे शिरीस हीं सर्व गोमूत्रांत वाटून त्यांत वात भिजवून त्या वातीनें नेत्रांस अंजन करावें ह्मणजे चातुर्थिक ज्वर, अपस्मार उन्माद यांचा प्रतिबंध करील. ॥ इति त्र्यूषण वर्तिः ॥

सिद्धार्थकवचाहिंगुकरंजोदेवदारुच ॥ मंजिष्ठात्रिफलाश्वेताकटभीत्वक्कटुत्रिकाः ॥ समांशंचप्रियंगश्चशिरीषोरजनीद्वयम् ॥ बस्तमूत्रेणपिष्टोयमगदंपानमंजनम् ॥ नस्यमालेपनंचैवस्नानमुद्वर्तनंतथा ॥ अपस्मारविषोन्मादकृत्यालक्ष्मीज्वरापहम् ॥ भूतेभ्यश्चभयंहंतिराजद्वारेचशस्यते ॥ सर्पिरेतेनसिद्धंवासगोमूत्रंतदर्थकृत् ॥

टी० ॥ ॥ पांढरे शिरीस, वेखंड, हिंग, करंजाची बी, देवदार, मंजिष्ठ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, तुरटी, लघुकांगोणी, दालचिनी, संठ, मिरें, पिंपळी, राळे, शिरीस, दारुहळद, हीं बोकडाचे मुतांत वाटून घ्यावीं, यानें अंजन करावें, नस्य करा

वें, लेप करावा, स्नान करावें, अंगाला चोळावें, ह्मणजे अपस्मार, विष उन्माद, कृत्या, दुर्दशा, ज्वर, भूतबाधा यांचें नाशक आहे; आणि राजाकडे जाणें असल्यास ही योग करावा, या प्रमाणेंच या औषधानीं सिद्ध केलेलं तूप गोमूत्र सहीत सेवन केलें असतां गुण करणारें आहे. ॥इतिसिद्धार्थकयोग:॥

कामशोकभयक्रोधहर्षेर्ष्यालोभसंभवान्
परस्परप्रतिद्वंद्वैरेभिरेववशंनयेत्॥

टी० ॥ ॥ काम, शोक, भय, क्रोध, हर्ष, अक्षमा, लोभ यां पासून जे उत्पन्न झाले रोग ते त्याचें प्रतिद्वंद्वी जें काम शांत्यादीक यांणी निवारण करावें ह्मणजे कामापासून उत्पन्न झाला जो कामज्वर तो काम शांती झाली ह्मणजे ज्वर जातो, त्या प्रमाणें करावें.

कार्पासास्थिमयूरपिच्छबृहतीनिर्माल्यपिंडीतकत्वङ्मांसीवृषदंशविट्तुषवचाकेशाहिनिर्मोचनैः॥ नागेंद्रद्विजशृंगहिंगुमरिचैस्तुल्यैस्तुधूपः कृतः स्कंदोन्मादपिशाचराक्षससुरावेशज्वरघ्नः स्मृतः॥

टी० ॥ ॥ कापसाच्या सरक्या, मोरपीस, रिंगणी, निर्माल्य, गेळफळ, दालचिनी, जटामांसी, मांजराची विष्ठा, तूस, वेखंड, केंस मनुष्याचे, सर्पाची मेंग, हस्तिदंत, सांबरशिंग, हिंग, मिरें हीं समांश घेऊन धूप करावा आणि तो घेतला असतां स्कंदोन्माद, अपस्मार, उन्माद, पिशाच, राक्षस, देवसंचार, ज्वर यांचा नाश करितो.

अथापस्मारलक्षणोपचारः
तमःप्रवेशःसंरंभोवेगोद्रेकोहतस्मृतिः॥
अपस्मारइतिज्ञेयोगदोघोरःसफेनकः॥

टी० ॥ ॥ तमोगुणाचा प्रवेश, घाबरेपणा, अतिशयें करून वेग, स्मृतिनाश, तोंडास फेंस, हीं लक्षणें जात होतात त्याला अपस्मार असें ह्मणतात. हा रोग भयंकर आहे.

वातिकंबस्तिभिःप्रायःपैत्तिकंचविरेचनैः
कफजंवमनप्रायैरपस्मारमुपाचरेत्॥

टी० ॥ ॥ वातापासून अपस्मार असेल तर बहुत करून बस्ति करावा, आणि पित्ता पासून असेल तर प्रायः रेचन द्यावें; आणि कफा पासून आहे तर प्रायः वमन द्यावें.

पुष्योधृतंशुनःपित्तमपस्मारप्रभंजनम्
तदेवसर्पिषायुक्तंधूपनंपरमंहितम्॥

टी० ॥ ॥ पुष्य नक्षत्रान्वे बाई कुभ्यांचें पित्त काढून अंजन करावें अथवा तु पांत मिश्र करून धूप करावा ह्मणजे अपस्माराचा नाश करितो.

मनोव्हाताक्ष्र्यकंचैवशकृत्पारावतस्यच
अंजनंहंत्यपस्मारमुन्मादंचविशेषतः॥

टी० ॥ ॥ मनशीळ, रसांजन, पारव्याची विष्टा, यांचें अंजन अपस्मार उन्माद यां चा नाश क० यष्टिहिंगुवचावज्रीशिरीषलशुनामयैः
साजमूत्रैरपस्मारेसोन्मादेनावनांजने॥

टी० ॥ ॥ जेष्टीमध, हिंग, वेखंड, निवडुंगाचा चीक, शिरास, लसून, कोष्टकोलिं जन यांनें अंजन आणि नस्य बोकडाचे मुता बरोबर केलें असतां अपस्मार उन्माद हे रोग जातात.

वचामृताव्योषमधूकसाररुद्राक्षसिंधूद्भवबार्हतानि॥फ
लंसमुद्रस्यरसोनकल्कंध्मातंहिनासापुरमध्यदेशे॥अ
पस्मृतिश्लेष्ममरुच्छिरोरुक्प्रलापतंद्राभ्रमजाड्यमो
हान्॥ससंनिपातश्रुतिकाक्षिभंगान्सपीनसंहंतिहल्ली
मकंच॥रसायनंभैरवनामधेयंज्ञातंविचारात्कविविठ्ठलेन

टी० ॥ ॥ वेखंड, गुळवेल, सुंठ, मिरे, पिंपळी, मोहाचा डीक, रुद्राक्ष, सेंधव, रिंगणीचें फळ, समुद्रफळ, लसूण सर्व एकत्र वाटून नाकांत ओढावें ह्मण जे अपस्मार, वायू, कफ, मस्तकपीडा, बडबड, तंद्रा, भ्रम, जाड्य, मोह, सन्नि पात, कर्णरोग, अक्षिभंग, पीनस, हल्लीमक इतक्यांचा नाश करील; याला भैरव रसायन असें ह्मणतात; विठ्ठल पंडिताला विचारानें हें समजलें आहे.

शंखपुष्पीवचाकुष्ठैःसिद्धंब्राह्मीरसेघृतम्
पुराणंहंत्यपस्मारंमेध्यमुन्मादनाशनम्

टी० ॥ ॥ शंखाहुली, वेखंड, कोष्टकोलिंजन, यांचें चूर्ण तूप ब्राह्मीचा रस एकत्र शिजवून रस आटला ह्मणजे तूप सिद्ध झालें तें फार दिवसांचा अपस्मार उन्मा द यांचें नाशक आहे.

घृतसैंधवहिंगूनांभ्योकर्षैर्वर्तितैश्चतुर्गुणैः
मूत्रैःसिद्धमपस्मारंहृद्ग्राहग्रामनाशनं

टी० ॥ ॥ तूप १ सेंधव १ हिंग १ हीं एक एक तोळा, आणि बारा तोळे गोमूत्र घेऊन एकत्र शिजवावें, मूत्र आटलें ह्मणजे तूप सिद्ध झालें तें तूप अपस्मा

र हृद्रोग यांचें नाशक आहे.

अरण्यत्रपुसीचूर्णंनस्येनापस्मृतिंजयेत्

टी० ॥ ॥ लघु राके, कंवडळ यांचें चूर्णाचें नस्य अपस्मार नाशक आहे.

अथवातव्याधिलक्षणोपचारः

देहेस्रोतांसिरिक्तानिपूरयित्वानिलोबली ॥ करोतिवि

विधान्व्याधीन्सर्वांगैकांगसंश्रयान् ॥

टी० ॥ ॥ बलवान् असाजो वायु, तो पोकळ शिरा असतात त्यांत शिरून शरीराचे ठाई संपूर्ण किंवा एखादा अवयव धरून राहिलेले असे नानाम कारचे व्याधी उत्पन्न करितो.

संकोचःपर्वणांस्तंभोभंगोस्थ्नांपर्वणामपि ॥ रोमहर्षः

प्रलापश्चपाणिपृष्ठशिरोग्रहान् ॥ खांजपांगुल्यकुब्

जत्वंशोषोंगानामनिद्रता ॥ गर्भशुक्ररजोनाशःस्पंद

नंगात्रसुप्तता ॥ शिरोनासाक्षिजत्रूणांग्रीवापार्श्वापि

कुंचलं ॥ भेदस्तोदार्तिराक्षेपोमोहश्चायासएवच ॥ ए

वंविधानिरूपाणिकरोतिकुपितोनिलः ॥ हेतुस्थानवि

शेषैश्चभवेद्रोगविशेषकृत् ॥ सर्वांगैकांगरोगांश्चकु

र्यात्स्नायुगतोनिलः ॥ ऊर्ध्ववातमधोवातंकुंभकंनलमा

रुतम् ॥ संधिवातंकटीवातंशिरोवातंवदत्यलम् ॥

टी० ॥ ॥ सांधे आखडणें, धरणें, हाडें, सांधे, फुटणें; अंगावर कांटा येणें, बड बड, हात पाठ डोकें धरणें; लंगडे पणा, पांगळेपणा, कुबड, अंगास रूक्षपणा, झोंप न येणें; गर्भ, वीर्य, स्त्रियांचा विटाळ यांचा नाश, कंप, अंगास बाहिरेप णा, डोकें, नाक, डोळे, खवांटे, मान, कुशी, यांचे ठिकाणी ओढ; फुटणें, तों चल्या सारखें होणें, ठणकणें, उडणें, मोह, श्रम अशा नाना तऱ्हा वायू कु पित झाला म्हणजे करितो, कारण विशेषें करून, स्थान विशेषें करून रोग विशेष करणारा होतो. शिरागत वायू झाला म्हणजे सर्वांग रोग, एकांग रो ग, करितो, ऊर्ध्व वायू, अधोवायू, कुंभक, नळवात, संधिवात, कटीवात, शिरो वात इत्यादी प्रकारचीं नावें होतात

अभ्यंगस्वेदनंबास्तिनस्यंस्नेहविरेचनम्

स्निग्धाम्ललवणास्वादुवृष्यवातानुलोमनम्

टी० ॥ ॥ अभ्यंग, वाफारा, बस्तिकर्म, नस्य, तेल इत्यादिकानी मर्दन रेच इतके प्रकार करावे, आणि स्निग्ध आंबट खारट मधुर पथ्य वातानुलोमन असें भक्षण करावें ह्मणजे वातव्याधी शांत होतो.

वाजिगंधाबलास्तिस्त्रोदशमूलीमहोषधं॥
गृध्रनख्योंच्चरास्नाचगणोमारुतनाशनः॥

टी० ॥ ॥ आस्कंद चिकणा, लघुचिकणा, पेटारी, दशमुळें, १० सुंठ, बोर, रानबोर, रास्ना याचा काढा वात नाशक आहे.

निर्गुंड्याचोपनाहंचकरंजेश्चापिपित्तलैः॥
भेषजैःसेकलेपादिद्यभिषेकादिकंचरेत्

टी० ॥ ॥ निर्गुंडीचा अथवा करंजाचा पेंड बांधावा आणि पित्तकारक औषधानी वाफारा, लेप स्नान इत्यादीक करावें ह्मणजे वायू शमतो.

चित्रकेंद्रयवापाठाकटुकातिविषाभया म
हाव्याधिप्रशमनोयोगःषड्चरणःस्मृतः

टी० ॥ ॥ चित्रक, इंद्रजव, पहाडमूळ, कुटकी, अतिवीष, हिरडा यांचें चूर्ण महा वातव्याधीचें शमन करणारें आहे; याला षड्चरण योग असें ह्मणतात.

चित्रकत्रिफलाव्योषभल्लातकगुडसमम्
सेवनीयंप्रयत्नेनवातदोषनिवारणाम् ॥

टी० ॥ ॥ चित्रक, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, बिब्बा, गुळ एकत्र करून वाटून खावें ह्मणजे वातदोष निवारण होतो.

एतद्योगेनसंयुक्तंगुग्गुलंमधुसर्पिषा
संलेह्यनाशयेच्चूर्णंवातरोगंविशेषतः

टी० ॥ ॥ पूर्वीचे योगाबरोबर गुग्गुळ मध तूप हें सेवन केलें असतां वातरोगाचें निवारण लौकर होतें.

सुरतरुरामठकुष्ठंशतपुष्पासैंधवंवचार्कपयः॥ अस्थि
गतानपिवातान्निहंत्येकेनलेपेन॥

टी० ॥ ॥ देवदार, हिंग, कोष्टकोळिंजन, बडिशेप, सैंधव, वेखंड, रुईचा चीक यांचा लेप अस्थिगत जरी वायू झाला तरी त्याचा नाश करितो.

शतपुष्पसुरदारुदिनेशपयोगररामठसिंधुभवंहरति॥
अपिलेपनतोऽस्थिगतंमरुतंकटिसंधिगतंत्रिदिनात्सततम्

टी० ॥ ॥बडिशेप, देवदार, रुईचा चीक, नागभाग, हिंग, सैंधव यांचा लेप अ स्थिगत वायू, कटिगत संधिगत वायू यांचा तीन दिवसांत नाश करितो.

मस्थिस्थिताक्षरेणांगंकेवलानिलपीडितम् ॥ तत्रप्रलेपं दद्याच्चपिष्टागुंजाफलेकृतम् ॥ तेनापबाहुजाःपीडावि श्वाचीगृध्रसीतथा ॥ अन्याश्चवातजाःपीडाप्रशमंयांतिवेगतः

टी० ॥ ॥ज्या ठिकाणी केवळ वायूची पीडा असेल तें आंगवस्त्रानें बांधून त्याव र गुंजा वाटून त्याचा लेप करावा तो लेप अपबाहू, विश्वाची, गृध्रसी अन्य दुसरे वायू यांची पीडा शमवितो.

रास्नामृतादेवदारुनागरैरंडजंशृतम् ॥
सप्तधातुगतेवातेसामेसर्वांगगेपिबेत् ॥

टी० ॥ ॥रास्ना गुळवेल देवदार सुंठ एरंडमूळ यांचा काढा सप्त धातूगत वायू आम वात सर्वांग वायू यांचे ठाईं प्रशस्त आहे.

## अथरास्नापंचकं

रास्नात्रिगुणभागास्यादेकभागस्ततःपरः ॥ धन्वयास बलेरंडदेवदारुसठीवचा ॥ वासकोनागरंपथ्याचव्यमु स्तपुनर्नवा ॥ गडूचीवृद्धदारूचशतपुष्पाचगोक्षुरः ॥ अ श्वगंधाप्रतिविषाकृतमालशतावरी ॥ कृष्णासहचरश्चै वधान्यकंबृहतीद्वयं ॥ एभिःकृतंपिबत्क्वाथंशुंठीचूर्णे नसंयुतं ॥ कृष्णाचूर्णेनवायोगराजगुग्गलुनाथवा ॥ अजमोदादिनावापितैलेनैरंडजेनवा ॥ सर्वांगकंपेकुब्ज त्वेपक्षाघातेवबाहुके ॥ गृध्रस्यामामवातेचश्लीपदेचा पतानके ॥ अंत्रवृद्धौतथाध्मानेजंघाजानुगतेर्दिते ॥ शु क्रामयेमेढ्ररोगेवंध्यायोन्यामयेषुच ॥ महारास्नादि गदितोब्रह्मणागर्भकारणम् ॥

टी० ॥ ॥रास्नातीन भाग ३ आणि धमासा, चिकणा, एरंड, देवदार, कचोरा, वे खंड, अडूळसा, सुंठ, हिरडा, चवक, नागरमोथा, घेटोळी, गुळवेल, चरपरा, बडि शेप, सराटे, आरकंद, काळे अतिविष, बाहवा, शतावरी, पिंपळी, कोरांटा, धणे, रिंगणी, डोरली यांचा काढा सुंठीचें चूर्ण, अथवा पिंपळीचें चूर्ण, अथवा योगरा ज गुग्गळ, अथवा ओंव्यानें चूर्ण, अथवा एरंड तेल, यांतून एका बरोबर घ्यावा,

हा काढा सर्वांग कंप कुबडे पणा, पक्षघात, अप बाहुक, गृध्रसी, आमवात, श्लीपद, अपतानक, अंत्रवृद्धी, आध्मान, पोटर्‍या, गुडघे, या दिकाणचा वायू अर्दित, शुक्र रोग, मेद्रवात बंध्या संबंधी योनिरोग, इतक्यांचे ठाई प्रशस्त आहे. आणि गर्भ रा हाण्यास कारण आहे. याला महारास्नादि काढा असें ह्मणतात. हा ब्रह्मदेवानीं सांगीतला आहे. ॥ इतिमहारास्नादिः ॥

एरंडबिल्वौबृहतीद्वयंचसौवर्चलव्योषविरामठंच ॥ स न्मातुलिंगोलवणोत्तमंचक्काथोधनुर्वातहरः प्रशस्तः ॥

टी० ॥ ॥ एरंड, बेल, रिंगणी, डोरली, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी, हिंग, महाळुंग, सैंधव यांचा काढा धनुर्वात नाशक आहे. ॥ एरंडादिः ॥

विशोध्यैरंडबीजानिपिष्ट्वाक्षीरेविपाचयेत्
तत्पायसंकटीशूलेगृध्रस्यांपरमौषधम् ॥

टी० ॥ ॥ एरंडाच्या बिया शुद्ध करून त्यांचें पीठ दुधांत शिजवावें ती खीर कंबरेचा शूल गृध्रसी वायू यांचे ठाई उत्तम औषध आहे.

अभ्रगंधविषव्योषरसटंकान्समांशकान् ॥ भावयेत्सप्तधाभृंगरसेनस्यात्समीरहा ॥ आर्द्रद्रवेणवल्लोवाखंड व्योषेणयोजितः ॥ महान्वातान्जयत्याशुनासाध्मातः स्कुसंज्ञकृत् ॥

टी० ॥ ॥ अभ्रकभस्म, गंधक, बचनाग, सुंठ, मिरें, पिंपळी, पारा, टांकणखार हीं समांश घेऊन माक्याचे रसांत खलून सात भावना द्याव्या ह्मणजे हा समीर पन्नग रस होतो. आल्याचे रसांत वालभर द्यावा किंवा खडीसाखर सुंठ मिरें पिंपळी यांचे चूर्ण बरोबर खावा ह्मणजे मोठा वायू जिंकतो. आणि नाकांत ओढला तर शुद्धी आणतो.

सूतंगंधकचित्रकंत्रिकटुकंमुस्तंविषंत्रैफलं ॥ तुल्यांशंवि दध्यात्तुमार्कवरसेकृत्वाचगुंजावटी ॥ कुष्ठाष्टादशकंप्रमेहकफजंवातप्रकोपंक्षयंरोगानेककरींद्रदर्पदलनोपंचान नोवैद्यराट् ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, चित्रक, सुंठ, मिरें, पिंपळी, नागरमोथा, बचनाग, हिरडा, बेहडा, आंवळकाठी हीं समभाग घेऊन माक्याच्या रसांत खलून गुंजा प्रमाणें गोळी अनुपान योजून खावी ह्मणजे अष्टादश कुष्टें प्रमेह, कफरोग, वातप्रको

प, क्षय इत्यादि अनेक रोग हेच करिंद्र यांचे गर्वाचा नाश करणारा हा रस सिंहच होईल. आणि केवल वैद्य श्रेष्ठ असा आहे. ॥इतिवातगजसिंहः

अत्रकाथंघृतंतैलंचूर्णपाकावलेहिकम् ॥
वटिकागुटिकाप्रोक्तारसास्तेनात्रलेखितं

टी० ॥ ॥ वातव्याधी विषयीं काढे, घृतें, तेलें, चूर्णे, पाक, लेह, वड्या, गोळ्या, रस त्ने सांगितले आहेत ते सर्व या ग्रंथांत लिहिले नाहींत. यत्किंचित लिहिले आहेत.

वातरोगस्त्वसाध्योयंदैवयोगात्प्रसिद्ध्यति
अनुमानेनकुर्वीतवैद्यकंनमतिज्ञया ॥

टी० ॥ ॥ वातरोग तर असाध्य आहे, परंतु दैव योगानें चांगला साध्य होतो. यासाठीं त्यावर उपचार अनुपानानें करावा मतिज्ञेनें करूं नये. इ० वा० रो० चि०

अथवातरक्तलक्षणोपचारः

जानुजंघोरुकट्यंसहस्तपादांगसंधिषु ॥ निस्तोदस्फुरणंभेदोगुरुत्वंस्पर्शसिरेवच ॥ कंडूःसंधिषुरुग्भूत्वाभूत्वानश्यतिवासकृत् ॥ वैवर्ण्यमंडलोत्पत्तिर्वातासृक्पूर्वलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ गुडघे, पोटऱ्या, मांड्या, कंबर, खांदे, हात, पाय, आंगाचे सांधे यांचे ठिकाणी तुसतें स्फुरण फुटणें, जडपणा, बहिरेपणा, कंड आणि सांध्याचे ठायीं वारंवार ठणाका लागुन पुनः बंद व्हावा आणि विवर्णपणा मंडळें उत्पन्न व्हावीं हें वातरक्ताचें पूर्व रूप जाणावें.

उत्तानमवगाढंचद्विविधंवातशोणितम्
त्वङ्मांसाश्रयमुत्तानंगंभीरंत्वंतराश्रयम्

टी० ॥ ॥ उत्तान गंभीर या भेदें करून वातरक्त दोन प्रकारचे आहे, त्वचेचा मांसाचा आश्रय करून जें असतें तें उत्तान आणि मेदादीक धातूंचा आश्रय करून जें असतें तें गंभीर जाणावें.

पिंडतेलादिनाभ्यंगंपानंतिक्तादिसर्पिषा
सेकलेपाद्यसृङ्मुक्तिःशोधनंचोभयोर्हितं

टी० ॥ ॥ रक्त्याबोळानें तेल सिद्ध करून त्या तेलानें अभ्यंग करावें आणि कुटकी इत्यादीक योग्य पदार्थ तूप यांचें पान, पाणी शिंपडणें, लेप लावणें, रक्त काढणें, रेचक, वमन, हे हित कारक आहे.

समधूच्छिष्टमंजिष्ठससर्जरससाधितम्
पिंडतैलादिनाभ्यंगोवातरक्तरुजापहः

टी० ॥ ॥ मेणमंजिष्ठ, राळ, यांचें तेलानें किंवा रक्तयाबोळाचे तेलानें अभ्यंग करावें म्हणजे वात रक्ताची पीडा दूर करील.

वासागुडूचीचतुरंगफलानाभैरंडतैलेनपिबेत्कषायम्
क्रमेणसर्वांगजमप्यशेषंजयेदसृग्वातभवंविकारम्

टी० ॥ ॥ अडूळसा, गुळवेल, बाहावा यांचा काढा एरंडेल तेलाबरोबर प्यालें असतां वात रक्ताचा विकार सर्वांगावर जरी असला तरी क्रमानें दूर करील.

मंजिष्ठाकुटजामृताघनवचाशुंठीहरिद्राद्वयंवासापर्पटसारिवाप्रतिषानंताविशालाजलम्॥ क्षुद्रारिष्टपटोलकोष्ठकटुकाभार्गीविडंगाग्निकंमूर्वादारुकलिंगभृंगमगधात्रायंतिपाठावरीगायत्रीत्रिफलाकिरातकमहानिंबोसनारग्वधम्॥ श्यामावल्गुजचंदनंसवरुणंपूतीकशाकोटकंमंजिष्ठादिममुंकषायविधिनानित्यंपुमान्यःपिबेत्वग्दोषाद्यचिरेणयांतिविलयंकुष्ठानिचाष्टादश॥ वातरक्तेमसूसेन्चविसर्पेविद्रधौतथा॥ सर्वेषुरक्तदोषेषु मंजिष्ठादिःप्रशस्यते॥

टी० ॥ ॥ मंजिष्ठ १ कुडा २ गुळवेल ३ नागरमोथा ४ वेखंड ५ सुंठ ६ हळद ७ दारुहळद ८ अडूळसा ९ पित्तपापडा १० उपलसरी ११ अतिविष १२ धमासा १३ कंवडळ १४ वाळा १५ रिंगणी १६ कडुलिंब १७ कडूपडवळ १८ कोष्ठ कोलिंजन १९ कुटकी २० भारंग २१ वावडिंग २२ चित्रक २३ मोरवेल २४ देवदार २५ इंद्रजव २६ माका २७ पिंपळी २८ मेंदी २९ पाहाडमूळ ३० शतावरी ३१ खैर ३२ हिरडा ३३ बेहडा ३४ आंवळकाठी ३५ काडेकिराईत ३६ बकाणलिंब ३७ असाणा ३८ बाहावा ३९ काळें तेड ४० बावच्या ४१ चंदन ४२ वायवर्णा ४३ करंज ४४ साग ४५ यांचा काढा करून नित्य प्यालें असतां त्वचेचा दोष अठरा कुष्टें वातरक्त, मसूरिका, विसर्प, विद्रधि सर्व रक्तदोष यांचा नाश लौकर करितो. याला मंजिष्ठादि असें म्हणतात. ॥ इतिमंजिष्ठादिः ॥

प्रस्थमेकंगुडूच्याश्चसार्धप्रस्थंतुगुग्गुलुः॥ प्रत्येकंत्रिफलायाश्चतत्प्रमाणंविनिर्दिशेत्॥ सर्वमेकत्रसंक्षिप्य

क्वाथयेद्दुल्वणेंभसि ॥ पादशेषंपरिश्राव्यकषायंग्राहयेद्भिषक् ॥ पुनः पचेत्कषायंवायावत्सांद्रत्वमाप्नुयात् ॥ दंतिव्योषविडंगानिगुडूचीत्रिफलात्वचः ॥ ततश्चार्धपलं चूर्णंगृण्हीयात्तुप्रतिप्रति ॥ चूर्णंकर्षंत्रिवृत्तायाः सर्वंतत्र विनिक्षिपेत् ॥ तस्मिन्सुसिद्धंविज्ञायकोष्णाणत्रेविनि-क्षिपेत् ॥ ततश्चाग्निबलंज्ञात्वातस्यमात्रांप्रयोजयेत् ॥ वातरक्तंतथाकुष्ठंगुदजानग्निसादनं ॥ दुष्टव्रणंप्रमेहं चत्वामवातंभगंदरं ॥ नाड्याढ्यवातान्श्वयथून्सर्वान्वातान्प्रयान्जयेत् ॥ अश्विभ्यांनिर्मितः पूर्वंमाहिषाख्यश्चगुग्गुलुः ॥

टी० ॥ ॥ ६४ तोळे गुळवेल ७२ तोळे गुग्गूळ ६४ तोळे हिरडा ६४ तो. बेहडा ६४ तो. आंवळकाठी हीं एकत्र करून पुष्कळ पाण्यांत कढवावीं, चतुर्थांश पाणी उरलें ह्मणजे गाळून घेउन पुनः तोकाढा दाट होई तों पर्यंत आटवावा आणि त्यांत दांतिमूळ २ सुंठ २ मिरें २ पिंपळी २ वावडिंग २ गुळवेल २ हिरडा २ बेहेडा २ आंवळकाठी २ दालचिनी २ तोळे हीं दोन दोन तोळे आणि नेड १ तोळा घेऊन चूर्ण करून टाकावें, आणि ढवळून चांगलें शिजलें ह्मणजे किंचित् उष्ण असतानांच भाड्यांत भरून ठेवावें नंतर अग्नीबळ पाहून मात्रा द्यावी ह्मणजे वातरक्त, कुष्ठ, मुळव्याध, अग्नीमांद्य दुष्टव्रण, प्रमेह, आमवात, भगंदर, नाडीवात, सूज, संपूर्ण वातरोग यांतें जिंकील याला माहिष गुग्गुळ असें ह्मणतात. हा अश्विनी कुमारानी निर्माण केला आहे. ॥ इतिमाहिषगुग्गुलुः ॥

पटोलीत्रिफलातिक्तागुडूचीचशतावरी ॥ एषः क्वाथो जयेत्सीतोवातास्त्रंदाहसंयुतम् ॥

टी० ॥ ॥ कडू पडवळ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, कुटकी, गुळवेल, शतावरी यांचा काढा प्यालें असता दाहयुक्त वातयुक्त जिंकील. ॥ पटोलादिः ॥

क्वाथोवासामृतातिक्ताभवेद्वातास्रनोदनः

टी० ॥ ॥ अडुळसा गुळवेल कुटकी यांचा काढा वातरक्त नाशक आहे. ॥ वासादिः

नवमाहिषलोचनोदरसन्निभवर्णस्यगुग्गुलोःप्रस्थम् प्रक्षिप्यतोयराशौत्रिफलाममृतांयथोक्तपरिमाणा

म ॥ संसाधयेत्प्रयत्नाद्दर्व्यासंघट्टयेच्चतद्यावत् ॥ अर्ध क्षपितंजातेतोयेज्वलनस्यसंसर्गात् ॥ अवतार्यवस्त्र पूतंपुनरपिसंसाधयेदापः ॥ सांद्रीभूतेतस्मिन्नवता र्येहिमोपस्पर्शे ॥ पथ्याचूर्णद्विपलंत्रिकटुकचूर्णषड क्षपरिमाणंकृमिरिपुचूर्णार्धपलंकर्षकर्षौत्रिवृद्दंत्योः ॥ पलमेकंछिन्नरुहांदत्वादत्वासंचूर्ण्ययत्नेन ॥ संस्थाप येच्चगुडंस्निग्धेभांडेघृतेनसुरभीणां ॥ आदायतस्य मात्रांविहितातिथिदेवताप्रणतिः ॥ खादेद्यथाग्निमनु जोव्याधिबलापेक्षयासम्यक् ॥ इच्छाहारोभेषजकाल श्चसर्वएवात्र ॥ तनुरोधिवातशोणितमेकद्विव्यूल्बणं चिरोत्थमपि ॥ भग्नस्रुतिपरिशुष्कस्फुटितमपिनिहंति यत्नेन ॥ व्रणकासकुष्ठगुल्मश्वयथूदरपांडुरोगमेदांसि ॥ मंदाग्नि त्वविबंधप्रमेहदोषांश्चनाशयति ॥ सततंनिषेव्यमाणःकालेन निहंतिरोगगणम् ॥ अभिभूयजरादोषंकरोतिकैशोरकंरूपम्

टी० ॥ ॥ नवीन उत्पन्न झालेला रोणगा, त्याचे डोळ्यांचे पोरा प्रमाणें ज्याचा रंग असेल असा गुग्गुळ ६४ तोळे गुळवेल ६४ तोळे हिरडा ६४ तो. बेहेडा ६४ तो. आं वळकाटी ६४ तो. घेऊन पाण्यांत टाकून करावें अर्धे पाणी आटे तों पर्यंत पळीनें ढवळावें, नंतर उतरून गाळून घ्यावें, आणि पुनः कढत ठेवावें, दाट झालें ह्मणजे उतरून थंड झाल्यावर त्यांत चूर्ण टाकावीं तीं हिरडा ८ तोळे सुंठ २ तोळे मिरें २ तोळे पिंपळी २ तोळे वावडिंग ४ तोळे तेड १ तोळा दांती मूळ १ तोळा गुळवेल ८ तोळे या प्रमाणें टाकून फारवेळ मर्दन करावें, सर्वां चा एक जीव होई तों पर्यंत कालवावें, नंतर गाईचे तुपानें रावलेलें असें मडकें घेऊन त्यांत भरून तोंड बांधून ठेवावें नंतर देवता अतिथी यांची पूजा नमस्कार करून आपलें अग्नीबल, व्याधी बल पाहून मात्रा खावी इच्छे प्रमाणें अहार करावा. पाहिजे त्या वेळेस औषध घ्यावें. हें औषध श रीर व्यापणारें असें वातरक्त एकाधीक दोषांचें, किंवा दोन तीन दोष ज्यांत अधीक आहेत असें फार दिवसाचें, स्राव बंद झालेलें शुष्क, फुटलेलें अशा वातरक्ताचें नाशक, आणि व्रण, कास, गुल्म, कुष्ठ, सूज, उदर, पांडुरोग, मेद, मंदाग्नी, पोटफुगणें, प्रमेह यांचें नाशक आणी सतत सेवन केलें असतां का

लें करून सर्व रोगांचा नाश करितें. आणि जरा दूर करून तारुण्य आणितें.
इति कैशोरकगुग्गुलुः ॥

मंजिष्ठात्रिफलातिक्तावचादारुनिशामृता ॥ निंबश्चैषां कृतः क्वाथोवातरक्तविनाशनः ॥ पामाकपालिकाकुष्ठरक्तमंडलजिन्मतः ॥

टी० ॥ ॥ मंजिष्ठ, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, कुटकी, वेखंड, दारुहळद, गुळवेल, कडूलिंब यांचा काढा वातरक्त, खरूज, कपालिकाकुष्ठ, रक्तमंडळ यांचा नाशक आहे. ॥ इतिलघुमंजिष्ठादिः ॥

पारदंचत्रियाशकृद्दंतत्तुल्यंस्याद्गंधकम् ॥ अभ्रकंतुद्वयोस्तुल्यंत्रिभिस्तुल्यंतुगुग्गुलुम् ॥ सर्वांशममृतासत्वंभावयेदौषधैः पृथक् ॥ निर्गुंडीगोक्षुरछिन्नाकोकिलाख्यांघ्रिजैरसैः ॥ सप्तवारंततोयुंज्यात्वातरक्तेत्रिवल्लकम् ॥ कोकिलाख्यस्यमूलानांपानीयमनुपाययेत् ॥

टी० ॥ ॥ पारा गंधक शुद्ध, समभाग दोघांचे बरोबर अभ्रकभस्म तिघांचे बरोबर गुग्गुळ ४ सर्वांचे बरोबर गुळवेलीचें सत्व ८ हीं एकत्र करून निर्गुंडी, गोखरू, गुळवेल, कांकोलीचें मूळ यांचे काढ्यांच्या ७ भावना द्याव्या, नंतर वातरक्त रोगावर तीन वाल प्रमाणें खावा. वर कांकोलीचे मुळांचा काढा प्यावा.

मंदमप्यसाध्यंज्ञेयं

टी० ॥ हें वातरक्त अल्प जरी असलें तरीं असाध्य जाणावें. ॥ इति वातर० नि०

अथोरुस्तंभलक्षणोपचारः

यदाकफान्वितेनोरुस्तब्धोशीतावचेतनौ ॥ संयुक्तौपादसद नकृच्छोद्धरणास्पर्शनिभिः ॥ तमूरुस्तंभमित्याहुराढ्यवातमथापरे

टी० ॥ ॥ जेव्हां कफयुक्त वायूनें मांड्या स्तब्ध आणि त्यांना जीव नाहींसा होतो, आणी पाय बारीक संकटानें उचलतें, स्पर्श न कळणें असा होतात तेव्हां त्या वायूला ऊरुस्तंभ किंवा आढ्यवात असें ह्मणतात.

भल्लातकामृताशुंठीदारुपथ्यापुनर्नवा पंचमूलीद्वयंमिश्रमुरुस्तंभनिबर्हणम् ॥

टी० ॥ ॥ बिब्बा, गुळवेल, सुंठ, देवदार, हिरडा, घेटोळी दशमुळें यांचा काढा ऊ-

रुस्तंभाचा नाशक आहे.

पिप्पलीपिप्पलीमूलंभल्लातकफलानिच ॥ कल्कंमधुयुतं पीत्वाऊरुस्तंभात्प्रमुच्यते ॥

टी० ॥ ॥ पिंपळी, पिंपळमूळ, बिब्बे यांची कुटून गोळी करून मधा बरोबर खावी ह्मणजे ऊरुस्तंभा पासून मुक्त होतो.

क्षौद्रंसर्षपवल्मीकमृत्तिकासंयुतंभिषक् गाढंमृत्सादनंकुर्यादूरुस्तंभेप्रलेपनम् ॥

टी० ॥ ॥ मध शिरीस वारुळाची माती एकत्र वाटून दाट लेप करावा याला मुत्सादन असें ह्मणतात हें ऊरुस्तंभ नाशक आहे.

यत्स्यात्कफप्रशमनंनचमारुतकोपनं ॥ तत्सर्वंसर्वदा कार्यमुरुस्तंभस्यभेषजम् ॥

टी० ॥ ॥ जें कफशामक आणि वायू कुपित न करणारें तें औषध ऊरुस्तंभावर नेह्मी करावें.

पलमर्धपलंवापिरसनस्यसुकुट्टितम् ॥ हिंगूजीरकसिंधूत्थंसौवर्चलकटुत्रिकं ॥ एभिःसंचूर्णितैःसर्वैस्तुल्यतैलेनसंयुतम् ॥ यथाग्निभक्षयेत्प्रातरोरुबुकाथानुपानतः ॥ मासमेकंप्रयोगेण सर्वान्वातामयाञ्जयेत् ॥ एकांगसर्वांगगतमूरुस्तंभंचगृध्रसींकटिपृष्ठास्थिसंधिस्थमर्दितंचापतंत्रकं ॥ ज्वरंधातुगतंजीर्णंनित्यंशैत्यंकराङ्घ्रिजं

टी० ॥ ॥ कुटलेला, लसूण, हिंग, जिरें, सैंधव, पादेलोण, सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण मिळून ४ तोळे किंवा २ तोळे घेऊन त्याचे बरोबर एरंडेल घेऊन जसें अग्नी बळ असेल त्या प्रमाणें प्यावें नंतर एरंड मुळाचा काढा प्यावा या प्रमाणें महिनाभर केलें असतां संपूर्ण वात रोग जिंकील. आणि एकांगवात, सर्वांगवात, ऊरुस्तंभ, गृध्रसी, कटिपृष्ठ, अस्थि संधी या ठिकाणचा वायू अर्दित अपतंत्रक हे वायू धातुगत ज्वर, जीर्ण ज्वर, हात पायांचें शैत्य इतक्यांचा नाश करील- इतिलशुनप्रयोगः॥

पुनर्नवानागरदारुपथ्याभल्लातकच्छिन्नरुहाकषायः॥ दशांघ्रिमिश्रःपरिपेयऊरुस्तंभेथवामूत्रपुरःप्रयोगः

टी० ॥ ॥ घेटोळी, सुंठ, देवदार, हिरडा, बिब्बा, गुळवेल दश मूळें यांचा का-

ा करून ऊरुस्तंभावर प्यावा अथवा गोमूत्रांत गुग्गुळ घालून प्यावा. पुनर्नवादिक्वाथ.

शिलाजतु गुग्गुलुं वापिप्पलीमथनागरं ॥ ऊरुस्तंभे पिबेन्मूत्रैर्दशमूलीजलेनवा ॥

टी० ॥ ॥ शिलाजीत अथवा गुग्गुळ किंवा पिंपळी अथवा सुंठ गोमूत्रा बरोबर. किंवा दशमुळाचे काढ्या बरोबर प्यावें ह्मणजे ऊरुस्तंभाचा नाश होतो.

निष्कमेकं शुद्धसूतं निष्कद्वादशगंधकम् ॥ गुंजाबीजंविषंनिंबबीजंजयातथा ॥ प्रत्येकंनिष्कमात्रंतु माषजेपालबीजकं ॥ जातीजंबीरधत्तूरकाकमाचीद्रवैर्दिनम् ॥ मर्द्यसर्वंवटींकुर्यात् घृतैर्गुंजाद्वयंपिबेत् ॥ गुंजागर्भोरसोनामहिंगुसैंधवसंयुतः ॥ समंडंदापयेत्पथ्यमूरुस्तंभप्रशांतये

टी० ॥ ॥ पारा १ तोळा, गंधक ४ तोळे, गुंजा, बचनाग, लिंबोळ्या, भांग, प्रत्येक चार मासे प्रमाणें जेपाळ १ मासा हीं एकत्र करून जाई, लिंबु, धोत्रा, कावळी यांचे रसांत एक एक दिवस खलावें नंतर वडी करून ठेवावी, २ गुंजा प्रमाणें तूप हिंग सैंधव यांचे बराबर सेवन केला असतां ऊरुस्तंभ शांत करील, याला पथ्य हुलग्याचें मंड आणि भात हें आहे. याला गुंजागर्भ रस असें ह्मणतात. ॥ इति गुंजागर्भरसः ॥ ॥ इति ऊरुस्तंभचिकित्सा ॥

## अथामवातलक्षणोपचारः

अंगमर्दोरुचिस्तृष्णा आलस्यंगौरवंज्वरः ॥ अपाकस्तनुतांगानामामवातस्यलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ अंग मोडून येणें, अरुची, तृषा, आळस, जडपणा, ज्वर, अपाचन, कृशपणा, आम वाताचीं लक्षणें जाणावीं.

हस्तपादशिरोगुल्फत्रिकजानूरुसंधिषु ॥ करोतिसरुजंशोफंयत्रादिद्धइववृश्चिकैः ॥

टी० ॥ ॥ हात, पाय, डोकें, पायांचे घोटे, माकडहाड, गुडघे, मांड्या, सांधे यांचे ठाईं विंचू डसल्या प्रमाणें पीडा आणि सूज करतो.

जठरंगर्जतेयस्यगुल्मवत्सारपीडितम् कटीपृष्ठीजडत्वंचतस्यामोगुल्माभिशंकितः

टी० ॥ ॥ गुल्मानें जशी पीडा होते त्या प्रमाणें पीडा आणि पोटांत गुरगुरतें कंबर पोट यांचे ठिकाणी जडपणा असें जांत आहे, त्यापासून गुल्माची शंका आहे.

कटीपृष्ठीवक्षदेशेतोतोदनं बस्तिशूलता
गुल्मवज्जठरे गर्जेत्तथांते शोफ एव च

टी० ॥ ॥ कंबर पाठ ऊर या ठिकाणी टोंचल्या प्रमाणें पीडा, ओटी, पोटांत शूळ, गुल्माप्रमाणें पोटांत गुर्गुरणें सूज अशीं लक्षणें जाणावीं.

रास्नामृतारग्वधदेवदारुत्रिकंटकैरंडपुनर्नवानाम् ॥ क्वाथं पिबेन्नागरचूर्णमिश्रं जंघोरुपृष्ठत्रिकपार्श्वशूली ॥

टी० ॥ ॥ रास्ना गुळवेल बाहवा देवदार गोरखरू एरंड घेटोळी यांचा काढा सुंठी चें चूर्ण घालून प्यालें असतां पोटऱ्या मांड्या पाठ माकडहाड कुशी या ठिकाणचा शूळ रहातो.

शुंठीगोक्षुरकक्वाथः प्रातः प्रातर्निषेवितः ॥ आमवातकटीशूलपाचनो रुक्प्रणाशनः ॥

टी० ॥ ॥ सुंठ आणि गोरखरूं यांचा काढा नित्य सेवन केला असतां आमवात कटी शूळ यांचा नाशक पाचक पीडा नाशक आहे.

मणिमंथस्य भागौ द्वौ यवक्षारश्च तत्समः ॥ तथाजमोदभागश्च नागराद्भागपंचकम् ॥ दशचैव हरीतक्याः सूक्ष्मं चूर्णं कृतं शुभम् ॥ मस्त्वारनालमूत्रैश्च सुरयोष्णोदकेन वा ॥ पीतं जयेदामवातं गुल्मं हृद्बस्तिजान्गदान् ॥ प्लीहानमथ शूलादीनानाहं चार्शसां हितम् ॥ वातानुलोमनमिदं चूर्णं वैश्वानरं स्मृतम् ॥

टी० ॥ ॥ सैंधव २ भाग, जवखार २ भाग, ओवा २ भाग, सुंठ पांच भाग, हिरडा १० भाग यांचें चूर्ण बारीक करून दह्यांत मंड, कांजी, गोमूत्र, मद्य, उष्णोदक यांतून एका बरोबर प्यावें ह्मणजे आमवात, गुल्म हृद्रोग, बस्तिंतले रोग, पांथरी शूल, आनाह, मुळव्याध यांचा नाश करितें. आणि वाताला अनुलोमन करतें याला वैश्वानर चूर्ण असें ह्मणतात.

हिंगुचव्यं बिडं शुंठी कृष्णाजाजी सपुष्करं ॥ भागोत्तरमिदं चूर्णं पीतं वातामजिद्भवेत् ॥

टी० ॥ ॥ सुंठीचें चूर्ण एरंड मुळाचे रसांत पुटपाकानें पक्व करून मधाबरोबर खावें ह्मणजे आमवाताची पीडा दुस्तर असली तरी जिंकील.

शुंठीकल्कं विनिक्षिप्य रसे सैरंडमूलजे ॥ विपचेत्पुटपाकेन तद्रसः क्षौद्रसंयुतः ॥ आमवातसमुद्भूतां पीडां जयति दुस्तराम् ॥

टी०॥ ॥ शुंठीचें चूर्ण एरंड मुळाचे रसांत खलून पुटपाकानें पक्क करून मधाबरोबर खावें ह्मणजे आम वाताची पीडा दुस्तर असली तरी जिंकील.

विलासिनीविलासेनविलासीत्हृदयंयथा, तथागुडूचीविश्वेनहरेदामसमीरणम्

टी०॥ विलासिनी स्त्रीचे विलासें करून विलासी पुरुषाचे अंतःकरणाचें जसें हरण होतें; तसें गुळवेल आणि सुंठ याचें काढ्यानें किंवा चूर्णानें आमवाताचें हरण होतें.

कर्षनागरचूर्णस्यकांजिकेनपिबेत्सदा, आमवातप्रशमनंकफवातविनाशनम्

टी०॥ सुंठीचें चूर्ण दाहामासें नित्य कांजी बराबर प्यावें ह्म० आमवातकफवातयांचा नाश क०.

पंचकोलकचूर्णंच पिबेदुष्णेनवारिणा॥
मंदाग्निशूलगुल्मामकफारोचकनाशनं

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी, चवक, चित्रक यांचें चूर्ण उन पाण्या बरोबर प्यालें असतां मंदाग्नि शूल गुल्म आम कफ अरोचक यांचा नाश करील.

त्रिफलानागरंचैवसूक्ष्मचूर्णानिकारयेत्॥ मस्त्वारनालतक्रेणपेयामांसरसेनवा॥ आमवातंनिहंत्याशुश्वयथुंसंधिसंस्थितम्॥

टी० ॥ ॥ हिरडा बेहडा आंवळकाठी सुंठ यांचें चूर्ण करून दह्यांचा मंड कांजी तक्र पेया मांस रस यांतून एका बरोबर प्यालें असतां आमवात संधिगत सूज यांचा नाश लवकर करील.

प्रक्षिप्यगंधंरसपादभागंकलाप्रमाणंचविषंसमस्तात्॥ कृशानुतोयेनचभावयित्वावल्लंददीतास्यमरुत्प्रशांत्यै॥ अपस्मारतथोन्मादेसर्वांगेव्यथनेपिच॥ एकांगवातेसामेवादंष्ट्राबंधेहिमेतथा॥ देयोयंवल्लमात्रंतु सर्ववातनिवृत्तये॥

टी० ॥ ॥ पारा ४ भाग गंधक १ भाग आणि सर्वांचे षोडशांश १/१६ बचनाग घेऊन चित्रकाच्या काढ्यांत खलून वालाप्रमाणें वात शमनार्थ द्यावा. याला वातविध्वंसन रस ह्मणतात अपस्मार उन्माद सर्वांगव्यथा एकांगवात आमवात हनुस्तंभ हींव इत्यादीक सर्ववायू दूर होण्या करितां वाल प्रमाण द्यावा. ॥इतिवातविध्वंसनः॥

## अथशूललक्षणोपचारः

वायुप्रवृद्धोजनयेद्धिशूलंहृत्पार्श्वपृष्ठत्रिकबस्तिदेशे

टी० ॥ ॥ वायू वाढला ह्मणजे हृदय, कुक्षि, पाठ, माकडहाड, ओटी पोट यांचे

ठिकाणीं तिडीक उत्पन्न करितो. त्याला शूल असें ह्मणतात.

वेदनात्वतृषामूर्छाध्मानाह्योगौरवारतिः॥ कासश्वासौ चहिक्काच्वशूलस्योपद्रवाः स्मृताः॥

टी० ॥ ॥ वेदना, तृषा, मूर्छा, आनाह, जडपणा, अरति, कास, श्वास, हिक्का, इतके शूलाचे उपद्रव सांगीतले आहेत.

भुक्तेजीर्यतियच्छूलंतदेवपरिणामजम्

टी० ॥ ॥ भोजनोत्तर अन्न जिरूं लागलें असतां जो शूल होतो तोच परिणाम शूल जाणावा.

आध्मानाटोपविण्मूत्रविबंधारतिवेदनैः
स्निग्धोपशमनंप्रायः पैत्तिकंलक्षयेद्बुधः

टी० ॥ ॥ पोट फुगणें जीव गुंडाळून येणें, मलमूत्राचा प्रतिबंध, सर्वांवर अप्रीति वेदना, प्रायः स्निग्ध उपचारानीं शमन अशा लक्षणानीं पित्तशूल जाणावा.

आनाहगौरवौछर्दिस्तृष्णाज्वरभ्रमोरुचिः॥ कृशत्वं बलहानिश्चवेदनातिप्रवर्तनम्॥ उपद्रवादशैवेतेयस्य शूलस्यनास्तिसः॥

टी० ॥ ॥ मलबद्धरोग, जाड्यछर्दी, तृषा, ज्वर, भ्रम, अरुची, कृशपणा, दुर्बलपणा अतिवेदना हे दाहा उपद्रव ज्याचे शूलाला आहेत तो मनुष्य नाहीं असें समजावें.

॥ एरंडबिल्वबृहतीद्वयमातुलिंगपाषाणभित्त्रिकटुमूलकृतः कषायः॥ सक्षारहिंगुलवणोरुबुतैलमिश्रः श्रोण्यूरुमेढ्रहृदयस्तनरुक्षुपेयः॥

टी० ॥ ॥ एरंड, बेल, डोरली, रिंगणी, महाळुंग, यांची मुळें, पाषाणभेद लकड्या, संठ, मिरें, पिंपळी यांचा काढा जवखार, हिंग, सैंधव, एरंडेल तेल याणीं मिश्र कंबर, माड्या, शिश्न, हृदय, स्तन इतक्या ठिकाणचे शूलावर प्यावा.

त्रिफलाक्काथगोमूत्रक्षौद्रक्षीररसैः पृथक्॥ एरंडतैलद्विगुणोहितः शूलनिवारणे॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी यांचा काढा गोमूत्र, मध, दूध, लकड्या पाषाणभेद यांतून कोणता एक पदार्थ एक भाग आणि एरंडेल तेल दोन भाग एकत्र करून प्यालें असतां शूल निवारण होतो.

शंबूकमूषणंचैवपंचैवलवणानिच॥ समांशैर्गुटिका कलाकलंबुकरसेनवा॥ प्रातर्भोजनकालेवाभक्षयेत्तु

यथाबलं॥ शूलाद्विमुच्यतेजंतुः सहसापरिणामजात्॥

टी० ॥ ॥ लहान शंखाचें भस्म, मिरें, मीठ, टांकणखार, सैंधव, बिडलोण, पांदे लोण हीं समांश घेऊन कलंबूक ह्मणोन औषधी आहे तिचा रसांत गोळ्या करून प्रातःकाळीं किंवा भोजन समईं शक्ति प्रमाणें खाव्या ह्मणजे परिणाम शूला पासून मुक्त होईल.

वमनंलंघनंस्वेदः पाचनंफलवर्तयः॥ क्षारश्चूर्णानिगुटिकाः शस्यंतेशूलनाशनाः॥ ॥

टी० ॥ ॥ वमन, लंघन, घाम काढणें, पाचन फलवर्ती ह्मणजे मल शोधन करण्या विषयीं गुदांत तेल लाऊन वात घालतात ती क्षार चूर्णें गोळ्या इतकीं शूल नाशक आहेत.

शतावरीसयष्ट्याह्ववाट्यालकुशगोक्षुरैः॥ शृतशीतंपिबेत्तोयंसगुडक्षौद्रशर्करम्॥ पित्तासृक्‌दाहशूलघ्नंसद्योदाहरुजापहम्॥

टी० ॥ ॥ शतावरी, जेष्टीमध, लघुचिकणा, दर्भमूळ, गोखरू यांचा काढा करून थंड झाल्यावर गूळ किंवा साखर मध घालून प्यावा, ह्मणजे पित्तरक्त, दाह शूल, यांचा नाश करील. आणि दाह तात्काळ शमवील.

मदनस्यफलंतिक्तांपिष्ट्वाकल्कंचवारिणा॥ कोष्णंकुर्यान्नाभिलेपंशूलशांतिर्भवेत्ततः॥

टी० ॥ ॥ गेळफळ कुटकी पाण्यांत वाटून किंचित ऊन लेप बेंबीवर करावा तेणें करून शूल शमन होईल.

त्रिफलारिष्टयष्ट्याह्वकटुकारग्वधैः शृतम्॥ पाययेन्मधुनामिश्रंदाहशूलोपशांतये॥

टी० ॥ ॥ हिरडा बेहेडा, आंवळकाठी, कडूलिंब जेष्टीमध कुटकी बाहावा यांचा काढा मधानें मिश्रित शूल दाह यांचे शांती साठीं प्यावा.

एकएवकुबेराक्षोहंतिशूलशतत्रयम्॥ किंपुनर्लशुनोपेतः सैंधवेनचहिंगुना॥

टी० ॥ ॥ एकच सागरगोटा तीनशें शूलांचा नाश करील. मग लसूण, सैंधव, हिंग यांचाशीं युक्त सेवन केलातर संशयच नाहीं.

नागरैरंडयोःक्वाथः क्वाथइंद्रयवस्यवा॥ हिंगुसौवर्च

लोपेनोवातशूलनिवारणः ॥

टी० ॥ ॥ सुंठ एरंडमूळ यांचा अथवा इंद्रजव यांचा काढा हिंग पादेलोण आणि मिश्रित वात शूलाचा निवारक आहे.

शतावर्याश्चमधुनायुक्तः शूलहरोरसः

टी० ॥ ॥ शतावरीचा रस मधाशीं युक्त शूल हारक आहे.

हिंगग्रंथिकधान्यकाग्निकवचाचव्याग्निपाठासठीवृक्षाम्लंलवणत्रयंत्रिकटुकंक्षारद्वयंदाडिमम् ॥ पथ्यापुष्करवेतसाम्लहपुषाजाजाज्यगंधैः कृतंचूर्णंभावितमेतदार्द्रकरसेस्याद्बीजपूरस्यवा ॥ आध्मानग्रहणीविकारगुदजान्गुल्मानुदावर्तकान्वाताध्मानगरोदराश्मरिरुजस्तूनिहृद्यारोचकान् ॥ ऊरुस्तंभमतिभ्रमंचमनसोबाधिर्यमष्टीलिकंप्रत्यष्टीलिकश्वासकासमपहृत्तपीतमुष्णांबुना ॥ हृत्कुक्षिवंक्षणकटीजठरांतरेषुबस्तिस्तनांसफलकेषुचपार्श्वयोश्च ॥ शूलानिनाशयतिवातबलासजानिहिंग्वाद्यमाद्यमिदमश्विनिसंहितायां

टी० ॥ ॥ हिंग, पिंपळमूळ, धणे, चित्रक, वेखंड, चवक, चिभ्भा, पाहाडमूळ, कचोरा आमसोल सैंधव बिडलोण बांगडखार, सुंठ, मिरें, पिंपळी, सज्जीखार, जवखार, डाळिंबसाळ, हिरडा, पोखरमूळ, अम्लवेतस, शेरणी, जिरें, रानतुळस यांचें चूर्ण स आल्याचे रसाची, किंवा महाळुंगाचे रसाची भावना द्यावी आणी ऊन पाण्या बरोबर खावें तेणें करून आध्मान, संग्रहणी, मुळव्याध, गुल्म, उदावर्त, वाताध्मान, विष, उदर, मूत्रकृच्छ्र, तूनि, प्रतूनी, अरुची, ऊरुस्तंभ, मति भ्रम, अंतःकरणाचा भ्रम, बाधिर्य, अष्टीलिका, प्रत्यष्टीलिका, श्वास, कास, हृदय, कुशी, वंक्षण कंबर, पोट, ओटीपोट, स्तन, खांदा, बरगड्या, इतक्या ठिकाणचा शूल, वायूचा किंवा कफाचा असला तर त्याचा नाश होतो. याला हिंग्वादि चूर्ण असें ह्मणतात हें प्राचीन आहे. अश्विनी कुमारानी सांगीतलें आहे. ॥ इ. हिंग्वा. चू.

चिंचाक्षारंपंचपलंलवणानिपलंपलं ॥ संचूर्ण्यनिक्षिपेप्रस्थेद्वयेजंबीरवारिणि ॥ शंखंदशपलंतत्वानिक्षिपेत्समवारतः ॥ तत्समस्तंविशोष्याथहिंगव्योषंचतुष्पलं ॥ वल्लीसूतविषान्भागैः पलार्धांश्चपृथक्पृथक् ॥ एततूस

मस्तुं संमर्द्य जंबीराम्लैर्दिनत्रयं ॥ बदरास्थिप्रमाणेन व टिकाकारयेद्बुधः ॥ एकैकां भक्षयेत्प्रातः कोष्णतोयं पिबेदनु ॥ सर्वशूलं हरेद्गुल्मम जीर्णपरिणामजम् ॥ अतीसारगदं हन्याद्ग्रहणीं चविशेषतः ॥

टी० ॥ ॥ सिंधेरवार २० तोळे मीठ ४ तोळे सैंधव ४ तोळे पादेलोण ४ तो. बांडलोण ४ तो. टांकणखार ४ तो. यांचें चूर्ण १२८ तोळे लिंबाचे रसांत टाकून नंतर ४० तोळे शंख तापवून त्या रसांत विझवावे. या प्रमाणें सातवेळ विझवून शुष्क करून त्यांत शंखाचें चूर्ण आणि हिंग ४ तोळे सुंठ ४ तोळे मिरें ४ तोळे पिंपळी ४ तो. गंधक २ तोळे पारा २ तोळे बचनाग २ तोळे टाकून सर्वांचा लिंबाचे रसांत तीन दिवस खल करून बोराचे आंठी प्रमाणें गोळ्या कराव्या आणि एक एक गोळी प्रातःकाळीं भक्षण करावी वर्ती ऊन पाणी प्यावें; तेणें करून सर्व शूल गुल्म, अजीर्ण, परिणाम शूल, अतिसार, संग्रहणी यांचा नाश होईल.

गोमूत्रसिद्धं मंडूरं त्रिफलाचूर्णसंयुतम् ॥ विलिहन्मधुसर्पिभ्यां शूलं हंति त्रिदोषजम् ॥

टी० ॥ ॥ गोमूत्रानें सिद्ध केलेला मंडूर, हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचे चूर्णसहीत मध, तूप यांचे बरोबर खावा तेणें करून त्रिदोषाचे शूलाचा नाश होतो

हिंग्वक्षार्द्रकुबेराक्षा क्षाः शूलेंबुनासुखाः ॥ गुडाभयं वा सघृतं रसोनः शूलनुत्परः ॥

टी० ॥ ॥ हिंग १ बेहेडा २ सुंठ ३ नागर गोटा ४ या प्रमाणें भाग घेऊन चूर्ण करून ऊनपाण्या बरोबर प्यावें. तेणें करून शूल शमतो. गूळ, हिरडा, आणि तूप लसूण, हे दोन योग शूल नाशक आहेत.

पक्तिशूलं जयत्याशु गुडार्द्रतिलमोदकः ॥ हिंग्वाभयं वचा वेल्लं पीतमुष्णांबुना जयेत् ॥ आनाहशूलहृद्रोगविषूची गुल्ममारुतान् ॥

टी० ॥ ॥ गूळ, आलें, तीळ यांचा मोदक परिणाम शूलाचा नाशक आहे. हिंग हिरडा, वेखंड, वावडिंग यांचें चूर्ण ऊन पाण्या बरोबर प्यावें तेणें करून आनाहशूल, हृद्रोग, विषूची, गुल्मवायू यांचा नाश होतो.

अथामशूले.

एरंडतैलं षड्भागं लशुनस्य तथा रसकम् ॥ एकं हिंगुत्रि

सिंधूत्थंसर्वमेकत्रमर्दयेत्॥ त्रिनिष्कंभक्षयेसम्यादामशूलप्रशांतये॥

टी० ॥ ॥ एरंडतेल ६ लसूण ८ हिंग १ सैंधव २ या प्रमाणें भाग घेऊन, एकत्र मर्दन करून एक तोळा प्रमाणें खावें म्हणजे आम शूल शांत होतो.

शुद्धसूतंद्विधागंधंयामैकंमर्दयेद्दृढं॥ द्वयोस्तुल्यंशुद्धताम्रंसंपुटेतन्निरोधयेत्॥ अधोर्ध्वलवणंदत्वामृद्भांडेधारयेद्भिषक्॥ रुध्वागजपुटेपाच्यंस्वांगशीतंसमुद्धरेत्॥ संपुटंचूर्णयेत्सम्यक्पर्णखंडेद्विगुंजकम्॥ भक्षयेत्सर्वशूलार्तोहिंगुशुंठीसजीरकं॥ वचामरिचजंचूर्णंकर्षंचोष्णजलैःपिबेत्॥ असाध्यंसाधयेच्छूलंरसोयंशूलकेसरी॥

टी० ॥ ॥ शुद्धपारा १ शुद्धगंधक २ असे भाग घेऊन एकप्रहरभर चांगलें खलून नंतर दोघांचे बरोबर शुद्ध तांब्याचे पत्रे घेऊन खालीं वर कज्जली घालून संपुट करावें, नंतर तें संपुट केलेले पत्रे, मडक्यांत खालीं वर मीठ घालून ठेवावें; मडक्याचें तोंड बंद करून गजपुट द्यावें स्वांगशीत झाल्यावर तें संपुट बारीक खलून विड्याचे पानाबरोबर दोन गुंजा प्रमाणें खावें. नंतर हिंग, सुंठ, जिरें, वेखंड, मिरें यांचें चूर्ण दाहा मासे ऊन पाण्याबरोबर खावें, म्हणजे असाध्य जरीं शूल असला तरीं शांत करील याला शूलकेसरी रस म्हणतात. ॥ इति शूलकेसरीरसः॥

व्यायामंमैथुनंमद्यंलवणंकटुकानिच॥ वेगरोधंसुतक्रंचवर्जयेच्छूलवान्नरः॥

टी० ॥ ॥ व्यायाम, मैथुन, मद्य, खारट, तिखट, वेगरोध, तक्र इतकीं शूलवान् मनुष्यानें वर्ज करावीं. ॥ इतिशूलचिकित्सा. ॥

अथानाहोदावर्तलक्षणोपचारः

बस्तिमेहनयोः शूलंमूत्रकृच्छ्रशिरोरुजः॥ विषमोवंक्षणानाहःस्याल्लिंगंमूत्रनिग्रहात्॥

टी० ॥ ॥ बस्ति, लिंग यांचे ठिकाणी शूल, मूत्रकृच्छ्र, मस्तकपीडा इतक्या लक्षणानी युक्त विषम असा वंक्षणानाह असतो, आणि तो मूत्रनिग्रहापासून होतो.

मन्यागलस्तंभशिरोविकाराज्रंभोपधानात्पवनात्मकास्युः

तथाक्षिनासावदनामयाश्च भवंतितीव्राःसहकर्णरोगैः

टी० ॥ ॥मन्यास्तंभ, गळस्तंभ, शिरोविकार, डोळे, नाक, तोंड, कान यांचे विकाणीं तीव्ररोग हीं चिन्हें वायूचा आनाहाची असतात आणि तो जांभईचे प्रतिबंधा पासून होतो.

वायुःकोष्ठानुगोरूक्षैःकषायकटुतिक्तकैः॥भोजनैःकुपितःसद्यःउदावर्तंकरोतिहि॥वातमूत्रपुरीषांश्चकफमेदोवहानिच॥स्रोतांस्युदावर्तयतिपुरीषंचापिवर्तते॥श्वासकासप्रतिश्यायदाहमोहतृषाज्वरान्॥वातमूत्रपुरीषाणिकृच्छ्रेणलभतेनरः॥

टी० ॥ ॥रूक्ष, तुरट, तिखट, कडु अशा पदार्थाचे भोजनानीं पोटांतला वायू कुपित झालेला तात्काळ उदावर्त रोग करितो. या रोगांत वायू मूत्र पुरीष आणि कफमेद यांतें वाहाणाऱ्या शिरा यांची ऊर्ध्वगती होते, पुरीष ही वर्चे द्वारानीं कदाचित पडते, आणी श्वास कास, प्रतिश्याय, दाह, मोह, तृषा, ज्वर हे उपद्रव असतात, आणि वात, मूत्र, पुरीष हीं संकटानें होतात.

त्रिवृद्धरीतकीश्यामास्नुहिक्षीरेणभावयेत्॥वर्तिकामूत्रपीतास्ताःश्रेष्ठास्त्वानाहनाशनाः॥

टी० ॥ ॥तेड, हिरडा, पिंपळी यांचें चूर्ण करून निवडुंगाचे चिकाची भावना द्यावी, नंतर त्याचा गोळ्या गोमूत्रा बरोबर खाल्ला असतां आनाह नाशा विषयीं श्रेष्ठ आहे.

हिंगुमाक्षिकसिंधूत्थैःपक्त्वावर्तिंसुवर्तिताम्॥घृताभ्यक्तांगुदेदद्यादुदावर्तविनाशिनी॥

टी० ॥ ॥हिंग, मध, सैंधव एकत्र करून खलून फडक्यास लाऊन त्याची वात करून शेकावी नंतर तुपांत भिजवून गुदांत घालावी तेणें करून उदावर्त विनाश होईल. ॥त्रिपाच्यमूत्राम्लरसेनदंतीपिंडीतकृष्णाबिडकुष्टधूमैः वर्तिःकरांगुष्ठनिभाघृताक्तागुदेरुजानाहहरीविदध्यात्

टी० ॥ ॥दांतीमूळ, गेळफळ, पिंपळी, बिडलोण, कोष्टकोळिंजन, लहान सहू यांचे चूर्ण गोमूत्र लिंबाचा रस यांत शिजवून ते फडक्यास लावून त्याची हाताचे अंगष्टा प्रमाणें वात करून तुपांत भिजवून गुदांत देणारा म्हणजे तिडीक आनाह यांचा नाश करील.

हिंगूग्रगंधाबिडशुंठ्यजाजीहरीतकीपुष्करमूलकुष्ठम्
भागोत्तरंचूर्णितमेतदिष्टंगुल्मोदरानाहविषूचिकासु.

टी० ॥ ॥ हिंग १ वेखंड २ बिडलोण ३ सुंठ ४ जिरें ५ हिरडा ६ पोखरमूळ ७ कोष्टकोलिंजन ८ या प्रमाणें भाग घेऊन याचें चूर्ण करून खावें तेणें करून गुल्म, उदर, आनाह विषूचिका यांचा नाश होतो.

हिंगूलजयपालटंकणविषाण्यंत्यार्धभागोत्तरंसर्वंरवल्व
तलेविमर्द्यमनिमान्गुंजाद्वयंवैददेत्॥ मार्तंडोदयवान्
ज्वरादिसहितश्वासोदराध्मानकेपाड्वाजीर्णगदेनुपान
वशात्तः पथ्यंचतक्रोदनं॥ व्योषेणार्द्ररसेनतच्चसितया
युक्तंज्वरेदारुणेमांद्येगुल्मकफानिलेचपवनेश्शूलेचशो
फोदरेवातास्त्रस्वरवर्णकुष्ठगुदजेरोगानशेषांजयेत्॥

टी० ॥ ॥ हिंगूळ १ जेपाळ १॥ टांकणखार १ बचनाग ॥ सर्व एकत्र खलून दोन गुंजा प्रमाणें घ्याव्या याला मार्तंडोदयवान् रस असें ह्मणतात, हा ज्वर श्वासोदर, आध्मान, पांडु अजीर्ण इतक्यांचे ठाई अनुपान योजून दिलाअसतां प्रशस्त आहे. पथ्य ताकभात, सुंठ, मिरें, पिंपळी, आल्याचा रस साखर यांचे बरोबर दारुण ज्वर अग्निमांद्य गुल्म कफ वायू शूल शोफोदर वातरक्त स्वर भेद, वर्णकुष्ठ, मुळव्याध इत्यादीक सर्व रोगांवर प्रशस्त आहे.॥ इतिमार्तं.द.र.

इत्यानाहोदावर्तचिकित्सा.

अथगुल्मलक्षणोपचार:

दुष्टावातादयोत्यर्थंमिथ्याहारविहारतः॥ कुर्वंतिपंच-
धागुल्मंकोष्ठांतेग्रंथिरूपिणम्॥

टी० ॥ ॥ मिथ्या आहार विहारें करून अति दुष्ट झालेले वातादि दोष, पोटांत पांच प्रकारचा ग्रंथिरूप गुल्म उत्पन्न करितात.

सव्यस्तैजायतेदोषैःसमस्तैरपिचोत्थितैः॥ पुरुषाणांत
थास्त्रीणांज्ञेयोरक्तेनचापरः॥

टी० ॥ ॥ वात, पित्त, कफ, आणि सन्निपात या दोषां पासून पुरुषांस होतो, तसा स्त्रियांस होतो; आणि रक्ता पासून ही स्त्रियांस होतो, तो पुरुषांस होत नाहीं.

उद्गारबाहुल्यपुरीषबंधतृप्त्याक्षमत्वांत्रविकूजनानि॥आ
टोपमाध्मानमपक्तिशक्तिरासन्नगुल्मस्यवदंतिचिन्हम्॥

टी० ॥ ॥ फार ढेंकरा, मळ, प्रतिबंध, तृषा सहन न होणें, आंतड्यांत गुरगुर शब्द, जीव गुंडाळून येणें, पोट फुगणें पाचन शक्ती नसणें इतकीं लक्षणें गुल्मानें आसन्न मनुष्यांचीं जाणावीं.

नवप्रसूताहितभोजनायायाचामगर्भंविसृजेदृतौवा
वायुर्हितस्याःपरिगृह्यरक्तंकरोतिगुल्मंसरुजंसदाहम्

टी० ॥ ॥ नूतन प्रसूत झालेली, कुपथ्य करणारी अशा स्त्रीचें रक्त घेऊन वायू दाह, पीडा युक्त गुल्म उत्पन्न करितो; आणी जी स्त्री अपूर्ण गर्भ असतां प्रसूत होते, आणि कुपथ्य करिते, तसेंच ऋतुकाळीं कुपथ्य करिते तिलाही या प्रमाणेंच गुल्म होतो.

वचाभयाबिडंशुंठीहिंगुकृष्णाग्निदीप्यकान् ॥ द्वित्रिष
ट्चतुरेकाष्टसप्तपंचांशकान्क्रमात् ॥ चूर्णंमूत्रादिभिः
पीतगुल्मानाहोदरापहं ॥ शूलार्शःश्वासकासघ्नंग्रहणी
दीपनंपरम् ॥

टी० ॥ ॥ वेखंड, हिरडा, बिडलोण, सुंठ, हिंग, पिंपळी, चित्रक, ओंवा हीं औषधें २।३।६।४।१।८।७।५ या प्रमाणें भाग घेऊन कुटावीं, नंतर तें चूर्ण गोमूत्राबरोबर घ्यालें असतां गुल्म, आनाह, उदर, शूल, मुळव्याध, श्वास, कास संग्रहणी यांचा नाश करतें; आणि अग्नी दीपन करतें.

चित्रकग्रंथिकैरंडशुंठीक्वाथःपरंहितः ॥ शूलानाहवि
बंधेषुसहिंगुबिडसैंधवः ॥

टी० ॥ ॥ चित्रक, पिंपळमूळ, एरंडमूळ, सुंठ यांचा काढा हिंग, बिडलोण, सैंधव यांणीं युक्त करून घ्यावा; ह्मणजे गुल्म, शूल, आनाह विवंध यांवर अत्यंत हितकारक आहे.

पथ्यारोहितकक्वाथोयवक्षारकणायुतः ॥ पिबेत्प्रात
र्यकृत्प्लीहगुल्मोदरनिवृत्तये ॥

टी० ॥ ॥ हिरडा, रक्तरोडा, यांचा काढा जवखार, पिंपळी यांचें चूर्ण घालून घ्यावा ह्मणजे अकृत, प्लीहा गुल्म, उदर यांची निवृत्ती होते.

शुद्धसूतसमंगंधंजेपालंत्रिफलासमम् ॥ त्रिकटुंपेषये
त्क्षौद्रमिश्रंगुल्मंलिहन्हरेत् ॥ उष्णोदकंपिबेच्चानुनारा
चोयंरसोत्तमः ॥

टी० ॥ ॥ शुद्ध पारा, गंधक, जेपाळ, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी हीं एकत्र खलून मधाबरोबर चाटावीं, वर ऊन पाणी प्यावें, तेणें करून गुल्म नाश होईल. त्याला नाराच रस असें ह्मणतात. ॥ इतिनाराचरसः

अथवाउदयमार्तंडोदेयः — टी० ॥ अथवा त्यावर उदय मार्तंड रस द्यावा

शताह्वाचिरबिल्वत्वग्दारुभार्गीकणोद्भवः ॥ कल्कः पीतोहरेद्गुल्मंतिलक्काथेनरक्तजम् ॥

टी० ॥ ॥ शतावरी, करंजाची साल, दारुहळद, भारंगमूळ, पिंपळी यांचे चूर्ण तिळांचे काढ्या बरोबर प्यालें असतां रक्त गुल्माचा नाश होईल.

तिलक्काथोगुडघृतव्योषभार्गीरजोन्वितः ॥ पीतोरक्तभवेगुल्मेनष्टेऽर्त्तेचयोषितः ॥

टी० ॥ ॥ तिळांचा काढा, गूळ, तूप, आणि सुंठ, मिरें, पिंपळी, भारंगमूळ, यांचें चूर्ण घालून प्यालें असतां रक्त, गुल्म, आणि स्त्रियांचें शूळ नष्ट होतें, यांवर प्रशस्त आहे. ॥ भार्गीकृष्णाकरंजत्वग्ग्रंथिकामरदारुजम् चूर्णंतिलानांकाथेनरक्तगुल्मरुजापहम् ॥

टी० ॥ ॥ भारंगमूळ, पिंपळी, करंजाची साल, पिंपळमूळ, देवदार यांचें चूर्ण तिळांचे काढ्याबरोबर प्यालें असता रक्त गुल्माचा नाश होतो.

सामुद्रंसैंधवंकाचंयवक्षारंसुवर्चलं ॥ टंकणंसर्जिकाक्षारंतुल्यंचूर्णंप्रकल्पयेत् ॥ अर्कक्षीरैःस्नुहिक्षीरैर्लुलितंच विभावयेत् ॥ अर्कपत्रंलिपेत्तेनरुध्वाभांडेपुटेपचेत् ॥ तत्क्षारंचूर्णयित्वाथत्र्यूषणंत्रिफलारजः ॥ जीरकंरजनीवन्हिर्नवकस्यचभागतः ॥ क्षारार्धंयोजयेत्सम्यगेकीकृत्यविचूर्णयेत् ॥ वज्रक्षारमिमंपूर्वंस्वयंप्रोक्तंपिनाकिना ॥ सर्वोदरेषुगुल्मेषुशूलशोफेषुवर्जयेत् ॥ अग्निमांद्येत्वजीर्णेचभक्ष्यंनिष्कद्वयंतथा ॥ वाताधिकेजलेकोष्णेघृतेपित्ताधिकेहितः ॥ कफेगोमूत्रसंयुक्तआरनालेत्रिदोषजुत् ॥

टी० ॥ ॥ मीठ, सैंधव, वांगडखार, जवखार, पादेलोण, टाकणखार, सज्जीखार यांचें चूर्ण करून रुईचे आणि निवडुंगाचे चिकांत खलावें, नंतर रुईचे पानाला लेप करावा, नंतर तीं पानें मडक्यांत घालून तोंड बंद करून लहा

नसें पुरघावें. नंतर तें काढून बारीक करून त्यांत त्याचे निमें सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, जिरें, हळद, चित्रक, यांचें चूर्ण घालू न पुनः एकत्र करून खलून ठेवावें, याला वज्रक्षार असें ह्मणतात, हा पूर्वी शिवानें सांगीतला आहे. सर्व उदरें, गुल्म, शूल, शोफ आणि अग्नीमां द्य, अजीर्ण ह्यावर आठ मासे प्रमाणें खावा; वाताधिक्य असेल तर ऊन पाण्या बरोबर, पित्ताधिक्य असेल तर तुपा बरोबर खावा, आणी त्रिदोषाधि क्यावर कांजी बरोबर खावा. ॥ इतिवज्रक्षारः ॥

चिंचाक्षारंस्नुहिक्षारमर्कक्षारंपलंपलं ॥ द्विपलंशंखभू तिंचरामठंचपलार्धकं ॥ लवणानिचसर्वाणिपलमात्रा णियोजयेत् ॥ क्षारद्वयंपलार्धंचसर्वमेकत्रचूर्णयेत् ॥ जंबीरकरसेमर्द्यमनलस्यादनत्रयम् ॥ भृंगराजस्यनि र्गुंडीमुण्ड्योश्चैवपृथक्द्रवैः ॥ आर्द्रकस्यरसेनैवप्रत्येकं मर्दयेद्दिनं ॥ बदरीबीजमात्रांतुवटिकांकारयेद्भिषक् ॥ एकैकांभक्षयेत्प्रातःपंचगुल्मान्व्यपोहति ॥ सर्वशूलं निहंत्याशुअजीर्णंचविषूचिकाम् ॥ मंदाग्निंनाशये च्छीघ्रंपथ्यंतैलाम्लवर्जितं ॥ चिंचाशंखवटीनामग्र हणीरोगहृत्परा ॥

टी० ॥ ॥ चिंच, निवडुंग, रुई यांचा खार चार चार तोळे शंख भस्म ८ तोळे हिंग २ तोळे सैंधव ४ तोळे पादेलोण ४ तो. काचलोण ४ तो. बिडलोण ४ तो. सांबरी मीठ ४ मीठ ४ द्रोणीचें मीठ ४ मृत्तिका लवण ४ तो. सूर्यखार ४ तो. हीं चार चार तोळे सज्जी खार, जवखार दोन दोन तोळे या प्रमाणें घे ऊन एकत्र चूर्ण करावें, आणि ईडलिंबाचे रसात खलावें नंतर चित्र- काचे काढ्यांत तीन दिवस खलावें नंतर माका, निर्गुंडी, गोरखमुंडी, आ लें यांचे रसात एक एक दिवस निराळें खलावें नंतर बोरीचे आंठी प्र माणें गोळी करून प्रातःकाळीं एकेक भक्षण केली असतां पांच प्रकार चे शूल, अजीर्ण, विषूचिका, मंदाग्नी यांचा शीघ्र नाश करील; याला प थ्य तेल तिखट आंबट हें खाऊं नये हिला चिंचाशंखवटी असें ह्मण तात, संग्रहणी रोगाचा नाश करिते. इति चिंचशंखवटी.

सामुद्रलवणंग्राह्यमष्टकर्षमितंबुधैः ॥ पंचसौवर्चलं

ग्राह्यंबिडंसैंधवधान्यकं ॥ पिप्पलीपिप्पलीमूलंचित्र कंकृष्णजीरकं ॥ नागकेसरतालीसाम्लवेतसकंत था ॥ द्विकर्षमात्राण्येतानिप्रत्येकंहारयेद्बुधः ॥ मरीचं जीरकंविश्वमेकैकंकर्षमात्रकम् ॥ दाडिमस्यचतुःक र्षत्वगेलाचार्धकर्षिकी ॥ एतच्चूर्णीकृतंसूक्ष्मंलवणं भास्कराभिधं ॥ शाणप्रमाणंदेयंतुमस्तुतक्रसुरास वैः ॥ वातश्लेष्मभवंगुल्मंप्लीहानमुदरंक्षयं ॥ अर्शांसि ग्रहणीकुष्ठंविबंधंचभगंदरम् ॥ शोफंशूलंश्वासकासं चामदोषंचहृद्रुजं ॥ मंदाग्निंनाशयेच्छीघ्रंदीपनंपाचनं परं ॥ सर्वलोकहितार्थायभास्करेणोदितंपुरा ॥

टी० ॥ ॥ मीठ ८ तोळे, पादेलोण पाच तो; बिडलोण, सेंधव, धणें, पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक, शाहाजिरें, नागकेशर, तालीसपत्र, आम्लवेतस हीं दोन दोन तोळे; मिरें, जिरें, सुंठ एकेक तोळा, डाळिंबाची साल ४ तोळे, दालचिनी ॥ वेलदोडे ॥ तोळा, हें सर्व एकत्र कुटून बारीक करावें याला भास्कर लवण चूर्ण असें ह्मणतात. हें चार मासे प्रमाणें दह्याचे मंडांत अथवा तक्र सुरा आसव ह्यांतून एकांत घालून द्यावें, तेणेंकरून वातश्लेष्मापासून झालेला गुल्म, वात, प्लीहा, उदर, क्षय, मुळव्याध, संग्रहणी, कुष्ठ, विबंध, भगंदर, शोफ, शूल, श्वास, कास, आमदोष, हृद्रोग, मंदाग्नी यांचा नाश होतो. आणि हें अत्यंत दीपन, पाचन आहे सर्व लोकाचे हिता सारीं सूर्यानें पूर्वी सांगीतलें आहे.

दंतिहिंगुयवक्षारालाबुबीजंकणागुडः ॥ स्नुहिक्षी रेणगुटिकासर्वेषांकर्षमात्रिका ॥ भक्षितारक्तगुल्म घ्नीरुधिरस्त्रावकारिणी ॥

टी० ॥ ॥ दांतिमूळ, हिंग, जवखार कडुदुधा भोंपळ्याचे बी, पिंपळी, गुळ निवडुंगाचे चिकांत खरळून १ तोळा गोळी भक्षण केली असतां रक्त गुल्मा ची नाशक आणि रक्ताचा स्त्राव करणारी आहे.

पक्वंतैलेर्कजंपुष्पंरुधिरस्त्रावकारिच ॥

टी० ॥ ॥ रुईचें फूल तेलांत तळून खाल्लें असतां रुधिरस्त्राव करणारें आहे

अथहृद्रोगलक्षणोपचारः

अत्युष्णगुर्वम्लकषायतिक्तश्रमाभिघाताध्यशनैःप्रसं

गेः॥ संचिंतनैर्वेगविधारणैश्चहृद्रामयः पंचविधः प्रतिष्टः

टी० ॥ ॥ उष्ण गुरु, आंबट, तुरट, कडु, त्यांचें अति सेवन, अतिश्रम, धक्का बसणें, अध्ययन, अतिमैथून, अतिचिंता, वेग धारण इतक्या कारणानीं हृद्रोग होतो. तो पांच प्रकारचा सांगीतला आहे.

दूषयित्वारसंदोषाविगुणाहृदयंगताः
हृदिबाधांप्रकुर्वंतिहृद्रोगंतंप्रचक्षते॥

टी० ॥ ॥ वातादिदोष रसाला दूषित करून हृदयांत येऊन व्यथा करिता त त्याला हृद्रोग असें ह्मणतात.

नियम्यतेमारुतजेहृदयंतुघतेतथा॥ आध्मानंकुक्षि हृत्कंठवातविण्मूत्ररोधता॥ तंद्रारोचकशूलानितृष्णा लिंगानिनिर्दिशेत्॥

टी० ॥ ॥ हृदयास ओट बसणें, ओढल्या प्रमाणें व्यथा होणें, आध्मान कुक्षींत, उरांत वारा मारणें, मलमूत्राचा अवरोध, तंद्रा, अरुची, शूल, तृषा, हीं चिन्हें वात हृद्रोगाचीं जाणावीं.

क्वाथःकृतःपौष्करमातुलिंगपलाशभूतीकसठीसुराव्हैः
सनागराजाजिवचायवाव्हैःसक्षारउष्णोलवणेनपेयः

टी० ॥ ॥ पोरवरमूळ, महाळुंग, पळस, ओंवा, कचोरा, देवदार, सुंठ, जिरें, वेखंड यांचा काढा करून त्यांत जवखार, साजिरखार, सेंधव, पादेलोण हीं घालून उष्ण असतां प्यावा तेणेंकरून हृद्रोग बरा होतो.

चूर्णंपुष्करजंलिह्यान्माक्षिकेणसमायुतं
हृद्रोगश्वासकासघ्नंक्षिप्रंहिक्कानिवारणम्

टी० ॥ ॥ पोरवरमुळाचें चूर्ण मधाबरोबर चाटलें असतां हृद्रोग, श्वास, खोकला उचकी यांचें लवकर निवारण करील.

शरावसंपुटेदग्ध्वाशृंगंहारिणजंपिबेत्॥गव्येनसर्पि षापिष्टंहृच्छूलंनाशयेध्रुवम्॥

टी० ॥ ॥ हरिणाचें शिंग परळांत बारीक तुकडे करून ठेवावें, आणि वर दुसरा परळ ठेऊन संधिलेप करून तें जाळावें, नंतर त्याचें चूर्ण करून गाईचे तुपांत घालून प्यावें, तेणें करून हृदयांत शूल नाहींसा होतो.

चतुर्विंशतिपलंक्षीरंगवामथपचेच्छनैः॥ हिरण्गल

कृंयावत्तावत्कुर्यात्तुशीतलं ॥ सिताक्षौद्रंघृतंतस्मिन्दु
ग्धेचार्धपलंक्षिपेत् ॥ कर्षैकंपिप्पलीचूर्णंक्षिप्त्वापेयं
हितंपरं ॥ सर्वदोषोत्थहृद्रोगंज्वरंकासंक्षयंजयेत् ॥

टी० ॥ ॥ १६ तोळे गाईचें दूध मंदाग्नी लावून अर्धे आटे तों पर्यंत पक्क
करावें नंतर थंड झाल्यावर साखर मध तूप दोन दोन तोळे टाकावें, आ
णि पिंपळीचें चूर्ण एक तोळा टाकून प्यावें तेणें करून सर्व दोषां पासून
झालेला हृद्रोग, ज्वर, खोकला क्षय यांचा पराजय होतो.

यष्टीनागबलादीच्यार्जुनैःसर्पिःससाधितं ॥ हृद्रो
गंक्षयपित्तास्त्रानिलास्त्रश्वासकासजित् ॥

टी० ॥ ॥ जेष्टीमध, गांगेरुकी, वाळा, अर्जुन, यांचा काढा करून त्या काढ्यांत
तूप घालून शिजवावें काढा आटला ह्मणजे तूप सिद्ध झालें तें तूप हृद्रोग,
क्षय, पित्तरक्त, वातरक्त श्वासकास यांतें जिंकणारें आहे.

सूतार्कगंधंक्वाथेनवरायामर्दयेद्दिनं ॥ काकमाच्यावटीं
कृत्वाचणमात्रांतुभक्षयेत् ॥ हृदयार्णवनामायंहृद्रोग
दलनोरसः ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, ताम्रभस्म, हीं हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, यांचे काढ्यां
त एक दिवस खलून पुनः कावळीचे काढ्यांत एक दिवस खलून हरभ-
न्या प्रमाणें गोळी करून खावी तेणें करून हृद्रोगाचा नाश होतो याला
हृदयार्णव रस असें ह्मणतात. ॥ इ. त्न. र.

वमनंरेचनंदद्याद्युक्त्याद्धृद्रोगनाशनम् ॥ नाराचोद
यमार्तंडोदद्याद्धृद्रोगहानये ॥

टी० ॥ ॥ हृद्रोग नाशक वमन किंवा रेचक युक्तीनें द्यावें. अथवा नाराच रस
किंवा उदय मार्तंड रस द्यावा ह्मणजे हृद्रोगाचा नाश होईल.

## अथमूत्रकृच्छ्रलक्षणोपचारः

पृथक्ङ्मलाःस्वैःकुपितानिदानैःसर्वेथवाकोपमुपेत्य
बस्तौ ॥ मूत्रस्यमार्गंपरिपीडयंतियदातदामूत्रयतीहकृच्छ्रात्

टी० ॥ ॥ वातादीक मल आपल्याकारणानीं कुपित झालेले निरनिराळे किं
वा संपूर्ण बस्तीप्रत येऊन मूत्राचे मार्गांना जेव्हां रोध करतात तेव्हां संक
टानें मुततो त्याला मूत्र कृच्छ्र असें ह्मणतात.

तीव्रार्तिरुग्वंक्षणबस्तिमेंढ्रेस्वल्पंमुहुर्मूत्रयतीहवातात्

टी० ॥ ॥ मोठी तिडीक रोंचल्या प्रमाणें व्यथा असे बस्तिवंक्षण लिंग यांचे ठिकाणी व्हावें आणि थोडें वारंवार मुतायला होतें हें वातापासून जाणावें.

शुक्रेदोषैरुपहतेमूत्रमार्गेविधारिते॥सशुक्रंमूत्रयेत्कृच्छ्राद्धस्तिमेहनशूलवान्॥

टी० ॥ ॥ वातादिदोषानीं शुक्र दुष्ट झालें असतां, आणि मूत्रमार्गाचा रोध झाला असतां बस्ति लिंग यांचे ठिकाणी शूल होतो आणि शुक्र सहीत मोठ्या संकटानें मुत्तो.

अश्मरीशार्करचैवतुल्यसंभवलक्षणे॥

टी० ॥ ॥ मूत्राश्मरी आणी मूत्रशर्करा यांची उत्पत्ती, आणी लक्षण तुल्य आहे.

पाषाणभेदत्रिवृतान्चपथ्यादुरालभापुष्करगोक्षुरंच॥पलाशशृंगाकटकर्कटीनांबीजंकषायःसनिरुद्धमूत्रे॥

टी० ॥ ॥ पाषाणभेद, तेड, हिरडा, धमासा, पोरवरमूळ, गोरवरूं, पळसपापडी, शिंगाडे, कांकडीच्नें बीं यांचा काढा मूत्रकृच्छ्रावर प्रशस्त आहे.

हरीतकीगोक्षुरराजवृक्षपाषाणभिद्धन्वयवासकानाम्
क्वाथंपिबेन्माक्षिकसंप्रयुक्तंकृच्छ्रेसदाहेसरुजेविबंधे

टी० ॥ ॥ हिरडा, गोरवरूं, बाहावा, पाषाणभेद, धमासा, यांचा काढा मध घालून प्यालें असतां दाह पीडा यांणी युक्त जें मूत्रकृच्छ्र यावर प्रशस्त आहे.

मूलानिकुशकाशेक्षुशराणांचेक्षुवालुका॥मूत्राघाताश्मरीकृच्छ्रंपंचमूलीतृणात्मिका॥

टी० ॥ ॥ कुश, काश, ऊंस, शर, कसई, हीं पांच प्रकारचीं मूळें मूत्राघात, मूत्राश्मरी, मूत्रकृच्छ्र यांचीं नाशक आहेत.

शिलाजत्वश्मभित्कृष्णात्रुटीनांवापिबेद्रुजः

टी० ॥ ॥ शिलाजीत, पाषाणभेद, पिंपळी, वेलदोडे, यांचें चूर्ण पाण्या बरोबर प्यालें असतां मूत्रकृच्छ्रावर प्रशस्त आहे.

हरिद्रामधुकंमूर्वामुस्तकंदेवदारुच॥
पिबेदक्षसमःकल्कंपयसामूत्रपीडितः

टी० ॥ ॥ हळद ज्येष्ठमध मोरवेल नागरमोथे देवदार यांचें चूर्ण एक तोळा दुधा बरोबर ज्याला मूत्र कृच्छ्र असेल त्यानें प्यावें.

एलोपकुल्यामधुकाश्ममेदकौंतिश्वदंष्ट्रावृषकोरुबूके
क्काथंपिबेदश्मजतुप्रधानंसशर्करंसाश्मरिमूत्रकृच्छ्री

टी० ॥ ॥ वेलदोडे, पिंपळी, जेष्टीमध, पाषाणभेद, रेणुका बीज, गोरखरू, अडूळसा, एरंड यांचा काढा शिलाजीत आणी साखर घालून मूत्राश्मरी, मूत्रकृच्छ्र यांवर द्यावा.

एलाश्मभेदसशिलाजतुपिप्पलीनांचूर्णानितंदुलजलै
र्लुलितानिपीत्वा ॥ यद्वागुडेनसहितान्यवलेह्यधीमाना
सन्नमृत्युरपिजीवतिमूत्रकृच्छ्री ॥

टी० ॥ ॥ वेलदोडे, पाषाणभेद, शिलाजीत, पिंपळी यांचें चूर्ण तांदुळांचे धुणांत घालून प्यावें. अथवा गुळाबरोबर खावें म्हणजे मूत्रकृच्छ्री आसन्न मृत्यु जरी असला तरी वांचेल.

समूलगोक्षुरक्काथः सितामाक्षिकसंयुतः ॥ नाशय
न्मूत्रकृच्छ्राणितथाचोष्णांसमीरणम् ॥

टी० ॥ ॥ मुळांसहीत सराट्यांचे झाड आणून त्याचा काढा साखर मध यानीं युक्त करून प्यालें असतां मूत्रकृच्छ्र, उष्णवायू यांचा नाश करील.

तक्रेणयुक्तंशितिवारकस्यबीजंपिबेत्कृच्छ्रविदाहहे
तोः ॥ पिबेत्तथातंदुलधावनेनप्रवालचूर्णंकफमूत्रकृच्छ्रे

टी० ॥ ॥ मूत्रकृच्छ्रापासून दाह होतो त्यावर कुरडूचें बी यांचें चूर्ण ताकांत घालून प्यावें; तसें कफापासून जें मूत्रकृच्छ्र होतें त्यावर तांदुळांचे धुणाबरोबर प्रवाल भस्म प्यावें.

मंथंपिबेद्वासंसितंससर्पिः श्रितंपयोवार्द्धसितंप्रदेयं ॥ धा
त्रीरसेनेक्षुरसंपिबेद्वाकृच्छ्रेसदाहेमधुनाविमिश्रम्

टी० ॥ ॥ दाहयुक्त मूत्रकृच्छ्रावर साखरयुक्त मंथ अथवा तापलेलें दूध तुपासहित बरोबरीनें साखर घालून अथवा आंवळ्यांचा आणि ऊंसाचा रस एकत्र करून त्यांत मध घालून प्यावें.

ऐर्वारुबीजयष्ट्याव्हदार्वीर्वातंदुलांभसा ॥ तोयेन
कल्कंद्राक्षायाःपिबेत्पर्युषितेनवा ॥ पिबेन्मद्येनसूक्ष्मै
लांधात्रीफलरसेनवा ॥

टी० ॥ ॥ शेंधाड्यांचें बीं, जेष्टीमध, दारुहळद, हीं तांदुळांचे धुणांत वाटून

प्यावीं, अथवा शिळे पाण्यांत मनुका वाटून प्याव्या अथवा वेलदोड्याचें चूर्ण मद्या बरोबर किंवा आंवळ्याचे रसा बरोबर प्यावें तेणें करून मूत्र कृच्छ्र दूर होतें.

रसभस्मचभागैकंचतुर्भागंतुगंधकं॥ पिष्ट्वावराटकान् पूर्यार्द्धसपादंचटंकणम्॥ क्षीरेणपिष्टारुध्वास्यंभांडेरुध्वापुटेपचेत्॥ स्वांगशीतंविचूर्ण्याथलघुलोकेश्वरोरसः ॥ चतुर्गुंजोघृतैर्देयोमरीचैकोनविंशति॥ जातीमूलंपलैकंतुत्सजाक्षीरेणपाचयेत्॥ शर्कराभावितंचानुपीतंकृच्छ्रहरंपरम्॥

टी० ॥ ॥ पाऱ्याचें भस्म १ गंधक ४ भाग एकत्र खलून कवड्यांत भरून भस्माचे चतुर्थांश टांकण खार दुधांत खलून, त्याणें कवड्यांचीं तोंडें बंद करून कवड्या मडक्यांत भरून तोंड बंद करून पुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर खलून चार गुंजा प्रमाणें तुपा बरोबर द्यावा, याला लघु लोकेश्वर रस असें ह्मणतात. नंतर १९ मिरें, आणि चार तोळे जाईचें मूळ । शेळीचे दुधांत शिजवून त्यांत साखर घालून प्यावें, अत्यंत कृच्छ्र हारक आहे.

अथमूत्रघातलक्षणोपचारः

मूत्रमल्पाल्पमथवासरुजंसंप्रवर्तते॥ स्थानाच्च्युतंमूत्रयुतंप्राक्पश्चाद्वाप्रवर्तते॥ भस्मोदकप्रतीकाशंमूत्राघातंतदुच्यते॥

टी० ॥ ॥ थोडें थोडें पीडायुक्त असें मूत्र होणें अथवा मूत्राचे पूर्वीं किंवा नंतर मूत्रा बरोबर स्थानापासून भ्रष्ट झालेले भस्माचे पाण्या सारखें जें पडतें त्याला मूत्रा घात असें ह्मणतात.

मूत्रंहारिद्रमथवासरक्तंरक्तमेववा॥ कृच्छ्रात्मुनःपुनर्जंतोरुष्णवातंवदंतितम्॥

टी० ॥ ॥ पिवळें किंवा तांबडें किंवा रक्तयुक्त असें मूत्र होतें त्याला उष्णवात असें ह्मणतात.

सतावभद्राश्ममभिन्मूलंधातावर्यश्वचिभकम्॥ रोहिणी कोकिलारव्योच्चकोंचस्थूलत्रिकंटकम्॥ मस्तुयांपिष्ट्वा कृरापीतंमूत्राघातनिषूदनम्॥

टी० ॥ ॥ रक्तशिवण, पाषाणभेद, शतावरीमूळ, चित्रक, कुटकी, कांकोलि, कमलाक्ष, मोठें सरांटे यांचें चूर्ण बारीक करून मद्याबरोबर प्यालें असतां मूत्रा घाताचें नाशक आहे.

निदिग्धिकायाःस्वरसंपिबेद्वातक्रमिश्रितम् ॥ जलेकुं कुमकल्कंवासक्षौद्रंक्षपितंनिशि ॥

टी० ॥ ॥ रिंगणीचा आंगरस ताका बरोबर प्यावा अथवा रात्रीस पाण्यांत केशर भिजत घालून सकाळीं त्यांत मध घालून कोळून प्यावें तेणें करून मूत्रा घात जातो.

शृतशीतंपयोमांसीचंदनंतंदुलांबुना ॥ पिबेत्सशर्करंश्रेष्ठमुष्णवातेसशोणिते ॥

टी० ॥ ॥ तापून थंड झालेलें दूध, जटामांसी, चंदन, तांदुळाचें धूण, साखर हें एकत्र करून प्यालें असतां रक्तसहीत उष्णवातावर श्रेष्ठ आहे

दद्यादुत्तरबस्तिंवामूत्राघातेसवेदने ॥

टी० ॥ ॥ वेदनासहीत मूत्रा घातावर उत्तर बस्ति द्यावा.

स्त्रीणामतिप्रसंगेनशोणितंयस्यसिच्यते ॥ मैथुनोपरमस्तस्यबृंहणीयोविधिर्हितः ॥

टी० ॥ ॥ अति मैथुनाचे योगानें ज्याचें रक्त शिश्ना वाटे जातें त्याणें मैथुन करूं नये आणि पौष्टिक औषध घ्यावें.

देयःपाषाणभेदोत्रानुपानैःकृच्छ्रनाशनः ॥ शीतोपचारंबहुलंकुर्याल्लिंगोद्भवेगदे ॥

टी० ॥ ॥ पाषाणभेद अनुपान योजून द्यावा, तो कृच्छ्रनाशक आहे. आणि लिंगाचे ठाईं होणारा रोग त्यावर पुष्कळ शीतोपचार करावा.

पिबेच्छिलाजतुक्वाथेगणेवीरतरादिके ॥ रसंदुरालभायावाकषायंवासकस्यवा ॥

टी० ॥ ॥ वीरतर्वादिगणाचे काढ्यांत शिलाजीत प्यावा, अथवा धमासा किंवा अडूळसा यांचा काढा प्यावा.

त्रिकंटकैरंडशतावरीभिःसिद्धंपयोवातभयेसशूले ॥ गुडप्रगाढंसघृतंपयोवारोगेषुकृच्छ्रादिषुशस्तमेतत्

टी० ॥ ॥ सरांटे, एरंड, शतावरी यांचा काढा वातापासू झालेला मूत्राघात

शूल सहित त्यावर प्रशस्त आहे. आणि गूळ, तूप, दूध एकत्र करून मूत्र कृच्छ्रादीक रोगांवर प्रशस्त आहे. इ. मू. धा. चि. ॥

अथमूत्राश्मरीलक्षणोपचारः

बस्त्याध्मानंतदासन्नदेशेषुपरितोतिरुक् ॥ मूत्रेच बस्तगंधित्वंमूत्रकृच्छ्रंशिरोरुजः ॥

टी० ॥ ॥ ओटी पोट फुगलेलें आणि त्याचे सभोंवति अति तिडीक मूत्राला बोकडाचे मुतासारखी घाण, मुतताना तिडीक, डोकें दुखणें हीं चिन्हें मूत्राश्मरीचीं जाणावीं. आणि सामान्यतः बेंची मूत्रबस्ति यांचे ठिकाणी पीडा ॥ भल्लातकास्थिसंस्थानारक्तापीतासिताश्मरी ॥

टी० ॥ ॥ बिब्याचे आंतली बी असते त्या प्रमाणें आकारानें आणि तांबडी किंवा पिंवळी किंवा पांढरी वर्णानें अश्मरी असते.

दौर्बल्यंसदनंकार्श्यंकुक्षिशूलमथारुचिः ॥ पांडुत्व मुष्णावातंचतृष्णाहृत्पीडनंवमिः ॥

टी० ॥ ॥ दुर्बलपणा, ग्लानी, कृशपणा, कुशींत शूल, अरुची, पांढरेपणा, उष्णावात, तृषा, हृदयांत पीडा ओकारी इतके उपद्रव असतात.

शुंठ्यग्निमंथापामार्गशिग्रुवरुणगोक्षुरैः ॥ अभयारग्वधफलैः क्वाथंकुर्याद्विचक्षणः ॥ रामठक्षारलवणचूर्णंदत्वापिबेन्नरः ॥ अश्मरीमूत्रकृच्छ्रघ्नंदीपनंपाचनंपरं

टी० ॥ ॥ सुंठ, ऐरण, आघाडा, शेवगा, वायवर्णा, गोखरू, हिरडा, बाहावा, यांचा काढा करून विचक्षण असेल त्याणें मूत्राश्मरी मूत्रकृच्छ्र यांवर हिंग जवखार सेंधव यांचें चूर्ण घालून प्यावा हा अत्यंत दीपन पाचन आहे.

शृंगबेरयवक्षारपथ्याकालीयकांजनम् ॥ आजनंदधिभिन्नत्क्प्रामश्मरीमाशुपातनम् ॥

टी० ॥ ॥ आलें, जवखार, हिरडा, दारुहळद, काळाशेवगा हीं शेळीचे दुधांत वाटून प्यावीं ह्मणजे मूत्राश्मरी फुटून पडते.

तिलापामार्गकांडेचकारवल्यायवस्यच ॥ पलाशकाष्ठसंयुक्तंसर्वतुल्यंदहेत्पुटे ॥ तन्निक्षेकप्रजामूत्रेवटीं चानंदभैरवीं ॥ पाययेदश्मरींहंतिसप्तवारान्नसंशयः

टी० ॥ ॥ तीळ, आघाडा, कारली, सातु यांचें कांडें, पळसाचें काष्ठ, हीं सर्व स

मान घेऊन मडक्यांत घालून पुट देऊन जाळावीं नंतर त्याची चार मा से राख घेऊन शेळीचे मुतांत गोळी करून खावी, या प्रमाणें सात वे ळा खाल्ली असतां अश्मरीचें पाचन होऊन नाश होतो यांत संशय ना हीं.॥ आदौव्यथास्यात्कटिकुक्षिदेशेततोनिरोधाज्ज्वलितंच मूत्रं॥इत्यश्मरीलक्ष्मरसोत्रयुक्तःपाषाणभेदीसनिरूप्यतेथ

टी० ॥ ॥ पूर्वी कंबर कुशी यांचे ठिकाणी पीडा, नंतर रोध होतो या कारणानें मूत्र उष्ण होतें हें अश्मरी चिन्ह सांगितलें आतां अश्मरी वर योग्य पा षाणभेदी रस तो पुढें सांगीतला आहे.

त्रिकंटकस्यबीजानांचूर्णमाक्षिकसंयुतं आविक्षीरेणसप्ताहंपिबेदश्मरिभेदनम्

टी० ॥ ॥ सरांट्यांचें चूर्ण मधयुक्त मेंढीचे दुधांत घालून प्यावें. सात दिवस प्यालें असतां अश्मरी भेद होतो.

क्षारोनिपीतस्तिलपुष्पराजःसमाक्षिकःक्षीरयुतस्त्रि रात्रं।हंत्यश्मरींसिंधुविमिश्रितंवानिपीयमानंरुचकंप्रयत्नात्

टी० ॥ ॥ तिळांचे फुलांचा क्षार, मध, दूध, एकत्र करून तीन दिवस प्यावें अथवा सैंधव आणि महाळुंग सेवन करावें तेणें करून अश्मरी नाश होतो.

गोपालकर्कटीमूलंपिष्टंपर्युषितांभसा॥ पीयमानंत्रिरा त्रेणपातयत्यश्मरींद्रुतात्॥

टी० ॥ ॥ त्रिभुडाचें मूळ शिळेपाण्यांत वाटून प्यावें ह्मणजे तीन दिवसांत अ श्मरी पाडील.

गव्येनपिष्ट्वापयसार्कपुष्पींनिपीयमानात्रिदिनंप्रभाते विदार्यवीर्येणनिजेनतीव्रामप्यश्मरींयाकुरुतेचदाहम्

टी० ॥ ॥ शिरदोडीगाईचे दुधांत वाटून प्रातः काळीं तीन दिवस प्यावी ह्मण जे ती आपले सामर्थ्यानें दाहयुक्त तीव्र अश्मरीचें विदारण करून नाश करिते. यवक्षारगुडाभ्यांचपिबेत्पुष्पफलोद्भवम्॥ रसंमूत्रविबंधघ्नंशर्कराश्मरीविनाशनम्॥

टी० ॥ ॥ जवखार गूळ यांणी युक्त मूत्ररोधाला नाशक असा फुलाचा किंवा फुलांचा रस प्यावा तो शर्कराश्मरी नाश करितो.

शतावरीमूलरसोगव्येनपयसासमः॥ पीतोनिपाल

यत्याशुत्यश्मरींचिरजामपि॥

टी० ॥ ॥ शतावरीचे मुळांचा रस आणि त्याचे बरोबर गाईचें दूध एकत्र करून प्यावा ह्मणजे फारदिवसांची जरीं अश्मरी असली तरीं तिचा ल वकर नाश करितो.

वरुणस्यत्वचंश्रेष्ठांशुंठीगोक्षुरसंयुतां॥ यवक्षारगु डंदत्वाक्काथंकृत्वापिबेद्धिमम्॥ अश्मरीशर्करामूत्र कृच्छ्राघातरुजापहम्॥

टी० ॥ ॥ वायवर्ण्याची साल, सुंठ, गोखरू, जवखार, गूळ यांचा काढा करू न थंड झाल्यावर प्यावा ह्मणजे मूत्राश्मरी शर्करा मूत्रकृच्छ्र मूत्राघात या रोगांचा नाश करितो.

गंधर्वहस्तबृहतीव्याघ्रीगोक्षुरकेक्षुरान्॥ मूलंकल्कं पिबेद्दध्नामधुरेणाश्मभेदनम्॥

टी० ॥ ॥ एरंड पांढरा, रिंगणी, डोरली, गोखरू काळा ऊस यांचीं मुळें गोड दह्यांत वाटून प्यालीं असतां अश्मरी भेदक आहेत.

तिलापामार्गकदलीपलाशयवसंभवः॥ क्षारःपेयो विमूत्रेणशर्करास्वश्मरीषुच॥

टी० ॥ ॥ तीळ, आघाडा, केळ, पळस, सातु यांचा खार मेंढीचे मुत्राबरोबर प्यावा, मूत्राश्मरी मूत्र शर्करा यांवर प्रशस्त आहे.

क्काथश्चशिग्रुमूलोत्थःकदूष्णोश्मरीपातनः॥ क्षीरान्न भुग्बर्हिशिखामूलंवातंदुलांबुना॥

टी० ॥ ॥ शेगव्याचे मुळाचा काढा तिखट उष्ण अश्मरी पाडणारा असा आ हे तो प्यावा, अथवा गठोण्याचें मूळ तांदुळांचे धुणांत वाटून प्यावें, दूधभात जेवावा

अश्मर्यांचाश्मरीकृच्छ्रेशिलाजतुसमाक्षिकं यवक्षारंगोक्षुरंचखादेद्वाचाश्मरीहरं॥

टी० ॥ ॥ अश्मरी आणि अश्मरीयुक्तमूत्रकृच्छ्र यांचे ठाईं मधुयुक्त शिलाजी त खावा जवखार आणि गोखरू खावें.

हिंग्वेलाक्षीरसर्पिस्तुमूत्रशुक्रामयापहम्

टी० ॥ ॥ हिंग, वेलदोडे, दूध, तूप, हें एकत्र करून प्यालें असतां, मूत्ररोग शु क्ररोग यांचे नाशक आहे.

वरुणस्यतुलांक्षुण्णांजलद्रोणेविपाचयेत्॥ पादशे
षंपरिश्राव्यघृतप्रस्थंविपाचयेत्॥ वारुणीकदलीबि
ल्वंतृणजंपंचमूलकम्॥ अमृताल्वश्मजंदेयंबीजं
चत्रपुसस्यच॥ शतपर्वातिलक्षारःपलाशःक्षारए
वच॥ यूथिकायाश्चमूलानिकर्षकानिसमर्पयेत्॥
अस्यमात्रांपिबेज्जंतुर्देशकालाद्यपेक्षया॥ जीर्णे
चानुपिबेत्सर्वमजीर्णेमस्तुमेवच॥ अश्मरीशर्क
रांचैवमूत्रकृच्छ्रंचनाशयेत्॥

टी० ॥ ॥ वायवर्णी ४०० तोळे कुटून १०२४ तोळे पाण्यांत शिजवावा चतुर्थांश पाणी उरलें ह्मणजे गाळून घेऊन त्यांत ६४ तोळे तूप घालून शिजवावें तूप शेष राहिलें ह्मणजे उतरून त्यांत करवीरणी, केळ, बेल, कुश, काश, ऊंस, शर, कुसई, गळवेल, शिलाजीत, कांकडीचें बीं, काळ्या दूर्वा, तिळांचा खार, पळसाचा खार, जुई हीं सर्व एक एक तोळा घेऊन टाकावी नंतर कालदेश शक्ती पाहून त्याची मात्रा खावी, औषध जिरलें तर जें पाहिजे तें खावें न जिरलें तर नंतर दह्यांचा मंड प्यावा, हें औषध अश्मरी मूत्रकृच्छ्र शर्करा यांचा नाश करितें.

शुद्धसूतंद्विधागंधंद्वेतपौनर्नवैर्द्रवैः॥ मर्दयित्वादि
नंखल्वेरुध्वाधोभूधरेपचेत्॥ पाषाणभेदसंयुक्तंपि-
ष्टाचूर्णंप्रकल्पयेत्॥ भक्षयेदश्मरींहंतिरसःपाषाणभेदकः

टी० ॥ ॥ शुद्धपारा १ भाग गंधक २ भाग घेऊन पांढरे पुनर्नव्याचे रसांत एक दिवस खलून भूधर यंत्रांत पक्व करावें, नंतर त्याचे बरोबरीनें पाषाण भेद घालून एकत्र करून ठेवावें, शक्ति प्रमाणें खावें, ह्मणजे अश्मरी नाश करितें. याला पाषाण भेदी रस असें ह्मणतात. इ. पा. र.

## अथप्रमेहमधुमेहपिटिकालक्षणोपचारः

समक्रियत्वाद्विषमक्रियत्वान्महाक्रियत्वाच्चयथाक्रमंते
मज्जानमोजःपिशितंचदूष्यशारीरिणांविंशतिरेवमेहाः

टी० ॥ ॥ कांहीं समक्रिय आणि कांहीं विषम क्रिय, आणि महाक्रिय, असे आहेत ते क्रमें करून साध्य, याप्य असाध्य असे होतात, वातादि दोषानी मज्जा, शुक्र, मांस दूषित होऊन मनुष्यास वीस प्रकारचे मेह उ

त्पन्न होतात.

दंतादीनांमलाढ्यत्वंप्राग्रूपंपाणिपादयोः॥ दाहश्चिक्कणतादेहेतृट्श्वासश्चोपजायते॥ सामान्यलक्षणंतेषां प्रभूताविलमूत्रता॥

टी० ॥ ॥ दांतमलयुक्त, हातापायांची आग, शरीर चिकचिकीत, तृषा, श्वास हें पूर्व रूप आहे. आणि पुष्कळ गढूळ असें मूत्र, हें त्याचें सामान्यलक्षण आहे.

उदमेहस्तथाचेक्षुःसांद्रमेहःसुराभिधः॥ पिष्टप्रमेहःशीताख्यः शुक्राख्यः सिकताशनैः॥ लालामेहस्तथाक्षारो- नीलमेहोथकालकः॥ हरिद्रामेहमंजिष्ठोरक्तमेहस्तथापरः॥ षोडशोथवसामेहोमज्जामेहःप्रकीर्तितः॥ क्षौद्रमेहस्तथाहस्तिमेहानांविंशतिःक्रमात्॥

टी० ॥ ॥ उदमेह १ इक्षुमेह २ सांद्रमेह ३ सुरामेह ४ पिष्टप्रमेह ५ शीतमेह ६ शुक्रमेह ७ सिकतामेह ८ शनैर्मेह ९ लालामेह १० क्षारमेह ११ नीलमेह १२ कालकमेह १३ हरिद्रामेह १४ मंजिष्ठामेह १५ रक्तमेह १६ वसामेह १७ मज्जामेह १८ क्षौद्रमेह १९ हस्तिमेह २० या प्रमाणें वीस प्रकारचे मेह जाणावे.

पूतिप्रमेहश्चघृतप्रमेहस्तक्रप्रमेहःखटिकाप्रमेहः॥ यथाभिधानंचतथैवलक्षणंबलक्षयंयातिनरस्यदेहः॥

टी० ॥ ॥ पूतिप्रमेह १ घृतप्रमेह २ तक्रप्रमेह ३ खटिकाप्रमेह ४ हे ही चार प्रकारचे आणखी प्रमेह आहेत. आतां उदमेहादिक जे प्रमेह सांगीतले त्याचे नावाप्रमाणेंच लक्षण जाणावें. जसें इक्षुमेह या मध्यें इक्षु हें नाव उंसाचें आहे तर उंसाचे-रसा सारखें शिश्नातून पाणी पडतें, ह्मणून याला इक्षुमेह ह्मणतात.

साध्याकफोत्थादशपित्तजाश्चयाप्यानसाध्याःपवनाच्चतुष्कः

टी० ॥ ॥ कफापासून होणारे दाह साध्य पित्तापासून होणारे साहा ते याप्य वायू पासून होणारे चार ते असाध्य.

गुदेबस्तिशिरस्यंसपृष्ठमर्मस्वचोत्थिताः॥ सोपद्रवादुर्बलाग्नेःपिटिकाःपरिवर्जयेत्॥

टी० ॥ ॥ गुद, बस्तिशिर, खांदे, पाठ, मर्मस्थान, या ठिकाणीं उत्पन्न झालेल्या आणि उपद्रव सहीत आणि ज्याचा अग्नी दुर्बल त्याला झालेल्या असाजा

पिटिका त्यांचें वर्ज न करावें.

त्रिफलादारुदार्व्यब्दक्काथः क्षौद्रेणमेहहा ॥ गडूच्याः स्वरसः पित्तोमधुनासर्वमेहजित ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, देवदार, दारुहळद, नागरमोथे यांचा काढा मधासहीन अथवा गुळवेलीचा आंगरस मधासहीत प्यावा सर्व मेहांचा नाशक आहे. ॥ फलत्रिकंदारुनिशाविशालामुस्ताचनिष्काथ्यनिशासमेतं ॥ पिबेत्कषायंमधुनासंयुक्तंसर्वप्रमेहेषुसमुत्थितेषु ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, देवदार, दारुहळद, कंवडळ, नागरमोथे यांचा काढा हळद मध घालून सर्व प्रमेहावर द्यावा.

रोध्राभयाकट्फलमुस्तकानांविडंगपाठार्जुनधन्वयानां कदंबशालार्जुनदीप्यकानांविडंगदार्वीघनशाल्मलीनाम् ॥ चत्वारएतेमधुनाकषायाः कफप्रमेहेषुनिषेवणीयाः

टी० ॥ ॥ लोध्र, हिरडा, कायफळ, नागरमोथे," वावडिंग, पाहाडमूळ, अर्जुन, धमासा," कळंब, अर्जुन, ओंवा," वावडिंग, दारुहळद, नागरमोथे, सांवरी, " हे चार काढे मधाशी युक्त कफप्रमेहावर सेवन करावे.

रोध्रार्जुनोशीरकुचंदनानामरिष्टसेव्यामलकाभयानाम् धात्र्यर्जुनारिष्टकवत्सकानांनीलोत्पलाजाजिनिशार्जुनानाम् ॥ चत्वारएतेविहिताः कषायाः पित्तप्रमेहेषुमधुप्रयुक्ताः

टी० ॥ ॥ लोध्र, अर्जुन, वाळा, पतंग यांचा काढा; लिंब, वाळा आंवळकाठी, हिरडा यांचा काढा; आंवळकाठी, अर्जुन, लिंब, कुडा यांचा काढा; काळें कमळ, जिरें हळद अर्जुन यांचा काढा, हे चार काढे मध सहीत पित्तप्रमेहावर द्यावे.

एलाशिला जतुकणापाषाणभेदनिर्मितंचूर्णम् ॥ तंदुलजलेनपीतंप्रमेहरोगंहरत्याशु ॥

टी० ॥ ॥ वेलदोडे, शिलाजीत, पिंपळी, पाषाणभेद यांचें चूर्ण तांदुळांचे धुणावरोबर प्यालें असतां प्रमेहाचा नाश लवकर करितें.

एलासकर्पूरशिलासधात्रीजातीफलंगोक्षुरशाल्मलीच सूतेंद्रवंगायसभस्मसर्वमेतत्समानंपरिभावयेच्च ॥ गुडूचिकाशाल्मलिकाकषायैर्निष्कार्धमानांमधुनातनश्च ॥ बद्ध्वावटींचंद्रकलांनसंज्ञांसर्वप्रमेहेषुनियोजयेत्ताम् ॥

टी० ॥ ॥वेळदोडे, कापूर, शिळाजीत, आंवळकाठी, जायफळ, सरांटे, सांवरी, पारा, कथील, लोखंड यांची भस्में सर्व समान घेऊन गुळवेल सांवरी याचे काढ्याची भावना देऊन दोन मासे प्रमाणें गोळी मधाबरोबर सर्व मेहावर द्यावी. हिला चंद्र कलावती ह्मणतात. इतिचंद्रकलावती.॥

गुडूचीरसमधुनावंगभस्मप्रमेहनुत्॥ नागभस्मतथैवापिसर्वमेहनिवारणम्॥

टी० ॥ ॥गुळवेलीचारस, मध यांचे बरोबर वंगभस्म प्रमेह नाशक आहे, तसें नागभस्म सर्व प्रमेह नाशक आहे.

वंगभस्ममृतंसूतंतुल्यंक्षौद्रेविमर्दयेत्
द्विगुंजंलेहयेन्नित्यंहंतिमेहांश्चिरंतनान्

टी० ॥ ॥वंगभस्म, पारदभस्म समभाग घेऊन मधांत खलून दोन गुंजा प्रमाणें नित्य चाटावें तेणें करून फार दिवसांचा मेह जातो.

द्विनिशात्रिफलायुक्तंरात्रौपर्युषितंजले॥ प्रभातेमधुनापीतंमेहमूलनिकृंतती॥

टी० ॥ ॥दारुहळद, हळद, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी हीं कुटून रात्रीस पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळीं कोळून पाणी गाळून घेऊन त्यांत मध घालून प्यालें असतां मेहाचें मूळ छेदून टाकील.

श्यामाककोद्रवोद्दालगोधूमचणकाढकी॥
कुलित्थाश्चहिताभोज्येपुराणामेहिनांसदा

टी० ॥ ॥सांवे, कोद्रु, हरीक, गहूं, हरभरे, तुरी, हुलगे हीं धान्यें मेही मनुष्यास जुनीं हितकारक आहेत.

यथामृतारसःक्षौद्रयुक्तःसर्वप्रमेहजित्॥
हरिद्राचूर्णयुक्तोवारसोधात्र्याःसमाक्षिकः

टी० ॥ ॥जसा गुळवेलीचा रस मधाशीं युक्त सर्व मेह जिंकणारा तसा, हळदीचें चूर्ण आणि मध यांशीं युक्त आवळ्याचा रस आहे.

क्षीरमोदुंबरंयत्नाद्वाकुंचंवाप्रयोजयेत्॥
पिटिकासुसमस्तासुलेपनंसंप्रशांतये॥

टी० ॥ ॥उंबराचे चिकाचा, किंवा बांवचीचे चिकाचा पिटिका ह्मणजे पुटकुळ्या त्यांवर लेप करावा तेणें करून बऱ्या होतात.

न्यग्रोधोदुंबराश्वत्थशोनाकारग्वधासनं ॥ आम्रंकपित्थं जंबूंचप्रियालंककुभंधवम् ॥ मधूकंमधुकंरोध्रंवरुणंपारिभद्रकम् ॥ पटोलंमेषशृंगींचदंतींचित्रकमाढकी ॥ करंजत्रिफलाशक्रभल्लातकफलानिच ॥ एतानिसमभागानिश्लक्ष्णचूर्णानिकारयेत् ॥ न्यग्रोधाद्यमिदंचूर्णं मधुनासहयोजयेत् ॥ फलत्रयरसंचानुपिबेन्मूत्रविशुद्धये ॥ एतेनविंशतिर्मेहामूत्रकृच्छ्राणियानिवा ॥ प्रशमंयांतिवेगेनपिटिकास्रुचयोजयेत् ॥

टी० ॥ ॥ वड, उंबर, पिंपळ, टेटू, बाहावा, बिवळा, अंबा, कवठ, जांबूळ, चारोळी, अर्जुन, धावडा, मोह, जेष्टीमध, रोध्र, वायवर्णा, कडूलिंब, कडूपडवळ, मेडशिंगी, दांतिमूळ, चित्रक, तूर, करंज, हिरडा, बेहेडा, आंवळकाटी, कुडा, बिब्बा हीं सर्वं समभाग घेऊन बारीक चूर्ण करावें याला न्यग्रोधाद्यचूर्ण असें ह्मणतात. मधाबरोबर योजावें. नंतर वर हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचा काढा मूत्र शुद्ध होण्यासाठीं प्यावा तेणें करून वीस प्रकारचे मेह, मूत्रकृच्छें हीं लवकर शांत होतात. हें पिटिकांवर योजावें. इतिन्यग्रोधाद्यंचूर्णं.

सौवीरकंसुरांसूक्तंतैलंक्षीरंघृतंगुडम् ॥
आम्लेक्षुरसपिष्टान्नानूपमांसानिवर्जयेत्

टी० ॥ ॥ बोर, मद्य, कांजी, तेल, दूध, घृत, गूळ, आंबट, उंसांचा रस, पिष्टान्न जलप्राय देशांतलें मांस इतकें मेही याणें वर्ज करावें.

पलाशतरुपुष्पाणांक्वाथःशर्करयायुतः
निषेवितःप्रमेहाणिहंतिनानाविधान्यपि

टी० ॥ ॥ पळसाचा फुलांचा काढा साखर घालून प्यालें असतां नानाप्रकारचे मेह नाशितो.

सजलंत्रिफलाकल्कंआतपेधारयेत्त्र्यहम् ॥ तद्भांडेदोलियंत्रेचणकान्मुष्टिमात्रकान् ॥ अहोरात्रोषितान्खादेद्वर्धमानंदिनेदिने ॥ असाध्यंसाधयेन्मेहंसिद्धयोगउदाहृतः

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचें चूर्ण भांड्यांत भरून त्यांत पाणी घालून तीन दिवस उन्हांत ठेवावें नंतर त्या भांड्यांत दोलायंत्रामध्यें मूठभर हरभरे अहोरात्र ठेवावे, नंतर खावे. ते हरभरे प्रतिदिवशीं वा

ढवीत जावे या प्रमाणें केलें असतां, असाध्य मेह बरा होईल हा सिद्ध योग सांगितला आहे.

कर्कटीबीजसिंधूत्थत्रिफलासमभागिकम्
पीतमुष्णांभसाचूर्णमूत्ररोधंनिवारयेत् ॥

टी० ॥ ॥ कांकडीचें बी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी यांचें चूर्ण सैंधव सर्व सम भाग एकत्र कुटून ऊन पाण्याबरोबर प्यावें, तेणें करून मूत्ररोधाचें निवारण होईल.

त्रिकटुत्रिफलामुस्तंगुग्गुलंचसमांशकम् ॥ गोक्षुरक्काथ संयुक्तांवटिकांकारयेत्बुधः ॥ देशकालबलापेक्षीभक्ष येच्चानुलोमिकां ॥ नचात्रपरिहारोस्तिकर्मकुर्याद्यथेप्सि तं ॥ प्रमेहान्वातरोगांश्चवातशोणितमेवच ॥ मूत्राघातं मूत्रदोषंप्रदरंचापिनाशयेत् ॥

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, नागरमोथे, गुग्गूळ ही समांश घेऊन सराट्यांचे काढ्यांत गोळ्या करून देशकाल, बल पाहून भक्षण कराव्या, अनुलोमक आहेत, याला पथ्य नाहीं. यथेच्छ कर्म करावें. प्रमेह वातरोग, वातरक्त, मूत्राघात, मूत्रदोष प्रदर यांचा नाश करील.

मृतंसूतंमृतंवंगंमृतंलोहाभ्रकंसमं ॥ मर्दयेमधुनासार्धंर सोयंतालकेश्वरः ॥ मासैकंभक्षयेत्क्षौद्रेबहुमूत्रायनुत्तये

टी० ॥ ॥ पारदभस्म, वंगभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म हीं मधांत खलावीं या- ला तालकेश्वर रस असें ह्मणतात. बहुमूत्राचे नाशार्थ मासाभर प्रमाणें मधां त खावें. ॥ इतितालकेश्वरः ॥

शुद्धसूतंसमंगंधंवंगंचद्विगुणंभवेत् ॥ एकत्रमर्दये त्सर्वंवृल्लमेकंप्रमेहिणां ॥ शर्करामधुसंयुक्तंपथ्यंचक्षा रवर्जितम् ॥ एषवंगेश्वरोनामसर्वमेहनिकृंतनः ॥

टी० ॥ ॥ पारा १ गंधक १ वंगभस्म २ या प्रमाणें भाग घेऊन एकत्र खलून वाल प्रमाण मध साखरे बरोबर प्रमेही याणीं खावें, पथ्य खारट वर्ज. याला वंगे श्वर ह्मणतात. सर्व मेहांचा छेदक आहे. इ. वं.

विषोषणकणाटंकहिंगूलैःसमचूर्णकः ॥ आनंदभैरवस्या स्यगुंजातीसारमेहनुत् ॥

टी० ॥ ॥ बचनाग, मिरें, पिंपळी, टंकणखार, हिंगूळ हीं समभाग एकत्र चूर्ण करून ठेवावें. याला आनंद भैरव ह्मणतात. हा गुंजा प्रमाण मेह अती सार यांचा नाशक आहे. ॥ इतिआनंदभैरवः ॥

इतिप्रमेहपिटिकाचिकित्सासमाप्ता.

अथमेदलक्षणोपचारः

अव्यायामदिवास्वप्नश्लेष्मलाहारसेविनः ॥ मधुरान्न रसंप्रायःस्नेहान्मेदोविवर्धते ॥

टी० ॥ ॥ व्यायाम नकरणारा, दिवसास झोंप, कफकारक, आहार सेवन करणारा, मधुर रस प्रायः सेवन करणारा यांचा मेद वाहाडतो, आणि स्नेहापासून ही मेद वाढतो.

मेदसावृतमार्गत्वात्पुष्यंत्यन्येनधातवः ॥ मेदस्त्वचीय तेतस्मादशक्तःसर्वकर्मसु ॥

टी० ॥ ॥ मेदानें अन्य धातूंचे मार्गाचा रोध होतो तेणें करून अन्य धातू शुष्क होतात, आणि मेद वाहाढतो ह्मणून सर्व कर्मा विषयीं मनुष्य अशक्तहोतो.

फलत्रयंत्रिकटुकंसतैलंलवणान्वितम् ॥ षण्मासमुप भुक्तंचेत्कफमेदोनिलापहम् ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी, तेल, सैंधव हीं सर्व एकत्र करून साहा महिनें पर्यंत सेवन केलें तर कफ, मेद, वायु, यांचें नाशक आहे.

अस्वप्नंचव्यवायंचव्यायामंचिंतनानिच ॥ स्थौल्यमिच्छन्परित्यक्तुंक्रमेणातिप्रवर्तयेत्

टी० ॥ ॥ थोडी झोंप, मैथून, व्यायाम, चिंता हीं ज्याला स्थौल्यजावें अशी इच्छा असेल त्याणें क्रमें करून वाढवावी.

व्योषाग्निमुस्तात्रिफलाविडंगगुग्गुलुःसमम् ॥ खादन् सर्वान्जयेद्व्याधीनामवातभवान्गदान् ॥ क्षौद्रेणत्रिफ लाक्वाथःपीतोमेदोहरःस्मृतः ॥

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी, चित्रक, नागरमोथे, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, वावडिंग, गुग्गूळ, समभाग एकत्र करून खावी, तेणें करून सर्व रोगांचा जय होतो आणि आमापासून झालेले रोग यांचा जय होतो, मधा बरोबर हिरडा बेहडा आंवळकाठी यांचा काढा प्यावा. तो मेदहारक आहे.

शीतीभूतंतथोष्णांबुमेदोघ्नंक्षौद्रसंयुतम् ॥ उष्णंभक्तस्यमंडंवापिबन्कृशतनुर्भवेत् ॥

टी० ॥ ॥ ऊन पाणी थंड करून मध घालून प्यालें असतां मेद नाशक आहे. तसाच भाताचा मंड उष्ण प्यावा ह्मणजे तनु कृश होते.

वासादलरसैर्लेपःशंखचूर्णावचूर्णितः ॥ बिल्वपत्ररसोवापिगात्रदौर्गंध्यनाशनः ॥

टी० ॥ ॥ अडूळशाचे पाल्याचा रस, शंखचूर्ण यांचा लेप अथवा बेलाचे पानाचा रसाचा लेप शरीराचे दुर्गंधीचा नाशक आहे.

बब्बूलस्यदलैःसम्यक्वारिणापरिपेषितैः ॥ गात्रमुद्वर्त्येत्पश्चाद्धरीतक्यास्कृपिष्टया ॥ भूयउद्वर्तनंकृत्वापश्चात्स्नानंसमाचरेत् ॥ प्रस्वेदान्मुच्यतेक्षिप्रंततस्त्वेवंसमाचरेत् ॥ जंबूदलार्जुनतरुप्रसवैःसकुष्ठैरुद्वर्तनंप्रकुरुतेप्रतिवासरंयः ॥ प्रस्वेदबिंदुकणिकानिकरानिषंगोदुर्गंधितावपुषितस्यपदंदधाति ॥

टी० ॥ ॥ बाभळीचा पाला पाण्यांत वाटून अंगास चोळावा नंतर हिरडा वाटून चोळावा नंतर स्नान करावें, घामापासून लवकर मुक्त होतो, नंतर या प्रमाणें करावें, जांबळीचीं आणि अर्जुन वृक्षाची पानें, कोष्ठकोळिंजन यांचें चूर्ण पाण्यांत वाटून जो प्रत्यहीं अंगास लावितो त्याचे अंगास घाम दुर्गंधी हीं राहात नाहींत.

त्रिफलातिविषामूर्वात्रिवृच्चित्रकवासकैः ॥ निंबारग्वधषड्ग्रंथासप्तपर्णनिशाद्वयैः ॥ गुडूचींद्रयवाकृष्णाकुष्ठसर्षपनागरैः ॥ तैलमेभिःसमंपक्वंसुरसादिरसप्लुतं ॥ पानाभ्यंजनगंडूषनस्यबस्तिषुयोजितम् ॥ स्थूलतालस्यकंड्वादिजयेत्कफकृतानामयान् ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, अतिवीष, मोरवेल, तेंड, चित्रक, अडुळसा कडूलिंब, बाह्वा, वेखंड, सातविण, हळद, गुळवेल, इंद्रजव, पिंपळी, कोष्ठकोळिंजन, शिरीस, सुंठ हीं औषधें आणि निर्गुंडी इत्यादिकाचे कफहारस याणि युक्त तेल पक्व करून ठेवावें, ते पिणें, अंजन करणें, चूळ टाकणे नस्य.बस्ति चोळणें इतक्या ठिकाणी उपयुक्त केलेले असतां स्थूलपणा आळस खंड इत्या

टी कफाचे रोग जिंकील. ॥ इति त्रिफलादितैलम् ॥

शुद्धसूतंमृतंताम्रंतालंबोलंसमंसमं ॥ अर्कक्षीरैर्दिनंमर्द्यंक्षौद्रैर्लेह्यंद्विगुंजकम् ॥ वडवाग्निरसोनामस्थौल्यवृंदंनियच्छति ॥ पलंक्षौद्रंपलंतोयमनुपानंपिबेत्सदा

टी० ॥ ॥ पारा, गंधक, ताम्रभस्म, हरताळ, रक्त्याबोळ, सर्व समभाग घेऊन रुईचे चिकांत एकदिवस खलून मधाबरोबर दोन गुंजा चाटावा याला वडवाग्नी रस असें ह्मणतात. हा स्थौल्य नाशक आहे. ह्याचावर चार तोळे पाणी आणि चार तोळे मध एकत्र करून प्यावें. इतिवडवाग्नीरसः ॥

## अथोदरलक्षणोपचारः

रोगाःसर्वेपिमंदाग्नौसुतरामुदराणिच ॥ अजीर्णान्मलिनैश्चान्नैर्जायंतेमलसंचयात् ॥ वातोदरंचैषजलोदरंचप्लीहोदरंबद्धगुदंतथैव ॥

टी० ॥ ॥ सर्वरोग मंदाग्नी असतां होतात; त्यांत उदरें तर मंदाग्नी असतानांच होतात, तशीं अजीर्णा पासून, मलिनपदार्थ भक्षणा पासून मल संचयानें होतात. वातोदर, जलोदर, प्लीहोदर बद्धगुद इत्यादीक.

कृशत्वमंत्रोदरवृद्धितंद्रारुचिमलाध्मानबलाग्निहानि

टी० ॥ ॥ कृशपण, आंतडीं, पोट, यांची वृद्धी, तंद्रा, अरुची, मलबद्धता, बल, अग्नी यांची हानी हीं लक्षणें जाणावीं.

पीतंचोदकमेवंतुतस्माज्जातंजलोदरम् ॥

टी० ॥ ॥ मंदाग्नी असतां उदक प्यालें त्या पासून जळोदर होतें.

उदरंसजलंयस्यवर्धतेश्वयथुस्तथा ॥ हस्तपादौकृशौधूमस्याज्जलोदरलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ जलयुक्त पोट वाहाडतें, सूज, हातपाय बारीक, तोंडांतून धूर निघाल्या प्रमाणें होणें, हें जलोदराचें लक्षण जाणावें.

रेचनंवमनंकुर्यात्सर्वत्रपाचनानिच

टी० ॥ ॥ सर्व उदरांवर रेचन, वमन, पाचन हें करावें.

विशालाशंखिनीदंतीत्रिवृन्नीलीफलत्रयम् ॥ निशाविडंगकंपिल्लचूर्णेणोदरनुत्पिबेत् ॥

टी० ॥ ॥ कंवडळ, सांखवेल, दांतिमूळ, तेड, नीळ, हिरडा, बेहडा, आंवळ

काठी, हळद, वावडिंग, कपिला हीं सर्व एकत्र कुटून गोमूत्राबरोबर उदर नाशार्थ घ्यावीं.॥ पयसाश्रृंगबेरांबुकषायोदारुवन्हिजः॥
चव्यमुस्तासमुत्थोवापेयोजठरशांतये॥
टी०॥ ॥पाण्याबरोबर आल्याचा रस अथवा देवदार, चित्रक यांचा काढा, अथवा चवक, नागरमोथे यांचा काढा उदर निवृत्ती साठी घ्यावा.

प्लीहिनः पृष्ठदेशेतुरक्तस्रावंतुकारयेत्॥
टी०॥ ॥प्लीहावान् मनुष्याचें पाठीचें रक्त काढावें.

वामभागेभवेत्प्लीहागुल्मंवदनसन्मुखम्॥
टी०॥ ॥प्लीहा डावे बाजूस असते, आणि गुल्म तोंडाचे समोर असतो.

लवणंरजनीराजीप्रत्येकंपलपंचकम्॥ चूर्णितंनिक्षिपेद्भांडेतक्रंशतपलोन्मितम्॥त्रिदिनंमुद्रितंरक्षेत्तत्पश्चापंचपलंसदा॥ पीत्वाविनाशयेत्प्लीहंत्रिःसप्ताहंनसंशयः
टी०॥ ॥सैंधव २० तोळे, हळद २० तोळे, मोहऱ्या २० तोळे, यांचें चूर्ण, ताक ४०० तोळे भांड्यांत घालून तोंड बांधून तीन दिवस ठेवावें नंतर २० तोळे प्रमाणें रोज घ्यावें, ह्मणजे एकवीस दिवसांनीं प्लीहोदराचा नाश होईल, यांत संशय नाही. समूलपत्रमेरंडंरुध्वाभांडेपुटेपचेत्॥
तत्कर्षपलगोमूत्रंपीतंप्लीहविनाशनम्
टी०॥ ॥मूळें पानें, सुद्धा एरंडाचें झाड भांड्यांत भरून तोंड बंद करून पुट देऊन पक्क करावें, नंतर कुटून एक तोळाभर घेऊन चार तोळे गोमूत्राबरोबर घ्यावें, प्लीहोदर नाशक आहे.

हरीतकीनागरदेवदारुपुनर्नवाछिन्नरुहाकषायः॥
सगुग्गुलुर्मूत्रयुतश्चपेयः शोफोदराणांप्रवरःप्रयोगः॥
टी०॥ ॥हिरडा, सुंठ, देवदार, घेटोळी, गुळवेल यांचा काढा गुग्गुळ गोमूत्र घालून घ्यावा शोफोदरावर श्रेष्ठ प्रयोग आहे.

रक्तस्रावेर्कदुग्धंचसैंधवंलेपयेत्तथा॥ अग्नीदाहंच
कुर्याद्वाप्लीहोदरहरंपरम्॥
टी०॥ ॥रक्तस्राव करून त्यावर रुईचा चीक, सैंधव यांचा लेप करावा अथवा अग्नी दाह ह्मणजे डाग द्यावा. तो प्लीहोदर नाशक आहे.

अंबुपानंदिवास्वापंगुर्वभिष्यंदिभोजनम्॥ व्यायामंचा

ध्वयानंचजठरीपरिवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ उदकपान, दिवसास झोंप, गुरु चिकट असें भक्षण, व्यायाम, मार्ग चालणें इतकें उदरी असेल त्याणें वर्ज करावें.

सामुद्रशुक्तिकाक्षारोयवक्षारःससैंधवः ॥ गोदध्नासं प्रयुज्येतसर्वोदरविनाशनः ॥

टी० ॥ ॥ समुद्रांतल्ये शिंप्यांचा खार, जवखार, सैंधव हें गाईच्चे दह्यां बरोबर खावें सर्व उदरांचें नाशक आहे.

मूत्राण्यष्टावुदरिणांपानेसेकेप्रयोजयेत् ॥ पिप्पलीवर्धमा नंवापयसैवप्रयोजयेत्

टी० ॥ ॥ आठ प्रकारचीं गोमूत्रादीक मूत्रें पिण्यास वाफारा घेण्यास उदरी यांस योजावीं अथवा वर्धमान पिंपळी दुधाबरोबरच योजावी.

उष्ट्रीक्षीरंपिबेजीर्णेनिरन्नोजठरामयी ॥ पक्षंमासंमृ तंवापिनच्चपानीयमाचरेत् ॥

टी० ॥ ॥ उंटिणीचें दूध जिरलें असतां उदरी याणें पक्ष किंवा मास ऋतु पर्यंत अन्न उदक सेवन न करितां प्यावें.

स्नेहस्वेदविरेकादिविधेयंप्लीहरोगिणां

टी० ॥ ॥ स्निग्धोपचार, घाम काढणें रेच इत्यादीक प्लीह रोग्यास करावे.

वामबाहोचमोक्तव्याकूर्पराभ्यंतरेशिरा ॥ विध्येत्प्लीहवि- नाशायकृन्नायकृदक्षिणे ॥

टी० ॥ ॥ प्लीह नाशार्थ डावे हाताची कोंपराचे आंतली शीर टोंचावी आणि यकृत् नाशा साठीं त्याच प्रमाणें उजवे हाताची टोंचावी.

अर्कपत्रंसलवणंमंतर्धूमंविपाचयेत् ॥ मस्तुनातंपि बेत्क्षारंप्लीहोदरहरंपरम् ॥

टी० ॥ ॥ रुइचीं पानें सैंधव मडक्यांत घालून तोंड बंद करून जाळावें, तो खार दह्यांचे मंडाबरोबर प्यावा अत्यंत प्लीह हारक आहे.

लवणंराजिकाचूर्णंसमंगोमूत्रमिश्रितम् ॥ त्रिशाणं हंतिपीतंचेद्यकृत्प्लीहोदराण्यपि ॥

टी० ॥ ॥ सैंधव मोहऱ्या समभाग एकत्र करून कुटून गोमूत्राबरोबर एक तोळा प्यालें तर यकृत्प्लीहा उदर यांचा नाश करितें.

पातव्योयुक्तितःक्षारःक्षीरेणोदधिशक्तिजः॥ पय-
सावाप्रयोक्तव्याःपिप्पल्यःप्लीहनाशनः॥

टी० ॥॥ समुद्रांतले शिंप्याचा क्षार दुधाबरोबर युक्तीनें प्यावा; अथवा दुधाबरोबर पिंपळ्या खाव्या प्लीह नाशक आहेत.

भल्लातकाभयाजाजीगुडैश्चकृतमोदकः॥ सप्तरात्रा
न्निहंत्येषःप्लीहानमतिदारुणम्॥

टी० ॥॥ बिब्बा, हिरडा, जिरें गूळ यांचा लाडू करून खावा; सात दिवसांत अति दारुण प्लीहा नाशितो.

लशुनंपिप्पलीमूलमभयांचैवभक्षयेत्॥ पिबेद्गोमू
त्रगंडूषंप्लीहरोगविमुक्तये॥

टी० ॥॥ लसूण, पिंपळमूळ, हिरडा एकत्र कुटून खावें, वर गोमूत्राचा घोट प्यावा, प्लीह रोग निवृत्त होईल.

यःसप्तरात्रंविलिपेत्स्नुधायाःक्षीरेणचूर्णंमृदितंकणा
याः॥ स्त्रियात्स्वकामंमधुरंचभुंक्तेतस्योदरव्याधिरुपैतिशांति

टी० ॥॥ निवडुंगाचे चिकांत पिंपळीचें चूर्ण खलून त्याचा सात दिवस लेप करावा, आणि खावें. मधुर आहार करावा, असें जो करील त्याचा उदर रोग शांत होईल.

एरंडतैलंदशमूलमिश्रंगोमूत्रयुक्तंत्रिफलारजोवा॥
निहंतिवातोदरशोथशूलंकाथःसमूत्रोदशमूलजश्च

टी० ॥॥ एरंडेलतेल दशमुळांचे चूर्णांत मिश्र करून खावें, अथवा गोमूत्रांत हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचें चूर्ण खावें, अथवा दशमुळांचा काढा गोमूत्र सहीत प्यावा ह्मणजे वातोदर, सूज, शूल यांचा नाशहोतो.

द्वेपंचमूल्योत्रिवृतानिकुंभेसप्तलाचित्रकशिग्रुमूलं॥
कुरंटबीजंत्रिफलागुडूचीमेरंडमूलंमदयंतिकाच॥ पाठा
सभार्गीस्नुषवीस्नुनीलीसरोहिषोयासकुबेलिकाच॥
पृथक्समादत्यपलंजलस्यद्रोणेपचेत्तच्चरणावशेषं॥
घृतंहिपक्वंसकषाययुक्तंनिहंतिपीतंसकलोदराणि॥

टी० ॥ ॥ दशमुळें, तेड, कुंभा, नेवाळी, चित्रक, शेगटा, पांढरे कोरांटीचें बी, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, गुळवेल, एरंडमूळ, मोगरी मूळ, पाहाडमूळ.

भारंगमूळ, पिंपळी, कांळां भाका, रोहिस गवत, धमासा हीं चार चार तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत शिजवावीं, नंतर चतुर्थांश पाणी उरलें ह्मण जे गाळून घेऊन त्यांत तूप घाळून पुनःपक्क करून पाणी आटलें ह्मण जे तें तूप प्यावें सर्व उदरांचा नाश करितें.॥ इतिसर्वोदरेदशमूल्या०घृतं

वातोदरीपिबेत्तक्रंपिप्पलीलवणान्वितम्॥ शर्करामरि चोपेतंस्वादुपित्तोदरीपिबेत्॥ यवानीसैंधवाजाजी- व्योषयुक्तंकफोदरी॥ सन्निपातोदरीतक्रंत्रिकटुक्षारसैंधवैः

टी०॥ ॥ वातोदरी असेल त्याणें पिंपळी सैंधव याणि युक्त आंबट ताक प्यावें आणि पित्तोदऱ्यानें साखर मिरें युक्त गोड ताक प्यावें. तसेंच ओंवा, सैंधव, जिरें, सुंठ, मिरें, पिंपळी याणि युक्त करून कफोदऱ्यानें ताक प्यावें, आणि सन्निपातोदरी असेल त्याणें सुंठ, मिरें, पिंपळी, जव खार, सैंधव याणी युक्त ताक प्यावें.

पुनर्नवानिंबपटोलशुंठीतिक्तामृतादार्व्यभयाकषायः॥ सर्वांगशोथोदरकासशूलश्वासान्वितंपांडुगदंनिहंति॥

टी०॥ ॥ घेंटोळी, कडूलिंब, कडूपडवळ, सुंठ, किराईत, गुळवेल, दारुहळद हिरडा यांचा काढा सर्वांग सूज, उदर, कास, शूल, श्वास, पांडुरोग यांचा नाश क आहे. पुनर्नवादिः॥

सूतभस्मवंगभस्मपलैकैकंप्रयोजयेत्॥ मृतंताम्रंगंधकं चप्रत्येकंचपलंपलं॥ अर्कक्षीरैर्दिनंमर्द्यंसर्वंतद्गोलकी कृतम्॥ रुध्वातद्भूधरेपक्कापुटेकेनसमुद्धरेत्॥ एषवंगे श्वरोनामप्लीहगुल्मोदरंजयेत्॥ घृतेर्गुंजाद्वयोलेह्यो निष्कःस्नेतपुनर्नवैः॥

टी०॥ ॥पाऱ्याचें भस्म ४ तोळे वंग भस्म ४ तोळे ताम्रभस्म ४ तो० गंधक चार तोळे घेऊन रुईचे चिकांत खलून गोळा करावा, नंतर भूधर यंत्रां त पक्क करून काढावा, याला वंगेश्वर असें ह्मणतात. प्लीह, गुल्म, उ दर यांचा जय करील. घेंटोळीचें चूर्ण चार मासे आणि तूप यांचे ब रोबर दोन गुंजा प्रमाणें चाटावा. ॥इतिवंगेश्वरः॥

रसगंधकताम्राणिलोहभस्मंविषंतथा॥ टंकणंसर्जिका क्षारंदरदंचकपर्दिकम्॥ अर्कक्षीरेणखल्वेचवज्रिक्षी

रेणभावयेत् ॥ निर्गुंडीभृंगराजेनचार्द्रद्रवेणभाव येत् ॥ गुल्मोजलोदरेरोगेशोथेपांडुक्षयेतथा ॥ शूले विषूचिकायांचत्ध्यनुपानैःप्रयोजयेत् ॥ त्रैलोक्यडंबरोनामकथितोरोगशांतये ॥ वल्लमात्रप्रमाणेन त्रिःसप्ताहंप्रदापयेत् ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, तांम्रभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, बचनाग, टांकणखार, सज्जीक्षार, हिंगूळ, कवडीचें भस्म हीं समभाग घेऊन रुई, निवडुंग यांचा चीक, निर्गुंडी, माका, आलें यांचा रस यांचा निरनिराळ्या भावना द्याव्या; म्हणजे त्रैलोक्य डंबररस होतो, हा गुल्म, जलोदर, सूज, पांडु, क्षय, शूल, विषूचिका यांचे ठाई अनुपान योजून दोन गुंजा प्रमाणें एकवीस दिवस द्यावी, अथवा रोग शांत होई तों पर्यंत द्यावी.

अत्रोदयमार्तंडोदेयः यावर उदय मार्तंड ही योजावा. ॥ इत्युदरचिकि०

## अथशोफलक्षणोपचारः

सगौरवंस्यादनवस्थितत्वंसोत्सेधमूष्माचशिरातनुत्वं सलोमहर्षांगविवर्णताचसामान्यलिंगंश्वयथोःप्रदिष्टम् ॥

टी० ॥ ॥ जडपणा, अनवस्थितपणा, उंचोटा, ऊष्मा, शिराबारीक, रोमांच, वर्ण बदलणें हें सूजेचें सामान्य लक्षण सांगीतलें आहे.

योमध्यदेशेश्वयथुःसकष्टःसर्वगश्चयः ॥ अर्धांगोरिष्टभूतस्याद्यश्चोर्ध्वंप्रतिसर्पति ॥

टी० ॥ ॥ मध्यभागीं जी सूज येते, आणि सर्वांगास जी येते ती कष्ट साध्य जाणावी. अर्धांगास येणारी आणि वर्ती चढणारी ती अरिष्ट भूत जाणावी.

श्वासोपिपासाछर्दिश्चदौर्बल्यंज्वरएवच ॥ यस्यचान्ने रुचिर्नास्तिश्वयथुंतंविवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ श्वास, ताहान, ओकारी, दुर्बलपणा, ज्वर, अन्नावर अरुची असें ज्या मध्यें आहे, तो श्वयथु म्हणजे सूज वर्ज करावा.

अन्यश्चोपद्रवकृतःशोफःपादसमुत्थितः ॥ पुरुषंहंतिनारींतुमुखजोगुदजस्तथा ॥

टी० ॥ ॥ अन्यरोगाची उपद्रवभूत जी सूज ती पायांस आली तर पुरुषास मारते; आणि मुखाला किंवा गुदाला आली तर स्त्रीला मारते.

॥ अन्यच्च ॥

स्त्रीणांतुमुखजःशोफःपुंसापादगतस्तथा ॥ असा
ध्योतोविजानीयाच्छोपिनोपरिवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ स्त्रियांचे तोंडाला, आणि पुरुषांचे पायांला जी सूज ती असाध्य ते रोगी वर्ज करावे.

दारुगुग्गुलुशुंठीनांकल्कोमूत्रेणशोफजित् ॥ गोमूत्र
स्यप्रयोगोवाक्षिप्रश्वयथुनाशनः ॥

टी० ॥ ॥ देवदार, गुग्गूळ, संठ यांचें चूर्ण गोमूत्राबरोबर प्यालें असतां शोफ जिंकणारें आहे; अथवा केवळ गोमूत्र शोफ नाशक आहे, अथवा उदरांत सांगितलेला पुनर्नवादी काढा द्यावा.

कृष्णाग्निविश्वघनजीरककंटकारीपाठानिशाकरिक
णामगधाजटानां ॥ चूर्णंकवोष्णसलिलेरवलोड्यपीतं
नातःपरंश्वयथुरोगहरंनराणाम् ॥

टी० ॥ ॥ निर्गुडीचें बी, चित्रक, संठ, नागरमोथे, जिरें, रिंगणी, पाहाडमूळ, हळद, पिंपळी, गजपिंपळी, जटामांसी यांचें चूर्ण, मंदोष्ण पाण्यांत कालवून प्यावें, या पेक्षां मनुष्यास शोफ नाशक दुसरें औषध नाहीं.

त्रिफलाक्वाथपानंहिमाहिषीसर्पिषासह ॥ हंतिशोफं
प्रमेहंचनाडीव्रणभगंदरम् ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहेडा, आंवळकाठी यांचा काढा महिषीचें तूप घालून प्यालें असतां सूज प्रमेह नाडी व्रण भगंदर यांचा नाशक आहे.

न्यग्रोधोदुंबराश्वत्थप्लक्षवेतसवल्कलैः ॥ ससर्पिष्कैः
प्रलेपस्याच्छोपनिवारणःपरः ॥

टी० ॥ ॥ वड, उंबर, पिंपळ, पायरी, वेत यांच्या साली उगाळून, तूप घालून लेप करावा तो अत्यंत शोफ निवारक आहे.

गोधूमकणिकायुक्तंनिर्गुंडीपत्रचूर्णकं ॥
पोळिकातिलतैलेनपक्काशोफविनाशिनी

टी० ॥ ॥ गव्हांची कणीक, निर्गुडीचे पाल्याचें चूर्ण यांची पोळी तेलाशीं युक्त शोफ नाशक आहे.

पुनर्नवादारुशुंठीसिद्धार्थःशिग्रुमेवच ॥

पिष्ट्वाचैवारनालेनप्रलेपःसर्वशोफजित्॥

टी० ॥ ॥ घेटोळी, देवदार, सुंठ, पांढरे शिरीस, शेगवा हीं वाटून कांजींत घालून लेप करावा सर्व शोफ जिंकणारा आहे.

पुनर्नवाग्निनिर्गुंडीपल्लितैरंडजैर्दलैः॥
सहचरैर्जलंतप्तंतत्स्वेदःशोफहामतः॥

टी० ॥ ॥ घेटोळी, चित्रक, निर्गुंडी, गुग्गूळ, एरंडाची पानें, कोऱ्हांटा हीं पाण्यांत घालून पाणी तापवावें, त्याचा वाफारा शोफ नाशक आहे.

कुटजार्कशिरीषाणांविदलैरंडनिंबजैः॥
पत्रैर्युक्तंजलंतप्तंतत्स्वेदोदुष्टशोफहृत्॥

टी० ॥ ॥ कुडा, रुई, शिरीस, काळे तेड, एरंडाची पानें, लिंबाची पानें हीं पाण्यांत घालून ते पाणी तापवून त्याचा वाफारा घ्यावा, तो दुष्ट शोफ हारक आहे. ॥ आर्द्रकस्वरसःपीतःपुराणगुडमिश्रितः॥
अजाक्षीराशिनांशीघ्रंसर्वशोथहरोभवेत्॥

टी० ॥ ॥ आल्याचा रस जुना गूळ घालून घ्यावा, आणी शेळीचें दूध सेववन करावें, म्हणजे लौकर सर्व शोफ निवारण होईल.

सिंहास्यामृतभंटाकीक्काथंकृत्वासमाक्षिकम्
कृच्छ्रशोथंजयेज्जंतुंकासंश्वासंज्वरंवमीम्॥

टी० ॥ ॥ अडूळसा, गुळवेल, डोरली यांचा काढा मधयुक्त प्यावा कृच्छ्र शोफ, जंत, श्वास, कास, ज्वर ओकारी यांतें जिंकील.

सेकस्तथार्कवर्षाभूनिंबक्काथेनशोफजित्॥
गोमूत्रेणाथकुर्वीतस्करवोष्णेनावसेचनम्॥

टी० ॥ ॥ रुई, घेटोळी, कडूलिंब याचे काढ्याचा वाफारा, अथवा मंदोष्ण गोमूत्रें करून सिंचन करावें तें शोफ जिंकणारें आहे.

कृष्णापुराणपिण्याकशिग्रुत्वसिकतातसी॥
प्रलेपोन्मर्दनेयुंज्यात्स्करवोष्णामूत्रकल्किताः

टी० ॥ ॥ मिरें, जुनी पेंड, शेगव्याची साल सारवर जवस हीं गोमूत्रांत वाटून किंचित ऊन करून अंगाला चोळावीं, लेप करावा, सूज नाशक आहे.

बिल्वपत्ररसःपीतःशोषणःश्वयथोरुजी॥
विट्संगेचैवदुर्नाम्नीविषूच्यांकामलास्वपि॥

टी० ॥ ॥ बेडाचे पानाचा रस प्यालें असतां सूज मलबद्धता मूळव्याध विषूचिका, कावीळ यांचा शोषक आहे.

बीजपूरजटाहिंस्त्रादेवदारुमहोषधं ॥ रास्नाग्निमं
थलेपोयंवातशोथविनाशनः ॥

टी० ॥ ॥ महाळुंगाचें मूळ, जटामांसी, देवदार, सुंठ, रास्ना, नरवेल यांचा लेप वायूचे शोफाचा नाशक आहे.

हिंगूलंजयपालंचमरीचंटंकणंकणा ॥
संमर्द्यवल्लःसघृतःसर्वशोफहरःपरः ॥

टी० ॥ ॥ हिंगूळ, जेपाळ, मिरें, टांकणखार, पिंपळी यांचा एकत्र खल करून तुपाबरोबर वालभर खावें सर्व शोफ हारक आहे. इतिशोफारिः ॥

दद्योत्पुदयमार्तंडस्त्रैलोक्याडंबरोथवा ॥ अग्निकु
मारकोवात्रदेयःशोफविनाशनः ॥

टी० ॥ ॥ उदयमार्तंड किंवा त्रैलोक्याडंबर किंवा अग्नीकुमार शोफ नाशार्थ द्यावा. ॥ भल्लातकभवेशोफेसतिलाकृष्णामृत्तिका
नवनीततिलैर्लेपोथवादुग्धंतिलान्वितम्

टी० ॥ ॥ बिब्यापासून आलेल्या सूजेवर तीळ, काळी माती अथवा लोणी तीळ किंवा दूध तीळ यांचा लेप करावा.

बिभीतकानांफलमध्यलेपःसर्वेषुदाहार्तिहरःप्रशस्तः
यष्ट्याव्हमुस्तैःसकपित्थपत्रैःसचंदनैस्तत्पिटिकासुलेपः

टी० ॥ ॥ बेहेड्याचे मगज्याचा लेप सर्व सूज दहा यांवर प्रशस्त आहे. आणी बिब्यापासून सूज पुटकळ्या येतात त्यांवर जेष्टीमध, नागरमोथे, कंवठीची पानें, चंदन यांचा लेप करावा.

पिष्टान्नमुष्णंलवणानिमद्यंमृदंदिवास्वप्नमजांगलंच
पयोगुडंतैलमथोगुरूणिशोफंजिघांसुःपरिवर्जयेत

टी० ॥ ॥ पिठाचें अन्न उष्ण, खारट, मद्य, माती, दिवसास झोंप, रानातलें नव्हे असें मांस, दूध, गूळ, तेल, गुरु पदार्थ इतकीं शोफाचे नाशाची इच्छा करणारा याणें वर्ज्य करावीं. ॥ इतिशोफचिकित्सा ॥

अथांत्रवृद्धीमुष्कवृद्धीलक्षण.

मुष्कौवंक्षणतःप्राप्यफलकोशाभिवाहिनीम् ॥ प्रपीड्य

धमनींवृद्धिंकरोतिफलकोशयोः॥

टी०॥ ॥ वायू अंडकोशाला वंक्षणाजवळ आणून त्याला धारण करण करणारी अशी जी शीर तिला अत्यंत पीडा करून फलकोश ह्मणजे अंडांतल्या गोळ्या त्यांची वृद्धी करितो.

मूत्रांत्रजावप्यनिलाद्धेतुभेदस्तुकेवलः॥

टी०॥ ॥ मूत्रज आणि अंत्रज हे वायू पासूनच परंतु कारण मात्र निराळे आहेत. ॥ अन्त्रवृध्दिरसाध्योयंवातवृध्दिसमाकृतिः॥

टी०॥॥ हा अंत्रवृद्धी रोग असाध्य, त्याचें वातवृद्धी रोगासारखें लक्षण आहे. रास्नायष्ट्यमृतेरंडपटोलरेणुकाबला॥

वृषस्यात्कथितोवृद्धिंहन्याच्चित्रकतैलवान्

टी०॥ ॥ रास्ना जेष्टीमध, गुळवेल, एरंड, कडुपडवळ, मेंदी चिकणा अडूळसा यांचा काढा चित्रकाचें चूर्ण एरंडेलतेल याणी युक्त करून प्यावा. अंत्र वृद्धीचा नाश करील.

तैलमेरंडजंपीत्वाबलासिद्धपयोन्वितम्॥ आध्मान शूलोपचितामंत्रवृद्धिंजयेन्नरः॥

टी०॥ ॥ चिकण्याचे काढ्यांत एरंडेल घालून प्यावें. तेणें करून आध्मान शूल याणी युक्त जी अंत्रवृद्धी तिचा जय होईल.

शंखोपरिचकर्णांतेत्यक्त्वासेवनिमादरात्॥ व्यत्या-सांद्वाशिरोविद्ध्येदंत्रवृद्धिनिवृत्तये॥

टी० ॥॥ शंख ह्मणजे गालाचे वरचा भाग, त्याचे वर्ती कानाचे जवळ सेवनी ह्मणजे सांदा सोडून शिरा वेध करावा; तो व्यत्यासेंकरून ह्मणजे उजवे कडील अंत्रवृद्धी असली तर डावे कडील शिरा वेध करावा; आणि डावेकडे असली तर उजवेकडे करावा, अंत्रवृद्धीची निवृत्ती होते.

कर्णकोशस्यमध्येतुरक्तांनिर्धारयेच्छिराम्॥ उभा-भ्यांद्वेशिरेवेध्येतेनवातस्फरवंभवेत्॥

टी०॥ ॥ कानाचे मधली रक्तयुक्त शिरा वेधावी, दोहीं कडून वृद्धी असेल तर दोन्हीं कानाच्या शिरा वेधाव्या तेणें करून ही अंत्र वृद्धीचें सुख होईल.

अजाजीहपुषाकुष्टंगोमयंबदरान्वितम्॥

कांजिकेनतुसंपिष्टंकुर्याद्वृध्मप्रलेपनम्॥

टी०॥ ॥ जिरें, थोर शेरणी, कोष्ठ कोलिंजन, गाईचें शेण, बोर हीं कांजीत वाटून लेप करावा तेणें करून वर्ध्म अंत्रवृद्धी यांचा नाश होतो.

लाक्षाकरंजबीजंचशुंठीदारुसगैरिकम् ॥ कुंदरंच समंकृत्वाचूर्णयेन्मतिमान्भिषक् ॥ कांजिकेनतु संपेष्यलेपोयंश्वयथुनाशनः ॥

टी०॥ ॥ कारव, करंजाची बी, सुंठ, देवदार, काव, यांचे बरोबर कुंदा गवत घेऊन सर्वांचें चूर्ण करून कांजीत कालवून किंचीत ऊन लेप करावा. हा अंत्रवृद्धी, सूज यांचा नाशक आहे.

आर्द्रकस्यरसः क्षौद्रयुक्तोवृषणवातजित् ॥

टी० ॥ ॥ आल्याचा रस मधासहीत प्यावा, वृषण वात जिंकणारा आहे.

फलत्रिकोद्भवंक्वाथंगोमूत्रेणैवपाचयेत् ॥ वातश्लेष्मकृतंहंतिशोथंवृषणसंभवम्

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचा गोमूत्रांत काढा करून प्यावा; वात कफा पासून आलेला वृषणाचा शोफ यांचा नाशक आहे.

रास्नामृताबलायष्टीगोकंटैरंडजःशृतः ॥ एरंडतैलसंयुक्तोवृद्धिमंत्रभवांजयेत् ॥

टी० ॥ ॥ रास्ना, गुळवेल, चिकणा, जेष्टीमध, गोखरू, एरंडमूळ याचा काढा एरंडेल घालून प्यावा, म्हणजे अंत्रवृद्धी जिंकील.

गुग्गुलंकबुतैलंवागोमूत्रेणपिबेन्नरः ॥ अंत्रवृद्धिंनिहंत्याशुचिरकालानुबंधिनीम् ॥

टी० ॥ ॥ गुग्गूळ, किंवा एरंडेल तेल गोमूत्रा बरोबर प्यावें म्हणजे फार दिवसांच्या अंत्रवृद्धीचा नाश होतो.

सक्षीरंवापिबेत्तैलंमासमेरंडसंभवम् ॥ तैलंनारायणंयोज्यंपानाभ्यंजनबस्तिषु ॥

टी० ॥ ॥ दुधाबरोबर एरंडेल तेल किंवा एरंड्यांचा मगज कटवून प्यावा, अथवा तेल पिणें, चोळणें बस्ती या विषयीं योजावें, अंत्रवृद्धी नाशक आहे.

पंचवल्कलकल्केनसघृतेनप्रलेपनम् ॥

टी०॥ ॥ वड, पिंपळ, उंबर, पायरी, नांदुरकी, वेत यांचा साली वाटून त्यांत तूप घालून लेप करावा, अंत्रवृद्धी नाशक आहे.

पुनर्नवामृतादारुसक्षारलवणत्रयम् ॥ कुष्ठंसठीव चामुस्तारास्नाकट्फलपुष्करम् ॥ यवानीहपुषाहिंगु शताव्हाचाजमोदकः ॥ विडंगातिविषायष्टीपंचकोल कसंयुतैः ॥ एतैःकल्कसमैरक्षैस्तैलप्रस्थंविपाचये त् ॥ गोमूत्रंद्विगुणंदेयंकांजिकंचतथैवच ॥ पुनर्नवा द्यमेतत्तुबस्तौपानेतथोत्तमम् ॥ कट्यूरुपृष्ठमेढ्रेषुकु- क्षौचवृषणाश्रितम् ॥ कफवातोद्भवंशूलमंत्रवृद्धीवि- नाशनम् ॥

टी० ॥ ॥ घेटोळी, गुळवेल, देवदार, मीठ, जवखार, बिडलोण, साजीखार, खारी मीठ, टांकणखार, सैंधव, कान्चलवण, कोष्ठकोळिंजन, कचोरा, वेखंड, नागरमोथे, रास्ना, कायफळ, पोखरमूळ, ओवा, शेरणी, हिंग, शतावरी, अजमोदा, वावडिंग, अतिविष, जेष्टीमध, सूंठ, मिरें, पिंपळी, चवक, चित्रक या सर्वां बरोबर बेहेडे घेऊन सर्व ६४ तोळे तेलांत टाकून तें तेल कढवावें, नंतर त्यांत दुप्पट गोमूत्र आणि कांजी मिळवावी. याला पुनर्नवाद्य तेल ह्मणतात; हें पिणें बस्ती या विषयीं योजावें तेणे करून कंबर, पाट, मांड्या, लिंग, कुशी, वृषण या ठिकाणच्या कफ वातापासून झालेला असा शूल अंत्रवृद्धी यांचा नाश होतो.

अंगुष्ठमध्यत्वक्छित्वादहेदंगविपर्ययम् ॥

टी० ॥ ॥ पायांचे आंगठ्याचे मधोमध त्वग्भेद होई तों पर्यंत डाग द्यावा तो विपर्ययानें उजवे कडे, वृद्धी असली तर डावे आंगठ्याला या प्रमाणें.

वचासर्षपकल्केनप्रलेपःशोफनाशनः ॥

टी० ॥ ॥ वेखंड शिरीस वाटून त्यांचा लेप शोफ नाशक आहे.

पिप्पलीजीरकंकुष्ठंबदरंशुष्कगोमयम् ॥ कांजिकेन प्रलेपोयमंत्रवृद्धिविनाशनः ॥

टी० ॥ ॥ पिंपळी, जिरें, कोष्ठकोळिंजन, बोर, वाळलेलें शेण यांचा लेप हीं कांजींत घालून करावा अंत्र वृद्धी नाशक आहे.

देवदारुमिसीवासाटांकळीमूलसैंधवैः ॥ क्षौद्रयुक्तैश्च तैर्लेपोवृद्धिमंत्रभवांजयेत् ॥

टी० ॥ ॥ देवदार बडीशेप अडूळसा टांकळीचें मूळ सैंधव यांचा लेप अंत्रवृ

द्धीला जिंकील. ॥ दार्वीचूर्णंगवांमूत्रैर्निपीतंमुष्कवृद्धिजित् ॥

टी० ॥ ॥ दारुहळदीचें चूर्ण गोमूत्रा बरोबर प्यालें तर अंडवृद्धी जिंकणारें आहे.

वेगाहतंपृष्ठयानंव्यायामंमैथुनंतथा ॥ अत्याशनमथाध्वानमुपवासंपरित्यजेत्

टी० ॥ ॥ वेगानें मारणें, किंवा घाव घालणें, पाठीवर बसून जाणें, व्यायाम, मैथून, अती खाणें, मार्ग चालणें, उपास करणें. इतकीं अंत्रवृद्धीचा रोग्यानें वर्ज करावीं. ॥ इति अंत्रवृद्धी चिकित्सा. ॥

## अथकुरंडलक्षणोपचारः

अत्यभिष्यंदिगुर्वम्लसेवनान्निचयंगतः॥ करोतिग्रंथिवच्छोफंदोषोवंक्षणसंधिषु ॥

टी० ॥ ॥ अति चिकट, जड, आंबट, याचे सेवनानें वृद्धी पावलेला असा दोष वंक्षण संधीचे ठायीं ग्रंथी प्रमाणें शोफ उत्पन्न करितो. त्याला कुरंड ह्मणतात.

वातकोपिभिराहारैः शीततोयावगाहनैः ॥ धारणेरणभाषाध्वविषमांगप्रवर्तनैः ॥ क्षोभणैःक्षुभितश्चान्यैःक्षुद्रांत्रावयवंयदा ॥ पवनोद्विगुणीकृत्यस्वनिवेशादधोनयेत् ॥ कुर्याद्वंक्षणसंधिस्थोग्रंथ्याभंश्वयथुंस्तदा ॥ ज्वरशूलांगसादाढ्यंतंवर्ध्ममितिनिर्दिशेत् ॥

टी० ॥ ॥ वात कोप करणारे, आहार, थंड पाण्यांत बुडी मारणें, भार घेणें, फेकणें बोलणें, चालणें, यांचे गई वेडें वांकडें आंग करणें या कारणानीं, आणी दुसऱ्या वायु क्षोभक कारणानी क्षुभित झालेला वायू बारीक अंतड्याचे अवयव वेगळे करून स्वस्थाना पासून खालीं नेऊन वंक्षण संधिगत होणारा आणी ग्रंथी सारखा शोफ उत्पन्न करतो. ज्वर, शूल, कृशपणा, याणी युक्त असतो तेव्हां त्याला वर्ध्म असें ह्मणावें.

इंद्रवारुणिकामूलंतैलंपुष्करजंतथा ॥ संमर्द्यचसगोदुग्धंपिबेज्जंतुःकुरंडके ॥

टी० ॥ ॥ कवडळीचें मूळ पुष्कळ तेलांत मिश्र करून गाईचे दुधाबरोबर प्यावें; कुरंड रोगावर प्रशस्त आहे.

गवांघृतेनसंयुक्तंकृत्वासैंधवचूर्णकम् ॥ पिबेत्सप्त

दिनेयावत्तावल्लेपःकुरंडके॥

टी०॥॥गाईचे तुपांत सैंधव चूर्ण घालून सात दिवस प्यावें, आणी तितके दिवस कुरंडावर लेप करावा.

संचूर्णितंसैंधवमाज्ययुक्तंसंमर्द्यतोयस्थितमेवसोष्णं॥मुहुर्मुहुर्यःकुरुतेप्रलेपंविलीयतेतस्यकुरंडरोगः

टी०॥॥सैंधव चूर्ण तूप पाण्यांत खलून किंचित् उष्ण वारंवार लेप करावा तेणें करून कुरंड रोग नाश पावतो.

एरंडतैलसंमिश्रंकासीसंसैंधवंपिबेत्॥वस्त्रेणवृषणंबध्वाकुरंडज्वरनाशनम्॥

टी०॥ ॥एरंडेल तेल सैंधव याणी मिश्र करून आक्षिक मद्य प्यावें, आणी वृषण वस्त्रानें बांधावा, तेणें करून कुरंडज्वराचा नाश होतो.

तंदुलवारिविमिश्रंघृतपूरसंज्ञमुच्यतेलोके॥तन्मूलपिष्टलेपंकुरंडगलगंडयोःकुर्यात्॥

टी०॥॥तांदुळाचे धुणांत चोपड्या करंजाचें मूळ उगाळून त्याचा लेप कुरंड आणि गंडमाळा यांवर करावा.

ईश्वरीमूलमेरंडमूलंमूषकचर्मच॥प्रलेपःस्यात्कुरंडाख्यरोगविच्छेदकारकः॥

टी०॥॥वांझ कर्टोलीचेंमूळ, एरंडमूळ, उंदीरकानीची साल यांचा लेप कुरंड नाशक आहे.

सुपेषितंब्राह्मणयष्टिकायामूलंसमंतंदुलधावनेन॥निहंतिलेपाद्गलगंडमालांकुरंडमुख्यानखिलान्विकारान्

टी०॥॥भारंगमूळ तांदुळाचे धुणांत उगाळून गंडमाळा कुरंड यांवर लेप करावा म्हणजे त्यांचा नाश करील.

वातारितैलमृदितंखरवारुणीजंमूलंनरःपिबतियोमसृणंविचूर्ण्य॥गव्येनिधायपयसित्रिदिनावसानेतस्यप्रणश्यतिकुरंडकृतोविकारः॥

टी०॥॥एरंडेल तेलांत लघु इंद्रा वणाचें मूळ खलून गाईचे दुधाबरोबर तीन दिवस प्यावें म्हणजे कुरंड रोगाचा नाश होईल.

तरुमूषिकचर्मणानिबद्धःप्रविलेपादथचेश्वरीजटायाः

उपशांतिमुपैतिमानवानामचिरेणैवकुरंडसंज्ञरोगः॥

टी० ॥ ॥ उंदीरकानीची साल बाधावी, किंवा वांझकर्टोलीचे मूळ उगाळून लेप करावा ह्मणजे कुरंड रोग लवकर शांत होतो.

यः पित्तदोषेणकुरंडरोगोभवेच्छिशोर्दक्षिणमुष्कभागे तस्योर्ध्वभागंश्रवणस्य विध्येद्वामस्यवामेप्रभवेपरस्य॥

टी० ॥ ॥ जो पित्त दोषानें मुलांचे उजवे बाजूला अंडावर कुरंड रोग होतो, त्याचे डावे कानावरची शीर वेधावी, डावे बाजूला असला तर, उजवे कानावरची शीर वेधावी. इति कुरंड चिकित्सा.

अथ गंडमालापच्चीग्रंथ्यर्बुदल०

विबद्धः श्वयथुर्यस्य मुष्कवल्लंबतेगले॥ महान्वायदि वाह्रस्वोगलगंडंतमादिशेत्॥

टी० ॥ ॥ जो वाढलेला शोफ अंडाप्रमाणें गळ्याचेठायीं लोंबतो तो मोठा, किंवा लहान त्याला गल गंड असें ह्मणतात.

कर्कंधुकोलामलकप्रमाणैः कक्षासमन्यागलवंक्षणेषु मेदः कफाभ्यांचिरमंदपाकैः स्याद्गंडमालाबहुभिश्चगंडैः

टी० ॥ ॥ बोर, मिरें, आंवळा या प्रमाणें काख, खांदे, मान, गळा वंक्षण यांचे ठायीं मेद आणी कफ यां पासूनजेग्रंथी ओळीनें उत्पन्न होतात, आणी त्यांचा थोडा चिरकालें करून पाक होतो त्याला गंडमाला असें ह्मणतात.

तेग्रंथयः केचिदवाप्तपाकाः स्रवंतिनश्यंतिभवंतिचान्ये॥ कालानुबंधंचिरमादधातिसैवापचीतिप्रवदंतिकेचित्

टी० ॥ ॥ पूर्वी सांगीतलें जे ग्रंथी ते कांहीं अपक्क राहातात. कांहीं एक पाझरतात कांहीं नष्ट होतात. कांहीं नवे उत्पन्न होतात आणी जे फार दिवस असतात त्याला अपची ह्मणतात.

वातादयोमांसमसृक्प्रदुष्य संदूष्यमेदश्चतथाशिराश्च॥ वृत्तोन्नतंविग्रथितंत्वशोफंकुर्वंत्यतोग्रंथिरितिप्रदिष्टः

टी० ॥ ॥ वातादि दोष, मांस रक्त मेद शिरा यानें दूषित करून वाटोळा उंच विशेष घट्ट शोफ उत्पन्न करतात ह्मणून त्या रोगाला ग्रंथी असें ह्मणतात.

गात्रप्रदेशेक्वचिदेवदोषाः संदूषितामांसमसृक्प्रदूष्य ॥ वृत्तंस्थिरंमंदरुजंमहांतमनंतमूलंचिरवृद्धिपाक

मू ॥ कुर्वंतिगात्रेदोच्छ्रयमांसगाढंतमर्बुदंशास्त्रविदो वदंति ॥

टी० ॥ ॥ दूषील झालेले वातादि दोष मांस रक्त यांतें दूषित करून क्वचित गात्र प्रदेशाचे ठायीं वाटोळा, स्थीर, दाबलें असतां किंचित दुखणारा, मोठा फार स्थूल रक्त, चिरकानें वाढणारा, आणि पिकणारा, उंचोटा आणि मांस जांत पुष्कळ अशा रोगाला अर्बुद असें ह्मणतात.

तुंबीरसेनकटुकेनचतुर्गुणेनकल्कीकृतेमगधजादि गणौषधैश्च ॥ तैलंशृतंहरतिदेहिषुगंडमालामत्यु ल्बणामपिगलेगलगंडरोगान् ॥

टी० ॥ ॥ चौपट कडुतुंबीचा रस त्यांत एकपट मगधजादि ह्मणजे पिप्प ल्यादि गणोक्त औषधे वाटून त्या कल्काबरोबर तेल कढवून गंडमाळा गलगंड यांवर लावलें असतां त्यांचा नाश करील.

सर्षपाशिग्रुबीजानिशणबीजातसीयवा ॥ मूलक स्यचबीजानितक्रेणाम्लेनपेषयेत् ॥ गंडानिग्रंथ यश्चैवगंडमालास्तथैवच ॥ आलेपात्तेनशाम्यंति विलयंयांतिवाचिरात् ॥

टी० ॥ ॥ शिरीस, शेवग्याचें बीं, तागाचें बीं, सातु, जवस, मुळ्याचें बीं, हीं आंबट ताकांत वाटून लेप करावा ह्मणजे गलगंड, ग्रंथी, गंडमाला हे रोग शांत होतात. अथवा नाश पावतात.

सर्षपारिष्टपत्राणिदंतिभल्लातकैःसह ॥ छागमूत्रे णसंपिष्टमपचिघ्नंप्रलेपनम् ॥

टी० ॥ ॥ शिरीस, कडूलिंबाचीं पानें, दांतीमूळ, बिब्बा हीं बोकडाचे मुतांत वाटून लेप करावा हा अपची नाशक आहे

जलकुंभीकजंभस्मपक्वागोमूत्रगालितम् ॥ पिबे त्कोद्रवतक्राशीगलगंडनिवृत्तये ॥

टी० ॥ ॥ कांटे शेवतीचीराख गोमूत्रांत घालून शिजवावी, नंतर गाळून प्या वें, आणि हरकांचा भात आणि ताक हें पथ्य करावें; तेणें करून गलगं ड निवृत्ती होते. ॥ व्योषंविडंगंमधुकंसैंधवंदेवदारुच ॥ तैलमेभिःशृतंनस्यात्कृच्छ्रामप्यपचिंजयेत् ॥

टी०॥ ॥ कंद, मिरें, पिंपळी वावडिंग जेष्टीमध सैंधव देवदार हीं औषधें घालून कढलेलें तेल नस्य केलें असतां मोठा कठीण जरी अपची रोग असला तरीं त्यास जिंकील. (र्जयेत्

पश्चात्क्षारेणसंशोध्यव्रणवत्समुपाचरेत्, क्षाराग्निभ्यांदहेद्वापिस्वेदैश्चविविधै

टी०॥ ॥ नस्य केल्या नंतर, क्षार लाऊन धुवावें; आणि व्रणा प्रमाणें उपचार करावा अथवा क्षारानें किंवा अग्नीनें जाळावें; किंवा नाना प्रकारचे स्वेद देऊन जिंकावा.

इभांडसदृशंभेदोल्हत्वाचाग्निंप्रयोजयेत् ॥ जयेद्वि द्रधिवत्पूर्वमर्बुदंदहनादिभिः ॥

टी०॥ ॥ हत्तीचे अंडा प्रमाणें मेद काढून डाग द्यावा; आणि विद्रधि प्र माणें डागादीक उपचार करून अर्बुद रोग जिंकावा.

छुछुंदरीविपक्वंतुक्षणातैलंवरंघृतम् ॥ निंबाश्वमार निर्गुंड्याचाभ्यंगान्नाशयेन्नृणाम् ॥

टी०॥ ॥ राकेचा तेलांत चुचुंद्री तळावी, आणि तें तेल लावावें; किंवा कडलिं ब, कण्हेर निर्गुंडी याणी सिद्ध केलेलें तूप चोळावें तेणें करून गंड मो- ळादी रोग बरे होतात.

कुलित्थंमरिचंहिंगुसजलंगंडपाचनम् ॥

टी०॥ ॥ हुलगे, मिरें, हिंग यांचा काढा गंडमाळांचा पाचक आहे.

विष्णुक्रांताचपेटारीकांजिकेनसुपेषिता ॥ कालस्फो टंहरेल्लेपादन्यग्रंथिषुकाकथा ॥

टी०॥ ॥ विष्णुक्रांत आणि पेटारी ह्मणजे चिकण्याचा भेद आहे; हीं दोन कांजीत वाटून लेप करावा ह्मणजे काळपुळीचा नाश करील, मग इतर ग्रंथींची कथा काय आहे?

पुत्रजीवस्यमज्जांतुजलेपिष्ट्वाप्रलेपयेत् ॥ काल- स्फोटंविषस्फोटंसद्योहन्यात्सवेदनम् ॥ कक्षाग्रंथिं गलग्रंथिंकर्णग्रंथिंचनाशयेत् ॥

टी०॥ ॥ पुत्र जीव वृक्षाचा गर पाण्यांत उगाळून लेप करावा, तो काळपुळी विषाचा फोड हे वेदना युक्त असेल तरीं तात्काळ त्यांचा नाश करितो आणि काख, गळा, मान या ठिकाणचे ग्रंथींचा नाश करितो.

सर्वेषामेवग्रंथीनांरक्तस्रावप्रशस्यते ॥

टी० ॥ ॥ सर्व ग्रंथीचे ठायीं रक्तस्राव प्रशस्त आहे.

गदार्कदुग्धतालेनजेपालेनविनाशयेत्

टी० ॥ ॥ सर्व ग्रंथी, कोष्टकोलिंजन, रुईचा चीक, हरताळ, जेपाळ यांचे लेपानें नासाव्या. ॥ गंधकंसूतकंतुल्यंअर्कक्षीरंससेंधवम्

॥ पिष्टाचकान्चनीमूललेपोयंगंडमालिके

टी० ॥ ॥ पारा, गंधक, समान रुईचा चीक, सैंधव, कांचनीचें मूळ यांचा लेप गंड माळेवर करावा.

पिष्टाजेपालपत्राणिस्वरसेनकृतावटी ॥ छायाशुष्का

ततोलेपाद्गंडमालाविनश्यति ॥

टी० ॥ ॥ जेपाळाची पानें वाटून त्यांचा आंगरसाची वडी सावलीत वाळवून त्याचा लेप केला असतां गंड माळा नष्ट होते.

राजिकालशुनंपेष्यंलेपोत्हृलग्रंथिकः ॥

टी० ॥ ॥ मोहऱ्या लसून एकत्र वाटून ह्रदय गळा या ठिकाणचे ग्रंथीवर लेप करावा.

भल्लातकासीसहुताशदंतिमूलैर्गुडस्नुकरविदुग्धदिग्धैः ॥

लेपेकृतेगच्छतिगंडमालासमीरवेगादिवमेघमाला ॥

टी० ॥ ॥ बिब्बा, हिराकस, चित्रक, दांतिमूळ, गूळ, निवडुंगाचाचीक, रुईचा चीक हीं एकत्र खलून लेप केला असतां गंड माळा जाते; जशी वायूचे वेगानें मेघ माला जाते.

अलंबुषायाःस्वरसःपीतोह्रिपलमात्रया ॥ अपच्यां

गंडमालानांकामलायाश्चनाशनः ॥

टी० ॥ ॥ लाजाळूचास्वरस प्यालें असतां अपची गंडमाला, कामला यांचा नाशक आहे. ॥ कांचनारत्वचःक्वाथःशुंठीचूर्णेननाशयेत् ॥

॥ गंडमालांतथाक्वाथःक्षौद्रेणवरुणत्वचः ॥

टी० ॥ ॥ कांचनाचे सालीचा काढा शुंठीचे चूर्णाशीं युक्त प्यावा, तसाच वायवर्ण्याचे सालीचा काढा मधाशीं युक्त प्यावा, ह्मणजे गंडमालेचा नाश करील.

जलेनपेषयेतुल्यंकान्चनंचित्रकंवृषं ॥ सप्ताहंलेपयेत्तेनसर्वजागंडमालिकाः ॥ स्पुटंतिनात्रसंदेहःस्फोटंलेपमिमंकुरु ॥

टी० ॥ ॥ कांचनी मूळ चित्रक अडूळसा हीं सर्व सम पाण्यांत वाटून त्याचा सात दिवस लेप केला असतां सर्व दोषां पासून झालेल्या गंडमाळा फुटतात, संशय नाहीं. हा लेप फोडावर ही करावा.

वत्सनाभंनिंबुनीरंलेपाद्गंडंविनश्यति

टी० ॥ ॥ बचनाग लिंबाचा रस यांचे लेपानें गंडमाळा नाश पावते.

निजद्रवेणसंपिष्टंमुंडीमूलंप्रलेपयेत् ॥ गंडमालाक्षयंयातितद्द्रवंच्चपिबेत्पलम् ॥

टी० ॥ ॥ गोरक मुंडीचे रसांत तिचेंच मूळ वाटून लेप करावा, आणि चार तोळे रस प्यावा, तेणें करून गंडमाळेचा क्षय होतो.

ब्रह्मदंडीयमूलंतुपिबेत्तंदुलवारिणा ॥ स्फुटितांहंतिलेपेनगंडमालान्नसंशयः ॥

टी० ॥ ॥ ब्रह्मदंडीचें मूळ तांदुळांचे धुणांत उगाळून प्यावें, आणि लेप करावा, ह्मणजे फुटलेल्या गंडमाळांचा नाश करितो.

षट्फलंव्योषचूर्णंचत्रिफलाचपलत्रयम् ॥ कांचनारत्वचाचूर्णंयोजयेद्द्वादशंपलं ॥ गुग्गुलुःसर्वतुल्यःस्यात्सर्वमेकत्रकुट्टयेत् ॥ क्षौद्रंपलशतंदेयंगुटिकाकर्षसंमितां ॥ भक्षयेद्गंडमालार्तोगलग्रंथीश्चनाशयेत् ॥

टी० ॥ ॥ सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण २४ तोळे, हिरडा, बेहडा, आंवळकाटी, यांचे १२ तोळे, कांचनाचे सालीचें ४८ तो० गुग्गुळ ८४ तो० घेऊन सर्व कुटून सर्व एकत्र करावें, नंतर ४०० तोळे मधांत गोळ्या एक तोळा बचनागाच्या कराव्या, आणि एक एक खावी; ह्मणजे गंडमाला गलगंड यांचा नाश करील. इ. त्रि. क.

अजमोदाचसिंदूरंहरितालंनिशाद्वयम् ॥ क्षारद्वयंफेनयुतंसाधकंसरलोद्भवं ॥ इंद्रवारुण्यपामार्गकदलीकंदकैःसमैः ॥ एभिःसार्षपकंतैलमजामूत्रप्रयोजितम् ॥ मृदग्नोपाचयेदेतत्स्नुह्यर्कक्षीरमिश्रितम् ॥ अजमोदादिकंतैलंगंडमालांव्यपोहति ॥ आमांविदग्धांतुपचेत्पक्वांचेचविशोधयेत् ॥ रोपणंमृदुभावंच्चतैलेनानेनकारयेत् ॥

टी० ॥ ॥ ओंवा, शेंदूर, हरताळ, दारुहळद, हळद, जवखार, सज्जीखार, समुद्रफेण, दवणा, विशेषनामकधूप, कंवडळ, आघाडा, केळीचा कांदा, हीं सर्व समभा

ग घेऊन तेलांत टाकून त्यांत शेळीचें मूत्र, निवडुंगाचा चीक, रुईचा चीक घालून मंदाग्नीवर पक्क करावें, याला अजमोदादी तैल ह्मणतात, हें गंडमाला नाशक आहे. अपक्क असली तर पोटीस बांधून पिकवावी आणि पिकली असली तर दर्द काढून शब्दु करावी, नंतर भरून येणें आणि मऊपणा हा, त्या तेलानें आणावा. ॥ इति अजमोदाद्यं तैलम् ॥

गंधकंटंकणंसिंधुकांचनीनवसारकम् ॥ सौवर्चलंयव क्षारंकाचंरक्तंस्कवर्चलम् ॥ शीतरक्तंचपाषाणंमूषको त्थंनियोजयेत् ॥ जेपालबीजमज्जाचसमंजंबीरपीडि तम् ॥ शस्त्रैःछित्वाप्रदातव्यंवेष्ट्यमेरंडपत्रकैः ॥ एवंत्र्य हात्स्फुटंत्येवदध्यन्नंदापयेत्ततः ॥ गंडमालापचीग्रंथिर्बहि निर्यातिनान्यथा ॥

टी० ॥ ॥ गंधक, टांकणखार, सैंधव, हळद, नवसागर, पादेलोण, जवखार, बांगडखार, शेंदूर, सज्जीखार, कापूर, रेवर, लकड्या पाषाणभेद, उंदीर-कानीची साल, जेपाळाचा मगज हीं सर्व समभाग घेऊन, ईड लिंबाचे रसांत खलून शस्त्रानें छेद करून वर्ती बांधावें; त्यावर एरंडाची पानें बांधावीं, या प्रमाणें तीन दिवस करावें; दहीं भात खावा, ह्मणजे गंडमाला अपची ग्रंथी, हे फुटून बाहेर निघतात, हें खोटें नाहीं.

अभिमंत्र्यशनौसायंरवौप्रातःसमाहरेत् ॥ पेटारीमूल लकंधूपैर्धूपयित्वाथखंडयेत् ॥ चतुर्दशगुणैःसूत्रैर्ब- ध्वाग्रंथिंगलेस्थितम् ॥

टी० ॥ ॥ शनवारीं सायंकाळीं अभिमंत्रण करून रविवारीं प्रातःकाळीं पेटारीचें मूळ धुपवून तोडून आणावें, आणि चवदा पदरीसूत घेऊन पुढेंमंत्र लिहितों त्या मंत्रानें गळ्याचे ग्रंथीवर बांधावें.

अथमंत्रः

गूढंप्रसहितिरितिरीचित्रपुदकमूकनागतेपापदगाला परंदुक्षामूलवासककालंदपालखेवगरुप्रसादात् ॥ इतिमंत्रः निर्गुंडीस्वरसेनाथलांगलीमूलकल्किनम् ॥ तैलंनस्येन हंत्याशुगंडमालांसुदुस्तराम् ॥

टी० ॥ ॥ निर्गुंडीचे आंगरसांत कुहिलीचें मूळ उगाळून तें तेलांत टाकून कढवा

वें, तें तेल नस्य योगानें दुस्तर गंडमालेचा नाश करितें.॥ इतिगंडमालापचिग्रं०

## अथश्लीपदलक्षणोपचारः

मेदोमांसाश्रितंशोफंपादेश्लीपदमुच्यते ॥

टी० ॥ ॥ पायांचे ठाईं मेद मांसाश्रित जो शोफ त्याला श्लीपद असें ह्मणतात.

यःसज्वरोवंक्षणजोभृशार्तिःशोफोनृणांपादगतश्चयस्यात् ॥ तच्छ्लीपदंस्यात्करकर्णनेत्रस्फिगोष्ठनासास्वपिकेचिदाहुः ॥

टी० ॥ ॥ जो ज्वर सहीत वंक्षणाचे ठाईं बहु पीडायुक्त मनुष्यास शोफ उपन्न होतो, त्यालाही कोणी श्लीपद ह्मणतात. आणि तो पाय, हात, कान, नेत्र, कुले, ओंट, नाक या ठिकाणीहि असतो.

लंघनालेपनैःस्वेदैरेचनैश्चप्रसेचनैः ॥ प्रायःश्लेष्महरै रूक्षैःश्लीपदंसमुपाचरेत् ॥

टी० ॥ ॥ लंघन, लेप, स्वेद, रेच, रक्त, मोक्ष इतक्यानीं आणि प्रायः कफ नाशक उष्ण अशा उपचारानीं श्लीपद बरें करावें.

सिद्धार्थसोभाजनदेवदारुविश्वौषधैर्मूत्रयुतैःप्रलिंपेत् ॥ पुनर्नवानागरसर्षपानांकल्केनवाकांजिकमिश्रितेन ॥

टी० ॥ ॥ शिरीस, शेगवा, देवदार, सुंठ हीं गोमूत्रांत वाटून लेप करावा, अथवा, घेटोळी, सुंठ, शिरीस हीं कांजींत वाटून लेप करावा ह्मं० श्लीपद बरें होतें.

धत्तूरैरंडनिर्गुंडीवर्षाभूशिग्रुसर्षपैः ॥ प्रलेपःश्लीपदं हंतिचिरोत्थमपिदारुणम् ॥

टी० ॥ ॥ धोत्रा, एरंड, निर्गुंड, घेटोळी, शेगवा, शिरीस यांचा लेप चिरकाला चें श्लीपद दारुण असलें तरी त्याचा नाश करीतो.

पलाशमूलस्वरसंपिबेद्वातैलेनतुल्यंसितसर्षपानाम् ॥ मूत्रेणपथ्यामरदारुविश्वंश्रीगुग्गुलुंश्लीपदिभिर्निषेव्यम् ॥

टी० ॥ ॥ पळसाचे मुळाचा आंगरस, आणि पांढरे शिरसाचें तेल दोन्ही समान घेऊन प्यावीं अथवा, देवदार, सुंठ, बेलफळ, गुग्गूळ हीं गोमूत्रांत एक करून श्लीपद रोग्यानी खावीं.

गुडूचीकटुकीशुंठीदेवदारुविडंगकम् ॥ पिष्टागोमूत्रसंयुक्तंलेपःश्लीपदनाशनम् ॥

टी० ॥ ॥ गुळवेल, कुटकी, सुंठ, देवदार, वावडिंग हीं गोमूत्रांत वाटून लेप

करावा श्लीपद नाशक आहे.

पादकंडूहरंकुर्यान्नवनीतेनमाक्षिकं॥ पाददाहहरंखादे त्तिलाद्द्विगुणबाकुचीं॥ चूर्णितामधुसर्पिभ्यांकर्षमात्रं प्रशांतये॥

टी० ॥ ॥ पायांची कंडू हारक लोणी आणि मध एकत्र करून चोळावें. आणि पायांचा दाह हारक एकपट तीळ, आणि दुप्पट बांवच्या एकत्र करून मध-तूप यांचे बरोबर एक तोळा खाव्या.

मदनंचतथासिक्थंसामुद्रलवणंतथा॥ माहिषीनवनीतेनसंतसेलेपनंहितम्॥ समाहात्स्फुटितोपादोजायते कमलोपमो॥

टी० ॥ ॥ गेळफळ मेण मीठ हीं महिषीचे लोण्यांत खलून पायांला चोळावें ह्मणजे दाह शांत होतो, आणि सात दिवसांत फुटलेले पाय कमळा प्रमाणे होतात.

अथविद्रधिलक्षणोपचारः

त्वग्रक्तमांसमेदांसिप्रदूष्यास्थिसमाश्रिताः॥ दोषाःशोफं शनैर्घोरंजनयंत्युच्छ्रिताभृशम्॥ महाशूलंमृजावंतंवृ त्तंवाप्यथवायतं॥ सविद्रधिरितिख्यातोज्ञेयःसषड्विधो बुधैः॥ रक्तविद्रधिलिंगंतुपित्त विद्रधिवत्स्मृतं॥

टी० ॥ ॥ त्वचा, रक्त, मांस, मेद हीं दूषीत करून अस्थाचा आश्रय करून राहिलेले असे वातादिदोष पुनः अति वाढलेले असे, ते सावकाशानें घोर फार दुखणारा शूलयुक्त वाटोळा किंवा लांब असा शोक उत्पन्न करतात. त्याला विद्रधि ह्मणतात, तो साहा प्रकारचा जाणावा रक्त विद्रधिचें चिन्ह पित्त विद्रधि प्रमाणें जाणावें.

विद्रधिस्त्वसृजांतस्थःसोभ्यंतरइतिस्मृतः॥

टी० ॥ ॥ रक्ता पासून आंत जो विद्रधि होतो त्याला अभ्यंतर असें ह्मणतात.

तत्कालेस्रावयेद्रक्तमग्निकर्माथवागदं॥

टी० ॥ ॥ अंतर्विद्रधिवर तात्काळ रक्तस्राव किंवा डाग किं. ओषध उपाय करावा

कासीससैंधवशिलाजतुहिंगुचूर्णैर्मिश्रीकृतोवरुणवल्कलजःकषायः॥ अभ्यंतरस्थितमपक्वमतिप्रमाणंनृणा मपंहरतिविद्रधिमुग्रशोफम्॥

टी० ॥ ॥ हिराकस, सैंधव, शिलाजीत, हिंग याचे चूर्णानें मिश्रित वायवर्णयांचा काढा आंतला अपक्क, मोठा शोफयुक्त अशा विद्रधीचा नाशक आहे.

पक्वेषुविद्रधिषुपूयमतिस्रवत्सुनाडीषुचव्रणगदेषुभगंदरेषु॥ स्याद्गंडमालिषुफलत्रिकगुग्गुलुःस्यात्पथ्यंफलत्रिकघृतंलघुभोजनंच॥

टी० ॥ ॥ पक्क आणि अति पुवातें स्रवणारा असा विद्रधि नाडी, व्रण, भगंदर, गंडमाला यांचे ठाईं त्रिफळा गुग्गूळ खावा, आणि त्रिफला घृत लघु भोजन हें पथ्य करावें.

त्रीणिपलानिफलत्रितयस्यह्येतुपलेभवतोमगधायाः॥ पंचपलानिभवंतिपुरस्यस्यात्फलत्रिकगुग्गुलुयोगः॥

टी० ॥ ॥ हिरडा ४ तोळे बेहेडा ४ तोळे आंवळकाठी ४ तो. पिंपळी ८ तो. गुग्गुळ २० तो. हें एकत्र खलावें ह्मणजे त्रिफळा गुग्गुळ झाला. इतित्रिफलागुग्गुलुः

जलौकापातनंशस्तंसर्वस्मिन्नेवविद्रधौ॥ मृदुर्विरेको लघ्वन्नंतुंबशृंगाग्निकर्मच॥

टी० ॥ ॥ सर्व विद्रधींचे ठाईं जळवा किंवा भोंपळा, किंवा शृंग याणि रक्तस्राव, डाग, हलका रेच लघु अन्न हें प्रशस्त आहे.

दशमूलच्छिन्नरुहापथ्यादारुपुनर्नवा॥ ज्वरविद्रधिशोफेषुशिग्रुविश्वयुताहिता॥

टी० ॥ ॥ दशमुळें, गुळवेल, हिरडा, देवदार, घेटोळी, शेगवा, सुंठी यांचा काढा ज्वर, विद्रधि, सूज यांवर प्रशस्त आहे.

सौभांजनस्यनिर्यासोहिंगुसैंधवसंयुतः॥ अचिराद्विद्रधिंहंतिप्रातःप्रातर्निषेवितः॥

टी० ॥ ॥ शेगव्याचा डीक, हिंग, सेंधव, यांचें चूर्ण रोज प्रातःकाळीं सेवन केलें असतां विद्रधीचा लवकर नाश करील.

शिग्रुमूलंजलेधौतंदरपिष्टंप्रलेपयेत्॥ तद्रसंमधुना पीत्वाहंत्यंतर्विद्रधिंनरः॥

टी० ॥ ॥ शेगव्यानें मूळ पाण्यांत उगाळून त्यांत मध घालून प्यावें आणि त्याच रसांत बचनागाचें चूर्ण घालून लेप करावा ह्मणजे अंतर्विद्रधीचा नाश करील.

शिग्रुदीप्यवरुणाहियामिनीकुंजराशनकृतःकषायकः॥
बोलचूर्णसहितोंतरस्थितंविद्रधिंप्रशमयेदसंशयम्॥
टी० ॥ ॥ शेगवो, ओंवा, वायवर्णा, दारुहळद, हळद, पिंपळी यांचा काढा बोळा
चें चूर्ण घालून प्यालें असतां अंतर्विद्रधीचा नाशक आहे.

वर्षाभूवरुणाघ्रिभ्यांकाथोविद्रधिनाशनः॥
टी० ॥ ॥ घेटोळी, वायवर्णा, याचे मुळांचा काढा विद्रधी नाशक आहे.

## अथव्रणादिलक्षणोपचारः

एकदोषोत्थितःसाध्योव्रणानांपूर्वलक्षणं॥ षड्विधः
स्यात्पृथक्सर्वरक्तागंतुनिमित्तजः॥
टी० ॥ ॥ एक एक दोषानें सर्व दोषानीं रक्ता पासून आणि आगंतूक असा
साहा प्रकारचा व्रण त्या मध्ये एका दोषा पासून झालेला साध्य हें व्रणाचें
पूर्व लक्षण जाणावें.

मंदोष्मताल्पशोफत्वंकाठिन्यंत्वक्सवर्णता,मंदवेदनता
चैवव्रणशोफस्यलक्षणम्॥
टी० ॥ ॥ अल्प उष्णता, अल्प शोफ, कठिणपणा, त्वचे प्रमाणें वर्ण, वेदना
मंद हें व्रण शोफाचें लक्षण जाणावें.

द्विधाव्रणःसविज्ञेयःशारीरागंतुभेदनः॥ दोषैरेकस्तयो
रन्यःशस्त्रादिक्षतसंभवः॥
टी० ॥ ॥ तो व्रण दोन प्रकारचा शरीर आगंतुक या भेदें करून एक दोषा-
नीं, आणि दुसरा शस्त्रादिकें करून क्षत होतें त्या पासून.

स्तब्धःकठिणसंस्पर्शोमहास्रावोमहारुजः॥ तुद्यते-
स्फुरतिश्यावोव्रणोमारुतसंभवः॥
टी० ॥ ॥ स्तब्ध, घट्ट, अतिस्राव, अती ठणका, टोंचल्या प्रमाणें व्यथा, फुर
फुरणें, धुरा साररवा वर्ण असावात तो व्रण जाणावा.

पूतिपूयातिदुष्टासृक्स्राव्युत्संगीचिरस्थितिः॥ दु
ष्टव्रणोतिगंधादिःशुद्धलिंगविपर्ययः॥
टी० ॥ ॥ दुर्गंधयुक्त पू दुष्ट रक्त यांतें स्रवणारा, सारवा धरणारा चिरकाल रा
हणारा अति दुर्गंध युक्त शुद्ध चिन्हापेक्षां विपरीत चिन्हें असा दुष्ट व्र
ण जाणावा. ॥ कपोतवर्णप्रतिमोयस्यांतःक्लेदवर्जितः॥

स्थिरश्चपिडिकावांश्चरोहतीतितमादिशेत्॥

टी० ॥ ॥ कपोत पक्षाचे वर्णा सारखा ज्याचा मध्य आणि शुष्क, स्थीर, सभों वती पुळ्या असा जो व्रण त्याला रोहती ह्मणावा.

प्रवृत्तपूयरुधिराव्रणायेषांच्चमर्मसु॥ क्रियाभिःसम्य गारब्धानसिद्ध्यंतिच्चयेव्रणाः॥ एतान्विवर्जयेद्वैद्यःसंर क्षेदात्मनोयशः॥

टी० ॥ ॥ मर्माचे ठाईं व्रण झालेले आणि ते पू रक्त याणें स्रवणारे, चांगले उ पचार केले असतां बरे न होणारे असे जाना व्रण आहेत त्यांचें वैद्यानें आपलें यश रक्षण करणें असेल तर वर्ज न करावें.

शिरीषोन्मत्तवाकूचीहिंस्राकालासृदर्शनैः॥ तंदुलीयक मूलंच्चप्रलेपःशोफनाशनः॥

टी० ॥ ॥ शिरीस, धोत्रा, बांवची, जटामांसी, नीळी, नान्हीचा वेल, तांदुळज्याचें मूळ यांचा लेप शोफ नाशक आहे.

तिलकल्कःसलवणोद्वेहरिद्रेत्रिवृद्घृतम्॥ मधुकंनिंबप त्राणिलेपःस्याद्व्रणशोधनः॥

टी० ॥ ॥ तिळांचें चूर्ण, सैंधव, दारुहळद, हळद तेड तूप जेष्ठीमध कडू लिं बाचीं पानें यांचा लेप व्रण शोधक आहे.

तिलसैंधवयष्ट्याव्हनिंबपत्रनिशायुतैः॥ त्रिवृन्मधुघृतैः पिष्टैःप्रलेपोव्रणशोधनः॥

टी० ॥ ॥ तीळ, सैंधव, जेष्ठीमध, कडू लिंबाची पानें, दारुहळद, हळद, तेड मध यांचा लेप व्रण शोधक आहे.

न्यग्रोधोदुंबराश्वत्थकदंबप्लक्षवेतसः॥ करवीरार्कक- टुकाकषायोरोपणेहितः॥

टी० ॥ ॥ वड उंबर पिंपळ कळंब पायरी वेत कण्हेर रुई कुटकी यांचा काढा व्रण भरून येण्या विषयीं हितकारक आहे.

शोफेमहतिसंवृद्धेशांतिःशोणितमोक्षणात्॥ एकतश्च क्रियाःसर्वारक्तमोक्षणमेकतः॥

टी० ॥ ॥ शोफ फार वाढला असतां रक्त मोक्षणानें शांत होतो, सर्व उप- चार एकीकडे आणि रक्त स्राव एकीकडे.

हस्त्यष्टांगुलंतुंबीशृंगंचद्वादशांगुलम् ॥ शिरासर्वांगजं रक्तंजलौकाचतुरंगुलम् ॥

टी० ॥ ॥ भोंपळा आठ अंगुळें प्रदेशांतील रक्त काढतो; शिंग बारा अंगुळें प्रदेशांतील आणी शिरावेध, सर्वांगाचें आणि जळू चार अंगुळें प्रदेशांतील.

येकेदपाकेसतिगंधवंतोव्रणामहांतःसरुजःसशोथाः ॥ प्रयांतितेगुग्गुलुमिश्रितेनपीतेनशांतित्रिफलाजलेन ॥

टी० ॥ ॥ जे व्रण पू होऊन पिकले असतां गंधियुक्त उणका सूज पाणी युक्त मोठे तेही, हिरडा बेहडा आंवळकाठी यांचा काढा गुग्गूळ मिश्रि त प्यालें असतां बरे होतात.

निंबपत्रतिलादंतीत्रिवृत्सैंधवमाक्षिकं ॥दुष्टव्रणप्रश मनोलेपःशोधनकेसरीम् ॥

टी० ॥ ॥ कडु लिंबाची पानें, तीळ, दांतीमूळ, तेड, सैंधव, मध यांचा लेप दुष्ट व्रणाचा शोधक आणि शोधना विषयीं सिंह.

अभयात्रिवृतादंतीलांगलीमधुसैंधवैः ॥ रूषवीपत्रधत्तूर कर्णमोटकुठेरिका ॥ पृथगेतप्रलेपेनगंभीरव्रणशोषणाः ॥

टी० ॥ ॥ हिरडा, तेड, दांतीमूळ, मंजिष्ट, मध, सैंधव पिंपळी तालीस पत्र धो त्रा वाभूळ नादुरकी ह्यांचा लेप केला तर हीं निरनिराळीं व्रणशोषक आहेत.

अग्निदग्धेव्रणेसम्यक्प्रयंजीतचिकित्सकः ॥

टी० ॥ ॥ अग्नीनें दग्ध होऊन झालेल्या व्रणावर ही पूर्वोक्त लेप वैद्याने योजा.

सद्यःक्षतंव्रणंवैद्यःसशूलंपरिवर्जयेत् ॥

टी० ॥ ॥ सद्यः क्षतापासून झालेला व्रण शूळ सहीत असला तर वर्ज करावा.

यष्टीमधकयुक्तेनकिंचिदुष्णेनसर्पिषा ॥ मत्वागंतुव्रणंवैद्ये धृतक्षौद्रसमन्वितम् ॥ शक्तिक्रियाप्रयोक्तव्यापित्तरक्तोष्मणानिशि

टी० ॥ ॥ आगंतुक व्रणावर जेष्टीमधीचें चूर्ण आणि तूप यांचा किंचित उ ष्ण लेप करावा. आणि शक्त्यनुसारें करून किंचित् पित्तकारक रक्त शोधक उष्ण अशा पदार्थांनीं तूप मधासहीत रात्रौ उपचार करावा.

आर्द्रोभग्नंविदित्वातुसेचयेच्छीतवारिणा ॥ पंकेनालेपनं कार्यंबंधनंचकुशान्वितम् ॥ आलेपनार्थंमंजिष्ठामधुकंवा म्लपेषितं ॥ शतधौतघृतोन्मिश्रंशालिपिष्टंचलेपनम् ॥

नाडीनांगतिमन्वीक्ष्यशस्त्रेणोत्साद्यकर्मवित् ॥

टी० ॥ ॥ अभिघातादिकें करून हाड मोडतें त्यावर प्रथम थंड पाणी शिं-पावें नंतर शिरेला अपाय न होतां शस्त्रादिकें करून, शरीरांत रुपलेले युक्तीनें काढून, वर तांबड मातीचा लेप करून वर्ती दर्भानें पेंडावें नंतर मंजिष्ठ, जेष्टमध लिंबादिकांचे रसांत वाटून लेप करावा नंतर शंभर वे ळां धुतलेल्या घृतांत तांदुळाचें पीठ मिश्र करून लेप करावा.

घृतंसदुग्धंव्रणतर्पणेनहन्याद्गतिंकोष्ठगतापियास्यात्

टी० ॥ ॥ कोष्ठव्रणावर दूध तूप एकत्र करून प्यावें ह्मणजे बरा होतो.

जात्यर्कशम्याककरंजदंतीसिंधूत्थसौवर्चलयावशूकैः
वर्तिःकृताहंत्यचिरेणनाडींस्नुक्क्षीरपिष्टासहसैंधवेन

टी० ॥ ॥ जाई, रुई, बाहावा, करंज, दांतीमूळ, सैंधव, पादेलोण, जवखार एकत्र खलून त्याची वात करून नाडी व्रणांत घालावी. अथवा निवडुंगाचा चीक सैंधव एकत्र खलून त्याची वात करून घालावी तेणें करून नाडी व्रण बरा हो

कृशादुर्बलभीरूणांनाडीमर्माश्रितायुता ॥ क्षारमूत्रेणसं छिद्यान्नशस्त्रेणकदाचन ॥

टी० ॥ ॥ कृश, दुर्बल, भित्रा यांची मर्माश्रित जी नाडी ती खार मूत्र याणीं छेदावी; शस्त्रानें कधींहि छेदूं नये.

समूलपत्रांनिर्गुंडींपीडयित्वारसेनतु ॥ तेनसिद्धंसमं तैलंनाडीदुष्टव्रणापहम् ॥

टी० ॥ ॥ मुळ्या पाला सुद्धां निर्गुंडीचें झाड कुटून त्याचा रस काढून त्या चे बराबर तेल घेऊन एकत्र कढवून रस आटल्यावर तेल सिद्ध झा लें तें नाडी संबंधीं दुष्ट व्रणाचें नाशक आहे.

नरास्थितैललेपेनस्फुटितःशुष्यतिव्रणः ॥

टी० ॥ ॥ मनुष्यांचे अस्थीचे तेलानें फुटलेला व्रण शुष्क होतो.

विडंगत्रिफलाव्योषचूर्णंगुग्गुलुनासमम् ॥ सर्पिषावटि कांकुर्यात्खादेद्वाहितभोजनः ॥ दुष्टव्रणापचीमेहकुष्ट-नाडीविशोधनः ॥

टी० ॥ ॥ वावडिंग, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, सुंठ, मिरें, पिंपळी यांचे चूर्णा बरोबर गुग्गूळ घेऊन सर्व तुपांत खलून गोळी करून खावी; पथ्य क-

गावें ह्मणजे दुष्ट व्रण अपची मेह कुष्टनाडी यांची शुद्धी करील.

मनःशिलासमंजिष्ठाक्षाररजनीद्वय॥ प्रलेपःसघृत
क्षौद्रस्त्वग्विशुद्धिकरःस्मृतः॥

टी० ॥ ॥ मनशीळ, मंजिष्ठ, जवखार, दारुहळद, हळद, तूप, मध यांचा लेप त्वचेची शुद्धी करणारा आहे.

करंजारिष्टनिर्गुंडीरसोहन्याद्व्रणक्रमीम्॥

टी० ॥ ॥ करंज, कडूलिंब, निर्गुंडी यांचा रस व्रण संबंधीं क्रमीचा नाशक आहे.

निंबशाम्याकजात्यर्कसप्तपर्णाश्वमारकाः॥ क्रमिघ्नामूत्र
संयुक्तासेकलेपनधावनैः॥

टी० ॥ ॥ कडूलिंब, बाहावा, जाई, रुई, सांत्विण, श्वेत कण्हेर गोमूत्र यांचा लेप याणीं व्रण धुणें, वाफारा ही क्रमिनाशक आहेत.

जातीनिंबपटोलपत्रकटुकादार्वीनिशासारिवामंजिष्ठा
भयसिंधुतुत्थमधुकैर्नक्ताव्हबीजैःसमैः॥सर्पिःसिद्धम
नेनसूक्ष्मवदनामांसाश्रिताःस्त्राविणोगंभीराःसरुजोव्र
णाःसगतिकाःशुद्ध्यंतिरोहंतिच॥

टी० ॥ ॥ जाई, कडूपडवळ, कडूलिंब, कुटकी, दारुहळद, हळद, श्वेत उपळसरी, मंजिष्ठ, काळावाळा, सैंधव, मोरचूत, जेष्टीमध यांचे बरोबर करंजाच्या बिया घेऊन याणीं सिद्ध केलेलें तूप त्या तुपानें बारीक, तोंडाचे मांसाश्रित, खोल, स्रवणारें, पीडायुक्त असे व्रण शुद्ध होऊन भरून चांगले बरे होतात.

पटोलीनिंबपत्राणांक्काथःसंक्षालनेहितः॥ कल्कःसंरो
पणेशस्तस्तिलानांमधुकान्वितः॥

टी० ॥ ॥ कडूपडवळ, कडूलिंबाचीं पानें यांचा काढा व्रण धुण्या विषयीं प्रशस्त आहे. असें तिळांचें आणि जेष्टी मधीचें चूर्ण व्रण भरण्या विषयीं प्र० आहे.

## अथभगंदरलक्षणोपचारः

गुदस्यद्व्यंगुलेदेशेपार्श्वतःपिटिकाभवेत्॥ भिन्नाभ
गंदरोज्ञेयःसचपंचविधस्मृतः॥

टी० ॥ ॥ गुदापासून दोन अंगुळें पुढें पुळी होऊन जी फुटते त्याला भगंदर असें ह्मणतात, तो पांच प्रकारचा जाणावा. ॥ लक्षणांतरं ॥

क्षतोद्गतिःपायुगताविवर्धतेत्वुपेक्षणात्साक्रमिभिर्वि

दार्यते॥ मकुर्वनेमार्गमनेकधासुखैव्रणैस्तदुन्मार्गिभगं
दरंभवेत्॥

टी० ॥ ॥ गुदाचे ठायीं उत्पन्न झालेलें क्षत वाढनें; आणी त्याची उपेक्षा केली असतां कृमी होऊन त्याचें विदारण करतात नंतर ते कृमी आपले मुखानें व्रण करून अनेक मार्ग करतात: नंतर तीं सर्व छिद्रें एक झालीं ह्मणजे भगंदर जाणावें

कुष्ठंत्रिवृत्तिलादंतीमाधधीसैंधवंमधु॥ रजनीत्रिफला
तुत्थंहितंस्याद्व्रणलेपनं॥

टी० ॥ ॥ कोष्ठकोलिंजन, तेड, तीळ, दांतीमूळ, पिंपळी, सैंधव, मध, हळद, हिरडा, बेहडा, आंवळकाठी, मोरचूत त्याचा लेप भगंदर व्रणावर प्रशस्त आहे.

रसांजनंहरिद्रेद्वेमंजिष्ठानिंबपल्लवाः॥
त्रिवृत्तेजोवतीदंतीकल्कोनाडीव्रणापहः

टी० ॥ ॥ रसांजन, दारुहळद, हळद, मंजिष्ठ, कडूलिंबाची पानें, तेड, कांगुणी, दांतीमूळ यांचे चूर्णाचा लेप नाडीव्रणाचा नाशक आहे.

निशार्कक्षीरसिंध्वग्निपुंखीलांगलिवत्सकैः॥ एभिःप्र-
साधितंतैलंभगंदरविनाशनम्॥

टी० ॥ ॥ हळद, रुईचा चीक, सैंधव, चित्रक, शरपुंखी, मंजिष्ठ, कुडा याणी सिद्ध केलेलें तेल भगंदर नाशक आहे.

त्रिफलारससंयुक्तंबिडालास्थिप्रलेपनं॥ दुष्टव्रणानि
हंत्याशुभगंदरहरंपरम्॥

टी० ॥ ॥ हिरडा बेहेडा आंवळकाठी यांचे काढ्यांत मांजराचें हाड उगाळून लेप करावा, तो दुष्टव्रण भगंदर त्यांचा नाशक आहे.

चित्रकार्कत्रिवृत्पाठामलपूहममारकौ॥ स्नुधावचालां
गलिकीहारितालंस्नुवर्चिकाम्॥ ज्योतिष्मतींचसंहृ
त्यंतैलंधीरोविपाचयेत्॥ एतत्स्यंदनंनामतैलं
दद्याद्भगंदरे॥ शोधनंरोपणंचैवसवर्णकरणंतथा॥

टी० ॥ ॥ चित्रक, रुई, तेड, पाहाडमूळ, वांवची, कण्हेर, निवडुंग, वेखंड, कळलावी, हरताळ सज्जीखार कांगुणी त्या औषधासहीत तेल कढवावें त्याला स्यंदन तेल ह्मणतात, हें भगंदरावर योजावें, शोधन रोपण वर्ण नीट करणारें

आहे. इतिस्यंदनतैलं ॥ पूर्वोक्तत्रिफलागुग्गुलुंभक्षयेत् टी० पूर्वो क्त त्रिफला गुग्गुलु खावा.

खदीरत्रिफलाक्काथोमहिषीघृतसंयुतः ॥ विडंगचूर्णसंयुक्तोभगंदरविनाशनः ॥

टी० ॥ ॥ खैर, हिरडा, बेहडा, आंवळकाठी यांचा काढा महिषीचें तूप वावडिंगाचें चूर्ण घालून घ्यावा भगंदर विनाशक आहे.

श्वनोस्थिमूलतातक्रपेषितारवररक्तयुक् ॥ लेपो भगंदरंहन्यान्नरास्थ्नांतैलमेवच ॥

टी० ॥ ॥ कुत्र्याचें हाड, मूलता हीं ताकांत उगाळून त्यांत गाढवाचें रक्त घालून लेप करावा ह्मणजे भगंदराचा नाशक आहे. अथवा मनुष्याचें हाडाचें तेल लावावें. इति भगंदर चिकित्सा

अथोपदंशलक्षणोपचारः

हस्ताभिघातान्नखदंतघातादधावनादत्युपसेवनाद्वा योनिप्रदोषाच्चभवंतिशिश्नेपंचोपदंशाविविधप्रकाराः

टी० ॥ हात, नखें, दांत, यांचें घर्षण, शिश्न न धुतलें, अति मैथून, योनिदोष इतक्या कारणानें शिश्नाचे ठायीं पांच उपदंश होतात त्यांचे अनेक भेद आहेत.

सतोदभेदस्फुरणैःसकृष्णैःस्फोटैर्व्यवस्येत्पवनोपदंशं

टी० ॥ ॥ व्यथा, स्फुरण, काळेपणा याणी युक्त जे फोड त्याणी वातोपदंश जा०

कालेनशोथक्रमिदाहपाकैर्विशीर्णशिश्नोम्रियतेसतेन

टी० ॥ ॥ कालें करून सूज, क्रमी, दाह, पाक यांहीं करून ज्यांचे शिश्न पोकळ होऊन सडलें तो उपदंशानें मरतो.

पटोलनिंबत्रिफलाकिरातैःक्काथंपिबेद्वारवदिरासनाभ्यां सगुग्गुलुंवात्रिफलायुतंवासर्वोपदंशापहरःप्रयोगः ॥

टी० ॥ ॥ कडूपडवळ, कडूलिंब, हिरडा बेहडा आंवळकाठी काडेकिराईत यांचा काढा घ्यावा किंवा खैर, असाणा यांचा काढा त्रिफला सहीत किंवा गुग्गुळ सहीत घ्यावा ह्मणजे सर्व प्रकारचे उपदंश नाशितो.

वटप्ररोहार्जुनजंबुपथ्यालोध्रंहरिद्रासहितःप्रलेपः ॥ सर्वोपदंशेष्ववरोहणार्थंचूर्णन्वितज्जंविमलाजलेन ॥

टी० ॥ ॥ वडाचे अंकूर, अर्जून, जांभूळ, हिरडा, लोध्र, हळद, यांचें चूर्ण नि

वडुंगाचे चिकात घालून लेप करावा तेणें करून उपदंशाचा जखमा भ रून येतात. दहेत्कटाहेत्रिफलांतामषीमधुसंयुतां॥
कृतोपदंशेलेपोयंसद्योरोपयतिव्रणम्

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा आंवळकाठी हीं कढईंत जाळून त्याचे मशीचा मधां त लेप करावा, तो तात्काळ उपदंशाचा व्रण भरून आणतो.

सर्जिकातुत्थकासीसशैलेयंसरसांजनं॥मनःशिलास मेश्चूर्णंव्रणवीसर्पनाशनम्॥

टी० ॥ ॥ मज्जीरखार मोरचूत हिराकस शिलाजीत रसांजन मनशीळ यांचें चूर्ण व्रणवीसर्प नाशक आहे.

अश्वत्थोदुंबरप्लक्षवटवेतसजःशृतः॥ व्रणशोथोप दंशानांनाशकःक्षालनेस्मृतः॥

टी० ॥ ॥ पिंपळ उंबर पिंपरी वड वेत यांचे काढ्यानें व्रण धुवावा तेणें करून व्र ण नाश होतो. आणि शोथ उपदंश यांचाही नाशक आहे.

शब्दसूतंचभल्लातंपिप्पलीमूलपिप्पली॥ आकल्लकंजा तिपत्रीखुरकंदेवपुष्पकम्॥मर्दयेत्समभागेनपुराणगु डमिश्रितम्॥उपदंशेषुसर्वेषुप्रमाणंरक्तिकावटी॥

टी० ॥ ॥ शब्दपारा, बिब्बा, पिंपळी, पिंपळमूळ, अक्कलकारा, जायपत्री, वंगभ स्म, लवंग हीं समभाग घेऊन जुन्या गुळांत खलून गुंजा प्रमाण खावें तेणें करून सर्व उपदंश नष्ट होतात. इत्युपदंशचिकित्सा.

## अथकुष्टचिकित्सा॥

कपालमौदुंबरमंडलाख्यजिव्हाख्यकुष्टान्यथपुंडरी कं सिध्माभिधंकाकणनामधेयंचर्माख्यमन्यत्कटिभं तथैव॥ वैपादिकंचैवकिलाससंज्ञंदद्रुस्तथाचर्मदलंच कंडुःपामाचविस्फोटशतारुषीचाविचर्चिकाचेतिदशा ष्टकुष्टान्॥

टी० ॥ ॥ कपाल १ औदुंबर २ मंडल ३ जिव्हाख्य ४ पुंडरीक ५ सिध्म ६ काक ण ७ चर्म ८ कटिभ ९ वैपादिक १० किलास ११ दद्रु १२ चर्मदल १३ कंडु १४ पा मा १५ विस्फोट १६ शतारुष १७ विचर्चिका १८ या प्रमाणें अठरा कुष्ट रोग जाणा.

प्रभूतैर्वाजलौकाभिःशृंगालाबुशिराव्यधैः॥ स्निग्ध

स्यमोक्षयेद्रक्तंदुष्टंकुष्टेपुनःपुनः॥

टी० ॥ ॥ पुष्कळ जळवा लाऊन किंवा भोंपळा, शिंग, शिरावेध याहीं करून सश क्तांचें रक्त दुष्ट असेल तें कुष्ठ रोगाचे गायीं वारंवार काढावें.

वमनंचयथादोषंकर्तव्यंचविरेचनं॥

टी० ॥ ॥ जो दोष असेल त्या प्रमाणें वमन किंवा रेचन कुष्ट रोग्यास द्यावें.

गुडूचीत्रिफलादार्वीक्काथोमुष्णोष्णवारिभिः॥ त्वग्दोषव्र णशोथघ्नः पीतोमासंचगुग्गुलुः॥

टी० ॥ ॥ गुळवेल, त्रिफळा, दारुहळद, यांचा काढा, किंवा ऊन पाण्या बरोबर गुग्गुळ एक महिनाभर कुष्ठ रोगावर प्यावा. हा त्वग्दोष व्रणशोथ यांचा ही नाशक आहे.॥ खदिरत्रिफलानिंबपटोलामृतवासकैः ॥ अष्टकोयंजयेकुष्टान्कंडूविस्फोटकादिकान्

टी० ॥ ॥ खैर, त्रिफळा, कडूलिंब, कडूपडवळ, गुळवेल, अडूळसा, त्या आठ औषधांचा काढा कंडू विस्फोटकादिक कुष्ठ रोग जिंकील.

बीजानिवामूलकसर्षपाणांलाक्षारजन्योमधुनादबी जं श्रीवेष्टकव्योषविडंगतुल्यंपिष्वाजमूत्रेणविलेप नंस्यात्॥ दद्रूणिसिध्मान्कटिभानिपामांकपालकु ष्टविषमंचहन्यात्

टी० ॥ ॥ मुळ्याचें बीं, शिरीस, लाख, दारुहळद, हळद, टांकळ्याचें बीं सू सूचा डीक, सूंठ, मिरें, पिंपळी, वावडिंग हीं समभाग घेऊन बोकडाचे मुतांत वाटून लेप करावा, तो दद्रु, सिध्म, कटिभ, पामाक, कपाल हीं कुष्टें नाशील. ॥ आरग्वधदलैःपिष्टैर्लेपःकांजिकसंकृतः ॥ करित्वकृदद्रुकुष्टानिहंतिपामांविचर्चिकाम्

टी० ॥ ॥ बाहाव्याचीं पानें, वाटून कांजीत मिश्र करून लेप करावा, तो म- हा कुष्ट दद्रु पामा विचर्चिका यांचा नाश करितो.

वेल्लव्योषवराब्दाग्निविषोग्रागुडतुल्यकः॥ लेपात्कुष्ठा दिकान्हंतित्रिवारंसकपालिकान्

टी० ॥ ॥ वावडिंग, सूंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहेडा, आंवळकाठी, नागरमोथे, चित्रक, बचनाग, वेखंड, गुळ समभाग घेऊन यांचा तीन वेळा लेप केला असतां कपालिकासहीत कुष्ठादीक रोगांचा नाशक आहे.

बाकुचीवृहत्याग्निभल्लातदंतिशम्याकनिंबजैः॥ कांजिकेपे
षितैर्लेपः श्वेतकुष्ठविनाशकृत्॥

टी० ॥ ॥ गंधक, वावडिंग, चित्रक, बिब्बा, दांतीमूळ, बाहावा, लिंबोळ्या
हीं कांजीत वाटून लेप करावा, तो श्वेत कुष्ठाचा नाशक आहे.

गंधकः सयवक्षारः सिध्महृत्तोयलेपतः॥ अहित्वक्
पयसापिष्टालेपस्त्वक्किलकापहः॥

टी० ॥ ॥ गंधक, जवखार, पाण्यांत उगाळून लेप करावा सिध्म नाशक
आहे. सर्पाची कांत पाण्यांत खलून लेप करावा, चामखिळाचा नाशक आहे.

तालकांहिगफणंगंधंबाकूच्यागोजलार्दितं॥ सिध्मंप्र
लेपनादाशुहंतिमासप्रयोगतः

टी० ॥ ॥ हरताळ, गंधक, बांवच्या ३ भाग गोमूत्रांत वाटून एक महिना लेप
केला असतां सिध्माचा नाश होतो.

शुक्लस्यकरवीरस्यरसोवेल्लंचचित्रकम्॥ एभिः स्क
पाचितंतैलमभ्यंगात्कुष्ठजातिनुत्॥

टी० ॥ ॥ पांढरे कण्हेरीचा रस, वावडिंग, चित्रक हें तेलांत टाकून तें तेल
कढवावें, आणि त्या तेलानें अभ्यंग करावा, कुष्ठजाति नाशक आहे.

वरावेल्लकणाचूर्णंलीढंसन्माक्षिकैः सदा॥ हंतिकु
ष्ठान्कृमीन्मेहान्नाडीव्रणभगंदरान्॥

टी० ॥ ॥ त्रिफळा, वावडिंग, पिंपळी यांचें चूर्ण मधाबरोबर चाटलें अस
ता कुष्ठ, कृमी, मेह नाडीव्रण भगंदर यांचा नाश करितें.

रसौगंधकयोः पिष्टंकटुतैलेनभृंगजैः॥ द्रवैः संमर्द्यत
ल्लेपात्सर्वकुष्ठंविनश्यति॥

टी० ॥ ॥ पारा गंधक यांची कज्जली शिरसाचें तेलांत खलून, नंतर मा
क्याचे रसांत खलून लेप करावा सर्व कुष्ठांचा नाश होईल.

रसोषणंसैंधवंचविडंगंचामृतारसः॥ कांजिकेनवि
मर्द्याथलेपः सिध्मविनाशनः॥

टी० ॥ ॥ पारा मिरें, सैंधव, वावडिंग गुळवेलीचा रस हीं सर्व कांजीत ख
लून लेप करावा सिध्म विनाशक आहे

रसगंधकहेमंचसाम्लकंकटुतैलतः॥ मर्दितंमर्दना

त्तस्यकुष्ठजातंविनश्यति ॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, नागकेशर, अभ्रक हीं शिरसाचे तेलांत खलून अंगाला चोळावें सर्व कुष्ठाचा नाश होतो.

श्वेतश्वित्रादिकुष्ठानित्यसाध्यानिप्रयत्नतः ॥ तस्मा त्तेषामुपायश्चनात्रैवलिखितोमया ॥

टी० ॥ ॥ पांढरें श्वित्र, कुष्ठ इत्यादीक जीं कुष्ठें तीं असाध्य ह्मणून विशे षें करून प्रयत्नानें त्यांवर उपाय लिहिला नाहीं.

तालकः शाणमात्रः स्याच्चतुःशाणाचबाकुची ॥ गोमूत्र युक्तंतच्चूर्णंलेपनाश्वित्रनाशनं ॥

टी० ॥ ॥ चारमासे हरताळ, सोळामासे बांवची गोमूत्रांत वाटून लेप करावा, श्वित्र नाशक आहे.

गुंजाफलाग्निचूर्णस्यलेपनंश्वेतकुष्ठनुत् ॥ शिलापामार्ग भस्मापिलेपाच्छ्वित्रविनाशनम् ॥

टी० ॥ ॥ गुंजा चित्रक यांचा लेप, आणि मनशील आघाड्याची राख यांचा लेप श्वित्र नाशक आहे. मंजिष्ठा कुटज इत्यादि वातरक्त प्रकरणांत मं जिष्ठादि काढा सांगितला आहे तो कुष्ठांवर द्यावा.

अन्नपानंहितंकुष्ठेनत्वम्ललवणोषणाम् ॥ दधिदुग्धगु डाश्चापितिलमाषांस्त्यजेन्नरः ॥

टी० ॥ ॥ आंबट, खारट, तिखट खेरीज करून अन्नपान कुष्ठरोगावर हित कारक आहे, आणि दहीं, दूध, गूळ, तीळ, उडीद हे वर्ज करावे.

ललाटहस्तपादेषुशिराश्चास्यविमोक्षयेत्

टी० ॥ ॥ कपाळ, हात, पाय यांठिकाणी शिरा वेध करून रक्त काढावें.

प्रच्छन्नमम्लकेकुष्ठेशृंगाद्यैश्चयथायथम्

टी० ॥ ॥ जें रक्त आच्छादित असेल तें अम्लक कुष्ठाचे ठायीं शृंगादिकें करून यथा योग्य काढावें.

मनःशिलालंमरिचानितैलमार्कपयःकुष्ठहरःप्रदेहः करंजबीजैडगजंसकुष्ठंगोमूत्रपिष्टंचवरप्रदेहः ॥

टी० ॥ ॥ मनशीळ, हरताळ, मिरें तेल रुईचा चीक यांचा लेप कुष्ठ हारक आहे. आणि करंजाचें बीं, टाकळ्याचें बीं, कोष्ठ कोळिंजन गोमूत्रांत वाटून ले

प करावा, कुष्ठावर प्रशस्त आहे.

हयवेल्लाग्निभल्लातदंतिशम्याकनिंबजैः ॥ कांजिकैः
पेषितैर्लेपः श्वेतकुष्ठविनाशकृत् ॥

टी० ॥ ॥ आस्कंद, वावडिंग, चित्रक, बिब्बा, दांतीमूळ, बाहावा, लिंबो-
ळ्याहीं कांजीत वाटून लेप करावा श्वेत कुष्ठाचा नाशक आहे.

गुंजाकुष्ठवचानिंबैर्वाऽपि पिष्टैः प्रलेपनात् ॥ श्वेतापराजि
तामूलं हंति श्वित्रमसंशयम् ॥

टी० ॥ ॥ गुंज कोष्ठकोळिंजन वेखंड कडुलिंब हीं पाण्यांत वाटून लेप क
रावा अथवा श्वेत गोकर्णी श्वेत निर्गुंडी यांचे मुळाचा लेप श्वित्र नाशक
आहे.

मंडलानि च घृष्टाथ चित्रकेन प्रलेपयेत्
ततो वातारिबीजैश्च लेपो मंडलकुष्ठनुत्

टी० ॥ ॥ मंडल कुष्ठावर घर्षण करून चित्रकाचा लेप करावा, नंतर निर्गं
डीचे बीजाचा लेप करावा, ह्मणजे मंडल कुष्ठाचा नाश करितो.

शुद्धतालं मृतं सूतं तुल्यं ताभ्यां चतुर्गुणम् ॥ भर्जितां वि
जयां योज्या सर्वतुल्यं गुडं क्षिपेत् ॥ श्वेतकुष्ठहरं निष्कं
रसोऽयं विजयेश्वरः ॥ दार्वीखदिरनिंबानां क्काथं तमनु
पाययेत् ॥

टी० ॥ ॥ शुद्ध हरताळ पाऱ्याचें भस्म हीं समभाग त्या दोहोंचे चतुर्गुण भा
जलेली भांग आणि सर्वांचे बरोबर गूळ घालून एकत्र खलून चार मा
से प्रमाणें खावा, श्वेत कुष्ठ नाशक आहे, ह्याला विजयेश्वर
रस ह्मणतात. ह्यावर दारुहळद, खैर कडुलिंब यांचा काढा पाजावा.

शुद्धसूतं मृतं चाभ्रं मृतं ताम्रं समं समं ॥ मर्दयेद्बाकुची
तैले यामैकं कृतगोलकम् ॥ द्विगुणे पाचयेद्गंधे सतै
ले लोहपात्रके ॥ गंधतैले विजीर्णे तु तद्गोलांशं मृताय
सं ॥ पंचांगनिंबसंयुक्तं मधुना गोलकीकृतम् ॥ निष्कै
कं कीटभं हंति वज्रपाणिर्महारसः ॥

टी० ॥ ॥ शुद्ध पारा, अभ्रकभस्म, ताम्रभस्म हीं समभाग बांवचीचे तेलांत
प्रहरभर खलून गोळा करून लोखंडाचे पात्रांत दुप्पट गंधक आणि
तेल घालून पक्क करावें, तें तेल गंधक जळून गेल्यावर शेष गोळा उरेल

त्या बरोबर लोह भस्म घेऊन दोन्ही कडु लिंबाचें पंचांग आणि म ध यां बरोबर खलून गोळा करून चार मासे प्रमाणें खावा कीट भ कुष्टांचा नाश करील. याला वज्रपाणि महारस ह्मणतात.

भृंगराजहरीतक्योमूलमंतःपुटेदहेत् ॥ आरना लेनतल्लेपाच्छ्वेतकुष्ठविनाशनम् ॥

टी० ॥ ॥ माका, हिरडा, पांढरमूळ त्यांचा पुटपाक करून कांजीत खलू न लेप करावा श्वेत कुष्ठाचा नाशक आहे. इति कुष्ठ चिकित्सा

अथशीतपित्तलक्षणोपचारः

वरटीदंशसंस्थानः शोफः संजायतेबहिः ॥ सकंडु तोदबहुलश्छर्दिज्वरविदाहवान् ॥ उदर्दमितितंवि द्याच्छीतवातमथापरे ॥

टी० ॥ ॥ गांधील माशी चावल्यानें जो गांध येते त्या प्रमाणे जो अंगावर शोफ उत्पन्न होतो, आणि तो कंड, व्यथा, ओकारी, ज्वर, दाह यांणि युक्त असतो, त्याला उदर्द ह्म० कोणी शीतवात असें ह्मणतात.

सिद्धार्थरजनीकुष्ठैप्रपुन्नाडतिलैः सह ॥ कटुतैलेन संमिश्रमेतदुद्वर्तनंहितम् ॥

टी० ॥ ॥ पांढरे, शिरस, हळद, कोष्ठकोलिंजन, टांकळा तीळ यांचें चूर्ण शि रसाचे तेलांत मिळवून अंगाला चोळावें उदर्दावर प्रशस्त आहे.

कुष्ठहरिद्रेस्फूरससंपटोलनिंबाश्वगंधेसुरदारुशिग्रु ॥ ससर्षपंतुंबरुधान्यवन्यंकंडूवावच्चूर्णानिसमानि कुर्यात् ॥ तैस्तक्रपिष्टैःप्रथमंशरीरंतैलाक्तमुद्वर्तयि तुयतेत ॥ तथास्यकंडूपिटिकास्सकोठकुष्ठानिशोफ श्चशमंप्रजंति ॥

टी० ॥ ॥ कोष्ठ कोलिंजन, हळद, दारुहळद, तुळस, कडूपडवळ, कडूलिंब आस्कंद, देवदार, शेगवा, शिरीस, खिरफळ, धणें, दालचिनी यांचीं सम भाग चूर्णें करून ताकांत वाटून पूर्वी शिरसाचें तेल अंगास लाऊन नंतर हीं चोळावीं तेणें करून कंडु पिटिका कोठ कुष्ठें शोफ हीं शांत होतात.

निंबस्यपत्राणिसदाघृतेनधात्रीविमिश्राण्यथवाप्रयुंजात् विस्फोटकोटक्षतशीतपित्तंकंडूवस्त्रापित्तंसकलानिहन्यात्

टी० ॥ ॥ कडू लिंबाची पानें वाटून तुपाबरोबर अथवा आवळ काठीबरोबर खावीं, तेणें करून विस्फोट, उदर्दकोठ, क्षतशीतपित्त, कंडू, रक्तपित्त हीं सर्व नाश पावतात.

यष्टीमधुकपुष्पंचसरास्नंचंदनद्वयं॥ निर्गुंडीसकणाक्वाथंशीतपित्तहरंपिबेत्॥

टी० ॥ ॥ जेष्टीमधीचें फुल, रास्ना, चंदन रक्तचंदन, निर्गुंडी पिंपळी यांचा काढा शीत पित्त हारक आहे.

यत्रानेकानिलगदाःशीतवातादयस्मृतः॥ हिमयंतीहगात्राणिरोमांचस्फुरितानिच॥ शिरोक्षिवेदनालस्यंशीतवातस्यलक्षणम्॥

टी० ॥ ॥ ज्याचेठायीं अनेक वाय, रोग, शैत्य वात इत्यादिक शरीरास गारठा आणतात, रोमांच उभे रहातात, नेत्र यांचे ठायीं वेदना, आलस्य, हें शीतवाताचें लक्षण जाणावें.

रसेनगंधंद्विगुणंप्रगृह्यपुनर्नवावन्हिरसैर्विमर्द्य॥ पक्वार्कपत्रोत्थरसेनतस्माद्विपाचयेदष्टगुणेनपश्चात्॥ रसार्धभागेनविषंचदद्याद्विपाचयेद्वन्हिजलैःक्षणंतत्॥ शीतारिसंज्ञोहिरसोयमस्यवल्लुंतदर्धंयदिवार्द्रकेन॥ मरीचचूर्णेनघृतप्लुतेनसेवेतमासंसघृतंसपथ्यम्॥

टी० ॥ ॥ पारा १ गंधक २ घेऊन घेंटोळी चित्रक यांचे रसांत खलून नंतर पिकलेल्या रुईचे पानाचा रस त्याचे आठ पट घेऊन त्यांत पक्व करून पाऱ्याचे निमें बचनाग घालून पुन्हः चित्रकाचे रसांत क्षणभर शिजवावें, ह्मणजे हा शीतारी रस होतो. हा वाल किंवा अर्धवाल आल्याचे रसांत, अथवा तूप मिरपुडींत एक मास पर्यंत खावा. तूप खावें, पथ्य करावें, ह्मणजे शीत वाताचा नाश करील. इति शी० वात०

अथस्पर्शवातलक्षणोप०

अंगेषुतोदनंप्रायोदेहस्पर्शंनविंदति॥ मंडलानिचदृश्यंतेस्पर्शवातस्यलक्षणम्॥

टी० ॥ ॥ अंगाला टोंचल्या प्रमाणें व्यथा, स्पर्श न कळणें, अंगावर मंड

लें दिसावीं हें स्पर्श वाताचें लक्षण जाणावें.

तालंरसेनाष्टगुणंजयांचविमर्द्ययत्नाद्गुटिकागुडेन
निबध्यतांसेवयमासयुग्मंदिनोदयेस्पर्शविकारनुत्ये

टी० ॥ ॥ पारा १ हरताळ ८ भांग ८ भाग घेऊन फळांत गोळी करून सू र्योदयीं दोन मास पर्यंत खावी, स्पर्श वाताचा विकार दूर होईल. इ० तालें.

अष्टभागोरसःशुद्धोविषतिंदोर्दशैवतु ॥ गंधकस्य
दशद्वौत्रिकटुत्रिफलयोस्त्रयः ॥ वन्हिचित्रकमुस्ता-
नांवचश्वगंधयोरपि ॥ रेणुकाविषकुष्ठानांपिप्पली
मूलनागयोः ॥ एकैकस्तुभवेद्भागइत्याग्रात्ध्याःक्रमे
णच ॥ गुडश्चतुर्विंशतिस्याद्गुटिकाबदराकृतिः ॥ क्र
मेणवातुसेवेतस्पर्शवातापनुत्तये ॥

टी० ॥ ॥ शुद्ध पारा ८ कुचला १० गंधक १२ सुंठ १ मिरें १ पिंपळी १ त्रिफळा ३ बिब्बा चित्रक, नागरमोथे, वेखंड, आस्कंद, रेणुका बीज, बचनाग, कोष्ठ कोळिंजन, पिंपळमूळ, नागकेशर, यांचा एकेक भाग, गूळ २४ भाग स र्व एकत्र खलून, बोरा प्रमाणें गोळ्या करून क्रमानें एक दोन तीन अशा खाव्या, स्पर्श वाताचा नाश होईल. इ० स्प० वा० चि०

## अथाम्लपित्तलक्षणोपचारः

अविपाकक्लमक्लेदतिक्ताम्लोद्गारगौरवैः ॥ हृत्कंठदा
हारुचिभिश्चाम्लपित्तंवदेद्भिषक् ॥

टी० ॥ ॥ अपाचन, ग्लानी, तोंडास पाणी सुटणें, तिखट, आंबट, ढेंकरा, जडपणा, घशांत उरांत जळजळ अरुची त्या लक्षणें करून आम्ल पित्त जाणावें.

भुक्तेविदग्धेप्यथवाप्यभुक्तेकरोतितिक्ताम्लवमिंकदाचित्
उद्गारमेवंविधमेतिकंठहृत्कुक्षिदाहाशिरसोरुजश्च ॥

टी० ॥ ॥ जेवताक्षणी, किंवा अर्धे जेवण जिरल्यावर, किंवा जेवणा पूर्वी कडू आंबट अशी ओकारी, कदाचित् कडू, आंबट ढेंकर, असेंच घशा शी यावें, हृदय कुक्षी यांचा दहा, डोकें दुखणें हे उपद्रव जाणावे.

अम्लपित्तेतुवमनंपटोलारिष्टवारिणा ॥ विरेचनं
त्रिवृच्चूर्णंमधुधात्रीफलद्रवैः ॥

टी० ॥॥ अम्लपित्तांचे ठायीं कडु पडवळ, कडूलिंब, यांचे काढ्या बरोबर ओकारीचें औषध द्यावें, आणि तेडाचें चूर्ण मध आंवळ काढीचा काढा हेंच रेचन द्यावें.

त्रिकटुत्रिफलामुस्तंबीजंचैवविडंगजम् ॥ एलापत्रंचसर्वाणिसमभागानिकारयेत् ॥ यावंत्येतानिसर्वाणिलवंगंतत्समंभवेत् ॥ सर्वचूर्णाद्विगुणितंत्रिवृच्चूर्णंतुकारयेत् ॥ यावंत्येतानिसर्वाणितावतीशर्कराभवेत् ॥ सर्वमेकीकृतंपात्रेस्निग्धेचैवनिधापयेत् ॥ भोजनादौततोभक्षेन्माषाष्टकमिदंशुभम् शीततोयानुपानञ्चनारिकेरोदकंतथा ततोयथेष्टमाहारंकुर्यात्क्षीरोदनञ्चवै अम्लपित्तंहरत्याशुशूलदुर्नामनाशनम् ॥ प्रमेहंविंशतिञ्चैवमूत्राघातांस्तथाश्मरीम् ॥ अविपत्यकरञ्चूर्णमगस्त्येमुनिभाषितं॥

टी० ॥॥ सुंठ, मिरें, पिंपळी, त्रिफळा, नागरमोथे, वावडिंग, वेलदोडे, तमालपत्र, हीं सर्व समभाग घेऊन सर्वांचे बरोबर लवंगा घेऊन, जें चूर्ण होईल त्याचे दुप्पट तेडाचें चूर्ण घेऊन, सगळे चूर्णा बरोबर साखर घेऊन, सर्व एकत्र करून राबलेल्या मडक्यांत ठेऊन भोजनाचे पूर्वी आठमासे प्रमाण खावें-वर्ती थंड पाणी प्यावें, किंवा नारळाचें पाणी प्यावें, आहार यथेष्ट करावा दूध भात जेवावा, ह्मणजे अम्लपित्त शूल, मुळव्याध, प्रमेह, मूत्रघात, मूत्राश्मरी, यांचा नाश करतें; याला अविपत्यकर चूर्ण ह्मणतात हें अगस्त्य मुनीनें सांगीतलें आहे. इ० अ० प० क

पाठानिंबपटोलत्रिफलासनयासयोजितोजयति ॥ अधिककफमम्लपित्तंसहितोगुग्गुलुनाक्रमशः ॥

टी० ॥॥ पाहाडमूळ, कडूलिंब, कडुपडवळ, त्रिफळा, असाणा, धमासा यांचा काढा गुग्गुळ घालून द्यावा, तो अति कफ अम्लपित्त यांतें जिंकिते

सहिंस्त्रामृतभांडाकीक्वाथंकृत्वासमाक्षिकम् ॥ अम्लपित्तंहरेद्दुष्टश्वासंकासंज्वरंवमीम् ॥

टी० ॥॥ जटामांसी, गुळवेल, थोर रिंगणी यांचा काढा, मधाराहीत घ्यावा, अम्लपित्त श्वास कास, ज्वर, ओकारी यांचें हरण करील.

पिप्पलीमधुसंयुक्ता अम्लपित्तविनाशिनी ॥ जंबीरस्व
रसः पीतः सायंहंत्यम्लपित्तकम् ॥

टी० ॥ ॥ मध, पिंपळी अम्ल पित्ताची नाशक आहे, लघु ईडलिंबाचा र
र प्यालें असतां सायंकाळीं अम्ल पित्ताचा नाश करितें.

अम्लपित्तेप्रयोक्तव्यः कफपित्तहरोविधिः ॥ गुडकू
ष्मांडकंचैवतथा खंडामलक्यपि ॥

टी० ॥ ॥ अम्लपित्तावर कफ पित्त नाशक उपचार करावा गूळ आणि
कोंहळा, किंवा खडी साखर, आंवळ काठी.

ज्वलंतमिवचात्मानं मन्यते योम्लपित्तवान् ॥ तस्यैव
शोधनंपथ्यंनशांतिः शोधनंविना ॥

टी० ॥ ॥ जो अम्लपित्ती अम्लपित्तानें आपल्याला जळल्या प्रमाणें मा
नतो त्याला शोधन हितकारक आहे, रेचका वांचून शांती नाहीं.

गुडपिप्पलिपथ्याभिस्तुल्याभिर्मोदकः कृतः ॥ पित्त
श्लेष्मापहः प्रोक्तो मंदाग्निंचापिदीपयेत् ॥

टी० ॥ ॥ गूळ, पिंपळी, हिरडा हीं समभाग घेऊन यांचा लाडू करून खा
वा, पित्त कफ यांचा नाशक मंदाग्नी दीपन करणारा आहे.

यवगोधूमविकृतिस्तीक्ष्णसंस्कारवर्जिता ॥ यथास्वं
लाजसक्तून्वासितामधुयुतान्पिबेत् ॥

टी० ॥ ॥ सातूंचा किंवा गव्हांचा विकार त्याला तीक्ष्ण ह्मणजे तिखट वगे
रे न घातलेला असा किंवा लाह्यांचें पीठ मध तुपासहित जें जाला माने
ल तें त्याणें खावें.

निस्तुषयववृषधात्रीकाथं त्रिसुगंधमधुयुतंपीत्वा
अपहरतिचाम्लपित्तं यदि भुक्तेमुद्गयूषेण ॥

टी० ॥ ॥ कांडलेले सातु, अडूळसा, आंवळा, दालचिनी, तमालपत्र, वेलदो
डे यांचा काढा मध युक्त प्यावा म्हणजे अम्ल पित्ताचा नाश करील जर
मुगाचे मंडाशीं जेवलें तर.

यवकृष्णापटोलानांक्काथंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ नाशये
दम्लपित्तंचत्वधरुचिंचवमिंतथा ॥

टी० ॥ ॥ सातु, पिंपळी, कडू पडवळ यांचा काढा मध युक्त प्यावा अम्लपित्त

अरुची, ओकारी यांचा नाश करील.

भूनिंबनिंबत्रिफलापटोलीवासामृतापर्पटमार्कवाणाम्
क्वाथोहरेत्क्षौद्रयुतोम्लपित्तं चित्तं यथागारवधूकटाक्षः

टी० ॥ ॥ काडे किराईत, कडूलिंब, त्रिफळा, कडुपडवळ, अडूळसा, गुळवेल, पित्तपापडा, माका यांचा काढा मध युक्त अम्ल पित्ताचें हरण करील. जसें वेश्या स्त्रीच्या कटाक्ष चित्त हरण करितो.

कूष्मांडस्यरसोग्राह्यः पलानांशतमात्रकम् रसतु ल्यंगवांक्षीरं धात्रीचूर्णपलाष्टकम् ॥ लघ्वग्निनाप चेत्तावद्यावद्भवति पिंडितम् ॥ धात्रीतुल्यासितायो ज्यापलार्धंलिहयेदनु ॥ खंडकूष्मांडकंख्यातमम्लपित्तं नियच्छति ॥

टी० ॥ ॥ कोहळ्याचा रस ४०० तोळे गाईचें दूध ४०० तोळे आंवळकाठी चूर्ण ३२ तोळे एकत्र करून मंदाग्नीनें गोळा होई तों पर्यंत शिजवावें, त्यांत ३२ तोळे साखर घालून दोन तोळे प्रमाणें खावें, अम्ल पित्ताचें नाशक आहे. ह्याला खंड कूष्मांड ह्मणतात. इति खंडकूष्मांडकम् इ० अ० पि० चि०

## अथविसर्पविस्फोटलक्षणोपचारः

रक्तंलसीकात्वङ्मांसंदूष्यंतेत्रयोमलाः ॥ विस र्पाणांसमुत्पत्तौसर्वत्रपरिसर्पणात् ॥

टी० ॥ ॥ ज्यांत वातादिकानीं रक्त, लस, त्वचा, मांस हीं दूषित होतात, त्याला विसर्प म्हणतात; तो सर्वत्र पसरतो ह्मणून त्याला विसर्प असें नाव आहे.

ज्वरोतिसारोवमथुस्तृण्मांसदरणंक्लमः ॥ आरोच काविपाकौचविसर्पाणामुपद्रवाः ॥

टी० ॥ ॥ ज्वर, अतिसार, ओकारी, तृषा, मांस, भेद, ग्लानी, अरुची, अपाचन हे विसर्पाचे उपद्रव जाणावे.

त्वचमाश्रित्यतेरक्तंमांसादीनिप्रदूष्यच ॥ घोरान्कु र्वंतिविस्फोटान्सर्वान्ज्वरपुरःसरान् ॥

टी० ॥ ॥ वातादि दोष मांसादीक दूषित करून, त्वचेचा आश्रय करून घोर विस्फोट ह्मणजे फोंड उत्पन्न करतात, त्याचे पूर्वी ज्वर असतो.

अग्निदग्धनिभास्फोटाःसरुजारक्तपित्ततः ॥ क्वचित्स

र्वत्रवादेहेविस्फोटाइतिसंस्मृताः॥

टी० ॥ ॥ अग्नीनें भाजून फोड येतो त्या प्रमाणें रक्त पित्ता पासून क्वचित् ठिकाणीं, किंवा सर्व देहाचे ठाईं जे फोड येतात त्याना विस्फोट असें ह्मणतात.

भूनिंबवासाकटुकापटोलंफलत्रिकंचंदननिंबसिद्धः॥
विसर्पदाहज्वरशोफकंडूविस्फोटतृष्णावमिनुत्कषायः॥

टी० ॥ ॥ किराईत, अडूळसा, कुटकी, कडु पडवळ, त्रिफळा, चंदन, कडूलिंब यांचा काढा विसर्प, दाह, ज्वर, शोफ, कंडू, विस्फोट, तृषा, वमी यांचा नाशक आहे.

कनकफजगवल्लीमालतीपत्रमूर्वारसगदकुनटीभिर्मर्दितस्तैलयोगात्॥ अपहरतिरसेंद्रः कुष्ठकंडूविसर्पस्फुटितचरणरंध्रंशामलत्वंत्वचायाः॥

टी० ॥ ॥ धोत्रा, नागवेल, जाई, मोरवेल, कपिला, कोष्ठकोलिंजन, मनशीळ इत्यांचे बरोबर तेल युक्त पारा खलून लावला असतां कुष्ठ, कंडू, विसर्प, फुटलेले पाय, त्वचेचा काळे पणा यांचा नाश करितो.

एरंडतुंबीकटुनिंबचक्रमर्दास्थिबीजानिचसोमराजी
अंकोल्लबीजानिसमानिकृत्वापातालयंत्रेणकृतैलमेषाम्॥ प्रगृह्यतेनाथविमर्दयेतविसर्पकादीन्विकृतिंमयांति

टी० ॥ ॥ एरंड, कडु भोपळा, कडू लिंब, टाकळा यांचें बीं बावचा, अंकोल्याचें बीं हीं सारखीं घेऊन पाताळ यंत्रांत तेल काढून चोळावें ह्म० विसर्पादीक जा०

पटोलामृतभूनिंबवासारिष्टकपर्पटैः॥ खदिराष्टयुतैः काथोविस्फोटज्वरशांतये॥

टी० ॥ ॥ कडू पडवळ, गुळवेल, काडेकिराईत, अडूळसा, कडूलिंब, पित्तपापडा खदिराष्टक यांचा काढा विस्फोट ज्वर नाशार्थ घ्यावा.

दूर्वावचोदुंबरजंबुशालसमच्छदाश्वत्थकषायकल्कैः॥
सिद्धंहिसर्वज्वरदाहपाकविस्फोटशोफान्विनिहंतिसर्पिः

टी० ॥ ॥ दूर्वा, वेखंड, उंबर, जांबूळ, अर्जून, सातवीण, पिंपळ यांचा काढा आटवून त्याणें सिद्ध केलेलें तूप सर्व ज्वर, दाह, पाक, विस्फोट, शोफ यांचा नाश करितें. इति विस्फोट चिकित्सा.

अथमसूरिकालक्षणोपचारः

स्फोटाः कृष्णारुणारूक्षास्तीव्रवेदनयान्विताः॥ मसूरा

कृतिसंस्थानाः पिटिकास्यर्मसूरिकाः ॥

टी० ॥ ॥ काळें, तांबडे, रूक्ष, तीव्र, वेदनेने युक्त मसूरिका साररवे जे फोड त्यांस मसूरिका असें ह्मणातात.

तासांपूर्वज्वरःकंडूगात्रभंगोरुचिर्भ्रमः ॥ त्वचिशोफश्चवैवर्ण्यंनेत्ररोगश्चजायते ॥

टी० ॥ ॥ मसूरिका उत्पन्न होण्या पूर्वी ज्वर, कंडू, आंग मोडून येणें, अरुचि, भ्रम, त्वचेला सूज, वैवर्ण्य, नेत्र पीडा इतकीं होतात.

निशाद्वयोशीरशिरीषमुस्तकैःसलोध्रभद्रश्रियनागकेसरैः ॥ पटोलमूलारुणतंदुलीयकैःपिबेद्धरिद्रामलकत्वकसंयुतम् ॥ मसूरिविस्फोटविसर्पशांतयेतथासरोमांतकमिज्वरापहः ॥

टी० ॥ ॥ दारु हळद, हळद, वाळा, शिरीस, नागरमोथे, लोध्र, चंदन, नागकेशर, कडूपडवळ, पोसवर मूळ, तांबडा तांदूळजा यांचा काढा हळद आणि आंवळकाठी सहीत प्यावा; तेणें करून मसूरिका, विस्फोट, विसर्प, रोमांति कमि, ज्वर यांचा नाश होतो.

पंचवल्कलचूर्णेनक्लेदनीमवचूर्णयेत् ॥ भस्मनाकेचिदिच्छंतितिलचूर्णैस्तथापरे ॥

टी० ॥ ॥ पंच वल्कलाचे चूर्णाने लस दडपावी, किंवा भस्मानें किंवा तिळांचे चूर्णानें इतिम· चिकित्सा.

अथस्नायुकलक्षणोपचारः

कुर्यात्तंतुनिभंसूत्रंश्वयथुंजनयत्यपि ॥ शनैःशनैःक्षताद्यातिपुनःस्थानांतरंभजेत् ॥ सस्नायुकइतिख्यातःक्रियोक्ताश्चविसर्पवत् ॥

टी० ॥ ॥ जो तंतू सारखें सूत्र उत्पन्न करितो — आणि सूज उत्पन्न करतो, हळु हळू क्षता पासून निघतो, पुनः दुसरे ठिकाणी जातो; त्याला स्नायुक असें ह्मणातात, ह्यावर विसर्पा प्रमाणें उपचार करावा.

गव्यंसर्पिस्त्र्यहंपीत्वानिर्गुंडीस्वरसंत्र्यहम् ॥ पीत्वा— स्नायुकमत्यग्रंहंत्यवश्यंनसंशयः

टी० ॥ ॥ गाईचें तूप तीन दिवस पिऊन नंतर निर्गुंडीचा आंगरस तीन दिव

स. प्याचा अति कठीण स्नायूक रोगाचा नाश करील; संशय नाहीं.

कुष्ठरामठशुंठीभिः कल्कः शिग्रुसमन्वितः ॥ पाना लेपनयोगेन जंतुपीडाविनाशनः ॥

टी० ॥ ॥ कोष्ठकोलिंजन, हिंग, शुंठ, शेगवा यांचें चूर्ण वाटून पिणें, लेप ह्या योगानें जंतु पीडा विनाशक आहे.

शिग्रुमूलफलैः पिष्टैः कांजिकेन ससैंधवैः ॥ लेपनं लशुनं चाग्निराजिकापिंडिकादिके ॥

टी० ॥ ॥ शेगव्याचें मूळ, बीं वाटून सैंधव कांजीसहित एकत्र खलून लेप करावा, अथवा लसूण, चित्रक मोहऱ्या यांचा लेप करावा, तेणें करून स्नायूक, पिंडिका ह्मणजे पोटऱ्यांचे गोळे इत्यादीक शांत होतात.

गुडूचीरसेन टंकणक्षारः पेयः ॥ अथवा षणबीजंभाग मेकं गोधूमपिष्टंभागमेकं द्वयमेकीकृत्य घृतेन पक्वं गुडेन त्रिदिनं भक्षयित्वा स्नायुको नश्यति ॥

टी० ॥ ॥ गुळवेलीचा रसांत टांकण खार प्यावा, अथवा नागाचें बीं १ ग व्हांचें पीठ १ दोन्ही एकत्र करून तुपांत तळून गुळा बरोबर ३ दिवस खावें; ह्मणजे स्नायुक नष्ट होईल. इति स्नायु चिकित्सा.

## अथ क्षुद्ररोगलक्षणोपचारः

स्निग्धाः सवर्णाग्रथिताः सरुजामुद्गसंनिभाः ॥ ग्रंथयोष्टांगदेशेषु क्षुद्रास्ते त्र्यधिका क्वचित्कचित् ॥ दारुणश्चेंद्रलुप्तादिपलितं क्षुद्रसंज्ञितम् ॥ सर्वेषां पंचकं चैव कुर्यादादौ यथाक्रमम् ॥

टी० ॥ ॥ स्निग्ध शरीराचे त्वचे सारखाच ज्यांचा वर्ण, एकांत एक उत्पन्न झालेले, पीडायुक्त शरीराचे गांई मुगा प्रमाणें आठ ठिकाणीं ग्रंथि होतात्‌ त्याला क्षुद्र असें ह्मणतात ते क्वचित्कचित असतात आणि दारुणा, इंद्र लुप्त ह्मणजे टकल इत्यादिक. पलित ह्मणजे केंश पिकणें त्यानांही क्षुद्र ह्मणतात, सर्व क्षुद्र रोगांवर पूर्वी पांच उपचार क्रमानें करावे.

त्रिफलागुग्गुलुः सेव्यः पश्चाल्लेप्यमलेपनम् ॥ शस्त्रेणोत्कृत्य वल्मीकं क्षाराग्निभ्यां प्रसाधयेत् ॥

टी० ॥ ॥ त्रिफला गुग्गूळ खावा नंतर लेप करावा, शस्त्रानें मांस वाढलेलें

वगैरे कापून काढावें; रवार किंवा अग्नि याणीं प्रसाधन ह्मणजे जाळून साफ करावें.

मनःशिलालंभल्लातसूक्ष्मैलागरुचंदनैः॥ जातिपल्लवक ल्केश्च निंबतैलं विपाचयेत्॥ वल्मीकंनाशयेत्तैलंबहुच्छिद्रंबहूभृतम्॥

टी० ॥ ॥ मनशीळ, हरताळ, बिब्बा, कडू जिरें, वेलदोडे, अगरु, चंदन, जाईचे पल्लव, यांचे बरोबर लिंबोळ्यांचें तेल, करवावें तें तेल वल्मीक ह्मणजे वारुळा सारखें ज्यांत मांस वाढलेलें असतें त्यावर लावावें, म्हणजे बहु छिद्रांचें मोठें असें वल्मीक नाश पावतें.

प्रियंगूचंदनंलोध्रंकुष्ठंपांडुवटच्छदम्॥ कालीयकान्वितंतैलंकुर्याच्चंद्रनिभंमुखं॥

टी० ॥ ॥ राळे, चंदन, लोध्र, कोष्ठकोलिंजन, पांढरे वडाचीं पानें, दारुहळद यांचा लेप मुखाला केला असतां चंद्रा सारखें मुख होतें.

लोध्रधान्यवचालेपस्तारुण्यपिटिकापहः॥ तद्वद्गोरोचनायुक्तंमरिचैश्चप्रलेपनम्॥ सिद्धार्थकवचालोध्रसैंधवैश्चप्रलेपनम्॥ गव्येनचार्जुनंत्वग्वामंजिष्ठावासमाक्षिका॥ कंटकैः शाल्मलेर्येश्चक्षीरपिष्टैर्विलेपयेत्॥ मुखेतारुण्यपिटिकाः संक्षयंयांत्यसंशयम्॥

टी० ॥ ॥ लोध्र, धणे, वेखंड यांचा लेप; तसेंच गोरोचन, मिरें यांचा लेप; आणि श्वेत शिरीस, वेखंड, लोध्र, सेंधव यांचा लेप; आणि गाईचें दूध, अर्जुन वृक्षाची साल यांचा लेप; आणि मंजिष्ठ, मध यांचा लेप; आणि सांवरीचे कांटे, दूध यांचा लेप; हे सर्व लेप मुखावरील तारुण्य पिटिकांचें नाशक आहेत. इतिपिटिका.

अथारुंषिकालेपः

पुराणमथपिण्याकंपुरीषंकुक्कुटस्यच॥ मूत्रेपिष्ट्वाप्रलेपोयंशीघ्रंहन्यादरुंषिकाम्॥

टी० ॥ ॥ जुनी पेंड, कोंबड्याची विष्ठा, गोमूत्रांत वाटून लेप करावा, म्हणजे अरुंषिका, कपाळ रोग यांचा नाश लवकर करील.

खदिरारिष्टजंबूनांत्वग्भिर्वामूत्रसंयुतैः॥ कुटजत्वक्

सैंधवैर्वालेपाद्धन्यादरुंषिकाम् ॥

टी० ॥ ॥ खैर, कडूलिंब, जांबूळ याचा साली गोमूत्रांत वाटून त्याचा लेप अथवा कुड्याची साल, सेंधव यांचा लेप अरुंषिका नाशक आहे.

अरुंषिकांजलौकाभिर्बहुशोग्राहयेद्भिषक् ॥ प्रक्षाल येन्मरवंतक्रसैंधवक्काथवारिभिः ॥ मुहुर्मुहुस्ततोलिं पेत्पटोलारिष्टवासकैः ॥ लिंबोदकेनलवणैस्ततोहन्यात् रुंषिकाम् ॥

टी० ॥ ॥ अरुंषिकेवर वारंवार जळवा लावाव्या आणि ताक सेंधव यांचा का ढा, पाणि याणि, वारंवार तोंड धुवावें, नंतर कडु पडवळ कडूलिंब अडुळसा लिंबाचा रस सेंधव यांचा लेप करावा म्हणजे अरुंषिकेचा नाश करील इति अरुंषिका. अथदारुणः

आम्रबीजस्यचूर्णंतुशिवाचूर्णंसमंद्वयं ॥ दुग्धेपि ष्टामलेपोयंदारुणंहंतिदारुणम् ॥

टी० ॥ ॥ आंब्याचे कोईचें चूर्ण, आंवळकाठीचें चूर्ण, दोन्ही समान दुधां त वाटून लेप करावा, मोठ्या दारुण्याचा नाश करील.

भृंगराजरसेनैवलोहकिट्टंपलत्रिकम् ॥ सारिवांच प चेत्कल्केस्तैलंदारुणनाशनम् ॥ अकालपलितंकंडू मिंद्रलुप्तंचनाशयेत् ॥

टी० ॥ ॥ माक्याच्या रसांत लोहकीट १२ तोळे आणि उपळसरी शिजवून त्यांचे बरोबर तेल कढवून लावावें म्हणजे दारुणा, अकाळीं केश पिकणें, कंडू इंद्र लुप्त यांचा नाश करील. इति भृंगराज तैलं.

कंटकारीफलरसैस्तुल्यंतैलंविपाचयेत् ॥ जपापुष्परसै र्वाथितल्लेपोदारुणमणुत्

टी० ॥ ॥ रिंगणीचे फळांचे रसांत त्याचे बरोबर तेल घालून कढवावें, अ थवा जास्वनीचे फुलांचे रसांत तितकेंच तेल घालून कढवावें आणि तें ते ल चोळावें दारुणा नाशक आहे.

पारदंमर्दयेन्निष्कंकृष्णाधत्तूरकद्रवैः ॥ नागवल्लीद्रवै र्वाथवस्त्रखंडंप्रलेपयेत् ॥ तद्वस्त्रंमस्तकेवेष्ट्यधार्यंया मत्रयंततः ॥ यूकापतंतिनिःशेषाः परीक्षानात्रसंशयः

टी० ॥ ॥ ४ मासे पारा घेऊन काळे धोत्र्याचे किंवा नागवेलीचे रसांत ख लून फडक्याला लेप करावा, तें फडकें डोक्यास बांधावें तीन प्रहर तसें च ठेवलें असतां उवा मरून पडतात या विषयीं परीक्षा पाहाणें नको, संशय नाहीं. ॥ कोद्रवाणांतृणाक्षारपानीयंपरिधावने कुर्याद्दारुणिकेमूर्ध्निलेपोवामधुसंयुतः

टी० ॥ ॥ हरीकांचे गवताचे क्षाराचें पाणी डोकें धुवायला घ्यावें, अथवा क्षार, मध यांचा लेप करावा, तेणें करून दारुणा जातो. इ. दारुणः

## अथइंद्रलुप्तम्

इंद्रलुप्तेमहालेपोमधुनाबृहतीरसः ॥ गुंजामूलफ लंवापिभल्लातकरसेपिवा ॥

टी० ॥ ॥ रिंगणीचा रस, मध यांचा किंवा गुंजेचें मूळ अथवा फळ बि- ब्याचे रसांत उगाळून त्याचा लेप करावा. इंद्रलुप्तावर मोठा प्रशस्त आहे.

लेपः सनवनीतोवाश्वेताश्वरवरजामषी ॥ हस्तिदं तमषींकृत्वाछागदुग्धरसांजनम् ॥ रोमाण्यस्यप्रजा यंतेलेपात्पाणितलेष्वपि ॥

टी० ॥ ॥ श्वेत कांचन, आसंध, गेळ्याची मषोरी लोण्यांत खलून लावावी, अथवा हस्ती दंताची मषोरी, शेळीचें दूध, रसांजन एकत्र खलून त्या चा लेप करावा, तेणें करून हाताचे तळ्यावर देखील केंश येतात.

प्रियालबीजमधुककुष्ठमाषैःससैंधवैः ॥ गुंजाफलै श्चिरंलिंपेत्केशभूमिंसमंततः ॥

टी० ॥ ॥ चारोळ्या, जेष्टीमध, कोष्ठ कोलिंजन, उडीद, सैंधव, गुंजा यांचा पु ष्कळ दिवस केंश नसतील, तेथें लेप करावा ह्मणजे केंश येतात.

गुंजापत्रविषंतैलंलाक्षामधुककांजिकम् ॥ पतंत्यनेन नोकेशालेपाद्रोहंतिचद्रुतम् ॥

टी० ॥ ॥ गुंजेचीं पानें, बचनाग, तेल, लाख, जेष्टीमध, कांजी यांचे लेपानें केंस गळत नाहींत आणि नवे रुजतात. इति इंद्र लुप्त.

## अथकेशकृष्णीकरणं

त्रिफलानीलिनीपत्रंलोहंभृंगरसैःसमम् ॥ अविमूत्रे णसंमिश्रंकृष्णीकरणमुत्तमम् ॥

टी० ॥ ॥ त्रिफळा, लघुनीळीचीं पानें, लोहचूर्ण, माक्याचा रस, मेंढीचें मूत एकत्र खलून केंशाला चोळावें ह्मणजे केश काळे होतात.

अयोरजोभृंगराजस्त्रिफला कृष्णमृत्तिका ॥ स्थित मिक्षुरसेमासंलेपनात्पलितंजयेत् ॥

टी० ॥ ॥ लोह चूर्ण, माका, त्रिफळा, काळी माती हीं महिनाभर उसांचे रसांत ठेऊन नंतर लेप करावा ह्मणजे पलितातें जिंकील.

धात्रीफलद्वयंपथ्येद्वेतथैकंबिभीतकं ॥ पंचाम्रमज्जा लोहस्यकर्षैकंचप्रदीयते ॥ पिष्टालोहमयेभांडेस्था पयेदुषितंनिशि ॥ लेपोपहंतिनचिरादकालपलितंमहत् ॥

टी० ॥ ॥ दोनें आंवळे, हिरडे २ बेहडा १ आंब्याचा कोया ५ लोह चूर्ण १ तोला लोहाचे पात्रांत खलून एक रात्र ठेऊन लेप करावा; अकाळीं जें पलित होतें त्याचा लवकर नाश करील. इति कृष्णी करणं.

## अथ पामा चिकित्सा.

प्रपुंन्नाटस्यबीजानिबाकुचीसर्षपास्तिलाः ॥ कुष्ठं निशाद्वयंमुस्तंपिष्टात्क्रेणचैकतः ॥ प्रलेपाद्स्यन श्यंतिकंडूपामाविचर्चिकाः ॥

टी० ॥ ॥ टांकळ्याचें बीं, बांवच्या, शिरीष, तीळ, कोष्ठकोलिंजन, दारुहळद, हळद, नागरमोथे हीं एकत्र ताकांत खलून, लेप केला तर कंडू खरूज विचर्चिका यांचा नाश होतो.

रसद्विजीरद्विनिशामरीचदैत्येंद्रसिंदूरमनःशिलानं चूर्णीकृतानांघृतमिश्रितानांत्रिभिःप्रलेपैरपयातिपामा

टी० ॥ ॥ पारा, काळें जिरें, कडू जिरें, दारुहळद, हळद, मिरें, गंधक, शेंदूर, मनशील हीं तुपांत खलून ह्याचा तीन वेळां लेप करावा ह्मणजे खरूज जाते

अर्कपत्ररसेपक्वंहरिद्राकल्कसंयुतम् ॥ नाशयेत्सा र्षपंतैलंपामाकंडूविचर्चिकाः ॥

टी० ॥ ॥ रुईचे पानांचे रसांत हळदीचे चूर्णा सहीत शिरसांचें तेल कढवून लावावें खरूज, कंडू, विचर्चिका यांचा नाश करील.

अश्वत्थस्यत्वचोभस्मचूर्णेनसहमिश्रितम् ॥ नवनी तद्वयोस्तुल्यंमर्द्यतेनप्रलेपयेत् ॥ आसनेगुदपार्श्वे

स्फुटिस्यांपिटिकांजयेत् ॥

टी० ॥ ॥ पिंपळाचे सालीची राख, चुना याचे बरोबर लोणी घेऊन एक त्र खलून लेप करावा ह्मणजे कुले, गंद, कुशी कंबर या ठिकाणची खरूज नाशील. ॥ इति पामा ॥

## अथाग्निदग्धे

यवान्दग्ध्वामषीकार्यातैलेनयुतथातया ॥ दद्यात्स र्वाग्निदग्धेषुभलेपंव्रणरोपणम् ॥

टी० ॥ ॥ सातूंची मषीरी तेलांत खलून भाजलेले ठिकाणी लेप करावा ह्मणजे बरा होईल.

सिक्थंसर्जरसोजीरंघृतपक्वंत्र्यहंहरेत् ॥ लेपतोव न्हिदग्धस्यदुःखंमृत्युंजयोयथा ॥

टी० ॥ ॥ मेण, राळ, शहाजिरें, हीं तुपांत घालून कढवावें, नंतर याचा लेप भाजलेल्या ठिकाणचें दुःख तीन दिवसांत हरण करितो, जसा सांब दुःखातें हरण करितो.

मधूच्छिष्टंसमधुकंरोध्रंसर्जरसंतथा ॥ मंजिष्ठाचंद नंमूर्वापिष्ट्वासर्पिर्विपाचयेत् ॥ सर्वेषामग्निदग्धानां मेतद्रोपणमुत्तमम् ॥

टी० ॥ ॥ मेण, जेष्टीमध, लोध, राळ, मंजिष्ठ, चंदन, मोरवेल हीं कुटून तुपांत कढवून लेप करावा ह्मणजे भाजलेलें बरें होईल. इत्यग्निदग्धं.

## अथांगसुगंधकरणं

तांबूलपत्रंचूर्णंतुचूर्णंकुष्ठशिवाभवम् ॥ वारिणाले पनंकुर्यात्गात्रदौर्गंध्यनाशनम् ॥

टी० ॥ ॥ नागवेलीचीं पानें, कोष्ठ कोळिंजन, आंवळकाठी हीं पाण्यांत वाटून अंगाला चोळावें; ह्मणजे अंगाची दुर्गंधी दूर होईल. इतिसुगंधिकरणं

इत्यादिबहवोयोगाःक्षुद्ररोगास्त्वनेकधा ॥ तेनात्रक थितामिथ्याउक्ताकारणिकामया ॥

टी० ॥ ॥ असे पुष्कळ योग आहेत, आणि क्षुद्ररोग ही अनेक प्रकारचे आहेत, ते सर्व लिहिले नाहीं, कारणीक मात्र लिहिले आहेत. इ. क्षुद्र.

## अथमुखरोगचिकित्सा.

मुखेत्वोष्ठगतादंतवेष्टगादंतगास्तथा ॥ हनुजिव्हाग
तास्तालुगतागलगतास्तथा ॥ मुखरोगाः पंचषष्टीसप्त
स्वायतनेषुच ॥ पृथक्लक्षणयंतेषांविस्तरान्नात्रलेखितं

टी० ॥ ॥ ओष्ठ, दंतवेष्ठ ह्मणजे हिरड्या, दांत, हनवटी, जिव्हा, तालु, गळा इतक्या स्थानी मुखाचे ठायीं ६५ मुखरोग होतात त्यांचा विस्तार होईल ह्मणून निरनिराळीं लक्षणें लिहिली नाहीत.

श्रीवेष्टकंसर्जरसंस्करदारुसगुग्गुलुम् ॥ यष्टीमधुक
संचूर्णमोष्ठजेप्रतिसारणम् ॥

टी० ॥ ॥ विशेषनामकधूप, राळ, देवदार, गुग्गुळ, जेष्टीमध यांचें चूर्ण बारीक करून ओष्ठाला चोळावें.

शीतादेर्त्हृतरक्तचतोयेनागरसर्षपान् ॥ निष्क्वाथ्यत्रि
फलामुस्तागंडूषःसरसांजनः ॥ प्रियंगवश्चमुस्ताच
त्रिफलाचप्रलेपनम् ॥

टी० ॥ ॥ थंडी, वारा याणी ओष्ठ फुटून रक्त निघालें असतां सुंठ, शिरीस, त्रिफळा नागरमोथे यांचा काढा करून त्यांत रसांजन घालून चूळ भरून टाकावे राळे, नागरमोथे त्रिफळा यांचा लेप करावा.

जातीपत्रामृताद्राक्षायासदार्वीफलत्रिकैः ॥ क्वाथःक्षौ
द्रयुतश्चोक्तोगंडूषेमुखपाकजित्

टी० ॥ ॥ जायपत्री, गुळवेल, मनुका, धमासा, दारुहळद, त्रिफळा, यांचे काढ्यांत मध घालून चूळ भरावी, ह्मणजे मुखपाकाते जिंकील.

पटोलशुंठीत्रिफलाविशालात्रायंतितिक्ताद्विनिशा
मृतानाम् ॥ पीतःकषायोमधुनानिहंतिचिरास्थिता
नास्यगदानशेषान् ॥

टी० ॥ ॥ कडूपडवळ, सुंठ, त्रिफळा, कवडळ, मेंदी, कुटकी, दारुहळद, हळद, गळवेल यांचा काढा मध घालून प्यालें असतां फार दिवसांचे सर्व मुख रोगांचा नाश करील.

कटुकातिविषादारुपाठामुस्तकलिंगकैः ॥ गोमूत्रक्व
थितः पेयः कंठरोगविनाशनः ॥

टी० ॥ ॥ कुटकी, अतिवीष, देवदार, पाहाडमूळ, नागरमोथे, इंद्रजव यांचा

गोमूत्रांत काढा करून प्यावा, कंठ रोगाचा नाशक आहे.

गृहधूमोयवक्षारःपाठाव्योषंरसांजनम्॥तेजोव्हा त्रिफलालोध्रंचित्रकश्चेतिचूर्णितम्॥सक्षौद्रंधारयेद तद्गलरोगविनाशनम्॥

टी० ॥ ॥ पेरोसा, जवखार, पहाडमूळ, सुंठ, मिरें, पिंपळी, रसांजन, तेजब ळ, त्रिफळा, लोध्र, चित्रक यांचें चूर्ण करून मधांत गोळी करून तोंडांत धरावी, गलरोगाची नाशक आहे.

यष्टीशुंठीतिलक्काथोगंडूषंतेनकारयेत्॥भोजनंमु द्गमिश्रंचमुखपाकप्रशांतये॥

टी० ॥ ॥ जेष्टीमध, सुंठ, तीळ यांचे काढ्यानें चूळ भरावी, मुगांची खिच डी खावी, म्हणजे मुख पाकाचीशांती होईल.

क्काथोदार्व्यायुतःक्षौद्रैर्गंडूषैर्मुखपाकजित्॥आस्य रोगहरंखादेन्मधुनापार्पटरसम्॥

टी० ॥ ॥ दारुहळदीचे काढ्यांत मध घालून गुळण्या कराव्या, मुख पाकातें जिंकील, आस्य रोगाचा नाशक पित्तपापड्याचा रस मध युक्त खावा.

स्वरसोमातुलिंगस्यसंयुतोमधुसर्पिषा॥तालुशोषेप्र लेपोयंमूर्ध्निदेयःससैंधवः॥

टी० ॥ ॥ महाळुंगाचा स्व रसांत मध तूप सैंधव घालून मस्तकावर लेप क रावा, म्हणजे तालुशोष शांत होतो.

लाजाजाजीफलंपूगंतुल्यंभक्ष्यंपिबेदनु॥शीततोयंप लार्धंचत्वास्यवैरस्यशांतये

टी० ॥ ॥ लाह्या, जायफळ, सुपारी हीं समान घेऊन खावीं; वरती थंड पाणी दोन तोळे प्यावें तेणें करून मुखाला रुची येते.

कटुतिक्तकषायेणदंतकाष्ठेननित्यशः॥दुर्गंधिंहंतिनो च्चित्रंक्षौद्रैर्वाकुष्ठचूर्णकम्॥

टी० ॥ ॥ कडू, तिखट, तुरट अशा काष्ठानीं दांत घांसले किंवा कोष्ठकोलिं जन, मध याणीं दांत घांसले तर दुर्गंधीचा नाश होतो.

जातीनिंबपटोलंचमालतीनवपल्लवाः॥पंचपल्लवकः श्रेष्ठःकषायोमुखधावने॥

टी० ॥ ॥ जाई, पिंवळी जाई, चमेली, कडूलिंब, कडूपडवळ, यांचे कोंवळे प ल्लुवाचे काढ्याने मुख धुवावें ह्मणजे चांगलें होतें.

मुखदंतगलजारोगाः प्रायः कफेन भूयिष्ठाः ॥ तस्मात्ते षामसकृद्रुधिरंस्रावेद्दुष्टम् ॥

टी० ॥ ॥ मुख, दांत, गळा या ठिकाणचे रोग बहुत करून फार कफानें यु क्त असे असतात ह्मणून वारंवार दुष्ट रक्त काढलें असतां बरे होतात.

जातिप्रवालत्रिफलायवासदारुत्रियामामृतगोस्तनी नां ॥ कषायः क्षौद्रयुतो निहंतिनरस्यपाकंमुखपंकजस्थम् ॥

टी० ॥ जाईचे कोंवळे पल्लव, त्रिफळा, धमासा, दारुहळद, गुळवेल, काळी द्राक्षें यांचा काढा मध युक्त प्यावा; ह्मणजे मुख पाकाचा नाश करील.

खदिरस्यातुलांसम्यग्जलद्रोणे विपाचयेत् ॥ शेषाष्टभा गेक्काथेस्मिन्नेतानि प्रतिवापयेत् ॥ जातीकर्पूरपूगानि कंकोलकफलानि च ॥ एतेषां गुटिका कार्या मुखे सौभा ग्यवर्धिनी ॥ दंतोष्ठमुखरोगेषु जिव्हाताल्वामयेषु च ॥

टी० ॥ ॥ खैर ४०० तोळे, पाणी १०२४ तोळे घेऊन अष्टमांश काढा करून, त्यांत जायपत्री, कापूर, सुपारी, कंकोळ यांचें चूर्ण टाकून गोळ्या कराव्या त्या मुख, दांत, ओष्ठ, जिव्हा, तालु यांचे रोगावर प्रशस्त आहेत. इ. ख. गु.

उपजिव्हां तु संलिख्य क्षारेण प्रतिसारयेत् ॥ व्योषक्षा राभयावन्हिचूर्णमेतत्प्रघर्षणम् ॥

टी० ॥ ॥ पडजिभेला, क्षार लाऊन, सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार, हिरडा, चित्रक यांचे चूर्णानें दडपावी, ह्मणजे बरी होते.

गृहधूमारनालेन क्काथं समधुसैंधवम् ॥ पाणिना मर्द येच्चास्य मुपजिव्हाप्रशांतये ॥

टी० ॥ ॥ घेरोसा, कांजीत घालून ऊन करून मध सैंधव युक्त तोंडाला आं तून चोळावें पडजीभ बरी होते.

निर्गुंडीमुत्पलंकंदं चर्वयेदुपजिव्हजित्

टी० ॥ ॥ निर्गुंडी आणि कमळाचा कांदा खावा ह्म० पडजीभ बरी होते.

बकुलस्य फलं रोध्रं वज्रवल्लीकुरंटकम् ॥ चतुरंगुलव व्बूलमिदं सर्वं समंस्मृतं ॥ एषां कल्कैः कषायैर्वा तैलंप

र्कंमुखेघृतं॥स्थैर्यंकरोतिचलितदंतानांधावनेनच॥

टी० ॥ ॥ बकुळीचीं फळें, लोध्र, वाळा, काळी गोकर्णी, कोरांटा, बाहवा, बाभूळ हीं सर्व समभाग घेऊन यांचा काढा किंवा कल्क करून त्याचे बरोबर तेल कढवून, निवळून तोंडांत धरावें हालणारे दांत बळकट होतात.

तुत्थलोध्रकणापथ्यापटुविश्वावघर्षणात्॥अपिप्र चलितादंताजायंतेवज्रसंनिभाः॥

टी० ॥ ॥ मोरचूत, लोध्र, पिंपळी, हिरडा, मीठ, संठ, यांचे चूर्णानें दांत घांसावे ह्मणजे दांत हालनारे असले तरी वज्रा सारखे होतात.

कुष्ठंदार्वीलोध्रपाठासमंगामुस्तातिक्तातेजिनीपातिका चा॥चूर्णंशस्तंघर्षणंतद्द्विजानांरक्तस्रावंहंतिकंडूरुजंच

टी० ॥ ॥ कोष्ठकोळिंजन, दारुहळद, लोध्र, पाहाडमूळ, मंजिष्ठ, नागरमोथे, कुरकी, तेजबळ, जुई यांचे चूर्णानें दांत घांसावे, रक्तस्राव, कंडू, व्यथा, यांचें नाशक आहे. दंतपुप्पुटकेकार्यंतरुणेरक्तमोक्षणम् सपंचलवणक्षारंसक्षौद्रंप्रतिसारणम्

टी० ॥ ॥ नूतन दंत पुप्पुट रोगावर रक्तमोक्षण करावें, आणि पंच लवण क्षार मध यांणें दांत घांसावे.

कासीसहिंगुसौराष्ट्रीदेवदारुसमंजलैः॥गुटिकांधार येद्दंतक्रिमिशूलहरांपराम्॥

टी० ॥ ॥ हिराकस, हिंग, तुरटी, देवदार यांची गोळी पाण्यांत वाटून करावी आणि मुखांत धरावी, दंत, क्रिमिदंत, शूल यांची नाशक आहे.

यवाग्रजंतेजवतीसपाठांरसांजनंदारुनिशांसकृष्णाम् क्षौद्रेणकुर्याद्गुटिकांमुखेनतांधारयेत्सर्वगलामयेषु॥

टी० ॥ ॥ जवखार, तेजबळ, पहाडमूळ, रसांजन, दारुहळद, पिंपळी हीं घेऊन मधांत कालवून गोळी करून तोंडांत धरावी, सर्व गलरोगांवर प्रशस्त आहे. इतिमुखरोगचि० अथकर्णरोगलक्षणोपचारः

समीरणःश्रोत्रगतोयदाचरेत्समंततःशूलमतीवकर्ण योः॥करोतिदोषैःश्चयथंसमावृतःसकर्णरोगःकथितोदुरासदः

टी० ॥ ॥ जेव्हां दोषानी युक्त असा वायु कानांत संचार करितो, आणि कानाचे ठायीं शूल, शोफ उत्पन्न करतो त्याला कर्ण रोग ह्मणतात तो दुःसाध्य.

बाधिरत्वंकर्णपूतिलुताकर्णरुजाबहुः

टी० ॥ ॥ बहिरेपणा, कर्ण पूति म्हणजे कानांतून पू वाहातो, कर्ण लुता म्हण जे कानांतून किरूळ वगैरे, वो कर्णरुजा म्हणजे कानांत ठणका असे-अनेक कर्ण रोगांचे भेद आहेत.

तीव्रशूलातुरेकर्णेसशब्देक्लेदवाहिनी ॥ बस्तमूत्रंक्षिपेत्कोष्णंसैंधवेनसमन्वितम् ॥

टी० ॥ ॥ तीव्र शूलाने व्याप्त शब्द फार पू वाहाणारा अशा कर्णाचे गर्यी सैंधव युक्त बोकडाचें मूत किंचित् उष्ण करून घालावें.

जंबाम्रपत्रंतरुणंसमांशंकपित्थकार्पासफलंचसार्द्रम् ॥ कृत्वारसंतन्मधुनाविमिश्रंस्त्रावापहंसंप्रवदंति तज्ज्ञाः ॥

टी० ॥ ॥ जांभळीची आणि आंब्याची कोंवळीं पानें, ओलें कापशीचें फळ आणि कवठ हीं समभाग घेऊन रस काढून मधयुक्त कानांत घालावा, म्हणजे स्त्राव बंद होईल.

कुष्ठहिंगुवचादारुशताव्हाविश्वसैंधवैः ॥ पूतिकर्णापहंतैलंबस्तमूत्रेणसाधितम् ॥

टी० ॥ ॥ कोष्ठकोळिंजन, हिंग, वेखंड, देवदार, शतावरी, सुंठ, सैंधव याणी सिद्ध केलेलें तेल बोकडाचे मूत्रांत मिश्र करून कानांत घालावें, पूति कर्ण नाशक आहे.

गवांमूत्रेणबिल्वानिपिष्ट्वातैलंविपाचयेत् ॥ सक्षारं तच्चवितरेद्बाधिर्येकर्णपूरणम् ॥

टी० ॥ ॥ गाईचे मुतांत बेलफळें वाटून त्याचे बरोबर तेल कढवून क्षार युक्त कानांत घालावें म्हणजे बाधिर्य जाईल.

कपित्थमातुलिंगाम्लशृंगबेररसैःशुभैः ॥ सुखोष्णैःपूरयेत्कर्णंकर्णशूलोपशांतये ॥

टी० ॥ ॥ महाळुंग, आंबा, आलें यांचा रस किंचित् उष्ण करून कानांत घालावा कर्ण शूल शांत होईल.

कर्णशूलहरंक्षिप्त्वालवणार्द्रकयोरसं ॥ दंतेनंचर्वयेन्मूलंनद्यावर्तपलाशयोः ॥ तद्वालपूरितेकर्णेध्रुवंगोमा

क्षिकांजयेत् ॥

टी० ॥ ॥ कर्णशूल हारक सैंधव युक्त आल्याचा रस कानांत घालावा, आणि नंद्यावर्त पळस याचें मूळ दांतानें चावावें, आणि ती थुंकी कानांत घालावी ह्मणजे गोमाशीचा नाश करील.

हिंग्वब्ददारुमिसिमूलकभस्मशृंगकुक्षारसिंधरुच कोल्लिदशिग्रुविश्वैः ॥ स्रुकुसर्जिकाबिडवचांजनमातुलिंगरंभाभसासमधुसूक्तमिदं विपक्वं ॥ तैलंप्रसिद्धमितितच्छ्रवणामयघ्नंकर्णव्रणादिबधिरत्वहरंनराणां ॥ भ्रूमस्तकश्रवणशष्कुलिकांतरेषुशूलापहंच रकशास्त्रचिकित्सितोक्तम् ॥

टी० ॥ ॥ हिंग, नागरमोथे, देवदार, बडिशेप, मुळा, कपिलवर्ण, शिसव, माका, धामणवृक्ष, मुंडलोह, सैंधव, पादेलोण, सोरा, शेगवा, स्कंद, विवडंग, सज्जिखार, बिडलोण, वेखंड, सुरमा, महाळुंग, केळीचें पाणी मध, कांजी यांचा बरोबर कढवून सिद्ध केलेलें तेल कर्ण रोगाचें नाशक आणि भिवया, मस्तक कान या ठिकाणचें शूलाचें नाशक असें चरकोक्त चिकित्सेंत सांगीतलें आहे.

लशुनसैंधवमागधिमुस्तहिंगुवचालशुनंतिलतैलं ॥ अर्कसुपक्वपलाशरसेनकर्णरुजबधिरंविनिहंति

टी० ॥ ॥ लसूण, सैंधव, पिंपळी, नागरमोथे, हिंग, वेखंड, लसूण, तिळाचें तेल हीं रुईचे पिकलेल्या पानाचा रस काढून त्याचे बरोबर कानांत घातली असतां कर्ण रोग, बहिरेपणा यांचा नाश करितील. इतिकर्णरोगचिकि.

## अथनासारोगचिकित्सा.

अपीनसंपूतिनासानासापाकस्तथैवच ॥ तथाशोणितपित्तंचपूयशोणितमेवच ॥ क्षवथुभ्रंशमुद्दीप्तोनासानाहःपरिस्रवः ॥ नासाशोषेणसहितादशैकादशेरितागदाः

टी० ॥ ॥ अपीनस १ पूतिनासा २ नासापाक ३ शोणितपित्त ४ पूयशोणित ५ क्षवथु ६ भ्रंश ७ उद्दीप्त ८ नासानाह ९ परिस्रव १० नासाशोष ११ या प्रमाणें अकरा प्रकारचे नासारोग जाणावे.

रक्तकरवीरपुष्पंजात्यंवातथामल्लिकायाः ॥ एतैःसमं

तिलतैलंनासार्शोनाशनंपरम् ॥

टी० ॥ ॥ तांबडे कण्हेर, जाई, मोगरी, यांचे फुलांचा रस आणि त्यांचे बरोबर तिळांचे तेल एकत्र मिश्र करून नाकांत घालावें, नासार्शाचें नाशक आहे.

गृहधूमकणादारुक्षाररक्तैःससैंधवैः ॥ सिद्धंशिखरिबीजैश्चतैलंनासार्शसांहितं ॥

टी० ॥ ॥ घेरोसा, पिंपळी, देवदार, जवखार, लाख, सैंधव, आघाड्याचें बीं, यांणी सिद्ध केलेलें तेल, नार्शावर प्रशस्त आहे.

कलिंगहिंगुमरिचंलाक्षासुरसकट्फलैः ॥ कुष्ठोग्रशिग्रुजंतुघ्नैरेवपिंडःप्रशस्यते ॥ तैरेवमूत्रसंयुक्तैः कटुतैलंविपाचयेत् ॥ अपीनसेपूतिनासेशमनंकीर्तितंपरम् ॥

टी० ॥ ॥ इंद्रजव, हिंग, मिरें, लाख, निर्गुडी, कायफळ, कोष्ठकोलिंजन, शेण्यारेवर, शेगवा, वावडिंग, हीं वाटून गोळी करून खावी आणि हींच गोमूत्रांत घालून त्याचे बरोबर शिरसोंचें तेल कढवून टेऊन नाकांत घालावें, अपीनस पूति नासा यांचें शामक आहे.

शुंठीकुष्ठकणाबिल्वद्राक्षाकल्ककषायवत् ॥ साधितंतैलमाज्यंवानस्यात्क्षवथुरुक्प्रणुत् ॥

टी० ॥ ॥ सुंठ, कोष्ठकोलिंजन, पिंपळी, बेलफळ, द्राक्ष यांचे कल्कानें सिद्ध केलेलें तेल किंवा तूप, नस्य योगानें क्षवथु रोगाचें नाशक आहे.

पूयःस्रवतिदुर्गंधोनासायाअतितापकृत् ॥ कृतेनस्येचतंहन्याच्छ्वेतजीरसितायुतम् ॥

टी० ॥ ॥ नाका पासून दुर्गंधि युक्त अति दाह करणारा पू गळत असतो, त्याचा पांढरें जिरें आणि साखर यांचें नस्य केलें असतां नाश होतो.

घृताक्तकुंकुमंनस्येसृष्टंपीनसजिद्भवेत् ॥

टी० ॥ ॥ केशर तुपांत खलून नस्य केलें असतां पीनस जिंकणारें आहे. इति नासारोग चिकित्सा.

अथनेत्ररोगचिकित्सा.

ऊर्ध्वगमाभिरुपगम्यशिरःशिराभिर्दोषाःस्वहेतुकुपिताःकफपित्तवाताः ॥ कंठोष्टतालुरसनारदमूलकर्णनासास्यलोचनशिरःस्करुजःसृजंति ॥

टी० ॥ ॥ आपापल्या कारणानी कुपित झालेले वात, पित्त, कफ, ऊर्ध्ववाहि, शिराचा योगानें मस्तकाप्रत प्राप्त होऊन कंठ, ओष्ठ, तालु, जिव्हा, दंतमूल, कर्ण नासिका, मुख, डोळे, डोकें यांचे ठायीं रोग उत्पन्न करतात.

षट्सप्ततिर्लोचनजाविकारास्तेषामभिष्यंदसमुद्भवानाम् ॥ श्लेष्माश्रयत्वादतिलंघनंप्राक्प्रशस्यतेमुद्गरसौदनंच ॥

टी० ॥ ॥ नेत्ररोग शाहत्तर, त्यां मध्यें अभिष्यंदा, पासून उत्पन्न होणारे कफाश्रित असतात ह्मणून त्यांवर पूर्वी पुष्कळ लंघनें करावीं, नंतर मुगांचा मंड, आणि भात खावा.

आश्च्योतनेचत्रिफलासलोध्रासगैरिकादारुनिशाप्रशस्ताआलेपनेगैरिकचंदनंचसताक्ष्यशैलंमुनिभिःप्रदिष्टम्

टी० ॥ ॥ आश्च्योतन ह्मणजे पाणी शिंपडुन डोळे धुणें, याविषयीं काढा करण्यास त्रिफळा, लोध्र, गुरटी, दारुहळद, हीं प्रशस्त आहेत; लेपा विषयीं गुरटी, चंदन, रसांजन हें मुनीनीं सांगितलें आहे.

दध्नासंसैंधवंलोध्रंमधूच्छिष्टफतंघृतम् ॥ पिष्टमंजनलेपाभ्यांसद्योनेत्ररुजापहम् ॥

टी० ॥ ॥ सैंधव, लोध्र, मेण, तूप हीं दह्यांत खलून लेप आणि अंजन केलें असतां नेत्र रोगाचा नाश होतो.

बृहत्येरंडमूलत्वक्शिग्रुमूलंससैंधवम् ॥ अजाक्षीरेणसंपिष्टावर्तिर्वाताक्षिरोगजित् ॥

टी० ॥ ॥ रिंगणी, एरंडमुळाची साल, शेगव्याचें मूळ, सैंधव, हीं शेळीचे दुधांत खलून त्याची वात करून डोळ्यांत फिरवावी ह्मणजे वायु, अक्षिरोग यांतें जिंकील.

अर्जुनेशर्करामस्तुक्षौद्रैश्चाश्च्योतनंहितम् ॥ शंखक्षौद्रेणसंयुक्तंकतकंसैंधवेनवा ॥ सितयार्णवफेनंवापृथगंजनमर्जुने ॥

टी० ॥ ॥ अर्जुन रोगावर दह्यांचा मंड, साखर, मध यांचे आश्च्योतन हितकारक आहे; अथवा शंख, मध किंवा निवळीचें बीं, सैंधव, समुद्रफेण हीं तीन पृथक् अंजनें आहेत.

चंदनंगैरिकंलाक्षामालतीकलिकाःसमाः॥ व्रणशुक्र हरीवर्तीशोणितस्यप्रसादनी॥

टी० ॥ ॥ चंदन, तुरटी, लाख, जाईच्या कळ्या, हीं समान घेऊन यांची वात करून नेत्रांत फिरवावी, व्रण शुक्र यांची हरण करणारी, रक्त शोधक अशी आहे. ॥ कतकस्यफलंशंखंसैंधवंत्र्यूषणंसिता॥ फेनंरसांज नंक्षौद्रंविडंगानिमनःशिला॥ कुक्कुटांडत्वक्फलानिवर्ति रेषांस्कखावहा॥ तिमिरःपटलंकाचंमलंचाशुक्रव्यपोहति

टी० ॥ ॥ निवळीचें बी, शंख, सैंधव, सूंठ, मिरें, पिंपळी, साखर, समुद्रफेण, रसांजन, मध, वावडिंग, मनशीळ, कोंबड्याचे अंड्याची त्वचा, जायफळ, यांची वात सुखावह आहे: आणि तिमिर, पटल काच, बिंदुसारा यांतें दूर करते. व्योषोत्पलाभयाकुष्ठतार्क्ष्यैर्वर्तिःकृताहरेत् अर्बुदंपटलंकाचंतिमिरार्मादिकान्गदान्॥

टी० ॥ ॥ सूंठ, मिरें, पिंपळी, कमळ, हिरडा, कोष्ठकोलिंजन, रसांजन यांची वात, अर्बुद, पटल, काच, बिंदु, तिमिर, अर्म इत्यादीक रोगांचें हरण करील.

हंत्यर्जुनंशर्करयाब्धिफेनोरात्र्यंधतांगोशकृतान्वकृष्णा दध्नाविघृष्टंमरिचंचरात्र्यंधनाशयेदंजनमुत्तमंच॥

टी० ॥ ॥ साखर, समुद्रफेण, अर्जुन नाशक; आणि गाईचें शेण, पिंपळी, रात्र्यंधपणा नाशक; तसेंच दहीं, मिरें यांचे अंजन उत्तम आहे.

अजापित्तगतंव्योषंधूमस्थानेनियोजयेत्॥ चिरबि ल्वरसेघृष्टंरात्र्यंधहरमंजनम्॥

टी० ॥ ॥ शेळीचे पित्तांत सूंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण घालून धुराचे ठिकाणीं ठेऊन कांहीं दिवस गेल्यावर करंजाचे रसांत उगाळून अंजन करावें. रात्र्यंध पणाचें नाशक आहे.

स्वर्णवराटिकासूतंसारपूतिजपत्रकम्॥ नवनीते नसंपक्तंहंतिपुष्पंचिरंतनम्॥

टी० ॥ ॥ सोनकवडी, पारा, कात, मध, तालीसपत्र हीं लोण्यांत खलून अंजन करावें फार दिवसांचे फुलांचें नाशक आहे.

रसकेशाश्मसिंधूत्थंव्योषंतुल्यंसटंकणम्॥ क्षौद्रेघृ ष्टावर्तीपुष्पंसर्वनेत्रामयाजयेत्॥

टी० ॥ ॥ कलुरवापरी, कैंशा, सुवर्ण माक्षिक, सैंधव, सुंठ, मिरे, पिंपळी मोर चूत, टांकण रवार यांची मधांत रवळून गोळी करावी, ती अंजनाचे योगा नें सर्व नेत्र रोग जिंकील. इति नेत्ररोग चिकित्सा.

## अथशिरोरोगलक्षणोपचारः

भ्रमोदाहोजडत्वंचवातेपित्तेकफेक्रमात् ॥ शिरोरो गस्यविज्ञेयंलक्षणंचपृथक्पृथक् ॥

टी० ॥ ॥ वातपित्त, कफ हे दोष असतां शिरोरोगाचें क्रमें करून भ्रम दाह जडपणा हें निरनिराळें लक्षण जाणावें.

शिरोरोगास्तुजायंतेवातपित्तकफैस्त्रिभिः ॥ सन्निपा तेनरक्तेनक्षयेणक्रिमिभिस्तथा ॥

टी० ॥ ॥ वात, पित्त, कफ आणि सन्निपात, रक्त, क्षय, कृमि इतक्यानीं शिरे रोग होतात.

पथ्याक्षधात्रीभूनिंबैर्निशानिंबामृतायुतैः ॥ कृतःक्काथः षडंगोयंसगुडःशीर्षशूलहा ॥ भ्रूशंखकर्णशूलानिल र्धार्द्धशिरसोरुजां ॥ सूर्यावर्तंशंखकंचदंतपातंचतद्रु जः ॥ नक्तांध्यंपटलंशुक्रंचक्षुःपीडाव्यपोहति ॥

टी० ॥ ॥ हिरडा, बेहडा, आंवळकाठी, किराईत, हळद, कडूलिंब, गुळवेल यांचा काढा करून त्यांत ६वा भाग गूळ घालून प्यावा ह्मणजे भ्रुकुटी, आंख, कान या ठिकाणचा शूळ अर्द्ध मस्तक दुखणें सूर्यावर्त शंखक दंतपात, दंतशूल, रातांधळें, पटल, शुक्र, डोळे दुखणें यांचा नाश करील

करंजशिग्रुबीजानिपत्रकंसर्षपत्वचः ॥ सर्वेषांशीर्ष रोगाणामेतच्छीर्षविरेचनम् ॥

टी० ॥ ॥ करंज, शेगवा, यांचें बीं, तमालपत्र, शिरस, दालचिनी यांचें शि रोविरेचन सर्व शिरो रोगांवर प्रशस्त आहे.

नावनंसगुडंविश्वंपिप्पलीसैंधवांबुना ॥ भुजस्तंभा दिरोगेषुसर्वमूर्द्धगदेषुच ॥

टी० ॥ ॥ गूळ, आल्याचा रस, पिंपळी, सैंधव पाण्यांत उगाळून, हीं दोन नस्यें, भुजस्तंभादीक रोग सर्व शिरो रोग यांवर प्रशस्त आहे.

सशार्करंकुंकुममाज्यभ्रष्टंनस्यंविधेयंपवनासृगुत्थे

॥ कृशंखकर्णाक्षिशिरोर्धशूलेदिनाभिवृद्धिप्रभवेच्चरोगे

टी० ॥ ॥ साखर आणि केशर तुपांत तळून त्याचें नस्य करावें तेणें करून धाक रक्त या पासून भिवया, आंख, कर्ण, डोळे या ठिकाणचा शूल; अर्ध मस्तकाचा शूल; दिवस वाढेल त्या प्रमाणें वाढणारा शूळ शांत होतो.

कुष्ठमेरंडजंमूलंलेपःकांजिकपेषितः ॥ शिरोर्तिनाशय त्याशठपुष्पंवामुचुकुंदजम् ॥

टी० ॥ ॥ कोष्ठ कोलिंजन, एरंडमूळ त्यांचा कांजींत वाटून लेप करावा, अथवा मुचुकुंदाचें फूल वाटून लेप करावा मस्तक शूलाचा लवकर नाश करील.

देवदारुनतंविश्वंनलदंविश्वभेषजम् ॥ लेपःकांजिकसंपिष्टस्तेलयुक्तःशिरोर्तिनुत् ॥

टी० ॥ ॥ देवदार, तगर, कोष्ठ कोलिंजन, वाळा, सुंठ हीं कांजीत वाटून त्यांत तेल घालून लेप करावा; ह्मणजे मस्तक शूलाचा नाश करील.

गिरिकर्णिकाफलंमूलंसजलंनस्यमाचरेत् ॥ मूलं वानिधयेकर्णेनिहंत्यर्धशिरोरुजम् ॥

टी० ॥ ॥ श्वेत गोकर्णीचें फळ, किंवा मूळ पाण्यांत उगाळून नस्य करावें; अथवा मूळ कानावर बांधावें, मस्त शूलाचा नाश करील.

मरीचंभृंगजेर्द्रावेर्मरीचंशालितंदुलेः ॥ अर्धशीर्षव्यथांहंतिलेपोवाशठिवारिणा ॥

टी० ॥ ॥ माक्याचे रसांत, किंवा साळीचे तांदळां बरोबर, मिरें वाटून लेप करावा, अथवा पाण्यांत सुंठ उगाळून लेप करावा; ह्मणजे अर्ध मस्तकाचा शूल शांत होईल.

अत्ररसायनभेरवोनस्येलेपेयोजयेत्

टी० ॥ ॥ मस्तक शूलावर "रसायन भेरव नस्य लेप" यांविषयीं योजावा.

अथस्त्रीरोगलक्षणोपचारः

असृग्दरंयोनिदोषःस्कंदोथमूढगर्भजः ॥ सूतिकास्तनरोगश्चस्तन्यरोगाश्चसप्तधा ॥

टी० ॥ ॥ असृग्दर, योनिदोष, स्कंद, मूढगर्भज, सूतिकारोग, स्तनरोग, न्यस्तरोग असा सात प्रकारचा स्त्रीरोग आहे.

योनेःस्रवतिरक्तंचशोणंपीतासितंसितम् ॥ अस्र

ग्दरंभवेत्सर्वसांगमर्दसवेदनम् ॥

टी० ॥ ॥ योनी पासून तांबडें, पिवळें, काळसर पांढरें असें जें रक्त पाझरतें, त्याला असृग्दर म्हणतात आणि तें आंग मोडून येणें तिडीक ह्या उपद्रवा नी युक्त असतें.

अंगमर्दोज्वरः कंपः पिपासागुरुगात्रता ॥ शोफशूला तिसारौच सूतिकारोगलक्षणम् ॥

टी० ॥ ॥ आंग मोडून येणें, ज्वर, कंप, ताहान, आंग जड, सूज, शूल, अति सार हें सूतिका रोगांचें लक्षण जाणावें.

अन्येषांपंचदोषाणांलक्षणंनाच्यभाषितम्

टी० ॥ ॥ आणखी दुसरे पांच रोग आहेत, त्यांचें लक्षण त्यांत सांगितलें ना.

देवदारुवचाकुष्टंपिप्पलीविश्वभेषजम् ॥ कट्फलंमु स्तभूनिंबतिक्ताधान्यंहरीतकी ॥ गजकृष्णाचदुस्पर्शा गोक्षुरंधन्वयासकम् ॥ बृहत्यातिविषाछिन्नाककर्कटक ष्याजीरकम् ॥ समभागान्वितैरेतैः सिंधुरामठसंयु तैः ॥ क्काथमष्टावशेषंतुप्रसूतांपाययेत्स्त्रियम् ॥ शूल कासज्वरश्वासमूर्छाकंपशिरोर्तिभिः ॥ युक्तंप्रलापतृ ड्दाहतंद्रातीसारवांतिभिः ॥ निहंतिसूतिकारोगंवा तपित्तकफान्वितम् ॥

टी० ॥ ॥ देवदार, वेखंड, कोष्ठकोलिंजन, पिंपळी, सुंठ, कायफळ, नागरमोथे, किराईत, कुटकी, धणे, हिरडा, गजपिंपळी, रिंगणी, गोरखरु, धमासा, डोर ली, अतिवीष, गुळवेल, बेल, काळेंजिरें, यांचा काढा करून त्यांत सैंधव, हिंग टाकून बाळंतिणीला पाजावा म्हणजे शूल, कास, ज्वर, श्वास, मूर्छा, कंप, मस्तक पीडा, बडबड, तृषा, दाह, तंद्रा, अतीसार, ओकारी इतक्या उपद्रवांनीं युक्त, त्रिदोषात्मक अशी सूतिका रोगांचा नाश करील. दं. दा.

दार्वीरसांजनवृषाब्दकिराततिबिल्वभल्लातकैरवकृ तोमधुनाकषायः ॥ पीतोजयत्यतिबलंप्रदरंसशूलं पीतासितारुणविलोहितनीलयुक्तम् ॥

टी० ॥ ॥ दारुहळद, रसांजन, अडुळसा, किराईत, बेल, बिब्बे यांचा काढा मध घालून प्यावा, अतिप्रबळ शूलयुक्त- पिवळें, पांढरें, पिंगट, तांबडें,

काळें कसेंहि प्रदर असलें तरी बरें होतें.

मधुनातार्क्ष्यसंयुक्तंमूलंस्यात्तंदुलीयकम् ॥ तंदु
लांबुकृतपानात्सर्वप्रदरनाशनम्

टी० ॥ ॥ तांदुळज्याचें मूळ, तांदुळांचे धुणांत उगाळून त्यांत मध रसांजन घालून प्यावें. सर्व प्रदरांचें नाशक आहे.

आखोः पुरीषंधातक्याः पुष्पंबोलंतथैवच ॥ समभा
गानिसंचूर्ण्यटंकमेकंचभक्षयेत् ॥ दिनसप्तप्रयो
गेणसर्वप्रदरनाशनम् ॥

टी० ॥ ॥ उंदराचें पुरीष, धायटीचीं फुलें, रक्ताबोळ हीं समभाग घेऊन चूर्ण करून एक तोळा खावें; साता दिवसांत सर्व प्रदरांचा नाश होईल.

कुशमूलंसमुद्धृत्यपेषयेत्तंदुलांबुना ॥ एतत्पीत्वात्र्य
हान्नारीप्रदरात्परिमुच्यते ॥

टी० ॥ ॥ दर्भाचें मूळ, तांदुळांचे धुणांत वाटून तीन दिवस प्यावें प्रदरापासून स्त्री मुक्त होईल.

रास्नाश्वदंष्ट्रामृतकैः शृतंशूलंहरंपयः

टी० ॥ ॥ रास्ना, लघुसरांटे, अडूळसा यांचा काढा शूल नाशक आहे.

गुडूचीत्रिफलादंतिकाथेनपरिपेषितैः ॥ पिप्पलीमरि
चैः दोषैः शताव्हाकुष्ठसैंधवैः ॥ वर्तिस्तुल्याप्रदेशि-
न्याधार्यायोनिविशोधिनी ॥

टी० ॥ ॥ गुळवेल, त्रिफळा, दांतिमूळ यांचे काढ्यांत पिंपळी, मिरें, उडीद, शतावरी, कोष्ठकोळिंजन, सैंधव हीं वाटून, त्याची वात आंगठ्या जवळचे बोटा प्रमाणें करून योनींत धरावी, योनीतलें दर्द काढून योनी स्वच्छ करील.

पिष्टजंबूकसंपिष्टंपक्वंतित्तिडिसंयुतम्
लेपमात्रेणनारीणांयोनिकंदहरंपरम् ॥

टी० ॥ ॥ नादुरकी, पीतलोध्र हीं कुटून चिंचे बरोबर पक्व करून लेप करावा, ह्मणजे योनी कंदाचा नाश करील.

कुशकाशोरुबूकाणांमूलंगोक्षुरकस्यच ॥ शृतंक्षीरं
सितायुक्तंगर्भिण्याशूलनुत्परम् ॥

टी० ॥ ॥ कुश, काश, एरंड, गोरवरू, यांच्या मुळांचा काढा दुधांत करून सा

रवर घालून प्यावा; गर्भिणीचा शूल दूर करील.

मातुलुंगस्यमूलानिमधुकंमधुसंयुतम्॥ घृतेनस
हभोक्तव्यंसुखंनारीप्रसूयते॥

टी० ॥ ॥ माहाळुंगीची मुळें, जेष्टीमध हीं तुपा बरोबर खावीं; नारी सुखें करून प्रसूत होईल.

पिप्पलीपिप्पलीमूलंचव्यंशुंठीयवानिका॥ जीरके
द्वेहरिद्रेचबिडसौवर्चलंतथा॥ एतैरेवौषधैःपिष्टै
रारनालंविपाचयेत्॥ आमवातहरंवृष्यंकफघ्नंव
न्हिदीपनम्॥ वज्रकंकांजिकंनामस्त्रीणामग्निविव
र्धनम्॥ सूतिकारोगशमनंशूलघ्नंक्षीरवर्धनम्॥

टी० ॥ ॥ पिंपळी, पिंपळमूळ, चवक, सुंठ, ओंवा, जिरें, शाहजिरें, हळद, दारुहळद, बिडलोण, पादेलोण हीं औषधें कुटून त्यांचे बरोबर कांजी शिजवावी, ती कांजी, आमवात नाशक, वृष्यकफघ्न अग्निदीपक अशी आहे. त्याला वज्र कांजीक असें ह्मणतात. स्त्रियांचा अग्नि वाढिवणारी, बाळंतरोग, शमिवणारी; शूल नाशक, दूध वाढिवणारी अशी आहे.

वातव्याधिविधानेनसूतिकांसमुपाचरेत्॥ जलौका
भिर्हरेद्रक्तंबस्तिनाचोपनाहयेत्॥

टी० ॥ ॥ वातव्याधिवर जसा उपचार करतात त्या रितीनें सूतिका रोगावर उपचार करावा. जळवा लाऊन रक्त काढावें, बस्ति कर्म करावें, आणि पेंड बांधावे.

लेपोविशालमूलेनहंतिपीडांस्तनोत्थिताम्
वनकार्पासिकेक्ष्वाकुमूलंसौवीरकेनवा॥

टी० ॥ ॥ कंवडळचें मूळ उगाळून लेप करावा, अथवा वनकापशी आणि कुध्या भोंपळा हीं गव्हांचे कांजीत वाटून लेप करावा, स्तन संबंधि पीडा दूर करील. ॥ विदारिकंदंसुरयापिबेत्स्तन्यविवर्धनम्

पाठामूर्वाब्दभूनिंबदारुशुंठीकलिंगकैः
सारिवामृतनिक्तारव्यैःक्वाथःस्तन्यविवर्धनः

टी० ॥ ॥ भुयकोहळा मद्यांत वाटून प्यावा, अथवा पाहाडमूळ, मोरवेल, नागरमोथें, किराईतें, देवदार, सुंठ, इंद्रजव, उपळसरी, गुळवेल, कुटकी यांचा काढा प्यावा, स्तनांतलें दूध वाढिवणारा आहे. इति स्त्री रोग चिकित्सा.

# अथबालरोगचिकित्सा.

ज्वरातिसारादयएवरोगाबालस्य.देहेप्रवदंतिसर्वे॥
स्तनादिदंतादिचभूतबाधातेषांतुपूर्वोक्तमिदंसमाचरेत्.

टी० ॥ ॥ ज्वर, अतिसारादीक जे रोग आहेत तेच बाळाचे शरीरांत आहे त, आणि स्तनादीक, भूतबाधा असे ही आहेत त्याना पूर्वोक्त उपचार करावे.

भैषज्यंसर्वमुद्दिष्टंमहतांयज्ज्वरादिषु
कार्यंगदेषुबालानामत्रमात्रालघीयसी

टी० ॥ ॥ मोठ्या मनुष्यास जे ज्वरादिकांचे ठाई औषध सांगितलें तें बाळाना त्या त्या रोगावर द्यावें; परंतु बाळांचे ठाई औषधांचें प्रमाण फार थोडें योजावें.

शृंगीकणारुणाब्दानांचूर्णंलीढंसमाक्षिकम्॥का
सश्वासातिसारांश्चवमींश्चनाशयेच्छिशोः॥

टी० ॥ ॥ कांकडशिंगी, पिंपळी, चित्रक, नागरमोथे यांचें चूर्ण मधा बरोबर चारलें असतां, बाळांचे कास, श्वास, अतिसार, ओकारी यांचा नाश करील.

गृहधूमनिशाकुष्ठराजिकेंद्रयवैःशिशोः
लेपस्तक्रेणहत्याशुसिध्मपामाविचर्चिकाः

टी० ॥ ॥ घेरोसा, हळद, कोष्ठकोलिंजन, मोहोऱ्या, इंद्रजव ही ताकांत वाटून लेप करावा ह्मणजे बाळांचे आंगावरचें शिबें, खरूज, विचर्चिका यांचा नाश करतो.

वचाकुष्ठविडंगस्यकोष्णक्वाथावगाहनात्॥दद्रुवि
चर्चिकाकंडुकृमिभिर्मुच्यतेशिशुः॥

टी० ॥ ॥ वेखंड, कोष्ठकोलिंजन, वावडिंग यांचा काढा करून त्या मंदोष्ण काढ्यानें स्नान घालावें, ह्मणजे दद्रू विचर्चिका, कंडू, कृमी या रोगां पासून बालक मुक्त होईल.

मुखपाकेतुबालानांताम्रसारमयोरजः॥गैरिकंसौ
द्रसंयुक्तंभैषज्यंसरसांजनम्

टी० ॥ ॥ बालाचे मुख पाकावर रक्त चंदन, लोह भस्म, काव मध एकत्र खलून तोंडाला चोळावें.

गुदपाकेतुबालानांपित्तघ्नींकारयेत्क्रियाम्॥रसांजन

विशेषेणपानालेपनयोर्हितम् ॥

टी० ॥ ॥ बाळांचे गुदपाकावर पित्तशामक क्रिया करावी, आणि रसांजन विशेषें करून खाणें, लेप या विषयीं हितकारक आहे.

कणोषणसिताक्षौद्रसूक्ष्मैलासैंधवैः कृतः ॥ मूत्रगृहे प्रयोक्तव्यः शिशूनांलेहउत्तमः

टी० ॥ ॥ पिंपळी, मिरें, साखर, मध, कडुजिरें, सैंधव यांचा लेह, बाळांचे मूत्रकृच्छ्रावर उत्तम आहे.

अश्वत्थत्वकूवल्काक्षौद्रैर्मुखपाकेप्रलेपनम्

टी० ॥ ॥ पिंपळाची साल, चिकणा, मध यांचा लेप मुख पाकावर करावा.

सर्वत्वकूलशुनंमूर्वासर्षपारिष्टपल्लवाः ॥ बिडालबिडजालोममेषशृंगोवचामधु ॥ धूपःशिशोज्वरघ्नोयमशेषग्रहनाशनः

टी० ॥ ॥ सर्पाची कांत, लसून, मोरवेल, शिरस, कडुलिंबाची पानें, माजराची विष्ठा, शेळीचे केंश, मेडशिंगी, वेखंड, मध यांचा धूप बाळाचा ज्वर, अशेष ग्रहपीडा यांचा नाशक आहे.

तद्वन्निर्माल्यसिद्धार्थसर्पत्वकूकेशासंयुतं ॥ सप्तपर्णत्वचंपिष्ट्वामूर्वातिक्तासमन्विताम् ॥ शिशोरुद्वर्तनंकुर्यात्सर्वग्रहनिवारणम्

टी० ॥ ॥ निर्माल्य, श्वेतशिरस, सर्पाची कांत, केंश, सातविणीची साल, मोरवेल, कुटकी हीं सर्व वाटून मूलांचे अंगाला लावावें, सर्व ग्रहांचें निवारण होतें. इति बालरोग चिकित्सा.

अथविषोपचारः

स्थावरंजंगमंचैवद्विविधंविषमुच्यते ॥ मूलाद्यंस्थावरंस्यात्सर्पादीनांतुजंगमम् ॥ स्थावराणांचसर्वेषांवमनंकारयेद्भिषक् ॥

टी० ॥ ॥ स्थावर, आणि जंगम, या भेदें करून दोन प्रकारचें वीष आहे; वचनाग इत्यादीक जीं मुळें वगेरे तें स्थावर वीष; आणि सर्पादिकांचें जें तें जंगम वीष जाणावें, सर्व स्थावर विषांवर वमन द्यावें.

रंजनीसैंधवयुतंसक्षौद्रंघृतमुत्तमम् ॥ पानंमूलवि

पार्तस्यविषविन्दूस्यचक्षते

टी० ॥ ॥ नीळी, सैंधव, मध, तूप हीं एकत्र करून मूळाचे विषाने पीडीत, आणि व्यापलेला असेल त्याणें प्यावीं.

सैंधवंमरिचंतुल्यंनिंबबिजंसमीकृतम् ॥ मधुसर्पिर्युतंहंतिविषंस्थावरजंगमम्

टी० ॥ ॥ सैंधव, मिरें, समभाग; या दोघांचे बरोबर लिंबोळ्या घेऊन वाटून मध तुप बरोबर खाव्या ह्मणजे स्थावर जंगम विषाचा नाश करिते.

तिक्तकोशातकीक्काथंमध्वाज्यसंयुतंपिबेत् ॥ कटुकातिंबुमूलंवातस्यंवापिबेज्जलैः ॥ तत्क्षणाद्वमनाद्धंतिविषंयोगाद्विमुच्यते ॥

टी० ॥ ॥ कडु घोंसाळीचा काढा मध तूप घालून प्यावा; अथवा कडु भोंपळ्याचें मूळ, किंवा पानें पाण्यांत वाटून प्यावीं, ह्मणजे विषाचा नाश होऊन विष योगा पासून मुक्त होतो.

रंजनीचूर्णधूपेनविषंवृश्चिकजंहरेत् ॥ वस्त्रेणसाध्यमासाध्यधूपंधूपंचपाययेत् ॥ दंशेचधूपयेच्चूर्णं सर्वधूपेष्वयंविधिः

टी० ॥ ॥ नीळीचे चूर्णाचा धूप विंचवाचें वीष हरण करितो. धूप घेण्यास अशक्य असला तर, वस्त्रानें शक्य करून प्यावा, ह्मणजे कडू, तिखट असा धूप, ह्मणजे धूर असतो तो पिवत नाहीं; म्हणून वस्त्र आड धरून युक्तीनें प्यावा. आणि दंश झालेल्या ठिकाणीं धूप द्यावा – सर्व धूपां विषयीं हा विधी करावा.

तोयेर्वानागरंनस्यंपिबेद्वासैंधवंघृतम् ॥ अर्कधत्तूरमूलंवाजलपानैर्विषापहम्

टी० ॥ ॥ सुंठ पाण्यांत उगाळून नस्य करावें; अथवा तुपांत सैंधव घालून प्यावें, अथवा रुईचें मूळ किंवा, धोत्र्याचें मूळ पाण्यांत उगाळून प्यावें; विष नाशक आहे.

हिंगुर्वाजललेपेनविषहाद्वृश्चिकस्यतु ॥ धत्तूरार्कजटालेपोनिहंतिवाश्चिकंविषम्

टी० ॥ ॥ हिंग पाण्यांत उगाळून लेप करावा, अथवा धोत्र्याचें मूळ किंवा

रुईचें मूळ उगाळून लेप करावा ह्मणजे विंचवाचें वीष उतरेल.

वंध्याकर्कोटकीकंदंजलैःपिष्ट्वापिबेल्लिपेत्॥ सर्पमूषकमार्जारवृश्चिकादिविषापहम्॥

टी० ॥ ॥ वांझ कर्टोलीचा कांदा पाण्यांत उगाळून प्यावा, आणि लेप करावा, सर्प, उंदीर, मांजर, विंचु इत्यादीक विषांचा नाशक आहे.

श्वानदंष्ट्राविषंहंतिलेपात्कुक्कुटविष्टया॥

टी० ॥ ॥ कुत्र्याचे दाढेचें वीष, कोंबड्याचे विष्ठेचा लेप केला असतां उतरतें.

तैलंतिलानांपललंगुडंचक्षीरंतथार्कस्यसमंहिपीतं आलर्कमुग्रंविषमाशुहंतिसद्योऽद्रवंवायुरिवाभ्रवृंदम्

टी० ॥ ॥ तिळांचें तेल, तिळकूट, गूळ, रुईचा चीक; हीं समभाग घेऊन एकत्र करून प्यालें असतां कुत्र्याचें वीष नूतन उत्पन्न झालेलें लवकर नाश पावतें. जसें वायूनें अभ्र नाश पावतें.

सूतंचूर्णमगारधूममममलंप्रत्येकगद्याणकम्॥ धत्तूरस्यरसेनमर्दितमलंपश्चाच्छुतंभास्करम्॥ जेपालंमरिचंचतुःशतयुतंवातारिबीजंलसद्युक्तंषष्टिभिः खल्वेदंदृढतरंजंबीरनीरैर्वरैः॥ कुर्यान्माषवदाकृतिंचवटिकांछायासुशुष्कीकृतांराज्यंधंग्रहसर्पसंधिसकलंशीतज्वरंदुर्जरं॥ सन्नेत्रांजनमौषधंचभुवनेचाजीर्णदोषापहम् सेव्यंतत्प्रवरंमहागुणफलंश्रीपूज्यपादोदितम्॥

टी० ॥ ॥ पारा ६ मासे, चुना ६ मासे घरोसा ६ मासे या प्रमाणें घेऊन धुत्र्याचे रसांत पुष्कळ खलावें; नंतर शुध्द जेपाळाच्या बिया १०० मिरें ४०० एरंड्या ६० त्यांत घालून ईडलिंबाचे रसांत बळकट खलावें, आणि उडदा प्रमाणें गोळ्या करून सावलींत वाळवून नंतर उगाळून डोळ्यांत घालावें म्हणजे रात्र्यंध, ग्रह, सर्प, संधिवात, सर्व शीतज्वर यांचा नाश करील. हें नेत्रांजनरूप औषध लोकां मध्यें उत्तम आहे. अजीर्ण नाशक सेवन करावें महा गुणानें युक्त आहे, हें वंद्य पुरुषानीं सांगितलें आहे.

श्वेतपुनर्नवामूलंरविवारेसमुद्धरेत्॥ इ० ग० ज०

कार्पासमूलंचर्चित्वाविषंवृश्चिकजंहरेत्

टी० ॥ ॥श्वेत घेटोळीचें आणि कापशीचें मूळ रविवारी आणून ठेवावें, आणि तें उगाळून लावलें असतां विंचवाचें वीष हरण करील.

## अथकृत्रिमविषचिकित्सा

अन्नेनविषजीवानांचूर्णैर्विषकृतेकृतम् ॥ मिश्रितंनखकेशैश्चलोहानांचूर्णसंचयैः ॥ कृत्रिमंतुविषंख्यातंपक्षान्मासाद्विबाध्यते ॥

टी० ॥ ॥विष मापयाचा शरीराचें चूर्णानीं युक्त जो भक्ष्यपदार्थ, अथवा विषयुक्त पदार्थानें युक्त किंवा नख, केश यांणीं मिश्रित किंवा अभ्रक कच्चीं अशीं लोखंडादीक त्यांचे चूर्णानें मिश्रित त्याला कृत्रिम वीष म्हणतात. तें पक्षानें किंवा महिन्यानें बाधा करतें.

आलस्यंकुरुतेजाड्यंकासश्वासबलक्षयं ॥ रक्तस्रावोज्वरःशोफःपीतचक्षुश्चलक्षयेत् ॥

टी० ॥ ॥आळस, जडपणा, कास, श्वास, बल, हानी, रक्तस्राव, ज्वर, शोफ, पिवळे डोळे, हीं लक्षणें जाणावीं.

तुल्येनटंकणेनैवम्रियतेभक्षणाद्विषं ॥ अतिमात्रंयदाभक्तंतदाज्यंटंकणंपिबेत् ॥

टी० ॥ ॥जितकें वीष पोटांत गेलें असेल तितका टांकणखार खावा, म्हणजे वीष उतरतें आणि जर फार खाल्लें असेल तर तूप आणि टांकणखार प्यावा म्हणजे वीष उतरतें.

पुत्रजीवस्यमज्जांचनिष्कमात्रांगवांपयः ॥ पिष्ट्वापीत्वाग्रतरंहन्यान्नानायोगकृतंविषं ॥

टी० ॥ ॥पुत्रजीव वृक्षाचा नार चार मासे गाईचे दुधांत वाटून प्यावा; म्हणजे नाना प्रकारचे योगानें केलेलें अशा अति उग्र विषाचा नाश करील. ॥ गृहधूमंजलेपिष्ट्वातंदुलीमूलतुल्यकं ॥ कल्काच्चतुर्गुणंचाज्यंतस्मात्क्षीरंचतुर्गुणम् ॥ घृतशेषंपचेत्सर्वंपिबेत्सर्वगरापहम् ॥

टी० ॥ ॥घरोसा, तांदुळजाची मुळें, दोन्हीं समान पाण्यांत वाटून त्यांत त्याचे चौपट तूप घालून, त्याचे चौपट दूध घालून तूप शेष राहील तों पर्यंत आटवावें, आणि प्यावें; सर्व कृत्रीम विषाचा नाश करील.

शुद्धसूतंमृतंस्वर्णसंशुद्धंहेममाक्षिकम् ॥ त्रयाणांगं
धकंतुल्यंमृद्यात्कन्याद्रवैर्दिनम् ॥ तच्छुष्कंसमसितं क्षौ
द्रैर्मासिकंभक्षयेत्सदा ॥ वन्हिमूलश्रृतंक्षीरैरनुस्याद्गर
नाशनम् ॥

टी० ॥ ॥ शुद्ध पारा, सुवर्ण भस्म, सुवर्ण माक्षिक भस्म तिन्ही समभाग तिहींचे बरोबर गंधक घेऊन कोरफडीचे रसांत एक दिवस मर्दन करावें; शुष्क झाल्यावर एक मासापर्यंत मध, साखरे बरोबर खावें. नंतर चित्रक दुधांत शिजवून तें दूध प्यावें ह्मणजे विष नाश होतो.

## अथ सर्पदंश चिकित्सा

कपोतविण्मर्त्यशिरोरुहाश्चसगोविषाणंशिखिपि
च्छकाग्रं ॥ यवश्चधान्यंचतुषाश्चबीजंकार्पासजंवा
प्युषिताश्चमालाः ॥ इत्यौषधीभिः परिकल्पितोयंधूमो
गदस्याद्भुजगैरमुक्तः ॥ गृहेविधेयःकुशलैरनेननश्यं
तिसर्पाश्चतथाव्रणश्च ॥

टी० ॥ ॥ कपोत पक्षाची विष्ठा, मनुष्याचे केंश, गाईचें शिंग, मोराचे पिसाचा शेंडा, साळू, धणे, तूस, कापसाच्या सरक्या, शिळ्या माळा, यांचा धूप घरामध्यें करावा, तेणें करून सर्प आणि व्रण यांचा नाश होतो; आणि यांचे वासानें सर्प लांब पळतात. इति धूपः

त्वक्सप्तपर्णात्कुटजात्सनिंबाद्व्दामयोशीरनतानिता
प्यं ॥ रोध्रंविदध्यान्नवमंनवांगंमाचेतसंचूर्णमुदाहृ
रंति ॥ लोहेथहैमेत्वथराजतेवास्थितंसदोसद्मनि
भूपतीनां ॥ क्षौद्रेणलीढंसचराचराणिविषाणिहृ-
न्याद्भुविमानवानाम् ॥

टी० ॥ ॥ सातीण, कुडा, कडुलिंब यांची साल, नागरमोथे, कोष्ठ कोलिंजन वाळा, तगर, सुवर्णमाक्षीक, लोध यांचें चूर्ण करावें, त्याला माचेतस चूर्ण असें ह्मणतात. हें लोहाचे, किंवा सुवर्णाचें, किंवा रुप्याचे पात्रांत, राजे यांचा घरीं नेहमी असतें; मधा बरोबर चाटलें असतां मनुष्यांचीं स्थावर जंगम विषें नाश पावतात. इति माचेतसं चूर्णं.

श्लेष्मातकत्वक्कक्षवकंगुडूचीनृपद्रुमत्वक्बृहतीद्वयंच

एषोगदःसर्वविषाणिहन्त्यादास्तीकनाम्नामुनिनाप्रदिष्टः

टी० ॥ ॥ भोंकरीची साल, पांढरा आघाडा, गळवेल, बाहव्याची साल, रिंगणी, डोरली यांचें चूर्ण करावें हें औषध सर्व विषांचा नाश करील. हें आस्तीक मुनीनें सांगीतलें आहे.

कृकलासपदंयस्तसितवस्त्रेणवेष्टयेत्॥ बाहौबध्वा विषंहंतिविषंभक्ष्यानबाध्यते॥

टी० ॥ ॥ सरड्याचा पाय श्वेत वस्त्रांत गुंडाळून दंडाला बांधावा ह्मणजे वीष उतरतें, आणि जों पर्यंत दंडाला बांधलें आहे तों पर्यंत वीष खाल्हें तथापि बाधत नाहीं.

पारदंगंधकंतुत्थंटंकणंरजनीसमं॥ देवदाल्याद्रवैर्मर्द्यंदिनमेकंतुभक्षयेत्॥ कालवज्राशनिर्नामरसःसर्वविषापहः॥ नरमूत्रंपिबेच्चानुकालदष्टोपिजीवति॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, मोरचूत, टांकणखार, हळद, हीं समभाग देव डांगरीचे रसांत एक दिवस खलून भक्षण करावें, त्याला कालवज्राशनि रस म्हणतात, सर्व विषांचा नाशक आहे. त्या नंतर मनुष्याचें मूत्र प्यावें, काळ डसला तरी वांचेल. इति काल वज्राख्य रसः

जलेनलांगलीकंदंनस्यंसर्वविषापहम्

टी० ॥ ॥ पाण्यांत कळलावीचा कांदा उगाळून नस्य करावें, सर्व विष नाशक आहे.

कुष्ठंवचामदनकोशवतीफलेनसंयोजितंतदितिचूर्णमिदंचतुर्णां॥ गोमूत्रपीतमखिलाखुविषंनिहंति कोशातकीक्वथनमापिबतोथवापि॥

टी० ॥ ॥ कोष्ठ कोळिंजन, वेखंड, गेळफळ, कडु दोडकी, यांचें चूर्ण गोमूत्रांत घालून प्यावें, सर्व प्रकारचे उंद्राचें विष नाश पावतें तसाच कडू दोडकीचा काढा प्यालें असतां विष नाशक आहे.

रसंगंधंनिशाबंधुंगृहधूमंशिरीषजम्॥ बीजंदिनकरक्षीरैर्मर्दयित्वाविलेपनम्॥ विशेषान्मूषकविषंहन्याद्न्यान्विषोद्भवान्॥

टी० ॥ ॥ पारा, गंधक, कापूर, घरोसा, शिरस, हीं रुईचे चिकांत वाटून लेप करावा, ह्मणजे सर्व विषांचा नाशक, आणि विशेषें करून उंद्राचे विषांचा नाश

क आहे. ॥ शिलातालककुष्ठानीपिष्वानिर्गुंडिजद्रवैः
पानंमूषकदंष्ट्राणांदत्वातीव्रविषंहरेत् ॥
टी० ॥ ॥ मनशीळ, हरताळ, कोष्ठकोलिंजन, हीं निर्गुंडिचे रसांत खलून प्या वीं, उंद्राचें तीव्र विष हरण करील.

चिंचापलसमायुक्तंगृहधूमंपलार्धकम् ॥ पुराणाज्ये नसप्ताहंलिह्वाचाखुविषंहरेत् ॥
टी० ॥ ॥ चिंच चार तोळे, धरोसा २ तोळे, जुने तुपांत खलून ७ दिवस खावा, म्हणजे उंद्राचें वीष उतरेल.

## अथश्वानदंष्ट्राविषहरणं

पिष्वापामार्गमूलंतुकर्षैकंमधुनापिबेत् ॥ श्वानदंष्ट्रा विषंहन्यात्कुमारीदलसैंधवम् ॥ दंशस्थानेबंधयेत्तु त्रिदिनांतेसुखावहम् ॥
टी० ॥ ॥ आघाड्याचें मूळ एक तोळा कुटून मधा बरोबर खावें; आणि दंशाचे ठिकाणी कोरफडीचें पान, सैंधव - बांधावें, तीन दिवसांत कुत्र्याचे विषाचा नाश होऊन सुख होईल.

## अथरोगगणना

ज्वरोतिसारग्रहणीचार्शोजीर्णविषूचिका ॥ कृमिरुक्च तथापांडुःकामलारक्तपित्तकम् ॥ राजक्ष्माथकासश्चहि क्काश्वासस्तथैवच ॥ स्वरभेदारोचकेच छर्दिस्तृष्णाच मूर्छनम् ॥ पानात्ययस्तथादाहोन्मादभूताख्यउन्मदाः ॥ अपस्मारोवातरोगोवातरक्तंतथैवच ॥ ऊरुस्तंभा मवातोचशूलोन्योपरिणामजः ॥ आध्मानश्चउदा वर्तंगुल्मोहृद्रोगएवच ॥ मूत्रकृच्छ्रंतथामूत्राघाता श्मरिचशर्करा ॥ प्रमेहोमधुमेहश्चपिटिकामेदएवच ॥ उदरंचतथाशोफोवृषणवृद्धिरिरेवच ॥ गलगंड गंडमालापचिग्रंथ्यर्बुदानिच ॥ श्लीपदंविद्रधिश्चैव व्रणशोथस्तथैवच ॥ भग्नव्रणंनाडिव्रणंभगंदरोपदंश कः ॥ शूकदोषश्चकुष्ठंचशीतपित्तंतथैवच ॥ शीतवा तस्पर्शवातस्तथाम्लपित्तमेवच ॥ विसर्पश्च सविस्फो

टोमंसूरीस्नायकनामको॥ क्षुद्रास्यकर्णनासाक्षिशि
रोस्त्रीबालकामयाः॥ विषञ्चसंग्रहेत्वस्मिन्सचिकि
त्सं पृथक्पृथक्॥

टी० ॥ ॥ ज्वर १ अतिसार २ ग्रहणी ३ अर्शः ४ अजीर्ण ५ विषूचिका ६ कृमी ७ पांडु ८ कामला ९ रक्तपित्त १० राजयक्ष्मा ११ कास १२ हिक्का १३ श्वास १४ स्वरभेद १५ अरोचक १६ छर्दी १७ तृष्णा १८ मूर्छा १९ पानात्यय २० दाह २१ उन्माद २२ भूतोन्माद २३ अपस्मार २४ वातरोग २५ वातरक्त २६ उरुस्तंभ २७ आमवात २८ शूल २९ परिणाम शूल ३० आध्मान ३१ उदावर्त ३२ गुल्म ३३ हृद्रोग ३४ मूत्रकृच्छ्र ३५ मूत्राघात ३६ मूत्राश्मरी ३७ मूत्रशर्करा ३८ प्रमेह ३९ मधुमेह ४० पिटिका ४१ मेद ४२ उदर ४३ शोफ ४४ अंत्रवृद्धि ४५ मुष्कवृद्धि ४६ गलगंड ४७ गंडमाला ४८ अपची ४९ ग्रंथी ५० अर्बुद ५१ श्लीपद ५२ विद्रधि ५३ व्रणशोथ ५४ भग्नव्रण ५५ नाडीव्रण ५६ भगंदर ५७ उपदंश ५८ शूकदोष ५९ कुष्ठ ६० शीतपित्त ६१ शीतवात ६२ स्पर्शवात ६३ अम्लपित्त ६४ विसर्प ६५ विस्फोट ६६ मसूरिका ६७ स्नायक ६८ क्षुद्ररोग ६९ मुखरोग ७० कर्णरोग ७१ नासारोग ७२ अक्षिरोग ७३ स्त्रीरोग ७४ बालरोग ७५ विष ७६ इतके या ग्रंथांत चिकित्सासहीत पृथक् पृथक् सांगितले आहेत.

चिकित्सासारनामायंग्रंथः परमदुर्लभः॥ श्रीमद्गोपा
लदासेनवादींद्रेणचधीमता॥ परोपकारायपुण्याय
प्रयासेनचनिर्मितः॥ आलोक्यसुश्रुतंवृंदंहारितंचर
कंतथा॥ आत्रेयंवाग्भटंसिद्धसारसार्णववादिकम्॥
बहूनांग्रंथरत्नानांसारमुद्धृत्ययत्नतः॥ श्रुतंदृष्टंचानु
भूतंतत्सर्वंलिखितंमया॥ ग्राह्यंतत्कुशलैर्येषांसद्यः
सारोपयोगिकम्॥ नदूषयेद्ग्रंथरत्नंसमयेप्यभिरक्षकं॥

टी० ॥ ॥ चिकित्सासार या नामें करून अत्यंत दुर्लभ. श्रीमद्गोपालदासवादींद्र बुद्धिमान् त्याणें परोपकारार्थ, पुण्यार्थ प्रयासें करून निर्माण केला. आतां ते प्रयास सांगतों.

सुश्रुत, वृंद, हारित, चरक, आत्रेय, वाग्भट, सिद्धसारसार्णव इत्यादीक

रत्न भूत बहुत ग्रंथ अवलोकन करून त्यांतील सारभूत तेवढें य त्नानें काढून जें ऐकिलेलें, पाहिलेलें, आणि अनुभूत तें सर्व लिहि लें आहे; तस्मात् कुशल असतील त्याणीं सर्व ग्रहण करावें. तात्का ळ त्या पासून चांगला उपयोग घडेल, असें आहे.

त्या ग्रंथाला दूषण ठेऊं नये, कारण कीं, हा रत्नभूत आहे; आ णि वेळेस पाठ राखणारा आहे. (इतिश्रीमद्गोपालदासविरचितश्चि कित्सासारः समाप्तः

